## अहमदशहा बहमनी दुसरा [२] (५५३)

( २९४ ) अमीर बरीद याच्या ताब्यात फारच थोडा मुलख होता. आपण जर आपले स्वातंत्र्य जाहीर केले तर राज्यातील भोवतालच्या प्रदेशातील इतर सत्ताधीश (ज्यांनी यापूर्वीच आपले स्वातंत्र्य जाहीर केले होते) आपल्यावर हल्ला करतील या भीतीने त्याने महमूदशहाचा मुलगा राजपुत्र अहमद याला तख्तावर बसविले. त्याच्या ताब्यात त्याने राजवाडा आणि वापर करण्यासाठी म्हणून शाही जडजवाहिर दिले. उदरनिर्वाह करण्यासाठी रोजचा तनखा म्हणून द्रव्याची नेमणूकही त्याच्यासाठी करून दिली. परंतु रोजच्या खर्चासाठी हा तनखा अपुरा पडल्यामुळे त्याने बहमनी घराण्यातील सुलतान वापर करीत असलेला मुकुट मोडला आणि गुप्त-पणे त्यातील हिऱ्यांची विल्हेवाट लावली. या मुकुटाची किंमत ४ लक्ष होन एवढी होती. अमीर बरीद याला जेव्हा या परिस्थितीची जाणीव झाली तेव्हा त्याने या हिऱ्यांच्या विक्रीच्या भानगडीत असलेल्या अनेक गायक, नर्तक आणि इतर मंडळींना ठार मारले. परंतु या विकल्या गेलेल्या हिऱ्यांचा शोध लागून ते त्याच्या हाती कधीच लागले नाहीत. कारण हिरे खरेदी करणारे हिऱ्यांबरोबर केव्हाच विजयनगरकडे पळून गेले होते. अहमदशहाने गुप्तपणे आपले अनुचर इस्माईल आदिलशहा याजकडे पाठवून त्याच्याजवळ आपल्याला अमीर बरीद देत असलेल्या वाईट [२] (५५४) वागणुकीबद्दल तक्रार केली. इस्माईल आदिलशहाने आपले वकील नजराणा आणि हिजरी ९२७ } भेटीच्या वस्तू देऊन बिदरच्या दरबाराकडे पाठविले. परंतु ते इ. स. १५२० } येऊन पोहोचण्याच्या आत अहमदशहा दुसरा मरण पावला. सिंहासनावर आल्यानंतर दोनच वर्षांनी हिजरी ९२७ यावर्षी त्याचा मृत्यू झाला.

## अल्लाउद्दीनशहा बहमनी दुसरा [२] (५५५)

( २९५ ) अहमदशहाच्या मृत्यूनंतर १४ दिवसपर्यंत अमीर बरीद याने तख्तावर कोणाला बसविले नाही. परंतु त्यानंतर स्वतः तख्तावर बसण्याच्या ऐवजी बहमनी घराण्यातील एखाद्याच्या मस्तकावर राजमुकुट ठेवणे शहाणपणाचे आहे असे त्याने ठरविले. याप्रमाणे अल्लाउद्दीन दुसरा याची त्याने सुलतानपदासाठी निवड केली.

( २९६ ) अल्लाउद्दीनच हा स्वभावतःच अतिशय समजूतदार होता. आपल्या अगोदर गादीवर आलेल्या सुलतानांचा लंपटपणा आणि बदफैलीपणा याचे झालेले घोर परिणाम त्याने स्वतः बघितले होते. तेव्हा त्याने कोणत्याही बाबतीत अतिरेकीपणाचे वर्तन टाळले आणि अमीर बरीद याची सत्ता नामशेष करण्याचा त्याने विचार केला. अमीर बरीदबरोबर त्याने इतके सख्य जोडले की अमीर बरीद देखील काही काळ बेसावध झाला. अल्लाउद्दीनने त्यानंतर गुप्तपणे आपल्या निवासस्थानाजवळ सशस्त्र लोक विखरून ठेवले. दुसऱ्या चान्द्रमासाच्या दिवशी अमीर बरीद त्याला भेटण्यासाठी येणार होता तेव्हा त्याने त्याला कैद करण्याचा निश्चय केला. तत्कालीन रूढ असलेल्या प्रथेला

अनुसरून अमीर बरीद हा आपल्या मुलांसहवर्तमान सुलतानाचे अभिनंदन करण्यासाठी आला. अमीर बरीद हा जेव्हा अल्लाउद्दीनच्या निवासस्थानाच्या नजीक येऊन पोहोचला तेव्हा लपवून ठेवलेल्या लोकांपैकी एकाला शिंक आली.[२११a] अमीर बरीदला भीती वाटून तो साशंक झाला आणि पाठीमागे फिरून त्याने आपले रक्षक [ २ ] ( ५५६ ) वाटेत कोणी लपून बसले आहे किंवा काय हे शोधण्यासाठी पाठविले. अल्लाउद्दीनचा कट उघडकीस आला आणि त्यात सामील असलेल्या सर्वांची कत्तल करण्यात आली. अल्लाउद्दीनची सुलतानपदावरून उचलबांगडी करण्यात आली आणि त्याला बंदिवासात ठेवण्यात आले. बंदिवासात असतानाच काही कालावधीनंतर त्याचा खून करण्यात आला. अल्लाउद्दीनची कारकीर्द जेमतेम २ वर्षे आणि ३ महिने एवढी झाली.

## वलीउल्ला शहा बहमनी [ २ ] ( ५५७ )

( २९७ ) अल्लाउद्दीन शहा याला सिंहासनावरून पदच्युत केल्यावर अमीर बरीद याने महमूदशहा बहमनी याचा आणखी एक मुलगा वलीउल्ला याला सिंहासनावर बसविले. वलीउल्ला याला अमीर बरीद याने जो तनखा नेमून दिला त्यावर त्याने समाधान मानले आणि राज्यकारभाराच्या कोणत्याही बाबतीत ढवळाढवळ करण्याच्या भानगडीत तो पडला नाही. परंतु अखेर त्याच्यावर लादण्यात आलेल्या बंधनांमुळे त्याची वृत्तीही विचलित झाली आणि त्याने आपल्याला अधिक स्वातंत्र्य मिळावे यासाठी जारीने प्रयत्न सुरू केले. यावर अमीर बरीदने त्याला राजवाड्याच्या परिसरातच बंदिस्त करून ठेवले. वलीउल्लाला तख्तावर बसविल्यानंतर तीनच वर्षांनी त्याच्या राणीबद्दल अमीर बरीदच्या मनात पापवासना निर्माण झाली. अमीर बरीदने त्याला विषप्रयोग करविला आणि त्याच्या राणीशी विवाह केला.

## कलिमउल्ला शहा बहमनी [ २ ] ( ५५८ )

( २९८ ) वलीउल्लाच्या मृत्यूनंतर कलीमउल्ला शहा याला सुलतान म्हणून जाहीर करण्यात आले. कलीमउल्ला हा अहमदशहाला युसुफ आदिलशहाच्या मुलीपासून झालेला मुलगा. केवळ सुलतानाच्या नुसत्या नावाखेरीज कलीमउल्लाकडे दुसरे कोणतेही अधिकार नव्हते. आणि राजवाड्याच्या बाहेर पडण्याची परवानगी त्याला कधीही देण्यात येत नसे. हिजरी ९३३ यावर्षी बाबर बादशहाने दिल्ली शहर (हिजरी ९३३ इ. स. १५२६) जिंकून घेतले. यावर इस्माईल आदिलशहा, बुरहाण निजामशहा आणि कुतुबशहा यांनी त्याच्या दरबारात आपले वकील पाठविले. कलीमउल्ला याने देखील आपला एक अनुचर वेष पालटून देऊन बाबराच्या दरबारी एक अर्जी देऊन पाठविला. त्यात त्याने असे कळविले की आपले राज्य बळकाविले गेले आहे आणि बंडखोर नोकरदारांनी आपल्याला बंदिस्त करून ठेवले आहे. अशा या विपन्न परिस्थितीतून दिल्लीचे बादशहा जर आपली सुटका करतील तर त्यास आपण दौलताबाद आणि वऱ्हाडचा प्रांत तोडून देऊ. बाबरने जिंकलेल्या प्रांतात अजून स्थिरस्थावर झाली

नव्हतो. माळवा आणि गुजरातच्या सुलतानांचा अजून मोड व्हावयाचा होता. त्यामुळे बाबराने कलीमउल्लाच्या विनंतीकडे दुर्लक्ष केले. परंतु कलीमउल्लाने बाबर [२] (५५९) बादशहाला वरीलप्रमाणे अर्जी पाठविल्याचे अमीर बरीद याला कळले. तेव्हा त्याने कलीमउल्लाचा अधिकाधिक छळ करण्यास सुरुवात केली. तेव्हा कलीमउल्ला आपला चुलता विजापूरचा इस्माईल आदिलशहा याच्याकडे पळून गेला. त्याचे आदिलशहाने योग्य प्रकारे आदरातिथ्य केले. परंतु इस्माईल आदिलशहाच्या त्याच्याबरोबरील वागणुकीची त्याला चीड आली तेव्हा कलीमउल्ला हा अहमदनगरच्या बुरहाण निजामशहाच्या आश्रयाला गेला. पहिल्या प्रथम बुरहाण निजामशहाने त्याची इतकी बडदास्त राखली की कलीमउल्लाच्या पुढ्यात बुरहाण निजामशहा उभा राहात असे. परंतु त्याला जेव्हा असे सांगण्यात आले की त्याने जर असे केले तर त्याच्या शाही इतमामाला ते निश्चितपणे कमीपणा आणणारे आहे. यावर बुरहाण निजामशहाने वरील प्रथा बंद केली. कलीमउल्लाशहा स्वतःच्या मृत्यूपर्यंत अहमदनगरच्या आश्रयाला राहिला. त्याच्या मृत्यूबरोबर बहमनी घराणे संपुष्टात आले. परंतु खरी वस्तुस्थिती सांगायची झाली तर कलीमउल्लाच्या मृत्यूपूर्वीच दक्षिणेची विभागणी पाच राज्यांमध्ये झाली होती. ती राज्ये म्हणजे आदिलशाही अथवा विजापूरची सलतनत, कुतुबशाही अथवा गोवळकोंड्याची सलतनत, इमादशाही अथवा वऱ्हाडची सलतनत, निजामशाही अथवा अहमदनगरची सलतनत आणि बरीदशाही अथवा अहमदाबाद बिदरची सलतनत. या शाह्यांचा इतिहास पुढील खंडात देण्यात येईल. [२१२★]

## पुस्तक तिसरे

# प्रकरण तिसरे (चालू)

## अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा इतिहास

### मलिक अहमद निजामशहा

(१) अहमद [२१३□] निजामशहा हा [२१४□] मलिक नायब निजाम उलमुल्क बहरी याचा मुलगा. मलिक नायब हा मूळचा विजयनगरचा [३] (१८९) ब्राह्मण होता. त्याचे खरे नाव तिमाप्पा असे होते. त्याच्या बापाचे नाव भैरव.

अहमदशहा बहमनीच्या मुसलमान फौजेकडून तो कैद केला गेला. तो वयाने तेव्हा फारच कमी होता. त्यावेळी त्याला मुसलमान धर्माची दिक्षा देण्यात आली. त्याचे नाव हसन असे ठेवण्यात आले. राजवाड्यातील एक गुलाम म्हणून तो लहानाचा मोठा झाला. त्याच्या कर्तबगारीचा सुलतानावर एवढा प्रभाव पडला [ ३ ] ( १९० ) की त्याने हसनची आपला सर्वांत मोठा मुलगा राजपुत्र महमूद याच्या तैनातीत नेमणूक केली. राजपुत्र महमूद याच्याबरोबरच त्याचे शिक्षण झाले. फारसी आणि अरबी वाङ्मयावर त्याने असामान्य प्रभुत्व संपादन केले. त्याच्या वडिलांचे नाव भैरव असे होते त्यावरून त्याला मलिक हसन भैरव असे नाव पडले. परंतु राजपुत्राला या नावाचा उच्चार बरोबर करता येत नसे म्हणून भैरव या नावाचा बहरी असा अपभ्रंश झाला. ज्यावेळी राजपुत्र महमूद सिंहासनावर आला त्यावेळी त्याने मलिक हसन याला १००० घोडेस्वारांचा मनसबदार केले. असेही म्हणतात की त्याचे आडनाव बहरी असल्यामुळे–बहरी म्हणजे ससाणा –त्याची नेमणूक महमूदशहा बादशहाने बहिरी ससाणे घेऊन शिकार करणारा अधिकारी या जागेवर केली. तुर्की भाषेत या अधिकाराच्या जागेला खुषबेगी असे नाव आहे. काही लोकांनी असे ठामपणे सांगितले आहे की मलिक हसन बहरी याला बहरी हे नाव मिळाले ते तो या अधिकारावर होता म्हणूनच. कालांतराने तो राज्याच्या सर्वोच्च अधिकाराच्या जागेपर्यंत पोहोचला. सुलतानाने त्याला आश्रफ हुमायून आणि निजाम उलमुल्क ह्या पदव्या देऊन त्याचा सन्मान केला. मलिक हसनवर ख्वाजा जहान महमूद गावान याची अतिशय मर्जी होती. त्याने सुलतानापाशी अशी शिफारस केली की राजमहेंद्री आणि कोंडापल्ली-सहित तेलंगणाच्या सुभेदारीवर मलिक हसन याला नेमण्यात यावे. त्याप्रमाणे राजमहेंद्री आणि कोण्डापल्ली ही राज्ये त्याला जहागिरीदाखल देण्यात आली. महमूद गावानचा मृत्यू झाल्यानंतर मलिक हसन त्याच्या जागी अधिकारपदावर आला. त्याला मलिक नायब ही पदवी मिळाली. महमदशहा बहमनी याचा मृत्यू झाल्यावर त्याचा मुलगा सुलतान महमूद याचा मुख्य वजीर म्हणून मलिक हसनची नेमणूक करण्यात आली. त्याने वऱ्हाड आणि दौलताबाद नजिकच्या जिल्ह्यांची त्याच्या जहागिरीत भर घातली. या जहागिरीची व्यवस्था बघण्याचे काम मलिक नायबचा मुलगा मलिक अहमद याजकडे सोपविण्यात आले. तो जुन्नर मुक्कामी त्यानंतर राहू लागला. त्याचप्रमाणे ख्वाजा जहान दक्कनी याची नेमणूक परंड्याच्या सुभेदारीवर करण्यात आली. मलिक नायब याने आपला मुलगा [ ३ ] ( १९१ ) मलिक अहमद याला जहागिरीदाखल मिळालेले जिल्हे ताब्यात घेता यावे यासाठी योग्य ती शाही फर्माने मिळविलेली होती. तरी देखील ज्या मराठा अधिकाऱ्यांच्या ताब्यात ते जिल्हे होते ते त्यांनी सुलतान वयात येऊन आपला राज्यकारभार बघावयास लागेपर्यंत मलिक अहमदच्या ताब्यात देण्याचे नाकारले. या मराठा अधिकाऱ्यांवर ख्वाजा महमूद गावान याचा अतिशय विश्वास होता. मलिक अहमद

याने आपल्या हातातील हुकुमाची अमलबजावणी करण्याचा निश्चय केला. त्याने जुन्नरच्या ( शिवनेरी ) किल्ल्यावर हल्ला केला. हा किल्ला डोंगराच्या माथ्यावर बांधण्यात आलेला असून तत्काळी अतिशय अभेद्य म्हणून समजला जाई. वेढा बराच काळ चालल्यानंतर किल्ल्यावरील शिबंदीने तलवारी आपल्या गळ्यात अडकविल्या आणि आपल्या अंगावर कफन्या पांघरून ते किल्ल्याबाहेर आले आणि त्यांनी मलिक अहमदपाशी अभयाची याचना केली. मलिक अहमदने किल्ल्याचा ताबा घेतला. त्यावेळी किल्ल्यात साठवून ठेवलेली महाराष्ट्र आणि कोकण देशाच्या पाच वर्षांच्या जमीनमहसूलाची रक्कम मलिक अहमदच्या ताब्यांत आली. आपल्या ताब्यात आलेल्या रकमेचा फायदा घेऊन मलिक अहमद याने आपला वागण्याचा पवित्रा बदलला. आपले अधिकारी आणि शिपाई यांना त्याने त्यांनी केलेल्या चाकरी-बद्दल भरपूर बक्षिशी दिली. त्याच्या अधिकारापुढे पुढे नमूद केलेल्या किल्ल्यांच्या अधिकाऱ्यांनी मान झुकविली नव्हती. त्यांचा पाडाव करण्यासाठी त्याने कूच केले. ते किल्ले म्हणजे चावंड, लोहगड, तुंग, कोआरी, तिकोणा, कोंडाणा, पुरंदर, भोरप, जीवधन, कुहरदुर्ग, मुरंजन, महोली आणि पाली. हे सर्व किल्ले त्याने बळाचा वापर करून आपल्या ताब्यात घेतले. त्यानंतर काही काळाने त्याने कोकणचा सर्व प्रांत जिंकून घेतला आणि नंतर तो दंडराजापूर या सागरीबंदराला वेढा घालून बसला असताना आपला बाप मलिक नायब निजामउलमुल्क बहरी याचा खून झाल्याची हकीकत त्याच्या कानावर आली. [२१५८] ही बातमी कळताच त्याने तूर्तास वेढा उठविण्याचे ठरविले आणि तो जुन्नरला परतला. तेथे त्याने [ ३ ] ( १९२ ) आपल्या बापाच्या सर्व पदव्या धारण केल्या आणि तो स्वतःला अहमद निजाम उल्मुक बहरी या नावाने संबोधू लागला. जरी त्याने सुलतान ही पदवी ताबडतोब धारण केली नाही तरी इतिहासकार त्याचा एकमुखाने सुलतान असाच उल्लेख करतात. म्हणून मी ग्रंथाचा लेखक ( महमद कासीम अस्त्राबादी फरिश्ता ) मलिक अहमद याचा उल्लेख या ग्रंथाच्या पुढच्या पानात अहमद निजामशहा बहरी असा करण्याचे ठरविले आहे. त्याला या नावाने संबोधणे हेच माझ्या दृष्टीने योग्य आहे.

( ४ ) मलिक अहमद जुन्नर येथे परतल्यानंतर त्याने पुष्कळ दिवस आपल्या बापाच्या मृत्यूबद्दल शोक करण्यात आणि त्याची उत्तरक्रिया करण्यात घालविले. बापाच्या मृत्यूचे सुतक संपल्यानंतर त्याने आपले लक्ष देशाचा कारभार चांगल्या तऱ्हेने व्हावा याबद्दल उपाययोजना करण्याकडे दिले. तो न्यायाच्या कामात इतका निष्ठुर होता की त्याच्या हुकमाशिवाय पोलाद हे लोखंडाला आकर्षून घेण्यास असमर्थ ठरे आणि त्याचप्रमाणे कहरबाची गवतावरील सत्ता नाहीशी होत असे. याचा अर्थ असा की मलिक अहमदच्या हुकमाशिवाय इकडचे पान तिकडे हलत नसे किंवा कोणाचीही दुसऱ्याला लुबाडण्याची हिंमत होत नसे. मलिक अहमद उत्तमपैकी सेनानी

होता. त्याच्याकडे जेव्हा तेलंगणाचा कारभार सोपविण्यात आला तेव्हा ओरियाच्या राज्याकडून होणारे हल्ले परतवून लावण्यात लष्करीदृष्ट्या त्याच्या अंगी असलेले असामान्य कौशल्य दृष्टोपत्तीस आले. त्याचा परिणाम असा झाला की बहमनींच्या दरबारातील सर्वांची इच्छा जरी त्याच्या सत्तेचा नाश करावा अशी होती तरी बहमनी सरकारचा कोणताही अधिकारी त्याच्याविरुद्ध चाल करून जाण्यास तयार होईना. आपला मुख्य वजीर कासीम बरीद याच्या सल्ल्यावरून बहमनी सुलतानाने वारंवार विजापूरच्या युसुफ आदिलखान सवाई याला हुकूम पाठविले की तुम्ही ख्वाजा जहान दक्नी आणि जैनउद्दीन तालीश यांजबरोबर मिळून जुन्नरवर चाल करून जा. परतु युसुफ आदिलखानाने आपले कर्तव्य टाळले. इतकेच नव्हे तर अहमद निजामशहाला त्याच्यावर कोसळणाऱ्या संकटाची जाणीव देऊन सावध केले. त्याच-प्रमाणे इंदापूर हे गाव त्याच्या खुद्द जहागिरीच्या मुलुखात [३](१९३) मोडत असताना देखील त्याने आपल्या फौजेला ते खाली करण्याचा हुकूम दिला.

(३) अहमद निजामशहाने जरीफ उलमुल्क अफगाण याला आपला अमिर उलउमरा केले आणि नासिरउल्मुल्क गुजराती याच्याकडे त्याने मिरजुम्ला या २१६□
पदाचे अधिकार सोपविले. यापूर्वी त्याच्यावर जैनुद्दीन अली तालिश चाल २१७□
करून आला होता त्याच्याकडे त्याने तहाची बोलणी सुरू केली आणि त्याला असे कळविले की बहमनी सत्तेविरुद्ध मला आता जो लढा द्यावयास लागणार आहे त्यामध्ये तुम्ही मला सामील होऊन या लढ्यात बहमनींविरुद्ध आपली संयुक्त आघाडी उघडण्यास मला मदत करा. जैनुद्दीन याने या योजनेबद्दल लक्षपूर्वक विचार केला आणि मलिक अहमदची इच्छा पुरी करण्याच्या दृष्टीने त्याने काही पावलेही टाकली. दरम्यान बहमनींचा एक अधिकारी शेख मुवालिद अरब याने अहमद निजामशहाचा पाडाव करण्याचे कामी आपली नेमणूक होण्याबद्दल जेव्हा तयारी दाखविली आणि त्या हेतूने कूच करित तो जेव्हा जुन्नरच्या दिशेने येत असताना परंड्याला येऊन दाखल झाला तेव्हा मलिक अहमद निजामशहा याला आपण जाऊन मिळाल्यास त्याच्या होणाऱ्या भयानक परिणामाची त्याला भिती वाटली आणि त्याने सुलतानाच्या सैन्याला मिळण्याचे ठरविले. अहमद निजामशहाने आपला जनाना शिवनेरीच्या अभेद्य दुर्गावर पाठीमागे ठेवला आणि बहमनींच्या सैन्याला तोंड देण्यासाठी त्याने कूच केले. परंतु सरळसरळ सामन्यात आपल्यापेक्षा संख्येने अधिक असलेल्या बहमनींच्या फौजेबरोबर तोंड देण्यास आपली ताकद अपुरी पडेल असे त्याला वाटले. तेव्हा त्याने बादशाही छावणीभोवती आपले घोडदळ घेऊन घिरट्या घालण्यास सुरुवात केली आणि त्यांची रसद त्याने मारली. या सुमारास त्याला प्रथमच असे कळले की जैनुद्दीन अली तालिश हा आपला पक्ष सोडून शत्रूपक्षाला जाऊन मिळण्याच्या विचारात आहे. अली तालीश आणि सुलतानाची फौज यामध्ये

हातमिळवणी शक्यतोवर होऊ न देण्यासाठी प्रयत्न करण्याचे, हे कळताचक्षणी त्याने ठरविले. तेव्हा त्याने अतिशय धाडसाचा असा एक व्यूह कृतीत आणण्याचे ठरविले. त्याच्या ह्या बेतात त्याला अमाप यशाची प्राप्ती झाली. त्याने अचानक सुलतानाच्या फौजेच्या छावणीजवळून एका रात्री उलट दिशेने कूच केले आणि तो जैनुद्दीन याचे मुख्य ठाणे आणि जहागिरीचे गाव चाकण येथे दाखल झाला. तेथे [ ३ ] ( १९४ ) क्षणभरही विश्रांतीसाठी न थांबता त्याने झपाट्याने हल्ला करून चाकण काबीज केले. चाकणच्या किल्ल्याच्या भिंती चढून जाण्यात अहमदने तटावर प्रथम पाऊल ठेवले आणि आपल्या बरोबरीच्या १७ सशस्त्र अधिकाऱ्यांना, किल्ल्यावरील शिबंदीला धोक्याचा इशारा पोहोचण्याचे आगोदरच, तो वर घेऊन गेला आणि किल्ल्यात पाय रोवून बसण्याचे कामी यशस्वी झाला. त्याच्या बरोबरची इतर माणसे पाठोपाठ तट चढून आत घुसली आणि मग सर्रास कत्तलीला सुरुवात झाली. किल्ल्यावरील शिबंदीने प्राणपणाने लढा दिला पण त्यांचे शौर्य वाया गेले. अहमद निजामशहाने चाकण घेतले. जैनुद्दीन अलीसह एकंदर ७०० पर्यंत माणसे या हल्ल्यात कामास आली.

( ४ ) अहमद निजामशहाने आपल्या सैन्याचा मुख्य विभाग आपला सेनापती नासिर उलमुल्क गुजराती याचे अधिपत्याखाली शेख मुवालिद याच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठी नियुक्त केला होता. नासिर उलमुल्क याने दोन वेळा आपल्यापेक्षा संख्येने अधिक असलेल्या बहमनींच्या फौजेवर अविचाराने हल्ला करण्याचे धाडस दाखविले आणि दोन्ही वेळा त्याचा पराभव झाला. ही बातमी कानावर येताच अहमद निजामशहाने चाकण सोडले आणि आपल्या सैन्याला मिळून त्याने शेख मुवालिदच्या छावणीवर रात्रीच्या वेळी हल्ला चढविला. बहमनींच्या फौजेचा पूर्णपणे पराभव झाला. त्यांचा सेनापती आणि त्यांचे इतर अनेक नावाजलेले अधिकारी धारातिर्थी पतन पावले. बहमनींच्या सैन्याचे सर्व जड सामान-सुमान, हत्ती आणि राहुट्या अहमद निजामशहाच्या हाती पडली. अहमद निजामशहा या विजयानंतर जुन्नरला परतला आणि आपल्या राज्याच्या मुलकी राज्यकारभाराकडे त्याने जातीने लक्ष घालण्याचे कामी आपल्याला वाहून घेतले.

( ५ ) शेख मुवालिद याच्या पराजयानंतर महमूदशहा बहमनीने अजमत उल्मुल्क डबीर याला दुसरे १८००० चे सैन्य देऊन अहमद निजामशहा विरुद्ध रवाना केले. अहमद शहाने पूर्वीप्रमाणेच आपले धोरण ठेवले. समोरासमोर लढाई देण्याचे त्याने टाळले आणि आपल्या फौजेसहित तो कदुराबादच्या डोंगराळ मुलखांत जाऊन बसला. [२१८८] अजमतउल्मुल्क हा जेव्हा मुरीघाटाजवळ पोहोचला [ ३ ] ( १९५ ) तेव्हा अहमद निजामशहाने ३००० घोडेस्वार घेऊन झपाट्याने अहमदाबाद बिदरच्या दिशेने कूच केले. शहराचे रखवालदार त्याने यापूर्वीच आपल्या बाजूला मिळवून घेतले असल्यामुळे त्यानी अहमदशहाला रात्रीच्या वेळी प्रवेश देऊन शहरात घेतले. अहमद-

शहाने आपल्या बापाच्या जनान्यातील बायकामंडळींचा ताबा घेतला आणि त्याना त्याने जुन्नरकडे पाठवून दिले. सकाळी त्याने आपल्यावर चाल करून आलेल्या सर्व अधिकाऱ्यांच्या बायकांना पकडले आणि त्यांना घेऊन तो परंड्याच्या दिशेने निघाला. वाटेमध्ये त्या सर्व स्त्रियांची आदब राखली जाईल याची सर्वप्रकारे काळजी त्याने घेतली. बहमनी सुलतानाच्या सैन्याच्या जेव्हा तो जवळ येऊन पोहोचला तेव्हा या अधिकाऱ्यांनी त्याच्याकडे शब्द पाठविला की शत्रू म्हणून तुम्हाला प्रतिकार करण्याचा विचारच आम्ही करू शकत नाही कारण तुम्ही आमच्या जनान्याला अतिशय सन्मान-पूर्वक अशी वागणूक दिलेली आहे. परंतु एकाद्या चोरासारखे आपल्या शत्रूपासून पळून जाणे आणि स्त्रिया व मुले यांजबरोबर लढाई करणे हे तुम्हाला शोभून दिसत नाही. अशा तऱ्हेचे वर्तन फिरंगी आणि कुर्द यांच्या दृष्टीने देखिल तिरस्करणीय ठरेल. यावर अहमद निजामशहाने उदारपणे आपल्या हाती असलेल्या स्त्रियांची त्यांच्या नातेवाईकांकडे रवानगी केली आणि परंड्याच्या दिशेने तो चालून गेला. दरम्यान बहमनीसुलतानाकडून बहमनी सरदारांच्या छावणीत त्यांच्या वर्तनावर कडक टीकेचे कोरडे ओढणारा असा खलिता येऊन पोहोचला. त्याने त्यात अशी तक्रार केली होती की माझा बहिरीससाण्यासारखा अधिकारी निजामउल्मुल्क याचा मुलगा अहमद याला तुम्ही ससाण्यासारखे अस्मानात उंच उड्या मारू देत आहा आणि माझ्या फौजेला मात्र अतिशय अपमानास्पद वागणूक मिळावी ह्याची मला आतिशय खंत वाटते. त्याच्या भरारीकडे पाहून आपापल्या घरट्यात जणू काही माझे सैनिक थरथरा कापत पडले आहेत. त्याच्या तीक्ष्ण नखरूपी हल्ल्याच्या प्रहारांपासून त्यांना आपली मुलेबाळे आणि जनाना यांचे संरक्षण करणे देखील अशक्य होऊन बसले आहे. अशा परिस्थितीत अहमदला पकडणे तुम्हाला शक्य झाले तर बरे [३] (१९६) आणि चांगले होईल यात काहीच शंका नाही. परंतु त्यात तुम्हाला अपयश आले तर माझ्यापुढे आणि जगातील लोकांच्या दृष्टिकोनातून तुम्ही साफ साफ उतराल यात काहीच प्रत्यवाय नाही. बहमनींच्या सैन्याने बीडला मुक्काम केला. सैन्यातील अधिकाऱ्यांनी आपल्यावर ठेवण्यात आलेल्या ठपक्याबद्दल तक्रार केली आणि बादशहाला असे जाहीरपणे कळविले की, " शत्रू ज्या ठिकाणी आम्हाला मिळेल त्या ठिकाणी त्याच्यावर हल्ला करण्याची आमची तयारी आहे. परंतु आमचा सेनापती अजमत उल्मुल्क याला अहमदच्या हालचाली काय आहेत याबद्दल कसलाच कयास घेता येत नाही. जर दुसऱ्या एखाद्या सेनापतीची त्याच्या जागी नेमणूक झाली आणि अशा सेनापतीने आमच्या अंगी असलेल्या कर्तृत्वाला वाव देण्याची संधी दिली तर तुमच्या सुभाग्याच्या नुसत्या प्रभावानेच आमच्या यशाची निश्चिती होईल. " यावर महमूद शहाने अजमत उल्मुल्क याला परत बोलविले आणि त्याचे जागी बीडच्या सैन्याचे अधिपत्य स्वीकारण्यासाठी म्हणून तेलंगणाचा सुभेदार जहांगीर खान याला ३००० घोडेस्वार देऊन रवाना केले. जहांगीर खानाने यापूर्वी निरनिराळ्या कामगिऱ्या

बजावून प्रसिद्धी मिळविली होती. त्याने बीड येथे येऊन सैन्याचा ताबा घेतला आणि आपली छावणी परंड्याकडे हलविली. परंड्याचा सुमेदार ख्वाजाजहान याची अहमद निजामशहाला विरोध करण्याची इच्छा नव्हती. त्याने आपला मुलगा आजमखान याला अहमद निजामशहाला जाऊन मिळण्यासाठी रवाना केले आणि तो स्वतः परंडा किल्ल्याचा आश्रय घेण्यासाठी निघून गेला.

(६) अशी परिस्थिती असताना अहमद निजामशहाने वऱ्हाडचा सुलतान इमादउलमुल्क गावली याच्याकडे मदतीसाठी मागणी केली आणि त्याने जुन्नरच्या दिशेने माघार घेतली. दरम्यान जहांगीर खानाने पैठणचा ताबा घेतला. जहांगीर-खानाच्या या हालचालीमुळे अहमद निजामशहाने जेऊर घाटाच्या तोंडाशी तळ बसवून राहण्याचे ठरविले. त्या ठिकाणी त्याला कदुराबादहून [२१९] सैन्याची एक तुकडी आणि कुमक लादून आणलेला एक तांडा यासह नासिरउलमुल्क गुजराती हा येऊन मिळाला. आपली बाजू अशा तऱ्हेने बळकट झाल्यावर अहमद निजामशहाने जेऊरच्या खिंडीचा ताबा घेतला आणि तो जवळ पासच्या डोंगरातच ठाण मांडून बसला. जहांगीरखानाने तीस गाव [ ३ ] (१९७) घाटाच्या [२२०] मार्गे डोंगराळ भाग पार केला आणि त्याने भिंगार या गावाजवळ छावणी दिली. तेथे दोन्ही फौजा एक महिन्यापर्यंत समोरासमोर ६ कोस अंतरावरतळ देऊन राहिल्या. त्यानंतर पावसाळा सुरू झाला. पावसाळ्यात आपल्याला काही धोका नाही असे समजून जहांगीरखानाने [२२१] चैन आणि ऐषआराम करण्यास सुरुवात केली. त्याचा कित्ता त्याच्या सैन्यातील प्रत्येकजणाने गिरविण्यास सुरुवात केली.

(७) दरम्यान अहमद निजामशहाने शत्रूच्या सैन्याच्या परिस्थितीसंबंधी इत्थंभूत

रज्जब ३<br>हिजरी ८९५<br>मे २८<br>इ. स. १४९०

बातमी मिळविली आणि नंतर त्याने ३ रज्जब [२२२] हिजरी ८९५ या दिवशीच्या रात्री आजमखानाला बरोबर घेऊन शत्रूच्या छावणीवर हल्ला केला. दिवस उजाडता उजाडता ते शत्रूच्या छावणीत शिरले आणि त्यांनी शत्रूवर एकाएकी छापा घातला. या अचानक झालेल्या हल्ल्यात बहमनी सैन्याचा पार मोड झाला. जहांगीरखान, सय्यद इसाक, सय्यद लुतफुल्ला निजामखान आणि फत्तेखान वगैरे सर्व नामांकित अधिकारी ठार मारले गेले. ज्याना ज्याना अहमदशहाने कैद केले त्या त्या सर्वांना त्याने म्हशीवर बसविले आणि शिपायांच्या करमणुकीखातर त्या सर्वांची त्याने छावणीभर धिंड काढली. त्यानंतर त्याने त्या सर्वांची रवानगी अहमदाबाद बिदर इकडे केली. ह्या विजयाला अहमद निजामशहाने बागेचा विजय असे नाव दिले कारण त्या जागी अहमदशहाने एक राजवाडा बांधला आणि वाड्यासभोवार सौंदर्य-विभूषित अशी बाग त्याने तयार केली. त्याच्या वंशजांनी त्या बागेच्या सौंदर्यात अधिक भर घातली आणि त्या बागेसभोवार एक तटबंदी बांधून त्यांनी त्या बागेला बाग निजाम [२२३] असे नाव दिले. या विजयानंतर अहमद निजामशहाने जाहिररित्या

परमेश्वराची प्रार्थना करून आभार मानले. ज्या जागेवर त्याला विजय [ ३ ] (१९८) मिळाला होता त्या जवळील एका खेड्याचे वतनकीचे हक्क दान म्हणून अवलिये आणि फकीर यांच्या रहाण्याच्या खर्चासाठी म्हणून त्याने नेमून दिले. अशा तऱ्हेने अहमदशहाला कोणी प्रतिस्पर्धी अगर शत्रू राहिला नाही. वरील घटनेनंतर अहमदशहा जुन्नरला परतला. यानंतर विजापूरचा युसुफ आदिलशहा याच्या सल्ल्यावरून त्याने लगोलग खुत्ब्यामधून बहमनी सुलतानांची नावे गाळून टाकली आणि त्याजागी आपले स्वतःचे नाव बदली म्हणून घातले. यानंतर त्याने सुलतानपदाची निदर्शक शुभ्र छत्रचामरे धारण केली. परंतु यावर ख्वाजा जहान आणि त्याच्या स्वतःच्याच काही अधिकाऱ्यांनी विरोध दर्शविला. तेव्हा खुत्ब्यामधून आपले नाव घेतले जाऊ नये असा फेरहुकूम त्याने दिला. या एकंदर प्रकरणात त्याला जी माघार घ्यावी लागली तीमध्ये आपली मानहानी झाली असे तर होऊ नये म्हणून त्याने असे जाहीर केले की मी जे छत्रचामर धारण केले ते मी स्वतंत्र सुलतान झालो याबद्दल द्वाही फिरविण्यासाठी म्हणून नसून उन्हापासून माझे संरक्षण व्हावे म्हणून. अहमदशहाच्या अधिकाऱ्यांनी यावर विचार करून ठरविले की एकंदर गोष्ट जरी अशी आहे तर आम्ही जर छत्र वापरले तर त्याला विरोध होऊ होऊ नये. ही गोष्ट अहमदशहाने मान्य केली. त्या दिवसापासून तो आतापर्यंत दक्षिण देशात सुलतान आणि त्याचे प्रजाजन यांच्यामध्ये याबाबतीत तरी छत्राच्या रंगाची एक बाब जर सोडून दिली तर कोणताही भेदभाव आपल्याला आढळून येत नाही. सुलतान वापरत असलेले छत्र आतून शेंदरी रंगाचे असते तर सर्वसामान्य प्रजाजनांच्या बाबतींत त्याचा रंग पांढरा असतो. ही पद्धत फक्त दक्षिण देशातच आपल्याला दिसून येते. परंतु हिंदुस्थानात आपल्याला ही पद्धती आढळून येत नाही. [२२४ब] यानंतर थोडे दिवस गेल्यानंतर अहमद निजामशहाच्या दरबारातील अधिकाऱ्यांनी त्याला असा आग्रह केला की आपण खुत्ब्यामध्ये आपल्या नावाचा उल्लेख यापुढे करून त्या रूपाने राजचिन्हे धारण करावी. अहमद निजामशहाने या गोष्टीला आपली संमती दिली आणि तो म्हणाला की तुम्ही ही विशिष्ट मागणी करीत आहा त्यामुळेच मी राजचिन्हे धारण करण्यास माझी संमती देत आहे.

(८) या घटनेनंतर चौल जवळ असलेले दंडराजापूर हे सागरी बंदर घेण्याचे अहमद निजामशहाने ठरविले. बराच काळ वेढा चालल्यानंतर बंदर [ ३ ] ( १९९ ) त्याच्या हस्तगत झाले. अशा तऱ्हेने कोकण देशाचा शांत मुलुख आपल्या ताब्यात आणल्यानंतर त्याने आपले विचार दौलताबाद जिंकून घेण्याकडे वळविले. त्या शहराच्या सुभेदाराने शहर आपल्या हाती सुपूर्द करावे म्हणून त्याने त्याच्याजवळ अंतस्थ कारस्थाने करण्यास सुरुवात केली. ( किल्ल्याचा सुभेदार ) मलिक वुजी आणि त्याचा भाऊ मलिक अश्राफ हे दोघे सुरुवातीस ख्वाजा महमूद गावान याच्या चाकरमान्यापैकी होते. त्याच्या मृत्यूनंतर ते दोघेजण महमूदशहा बहमनीच्या शिलेदारांच्या फलटणीत सामील झाले. अहमद निजामशहाचा बाप मलिक हसन निजाम उलमुल्क

बहरी याच्या आश्रयाखाली ते असताना सरतेशेवटी त्यांना अमीरकीच्या पदावर बढती देण्यात आली. मलिक हसन याने मलिक वुजी याला दौलताबादचा सुभेदार नेमले आणि दौलताबादच्या अधिपत्त्याखाली असलेल्या आजूबाजूच्या जिल्ह्यांचा सुभेदार म्हणून त्याने मलिक वुजी याचा भाऊ मलिक अश्राफ याची नेमणूक केली. बहमनींच्या दरबारात यापूर्वी जी अंदाधुंदी माजली होती तिचा फायदा एका मराठा अधिपतीने घेतला आणि गाळण्याचा किल्ला त्याने बळकविला. परंतु मलिक अश्राफ याने तो किल्ला आपल्या हवाली करण्यास त्याला भाग पाडले इतकेच नव्हे तर त्या मराठा अधिपतीच्या गाळण्या सभोवतालच्या मुलुखात लुटालुट करण्यासाठी ज्या स्वाऱ्या होत त्याही मलिक अश्राफ याने बंद पाडल्या. या दोघा भावांनी आपला कारभार इतक्या चोख रितीने चालविला की दौलताबादच्या आसमंतात कुप्रसिद्ध असलेल्या दरोडेखोरांना त्यांनी वठणीवर आणले. अगदी प्रथमच सुलतानपूर, नंदूरबार, बागलण आणि गुजरात यांच्या सरहद्दीकडे जाणारे रस्ते व्यापारी आणि प्रवासी यांना इकडून तिकडे जाण्यास अतिशय सुरक्षित झाले. या रस्त्यावर पहारा देण्याची आता जरुरी उरली नाही. त्या देशातील रहिवाशी या भावांच्या राज्यकारभारामुळे इतके सुखी झाले की त्या प्रदेशाला समृद्धीची एक आगळी कळा प्राप्त झाली. २२५ □ निजाम उलमुल्क याच्या आश्रयामुळे आपल्याला जे वैभव प्राप्त झाले त्याच्या कृतज्ञतेच्या पोटी त्या दोघा भावांनी त्याचा मुलगा अहमद निजामशहा [ ३ ] ( २०० ) याच्याबरोबर अत्यंत मैत्रीचे संबंध ठेवले. ही मैत्री अधिक बळकट व्हावी हा हेतू मनात धरून अहमद निजामशहाने बाग निजामच्या विजयप्राप्तीनंतर आपली बहीण बिबी जीनत हीचे मलिकवुजी याजबरोबर लग्न लावून दिले. मलिकवुजी याला या लग्नापासून एक मुलगा झाला. मलिक वुजीचा धाकटा भाऊ मलिक अश्राफ याची मलिक वुजीनंतर सुभेदारीच्या पदावर येण्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याच-प्रमाणे आपले स्वतंत्र राज्य स्थापावे हा हेतूही त्याच्या मनात होता. मलिक वुजीला मुलगा झाल्यामुळे आपल्या मनातील आशांचा पार चक्काचूर झाला आहे असा विचार त्याच्या मनात आला आणि त्याने अतिशय क्रूरपणे मलिक वुजी आणि त्याचा मुलगा या दोघांचाही खून केला. यानंतर त्याने दौलताबाद येथे आपले स्वातंत्र्य जाहिर केले आणि बुरहाणपूर, गुजरात आणि वऱ्हाड येथील सुलतानांबरोबर एकजुटीचा तह करण्याचे प्रयत्न केले. आपला नवरा आणि मुलगा यांचा खून झाल्यावर बिबी जीनत ही जुन्नरकडे पळून गेली आणि तिने आपला भाऊ अहमद निजामशहा याचा आश्रय घेतला. त्याने हिजरी ८९९ यांवर्षी दौलताबादवर मलिक अश्राफ विरुद्ध चाल केली.

हिजरी ८९९ इ. स. १४९३ त्याचे सैन्य बाग निजाम येथपर्यंत जेमतेम पोहोचले. तेथे त्याला कासीम बरीदने पाठविलेली पत्रे मिळाली. या पत्रात कासीम बरीद याने असे कळविले होते की युसुफ आदिलखान याने बिदरला वेढा दिला आहे. तुम्ही त्याच्या विरुद्ध मदत करण्यासाठी ताबडतोब निघून या. आपण माझ्या

मदतीस आल्यास दौलताबाद जिंकून घेण्याचे कामी मी आपल्याला मदत करीन. यावर अहमद निजामशहाने दौलताबाद जिंकून घेण्याचा आपला बेत तूर्तास रद्द केला आणि त्याने बिदरकडे कूच केले. बिदरचा वेढा त्याने कशा तऱ्हेने उठविला याची हकीकत युसुफ आदिलशहाच्या कारकिर्दीच्या इतिहासात निवेदन केलेली आहेच. त्यानंतर त्याने दौलताबादकडे कूच केले. दौलताबादच्या किल्ल्याला त्याने २ महिनेपर्यंत वेढा दिला पण त्याच्या पदरात यश पडले नाही. म्हणून तो जुन्नरकडे परत फिरला.

(९) कूच करत करत तो भिंगार या खेड्याजवळ येऊन पोहोचला. भिंगार हे खेडे जुन्नर आणि दौलताबाद येथून सारख्या अंतरावर वसलेले आहे. तेथे त्याने आपल्या राज्याची राजधानी स्थापन करण्याचे ठरविले. या ठिकाणाहून दौलताबादचा किल्ला त्याच्या हाती पडेतोपर्यंत दौलताबादच्या आजूबाजूच्या मुलखाची लुटालूट आणि जाळपोळ करण्यासाठी दरसाल आपल्या [३] (२०१) फौजेची रवानगी करण्याची योजना त्याने आखली. हा हेतू मनात धरून सीना नदीच्या तीरावर हिजरी ९०० यावर्षी बाग निजामच्या नजीक त्याने आपल्या राजधानीचे शहर बांधण्यासाठी मूहूर्तमेढ रोवली. या शहराला त्याने अहमदनगर असे नाव दिले. सुलतान आणि त्याचे आश्रित यांनी इमारती उभारण्याचे कामी इतके सख्त परिश्रम केले की केवळ दोन वर्षांच्या अवधित एका नव्या शहराची स्थापना झाली. शोभा आणि सौंदर्याच्या बाबतीत बगदाद आणि कायरो या शहरांनाही अहमदनगर शहराने मागे टाकले. यानंतर वर्षातून दोनदा, ठरलेल्यावेळी अहमदनगरच्या सैन्याची अशी प्रथाच पडून गेली की त्यांनी अहमदनगरहून निघावे आणि दौलताबाद शहराची उपासमार होऊन ते आपल्या हाती पडावे म्हणून दौलताबादच्या आसपासचा प्रदेश त्यांनी उद्ध्वस्त आणि लुटालूट करून फस्त करावा. दरम्यान मलिक अश्राफ याने गुजरातचा सुलतान महमूदशहा बेगाडा याच्याकडे मदतीची याचना केली. हिजरी ९०५ यावर्षी त्या सुलतानाने खानदेशचा सुलतान आदिलखान फारूकी याला वठणीवर आणण्याच्या आणि अहमद निजामशहाने दौलताबाद शहरास दिलेला वेढा उठविण्याचा असे दोन उद्देश मनात धरून आपल्या राज्यातून कूच केले. गुजरातचे सैन्य सुलतानपूर शहराजवळ येऊन पोहोचल्यानंतर आदिलखान फारूकीने इमाद उलमुल्क गावली आणि अहमद निजामशहा यांचेकडे महमूदशहा बेगाडा याचा प्रतिकार करण्यासाठी मदतीची याचना केली. यावर अहमदशहाने दौलताबादचा वेढा उठविला आणि १५००० घोडेस्वार घेऊन बुराहाणपुरच्या दिशेने कूच केले. [३] (२०२) आदिलखान फारूकी, इमाद उलमुल्क गावली आणि अहमद निजामशहा बहरी यांच्या संयुक्त फौजांनी बुरहाणपूर येथे आपला तळ दिला. त्यावेळी महमूदशहा बेगाडा असीरच्या किल्ल्यासमोर होता. अशी परिस्थिती असताना अहमद निजामशहाचा सेनापती नासिर उल्मुल्क गुजराती याला शत्रूच्या छावणीत वकील म्हणून पाठविण्यात

हिजरी ९०० } इ. स. १४९४

हिजरी ९०५ } इ. स. १४९९

आले. तो तिकडे गेला असताना त्याने अहमद निजामशहाच्या सांगण्यावरून गुजरातच्या सैन्यातील माहुताला लाच दिली आणि ठराविक वेळी गुजरातच्या सैन्यातील एका माजलेल्या हत्तीला मोकाट सोडण्यास त्याला सांगितले २२६□ ठरलेल्या रात्री अहमद निजामशहाने ५००० पायदळ आणि ५००० कोळी घोडेस्वारांचे पथक घेऊन गुजरातच्या छावणीवर हल्ला चढविला. त्याच्या पायदळात मुख्यतः तिरंदाज, हातगोळे फेकणारे आणि बंदुकची यांचाच भरणा होता. ह्याच वेळी लाच घेतलेल्या माहुताने त्या माजलेल्या हत्तीला पूर्वीच ठरल्याप्रमाणे मोकळे सोडले. शत्रूच्या छावणीत यामुळे जिकडेतिकडे भयभितीचे एकच वातावरण पसरले. आपल्यापेक्षा कमजोर असलेल्या सैन्याकडून अशा तऱ्हेने अचानक आपल्यावर हल्ला येईल अशी महमूदशहा गुजराती आणि त्याचे अधिकारी यांना यत्किंचितही कल्पना नव्हती. ते आपल्या राहुटयात शांतपणे झोपी गेलेले होते. परंतु झालेल्या गोंधळाने त्यांची देखील घाबरगुंडी उडाली आणि ते भयचकित होऊन ताडकन आपल्या बिछान्यातून उठून बसले. याचवेळी तो माजलेला हत्ती गुजरातच्या सैन्यातील जनान्याच्या तंबूच्या रोखाने जाऊ लागला आणि त्यामुळे जनान्यातील स्त्रियांनी घाबरून जाऊन भयानक आरोळ्या मारण्यास सुरुवात केली. महमूदशहाला असे वाटले की शत्रू आपल्या छावणीत दूरबर घुसून आला आहे आणि आपल्या कुटुंबातील मंडळींची त्याने सर्रास कत्तल चालविली आहे. या समजुतीने त्याने आपल्या शामियान्यामधून वाट काढली आणि तेथून बाहेर पडून आपल्या काही अनुचरांसहित तो तेथून जवळच सहा मैल अंतरापर्यंत पळून गेला. महमद निजामशहाच्या फौजा शत्रूच्या छावणीच्या हद्दीच्या रेषेच्या आत बाहेर उभ्या राहून त्यांच्यावर तोफगोळ्यांचा मारा करीत राहिल्या. दरम्यान गुजराती अधिकाऱ्यांनी शत्रूबरोबर सामना देण्यासाठी [ ३ ] (२०३) आपल्या फौजांना छावणीबाहेर काढले. हे पाहिल्यानंतर अहमद निजामशहाच्या सैनिकांनी गुपचुपपणे माघार घेतली. यानंतर गुजराती सैन्यात उडालेले गोंधळाचे वातावरण थोडेफार कमी झाल्यावर गुजराती सैन्यातील अधिकारी एका ठिकाणी जमा झाले आणि महमूदशहाचे अभिनंदन करण्यासाठी त्याच्या छावणीकडे कूच करून गेले. परंतु छावणीत महमूदशहा त्याना न दिसून आल्यामुळे त्यांनी असे ठरविले की या परिस्थितीत दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व सैन्यासहित महमूदशहाच्या मागोमाग जाणे हेच योग्य आहे त्याप्रमाणे सकाळी ते निघून गेल्यावर त्यांची छावणी असलेल्या जागेवर अहमदशहा आणि त्याच्या बरोबरील इतर सुलतांनानी आपले सैन्य हलविले. यानंतर काही कालावधी लोटला आणि महमूदशहा गुजरातीबरोबर तह झाला. अहमद निजामशहा यावर दौलताबादकडे निघून आला. वऱ्हाडातून घाटाने तो वर चढून आला आणि त्याने एलोरा येथे छावणी दिली. मोहिमेच्या काळजीमधून आता तो मुक्त झाल्यामुळे त्याने अनेक प्रकारांनी आपली करमणूक आणि मनोरंजन करून घेतले. गुजरातच्या इतिहासकारांनी महमूदशहा गुजरातीचा झालेला हा पराभव देण्याचे

टाळले आहे. साहजिकच त्यांची इच्छा महमूदशहा बेगाडा याच्या किर्तीला त्यामुळे लागलेला कलंक लपविण्याची असावी. ही गोष्ट खरी किंवा खोटी हे एक परमेश्वरालाच ठाऊक.

(१०) अहमद निजामशहा दौलताबादवर फिरून चाल करून आल्यामुळे अश्राफखानाची स्थिती अतिशय बिकट झाली आणि त्याने पुन्हा एकदा महमूद शहा गुजरातीकडे मदतीची याचना केली. त्याने बेगाडाला असे वचन दिले की अहमद निजामशहाच्या वारंवार होणाऱ्या हल्ल्यांपासून आपण माझा बचाव केला तर दौलताबाद येथे आपल्या नावे जाहिररित्या मी खुत्व्याचे वाचन करीन आणि प्रतिवर्षी आपल्याला खंडणी म्हणून काही रक्कम देत जाईन. महमूद शहाला या प्रलोभनांचा मोह पडला आणि तो मोठी फौज घेऊन तापी नदीच्या तीरावर येऊन धडकला. यावर अहमद निजामशहाने वेढा उठविला आणि तो आपल्या राजधानीकडे परतला. अश्राफखानाने आपल्या दिलेल्या वचनाप्रमाणे दौलताबादच्या कुतुबुद्दीन मशिदीत गुजरातच्या महमूद शहाच्या नावे खुत्व्याचे पठण केले. त्याचप्रमाणे तो छावणीत गेला आणि महमूदशहाला त्याने उंची नजराणे अर्पण केले. त्याने महमूदशहाजवळ असेही कबूल केले की आपला मांडलिक म्हणून दरवर्षी मी आपल्याला याप्रमाणे खंडणी देत जाईन. महमूदशहाने यानंतर बुरहाणपूरच्या आदिलखानाकडून खंडणी [ ३ ] ( २०४ ) वसूल केली आणि आपल्या राज्याकडे तो निघून गेला. महमूदशहा परत फिरल्याची बातमी अहमद निजामशहाला कळल्याबरोबर त्याने पुन्हा दौलताबादवर चाल केली. गुजरातच्या सुलतानाचे आपण मांडलिक होणार या नुसत्या कल्पनेनेच दौलताबादच्या किल्ल्यावरील शिबंदीला अतिशय संताप आला आहे असे अहमद निजामशहाला आढळून आले. त्यांनी अहमद निजामशहाकडे आम्ही तुमच्याशी राजनिष्ठ आहोत असा शब्द पाठविला आणि आमच्या राजनिष्ठेची तुम्हाला लवकरच प्रचिती आणून देऊ असेही त्यांनी त्याला कळविले. तो गोदावरीच्या तीरावर जेव्हा पोहोचला तेव्हा त्याला शिबंदीने पाठविलेला वरील निरोप मिळाला. त्यावर त्याने ३००० घोडेस्वार बरोबर घेऊन झपाट्याने कूच केले आणि दुसऱ्या दिवशी सकाळी दिवस उजाडता त्याने दौलताबादला वेढा दिला. दौलताबादवरील शिबंदीत बहुतेक मराठा शिपाई होते. आपल्या शिबंदीतील सैनिक आपल्यावर रुष्ट झालेले आहेत असे मलिक अश्राफ याला आढळून आल्यावर या घटनेचा त्याला अतिशय विषाद वाटला. तो एकाएकी आजारी पडला आणि पाच दिवसांच्या आतच त्याला मृत्यू आला. मलिक अश्राफ मृत झाल्यावर किल्ल्यावरील शिबंदीने दौलताबादच्या किल्ल्या अहमदनगरच्या सुलतानाच्या हवाली केल्या. अहमद निजामशहाने यावर किल्ल्यात प्रवेश केला, किल्ल्याची जरूर ती डागडुगी करण्याचा त्याने हुकूम दिला आणि किल्ल्यावरील शिबंदीत त्याने आपल्या फौजेतील शिपायांचा भरणा केला. अहमदनगरला परतल्यानंतर त्याने बाग निजाम समोवार एक किल्ला बांधला. या किल्ल्यात त्याने लाल रंगाच्या दगडाचा एक राजवाडा बांधला. यावर्षी

त्याने अंतूरचा किल्ला आणि खानदेशातील इतर ठाणी काबीज केली आणि गाळणा आणि बागलाण येथील राजांना आपल्याला खंडणी देण्यास त्याने भाग पाडले.

( ११ ) हिजरी ९१३ / इ. स. १५०७ ) हिजरी ९१३ यावर्षी बुरहाणपूरचा दाऊदशहा हा मरण पावला आणि त्याच्या वारसाहक्काच्या संबंधात तंटे निर्माण झाले. त्याच्या राज्यातील एक प्रमुख अधिकारी मलिक हिसामुद्दीन याने आलमखान नावाच्या माणसाच्या वतीने अहमद निजामशहाकडे मदत मागितली तर महमूदशहा गुजराती याने हसनखान फारूकीचा मुलगा व आपला पुतण्या मिरान आदिलखान याला मसनदीवर बसविण्याचा चंग बांधला. या हेतूच्या सिद्धीसाठी गुजरातच्या सुलतानाने खानदेशाकडे कूच केले. दरम्यान खानदेशाच्या [ ३ ] ( २०५ ) गादीवर अधिकार सांगणारा तिसरा एक स्पर्धक मलिक लारुन याने या दोन्ही फारूकी-राजपुत्रांपैकी कोणाचेच वर्चस्व मानण्याचे नाकारले. त्याच्या ताब्यात असीरचा किल्ला होता. अहमद निजामशहा आणि इमाद उलमुल्क गावली हे दोघेजण नुकतेच बुरहाणपूरला पोहोचले होते. तेथे त्याना खऱ्या वस्तुस्थितीची जाणीव झाली. तेथे त्याना असेही कळले की महमूदशहा गुजराती हा भली मोठी फौज घेऊन खरोखर तापीच्या तीरावर थाळनेर येथे येऊन ठेपला आहे. यावर त्या दोघांनी प्रत्येकी ४००० घोडेस्वार आलम-खानाच्या मदतीस ठेवण्यास आपली संमती दिली आणि त्यानी गाविलगडच्या दिशेने माघार घेतली. ह्या सैन्याने मात्र लगोलग आलमखानचा पक्ष सोडल्यामुळे अहमद निजामशहा आणि इमाद उलमुल्क याना आपापल्या राजधान्यांकडे परत फिरावे लागले. अशा तऱ्हेने दक्षिणेतल्या या दुकलीची मोहीम संपुष्टात आली. यानंतर थोड्याच कालावधीने आलमखान अहमद निजामशहाला येऊन मिळाला आणि अहमदशहाने आपल्याला त्याच्या कृपाछत्राखाली घ्यावे म्हणून त्याने त्याची याचना केली. महमूद-शहा गुजरातेकडे परत फिरल्यानंतर अहमद निजामशहाने सैन्य घेऊन आपल्या राज्याच्या सरहद्दीकडे चाल केली आणि खानदेशाच्या राज्याचा काही भाग आलम-खानाला तोडून द्या अशी त्याने गुजरातच्या महमूदशहाकडे मागणी केली. परंतु महमूदशहाने अहमदशहाच्या वकिलांना अतिशय अपमानास्पद अशी वागणूक दिली आणि त्यांना असे विचारले की बहमनी सुलतानाच्या गुलामासारखे असणाऱ्या तुमच्या धन्याला माझ्याजवळ बरोबरीच्या नात्याने पत्रव्यवहार करण्याचा अगर त्याच्या प्रांतात मोडत नसलेल्या भानगडीत ढवळाढवळ करण्याचा काय अधिकार आहे. महमूदशहा त्यांना असेही म्हणाला की तुमच्या धन्याने आपले वर्तन बदलण्याचे याउप्पर ठरविले नाही तर त्याला जरब बसविणे मला भाग पडेल. महमूदशहाने आपल्या वकिलांबरोबर अतिशय उद्धटपणाचे वर्तन .केले आहे या गोष्टीची अहमद निजामशहाने दखल घेतली नाही इतकेच नव्हे तर या गोष्टीबाबत तुटेपर्यंत ताणायचे आपण मनात आणले तर ते अविचाराचे ठरेल असा त्याने विचार केला आणि तो मुकाटपणाने आलमखानाबरोबर अहमदनगर येथे परत फिरला.

( १२ ) हिजरी ९१४ } हिजरी ९१४ या वर्षी मुख्य वकील [ ३ ] ( २०६ )
इ. स. १५०८ } आणि पेशवा नासिर उलमुल्क हा मरण पावला. त्याच्या जागी मुकम्मीलखान दक्कनी याची वजीराच्या जागेवर नेमणूक करण्यात आली. यानंतर दोन तीन महिन्यानीच सुलतान अहमद निजामशहा याला भयंकर तापाने घेरले. तेव्हा त्याने आपला ७ वर्षांचा अल्पवयीन मुलगा बुरहाण निजाम याला आपला वारस म्हणून नियुक्त केले. यानंतर काही काळाने अहमद निजामशहाचा मृत्यू झाला.

( १३ ) जरी अहमद निजामशहाच्या अंगचे गुण वर्णनापलीकडचे होते तरी देखील सर्वसाधारणपणे इतिहासकार ज्या प्रथेला पाळतात त्या प्रथेला अनुसरून त्यापैकी काही गुणांचे वर्णन याठिकाणी देण्याचा प्रयत्न मी ( ग्रंथकर्ता फरिश्ता ) करणार आहे. त्याच्या अंगी प्रकर्षाने वसत असलेले स्वभावविशेष म्हणजे त्याचे संयमन आणि विनयशीलपणा. जेव्हा जेव्हा तो शहराच्या रस्त्यांमधून घोड्यावर स्वार होऊन रपेट करी तेव्हा तेव्हा न जाणो दुसऱ्याच्या स्त्रीवर आपली दृष्टी पडेल या भितीने तो आपल्या डाव्या अथवा उजव्या बाजूकडे पाहण्याचे देखील टाळीत असे. तो तरुण असताना जेव्हा गाविलगडचा किल्ला काबीज करण्यासाठी कूच करून गेला तेव्हा युद्ध कैद्यांमध्ये एका असामान्य सौंदर्याच्या तरुणीला कैद करण्यात आले होते. त्याच्या एका अधिकाऱ्याने आपल्या बादशहाला ही स्त्री योग्य नजराणा आहे असे समजून तिला बादशहाकडे सुपूर्द केले. तिच्या सौंदर्याचा अहमद निजामशहाला अतिशय मोह पडला परंतु त्याला जेव्हा असे सांगण्यात आले की त्या स्त्रीला नवरा असून त्याच्या सर्व कुटुंबिय मंडळीसह पकडलेल्या युद्ध कैद्यांमध्ये तो आहे. तेव्हा त्याने आपल्या तिच्या संबंधीच्या भावनावर बंध घातला आणि कोणत्याही पद्धतीने तिच्या पातिव्रत्याचा भंग न करता तिला त्याने भरपूर बक्षिसी देऊन तिच्या नातेवाईकांच्या स्वाधीन केले. युद्धभूमीवरून त्याचा एखादा अधिकारी पळून माघारी आला तर त्याला फैलावर घेण्याऐवजी बक्षिसी देण्याची त्याची पद्धत होती. त्याच्या या सहसा आढळून न येणाऱ्या वर्तनाचा खुलासा त्याने करण्याबद्दल प्रश्न विचारण्याचे धाडस जेव्हा त्याच्या दरबारातील एका अधिकाऱ्याने केले तेव्हा त्याने उत्तर दिले की मी असा का वागलो त्याचे स्पष्टीकरण पुन्हा कधितरी दुसऱ्यावेळी मी तुम्हाला देईन. यानंतर थोड्याच कालावधीनंतर असा प्रसंग घडून आला की अहमद निजामशहाने अशा तऱ्हेने बक्षिसी ज्या एका अधिकाऱ्याला दिली होती त्याने फार मोठी कर्तबगारीची कामगिरी पार पाडली. बादशहाकडून त्याच्यावर मानसन्मानाची खैर खैरात झाली तेव्हा अहमद निजामशहा वरीलप्रमाणे प्रश्न विचारणाऱ्या दरबारी अधिकाऱ्याला म्हणाला की शिकारीत तरबेज असणाऱ्या शिकाऱ्याप्रमाणेच सुलतानानाच शिकारीसाठी तयारी कशी करावी याचा उगज पडलेला असतो [२२७]□

(१४) येकंग नावाच्या तलवारीचा अगर काठीचा लढण्यासाठी उपयोग करण्याची प्रथा अहमद निजामशहानेच सुरू केली. निजामशहाला स्वतः तलवारीचे उत्तम तऱ्हेने हात करता येत असत आणि तलवारीचे आपले कौशल्य दाखविण्यात त्याला अतिशय आनंद होई. साहजिकच आपल्या बादशहाचें अनुकरण करण्यासाठी लोक अतिशय उत्सुक असतात असे जे सर्वसाधारणपणे म्हटले जाते त्याला अनुसरून अहमदनगर राज्यातील लहान आणि थोर सर्व मंडळींनी या कलेच्या नादी आपल्याला लावून घेतले आणि मोठमोठ्या मुसलमानी शहरांमधून कला आणि शास्त्रे शिकविण्यासाठी ज्याप्रमाणे महाविद्यालये असतात तद्वतच अहमदनगर शहराच्या सर्व भागात येकंगीचे शिक्षण देण्यासाठी आणि कुस्तीची कला शिकविण्यासाठी व्यायामशाळांची स्थापना झाली. जिथे जिथे लोक जमत त्यात्याठिकाणी येकंगच्या कलेशिवाय दुसरी कोणतीही गोष्ट बोलली जात नसे. कालांतराने दक्षिणेमधल्या मारामारीच्या मस्तीने धुंद असलेल्या वातावरणात एकंदर परिस्थिती इतक्या थराला पोहोचली की लोक आपल्या शेजाऱ्यांवर आपली बढाई आणि शेखी मिरवू लागले. उतावळ्या आणि अविचारी तरुण माणसांमध्ये जेव्हा झगडे निर्माण होऊ लागले तेव्हा ते वारंवार बादशहापुढे जाऊन आपली बाजू सत्य कशी आहे ते पटवून देण्याचा प्रयत्न करीत आणि बादशहा आपल्या समक्ष त्यांच्यामध्ये तलवारीचे द्वंद्व युद्ध लावून त्यांच्यामधील भांडणाचा निकाल लावी. जो पहिल्या प्रथम दुसऱ्याच्या अंगावर प्रहार करून रक्त काढीत असे तो विजयी झाला असे समजण्यात येई. अशा तऱ्हेच्या प्रथेला उत्तेजन देण्याचा असा परिणाम झाला की दररोज राजवाड्याजवळ आपल्या अंगातील कौशल्य दाखविण्यासाठी मोठ्या संख्येने जमा होण्याची राज्यातल्या तरुण मंडळींना एक आदतच पडून गेली. असा एक दिवसही सुना गेला नाही की ज्या दिवशी एक अगर दोन माणसे ठार झाली नाहीत. त्यावेळी अहमद निजामशहाच्या मनात विचार आला की या पद्धतीला आळा घालण्याची वेळ आता निर्माण झाली आहे. तेव्हा त्याने असा हुकूम काढला की अशा तऱ्हेने लोकांची आपल्यामधील भांडणे मिटविण्यासाठी होणारे माझ्यासमोरील प्रदर्शन यापुढे होता कामा नये. आपापसातील भांडणे जर मिटवायची असतील तर भांडण झालेल्या व्यक्तींनी शहराबाहेर जाऊन आपल्या भांडणांचा खुशाल निकाल लावून घ्यावा. त्याला माझी ना नाही. अहमदशहाने असेही जाहीर केले की अशा तऱ्हेच्या द्वंद्वात जर दोन्ही व्यक्तींनी युध्दाचे [ ३ ] ( २०८ ) सर्व नियम पाळून प्रामाणीकपणे युध्द केले आणि त्यात एखादी व्यक्ती ठार झाली तर त्याबद्दल सूड घेतला जाण्याची मना करण्याची माझी आज्ञा आहे. ह्या भयानक प्रथेप्रमाणे आपली भांडणे मिटविण्याची दक्षिणेतील मुसलमानांना इतकी चटक लागली होती की या प्रथेचा प्रसार अहमदनगरपासून दूरवर अंतरापर्यंत फैलावला. हल्लीच्या दिवसांत तर अशा तऱ्हेने आपली भांडणे मिटवणे हे भूषणावह समजले जाते आणि अमीरउमराव आणि राजपुत्र मंडळीच काय परंतु विद्वान धर्मज्ञ आणि तत्त्वज्ञानी पंडीतही

आपल्यामधील मतभेदाचा निकाल लावण्यासाठी द्वंद्वाचा अवलंब करतात. त्यांच्या मुलांनी असे द्वंद्व खेळण्याबद्दल यत्किंचीतही चुकारपणा अथवा कमजोरी दाखविली तर आपल्या मुलांच्या अंगी खराखुरा मर्दपणा बाणला आहे असे मानण्यास त्यांचे मन तयार होत नाही. ह्या मनोवृत्तीचा प्रत्यक्ष अनुभव या ग्रंथाच्या लेखकाला ( महमद कासीम फरिस्ता ) विजापूरच्या रस्त्यात जी एक घटना घडून आली त्यामध्ये पाहण्यास मिळाला. सय्यद मुर्तजा आणि सय्यद हसन हे दोघे भाऊ होते. त्यांच्या करड्या दाढ्यांवरून त्यांचे वय झाल्याचे दिसून येत होते. विजापूर दरबारी देखील त्यांच्या शब्दाला किंमत होती आणि त्यांना मानाचे स्थान होते. त्यांचे काही क्षुल्लक कारणावरून तीन दक्षिणी माणसांबरोबर भांडण झाले. हे तिघेजणही भाऊभाऊ होते. ते दरबारात वारंवार जात आणि त्यांचेही वय झालेले असून लोक त्यांच्याकडे आदराने बघत असत. प्रथम सय्यद मुर्तजाच्या २० वर्षाच्या तरुण मुलाने वरील तिघा दक्षिणी माणसांपैकी एकाला द्वंद्वाचे आव्हान दिले पण एका क्षणातच तो तरुण ठार मारला गेला. यावर त्या तरुणाचा बाप (सय्यद मुर्तजा) आणि चुलता यांनी दुसऱ्या दोघा दाक्षिणात्यांना द्वंद्वाचे आव्हान दिले पण या द्वंद्वातही ते दोघेजण ठार झाले. त्यांचे मृतदेह द्वंद्वाच्या जागेपासून हलवून त्यांचे मृतकर्म होईपर्यंत द्वंद्वात अंगावर झालेल्या जखमांनी त्यांचे तिघे प्रतिस्पर्धीही मरण पावले. अशा तऱ्हेने केवळ काही मिनिटांच्या अवधित ज्यांचे परस्परांबरोबर प्रत्यक्षात असे काहीही वैर नव्हते अशी ६ सभ्य माणसे ठार मारली जाऊन आपल्या नातेवाईकांना आणि ते रहात असलेल्या समाजाला मुकली. दक्षिणेमधील मुसलमान तलवारीचे कसब दाखविण्यात अतिशय निष्णात आहेत आणि विशेषतः द्वंद्वात त्यांचा हात धरणारा कोणी नाही ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु अशा तऱ्हेचे द्वंद्व ते पायावर उभे राहून खेळतात आणि घोड्याच्या पाठीवर बसून आपल्या हातातील तलवारीची फेंक करण्याची ते सवय करीत नाहीत त्यामुळे घोडदळातील सैनिक याद्दष्टीने त्यांना कमी महत्त्व आहे (जरी खाजगी द्वंद्वात आणि रस्त्यावरील मारामारीत ते एखाद्या सिंहाप्रमाणे लढतात तरी ). पायदळी फौजांच्या प्रचंड समुहात लढताना त्यांच्या अंगातील कौशल्य एकदम कुचकामाचे आहे [ ३ ] ( २०९ ).

( १५ ) बहमनी राज्य विलयाला गेल्यानंतर द्वंद्वयुद्धाच्या या प्रथेला दक्षिणेतील इतर सुलतानांनी दडपून टाकण्याचे ऐवजी त्यांनी या प्रथेच्या वाढीला आपल्या परीने अधिकच उत्तेजन दिलेले आहे. याला अपवाद म्हणजे फक्त विजापूरचा सुलतान दुसरा इब्राहीम आदिलशहा हा होय. त्याने या प्रथेचा विमोड करण्याचा जणू चंगच बांधला आहे. अशी आशा करण्यास जागा आहे की त्याच्या सारख्या इतर शहांच्या राजपुत्रांच्या कसोशीच्या प्रयत्नांना यश येऊन जगातल्या इतर कोणत्याही सुसंस्कृत देशात माहीत नसलेल्या या तिरस्करणीय आणि भयानक प्रथेचे समूळ उच्चाटन होईल.

## बुरहाण निजामशहा पहिला [ ३ ] ( २१०–२११ )

( १६ ) बुरहाण निजामशहा अहमदनगर येथे आपल्या बापाच्या गादीवर आला तेव्हा त्याचे वय सात वर्षांचे होते. अहमदनगरच्या राज्यात मुकम्मील खान दक्नी हा अतिशय कर्तबगार मुत्सद्दी आणि सेनानी होता. अहमद निजामशहाच्या हयातीत पेशवा आणि [२२८] अमीर जुमला या अधिकाराच्या जागेवर त्याचीच नेमणूक झालेली होती. बुरहाण निजामशहाने त्याला वकील किंवा संरक्षणकर्ता या अधिकारावर नेमले. त्याचा मुलगा मिया जमालउद्दीन याला [२२९] अजीज उल्मुल्क हा किताब मिळाला आणि त्याची सरनोबतीच्या जागेवर नियुक्ती करण्यात [३] (२१२) आली. अशा तऱ्हेने बापाने आणि मुलाने शाही कुटुंब आपल्या अधिकाराखाली आणल्यावर सरकारी कारभाराच्या सर्व बाबींवर त्यांनी आपली हुकमत पूर्णपणे प्रस्थापित केली. अशा तऱ्हेने तीन वर्षे उलटली. अजीजउल्मुल्क याचा गर्विष्ठपण आणि उद्दामपणाची वागणूक इतर अमीरांना अतिशय असह्य झाली. रुमीखान, करीमखान आणि मिरखान ह्या अमिरांना त्याच्या सत्तेबद्दल मत्सर वाटू लागला आणि त्यांनी त्याची सत्ता उलथून पाडण्याचे प्रयत्न सुरू केले. त्यांनी आपल्या बाजूला बिबी आयेषा हिला वळवून घेतले. ( आयेषा ही बुरहाण निजाम शहाच्या आईची दाई असून तिच्या पूर्ण विश्वासातली होती ), त्यांनी संगनमताने असे ठरविले की आयेषाने बुरहाण निजामशहाचा अल्पवयी असलेला भाऊ राजाजू याला अमीरांच्या हवाली करावे. अमीरांनी राजाजूला [२३०] सिंहासनावर बसविण्याचा दृढनिश्चय केला. बुरहाण निजामशहाला अशा तऱ्हेने सिंहासनावरून काढून टाकल्यावर मुकम्मीलखान आणि अजीजउल्मुल्क यांच्या एकतंत्री दडपशाहीमधून आपल्याला मुक्त होता येईल असे त्यांना वाटले. याप्रमाणे बिबी आयेषा हिने राजाजूला एक दिवस मुलीचा पोषाख केला आणि त्याला स्वतःच्या पालखीत बसवून आपल्याबरोबर शहराकडे चालविले. ती थोडीशी पुढे जाते न जाते आहे तोच राजमातेने आपल्या मुलाची चौकशी केली. तो तिला असे आढळून आले की राजाजू आपल्या जागेवर नाही. राजवाड्यात आणि राजवाड्याबाहेर असलेल्या सेवकगणांची त्यामुळे अतिशय त्रेधातिरपीट उडाली. काहींनी असा अंदाज बांधला की तो कारंजात अगर विहिरीत पडला ( ३ ) [ २१३ ] असावा, आणि ते त्याला शोधण्यासाठी गेले तर काहींनी बिबी आयेषाच्या पाठोपाठ जाऊन ती शहरात पोहोचण्याचे अगोदर तिला गाठून तिला आणि राजाजूला परत पाठीमागे आणले. आयेषा ही राजवाड्यातील वृद्ध स्त्री असून तिला राजपुत्रांच्या आजीप्रमाणे मानण्यात येत असे. आपल्याबरोबर नेहमी राजपुत्रांना शहरात घेऊन जाण्याची तिला सवय होती. तिथे ते कधी कधी दोन-तीन दिवस देखील मुक्काम करीत. या गोष्टीमुळे तिने यावेळी असा बहाणा केला की नेहमीप्रमाणेच शहराला भेट देण्यासाठी

आपण राजपुत्राला आपल्या बरोबर घेऊन जात आहोत. परंतु थोडयाच दिवसांत वरील कट उघडकीस येऊन तिने हे कृत्य अमीरांच्या संगनमताने केले असल्याचे सिद्ध झाले. तेव्हा मुकम्मीलखान आणि अजीज उल्मुल्क यानी अधिक जागरुकपणे राजपुत्रावर नजर ठेवण्यासाठी जारीने उपाय योजना केली. बुरहाण निजामशहाच्या शिक्षणाकडे इतक्या जातीने लक्ष पुरविण्यात आले की वयाच्या १० व्या वर्षीच त्याला सहजपणे आणि योग्य त्याठिकाणी जोर देऊन कवितावाचन करता येऊ लागले. लिहिण्याची कलाही त्याला उत्तम प्रकारे अवगत झाली. इतक्या लहान वयात त्याने बादशहाची कर्तव्ये कोणती यावर लिहिला गेलेला एक प्रबंध नकलून काढलेला अहमद-नगरच्या शाही ग्रंथालयात या ग्रंथाच्या लेखकाने प्रत्यक्ष पाहिला आहे. थोडयाच कालावधित पेशवा मुकम्मीलखान याच्या मुख्य शत्रूंवर त्यांच्या अनुयायांसहित अहमदनगरचे राज्य सोडून जाण्याची पाळी आली. त्यांची संख्या जवळ जवळ ८००० माणसे एवढी भरली. ते वऱ्हाडचा सुलतान अलाउद्दीन इमाद उल्मुल्क याच्या चाकरीत शिरले आणि त्यांनी त्याला बुरहाण निजामशहाच्या राज्यावर हल्ला करण्यास चिथावले. अहमदनगरचे राज्य काबीज करणे म्हणजे आपल्या सहज आवाक्यामधील आहे अशी इमाद उलमुल्क याची समजूत झाली. त्याने मोठी फौज घेऊन एलिचपूरहून निजाम-शाही राज्याच्या सरहद्दीच्या दिशेने [२३१८] चाल केली. मुकम्मील खानाच्या मदतीसाठी परंड्याच्या ख्वाजा जहान दक्कनीची फौज आली. मुकम्मीलखानाने बुरहाण निजाम शहाला बरोबर घेऊन शत्रूशी मुकाबला करण्यासाठी [ ३ ] ( २१४ )

हिजरी ९१६ ⎫
इ. स. १५१० ⎭ कूच केले. दोन्ही फौजांमध्ये हिजरी ९१६ यावर्षी राहुरी येथे तुंबळ युद्ध झाले. या युद्धात इमाद उल्मुल्क याचा संपूर्ण पराभव झाला. रंणागणावरून त्याने जो पळ काढला तो एलिचपूर येथे पोहोचेपर्यंत तो थांबला नाही. त्याचे सर्व सामानसुमान, हत्ती आणि घोडे ही निजामशाही सैन्याच्या हाती पडली.

( १७ ) या लढाईमध्ये बुरहाण निजामशहा हा अल्पवयी असल्यामुळे आपला शिक्षक अजदार खान याच्या समवेत घोड्यावर स्वार होऊन रणांगणामध्ये गेला. घोड्यावरून दौड करत असताना घोड्याच्या खोगिरावर तो अजदारखानाच्या पुढे बसला. इमादउलमुल्क याला आपला पाठलाग होत आहे असे जेव्हा दिसून आले तेव्हा त्याने एलिचपूर सोडले आणि बुरहाणपूरकडे पळ काढला. तेथे त्याने आपल्यावतीने तह करण्यासाठी मध्यस्थी करण्याबद्दल खानदेशच्या सुलतानाची मदत मागितली. त्यानुसार काही विद्वान व्यक्तींना मुकम्मीलखानाकडे पाठविण्यात आले. त्यांनी मुकम्मीलखानाकडे असे प्रतिपादन केले की एकाच मुसलमानी धर्माच्या अनुयायांनी परस्परांविरुद्ध शस्त्र उचलणे म्हणजे इस्लामच्या संस्थापकाने घालून दिलेल्या नियमा-विरुद्ध वर्तन करण्यासारखे आहे. यावर मुकम्मीलखानाने तह करण्यास आपली संमती

दिली व तहाच्या अटी मुक्रर झाल्या आणि दोन्ही पक्षानी आपापल्या राज्यांकडे कूच केले.

(१८) असे म्हणतात की निजामशाही घराण्यातील सुलतानांचे पूर्वज हे पाथरी या गावचे रहिवासी होते. परंतु काही कारण घडून त्यांच्यापैकी एका कुलकर्णी वतनदाराने[२३२□] आपल्या जन्मस्थानाचा त्याग केला आणि तो विजयनगरला जाऊन तेथेच स्थायिक झाला. जेव्हा या कुटुंबाकडे राजसत्ता आली तेव्हा त्याचे नातलग हे अहमदनगरला आले आणि त्यांनी पाथरीच्या खेड्यातील पूर्वापार चालत आलेले आपले कुलकर्णी वतनदारीचे अधिकार आपल्याला मिळवून देण्यात यावेत [ ३ ] ( २१५ ) अशी इच्छा प्रकट केली. पाथरी हे गाव वऱ्हाडच्या प्रदेशात परंतु निजामशाही राज्याच्या सरहद्दीला अगदी लागून असे होते. यावर मुकम्मील खानाने बुरहाण निजामशहाच्या अधिकाराखाली आणि त्याच्या वतीने इमादउलमुल्क याला पत्र लिहून विनंती केली की, निजामशाही घराण्याचे हितसंबंध पाथरी या गावामध्ये इतके गुंतलेले आहेत की तुमचे आणि निजामशाही घराण्याचे पूर्वापार वैयक्तिक संबंध लक्षात घेऊन आपण पाथरीच्या जिल्ह्यावरील आपला अधिकार सोडून द्यावा. त्या जिल्ह्याच्या बदली त्याहीपेक्षा अधिक उत्पन्न असलेला दुसरा कोणताही जिल्हा आम्ही तुम्हाला त्याच्याबदली तोडून देऊ. अशा तऱ्हेची अदलाबदल करण्यास संमती देण्याचे इमादउलमुल्क याने नाकारले. आपण अदलाबदल करण्यास नकार दिला या घटनेतून कदाचित युद्धप्रसंग निर्माण होईल अशी भीती वाटल्यामुळे इमादउलमुल्क याने पाथरी येथे किल्ला बांधण्यास सुरुवात केली. या पासून त्याला परावृत्त करण्याचा मुकम्मीलखानाने प्रयत्न केला पण त्याचे प्रयत्न फुकट गेले. अखेर किल्ल्याचे बांधकाम पुरे झाले. त्यानंतर काही काळाने मुकम्मीलखान हा दौलताबादेस असताना पाथरीनजिक एलोऱ्याची लेणी पाहण्याच्या निमित्ताने काही मंडळींना बरोबर घेऊन सहलीसाठी म्हणून गेला. तेथून त्याने अचानक पाथरीवर चाल केली आणि हल्ला करून पाथरी गावाचा कबजा घेतला. यानंतर त्याने पाथरी गावाचा अधिकारी म्हणून मिया महमद घोरी याची नेमणूक केली. पाथरी घेण्याचे कामी घोरीने प्रशंसनीय कामगिरी बजाविली होती. मुकम्मीलखानाने महमद घोरी याला कामिलखान हा किताबही बहाल केला.

(१९) दरम्यान बुरहाण निजामशहा हा वयात आला. त्याच्या मनावर अमीना नावाच्या एका नर्तकीची मोहिनी पडली. त्याने तिच्याशी लग्न केले आणि तिला आपल्या जनानखान्यातील स्त्रियांची प्रमुख म्हणजे आपली पट्टराणी बनविले. तिच्यापासून त्याला दारू पिण्याचे व्यसन लागले. ही गोष्ट जेव्हा मुकम्मीलखानाला समजली तेव्हा तो सिंहासनापाशी हजर झाला आणि आपल्या अधिकाराची निदर्शक चिन्हे सुलतानाच्या पायाजवळ ठेवून म्हणाला, "आपण जेव्हा लहान होता तेव्हा आपल्या सिंहासनाच्या या नम्र सेवकाने राज्यकारभाराच्या ज्या बाबी माझ्याकडे सोपविण्यात आल्या त्यांचा कारभार माझ्या कुवतीप्रमाणे यथाशक्ती चालविला. परंतु

आता तुम्ही राज्य कारभार चालविण्यास व्यक्तीशः समर्थ झाल्यामुळे तुम्ही मला राज्याच्या कारभाराच्या जबाबदारीतून मुक्त करण्याची कृपा करावी." [ ३ ] (२१६) बुरहाण निजामशहाने मुकम्मीलखानाच्या विनंतीला आपली मान्यता दिली परंतु अजीजउलमुल्क आणि त्याचे इतर मुलगे यांची त्याने मोठ्या पदावर नेमणूक केली आणि पेशवेपदावर शेख जाफर दक्कनी याला नेमले. मुकम्मील यानंतर राज्यकारभारातून निवृत्त झाला आणि त्याच्या मित्रांनी अतिशय आग्रहच जर केला तर क्वचित प्रसंगी तो दरबारात जाई. राज्यकारभारात त्याने पुन्हा पडावे यासाठी झालेल्या सर्व प्रयत्नांना त्याने निकराने आपला नकार दिला. सरते शेवटी निसर्ग नियमाने मुकम्मील खान या नश्वर जगाला सोडून गेला

( २० ) हिजरी ९३० | इ. स. १५२३ | हिजरी ९३० यावर्षी शहा ताहिर जुनैदी याच्या मध्यस्थीने बुरहाण निजामशहा आणि इस्माईल आदिलशहा यांची सोलापूरच्या किल्ल्यात भेट घडून आली. इस्माईल आदिलशहाची बहिण बिबी मरियम ही बुरहाण निजामशहाला विवाहादाखल देण्यात आली आणि विवाहसमारंभ मोठ्या थाटामाटाने साजरा करण्यात आला. याप्रसंगी असे झाले की इस्माईल आदिलशहाचे वतीने हजर असलेला वकील बेळगावचा आसदखान याने आपल्या सुलतानाचे वतीने सोलापूरचा किल्ला बिबी मरियमच्या लग्नाप्रित्यर्थ हुंडा म्हणून देण्याचे कबूल केले. परंतु पुढे इस्माईल आदिलशहाने असे करण्याबद्दल आपण आसदखानाला सर्वाधिकार दिले असल्याचे नाकबूल केले. तेव्हा शहा ताहिर याच्या मध्यस्थीमुळे बुरहाण निजामशहाने आपली सोलापूरची मागणी मागे घेतली आणि तो अहमदनगरला परतला. बुरहाण निजामशहाची आवडती राणी अमिना हिने आपले पट्टराणीपदाचे अधिकार बिबी मरिमय हिच्यावर गाजविण्यास सुरुवात केली. तेव्हा तिने एका सर्वसामान्य कलावंतिणीला शाही अंतःपुरात प्रवेश देऊन आपल्यासारख्या राजघराण्यातील स्त्रीला अपमानाची वागणूक देण्यात येत असल्याबद्दल आपला भाऊ इस्माईल आदिलशहा याजकडे तक्रार केली. विजापूरच्या दरबारात हजर असलेल्या अहमदनगरच्या स्थानिक वकिलाकडे अतिशय कडक भाषेमध्ये विजापूरच्या सुलतानाने आपला निषेध प्रकट केला. या घटनेमधूनच [ ३ ] ( २१७ ) दोन्ही राज्यात शत्रूत्व वाढीला लागले. बुरहाण निजामशहाने बिदरच्या बरीदशहाकडे आणि गाविलगडच्या इमाद शहाकडे आपले वकील पाठवून त्यांना विजापूरच्या इस्माईल आदिलशहाविरुद्ध एकजूट करण्याचे आपल्या वकिलाकरवी आवाहन केले. यानुसार या त्रिवर्गाने हिजरी ९३१ या वर्षी सोलपूर विरुद्ध कूच केले. इस्माईल

हिजरी ९३१ | इ. स. १५२४ | आदिलशहा आपल्याबरोबर ९००० तिरंदाज घेऊन सोलापूरच्या संरक्षणासाठी धावून गेला. सरहद्दीजवळ दोन्ही पक्षांच्या फौजात भयानक युद्ध झाले. या युद्धात इतका रक्तपात झाला की त्याच्या नुसत्या आठवणीने देखील अंगावर काटा उभा राहतो. इमादशहाला बेळगावच्या आसदखानाने तोंड दिले

आणि त्याच्यावर हल्ला करून त्याच्या फौजेची फळी मोडली. कसलाही विचार न करता इमादशहाने गाविलगडकडे पळ काढला. त्यादिवशी सूर्य आकाशात भयंकर तेजाने तळपत होता. त्यामुळे बुरहाण निजामशहा उष्म्याने गलितगात्र झाला. त्याला युद्धाच्या मैदानातून पालखीत घालून बाहेर काढण्यात आले. त्याच्या फौजेतील परदेशी सैनिकांनी त्याला अहमदनगरला वाहून नेले.

( २१ ) हिजरी ९३३ इ स. १५२७ | हिजरी ९३३ यावर्षी इस्माईल आदिलशहा आणि सुलतान कुली कुतुबशहा यांच्या चिथावणीवरून इमादशहाने सैन्य घेऊन पाथरीवर चाल केली आणि पाथरीचे गाव त्याने जिंकून घेतले. परंतु त्यानंतर लगेच बुरहाण निजामशहाने पाथरीला वेढा दिला आणि दोन महिन्याच्या सक्त वेढ्यानंतर त्याने पाथरी गाव परत जिंकून घेतले. याप्रसंगी त्याने पाथरीचा किल्ला जमीनदोस्त केला आणि पाथरी आणि पाथरीचा किल्ला त्याने आपल्या ब्राह्मण नातेवाईकांना दान म्हणून दिला. तो त्यांच्याकडे अनेक पिढ्या अकबर बादशहाच्या कारकिर्दीपर्यंत चालू राहिला. पाथरीचा नाश केल्यावर बुरहाण निजामशहा तसाच चाल करून पुढे गेला आणि माहूरचा किल्ला त्याने जिंकून घेतला. त्यानंतर त्याने एलिचपूरच्या दिशेने कूच केले. एकट्याने निजामशाही सैन्याला टक्कर देणे इमादशहाच्या आवाक्याबाहेरचे झाल्यामुळे त्याने बुरहाणपूरकडे पळ काढला आणि तेथे त्याने खानदेशचा सुलतान महमदखान फारुकी याचे मन आपल्याला मदत देण्याविषयी वळविले. याप्रमाणे दोघांनी एकजूट करून बुरहाण निजामशहाविरुद्ध [ ३ ] ( २१८ ) चाल केली. परंतु त्यांची ससेहोलपट होऊन त्यांचा पूर्ण पराभव झाला. त्यांचे सर्व सामानसुमान आणि त्याशिवाय ३०० हत्ती बुरहाण निजामशहाच्या ताब्यात गेले. त्याचप्रमाणे वऱ्हाडमधील अनेक ठिकाणे बुरहाण निजामशहाच्या हाती पडली. परिस्थितीने असे स्वरूप धारण केलेले पाहिल्यानंतर इमादशहा आणि महमदखान फारुकी यांनी गुजरातच्या बहादुरशहाकडे वकील पाठवून त्याच्याकडे मदतीची याचना केली. बहादुरशहाने मोठ्या खुषीने त्यांची विनंती मान्य केली आणि लगोलग हिजरी ९३५ यावर्षी मोठे सैन्य घेऊन त्याने सुलतानपूर आणि नंदूरबार या मार्गे दक्षिणेकडे कूच केले. आपल्याहिजरी ९३५ इ. स. १५२९ विरुद्ध झालेल्या एकजुटीमध्ये गुजरातने पुढाकार घेतल्याचे पाहून बुरहाण निजामशहाला भय वाटले. त्याने बाबर याला दिल्लीच्या सिंहासनावर आरूढ झाल्याबद्दल अभिनंदनाचे पत्र पाठविले आणि इस्माईल आदिलशहा, असीर बरीदशहा आणि सुलतान कुली कुतुबशहा यांजबरोबर देखील पत्रव्यवहार केला. त्यांच्यापैकी फक्त अमीर बरीदशहा याने निजामशहाला मदत देऊ केली आणि ६ हजार परदेशी घोडेस्वारांना घेऊन तो निजामशहाला येऊन मिळाला.

( २२ ) माहूर आणि पाथरी इमादशहाच्या करता जिंकून घेण्यासाठी बहादुरशहा गुजरातीने वऱ्हाडात प्रवेश केला. वऱ्हाडचा त्याला इतका मोह पडला की वऱ्हाडातच त्याने काही दिवस मुक्काम केला. यामुळे आपले राज्य बहादुरशहाच्या

सैन्याकडून उद्‌ध्वस्त केले जाईल अशी इमादशहाला भीती वाटली आणि त्याने बहादुरशहाला विनंती केली की आपण आता बुरहाण निजामशहाच्या प्रदेशात चाल करून जा आणि त्याच्या राज्याचा काही भाग माझ्यासाठी जिंकून घ्या. आपण असे केले म्हणजे मी माझी कुटुंबिय मंडळी गावीलमधून हालवीन. तो किल्ला मी तुमच्या स्वाधीन करीन आणि मग सातत्याने आपल्या पायाशी सेवेसाठी हजर राहीन. याप्रमाणे बहादुरशहाने बुरहाण निजामशहाच्या सैन्याच्या दिशेने चाल केली आणि बीडजवळच्या डोंगराळ मुलखात त्याने आपला तळ दिला. याठिकाणी अमीर बरीदशहाने स्वतःचे तीन हजार स्वार आणि आदिलशहाने पाठविलेल्या घोडेस्वारांचे दळ यासहित गुजरातच्या सैन्याच्या एका तुकडीवर हल्ला चढविला. ही तुकडी बीड आणि ( ३ ) [ २१९ ] पैठणच्यामध्ये गुजरातच्या मुख्य सैन्यापासून पूर्णपणे अलग पडली होती. या लढाईत ३००० माणसे कामास आली आणि संपत्तीने लादलेले ७० च्या वर उंट हल्लेखोरांच्या हाती पडले. आपल्या तुकडीच्या पराभवाची हकीकत जेव्हा बहादुरशहाला कळली तेव्हा त्याने या पराभवाचे उट्टे काढण्यासाठी आपला वजीर खुदावंदखान याला २०,००० घोडेस्वार देऊन ताबडतोब रवाना केले. या तुकडीवर देखील दबा धरून बसलेल्या बरीदशहाच्या सैन्याने हल्ला करून तिचा पराभव केला. तेव्हा बहादुरशहाने इमादशहाच्या हाताखाली २०,००० स्वारांची तिसरी तुकडी खुदावंदखानाला कुमक देण्यासाठी पाठविली. तिच्यामुळे बुरहाण निजामशहाला प्रथम परंड्याच्या दिशेने माघार घेणे भाग पडले आणि अखेरीला तेथूनही त्याला जुन्नरचा मार्ग धरावा लागला.

( २३ ) यानंतर कसलाही प्रतिकार न होता बहादुरशहा अहमदनगरला पोहोचला आणि बुरहाण निजामशहाच्या राजवाड्यात त्याने आपला तळ दिला. तेथे तो ४० दिवस राहिला. नंतर किल्ल्याच्या वेढ्याचे काम त्याने इमादशहावर सोपविले आणि त्याने दौलताबादकडे कूच केले. दरम्यान बुरहाण निजामशहाने गुजरातच्या सैन्याभोवती घिरट्या घालून त्यांची रसद तोडून काढण्याचा प्रयत्न केला.

( २४ ) परिस्थिती जेव्हा या थराला पोहोचली तेव्हा बुरहाण निजामशहाने इस्माईल आदिलशहाला पत्र लिहून कळविले की मला बंधूसमान मानून आपण जर स्वतः माझ्या मदतीसाठी चालून आला नाहीत तर शत्रूकडून माझ्यावर जो दबाव आणला जात आहे त्याखाली बुडून जाण्याखेरीज माझ्याजवळ दुसरा मार्ग उरणार नाही. यावर इस्माईल आदिलशहाने उत्तर पाठविले की विजयनगरच्या काफर हिंदूंनी रायचूरजवळ आपली छावणी दिली आहे. यावेळी मी जर आमच्या देशातून बाहेर पडलो तर विजयनगरचा राया माझ्या राज्यावर ताबडतोब आक्रमण करील. म्हणून मी तुम्हाला माझ्या सैन्यातील निवडक ५०० घोडेस्वार माझा सेनापती हैदर उल्मुल्क कजविनी याच्या अधिपत्याखाली पाठवित आहे. मला अशी आशा आहे की आपण लवकरच शत्रूला परतवून लावण्यात यशस्वी व्हाल. बुरहाण निजामशहाने आपल्या मनाशी ज्या आशा बाळगल्या होत्या त्याची परिपूर्ती होण्यात त्याला अपयश आल्या-

मुळे त्याने शेख जाफर याला पेशवेपदावरून दूर केले. शेख जाफर हा [ ३ ] ( २२० ) राज्यातील सर्व वर्गांच्या लोकांत अतिशय अप्रिय झाला होता. शेख जाफरच्या जागी त्याने कवरसेन ( कान्हू नरसो ) या ब्राह्मणाची नेमणूक केली. कवरसेन हा अतिशय शहाणा, कुशाग्र बुद्धीचा आणि प्रामाणिक असा मनुष्य होता. त्याच्या सल्ल्यावरून मिळेल तेवढी फौज जमा करून बुरहाण निजामशहाने जुन्नरहून अहमदनगरकडे कूच केले. नंतर त्याने मोठ्या सावधगिरीने आपली छावणी हलविली आणि गुजराती सैन्याच्या तळापासून ८ मैल अंतरावर दौलताबादजवळील टेकड्यांमध्ये त्याने आपले मोर्चे लावले. आपल्या जागेवरून जवळ जवळ तीन महिने त्याने शत्रूसैन्याबरोबर वारंवार बारीकसारीक युद्धप्रसंग करून आणि रात्रीच्या वेळी त्याच्यावर हल्ले करून त्याला सतावून सोडले. त्यानंतर दोन्ही बाजूत समोरासमोर युद्धप्रसंग झाला. त्यात बुरहाण निजामशहाचा पराभव झाला. यानंतर महमदखान फारुकी आणि इमादशहा यांच्या मध्यस्थीने अखेर बुरहाण निजामशहाचे मन तह करण्यासाठी म्हणून वळविण्यात आले. त्याने वरील दोघा सुलतानांना लढाई चालू असताना त्यांच्याकडून घेतलेले किल्ले आणि हत्ती त्यांना परत देण्याचे वचन दिले. याप्रमाणे या दोघा सुलतानांनी गुजरातचा सेनापती खुदावंदखान याला निवेदन केले की आम्ही बहादुरशहाला आमच्या मदतीसाठी बोलाविले ते माहूर आणि पाथरी परत मिळविण्यासाठी. ही मदत आम्हांला दिल्याबद्दल बहादुरशहाच्या नावे वऱ्हाड आणि अहमदनगरमध्ये खुत्बा वाचण्याचे आ ण प्रतिवर्षी गुजरातच्या सुलतानाला नजराणा देण्याचे आम्ही कबूल केले. परंतु आता तुमच्या सुलतानाचा बेत आमच्या देशाचा संपूर्णपणे ताबा घेण्याकडे वळलेला दिसतो. यावर खुदावंदखानाने उत्तर दिले की हा सर्व दोष तुमचाच आहे कारण तुम्हा दक्षिणेतील सुलतानांची परस्परात एकवाक्यता झाली तर सर्वांचेच भले होईल यात काहीच संशय नाही. खुदावंदखानाला यातून काय सुचवावयाचे आहे याचा उमज महमदखान फारुकी आणि इमादशहा यांना पडला आणि त्यांनी आपापसातील एकजुटीचे विसर्जन करावयाचे ठरविले. [ ३ ] ( २२१ ) याप्रमाणे इमादशहाने आपल्या छावणीमधून दौलताबादच्या किल्ल्यावर रसद आणि दाणागोटा नेला जाण्यास परवानगी दिली. आणि पावसाळा सुरू झाल्याबरोबर तो एलिचपूरकडे चालता झाला.

( २५ ) या घटनेनंतर दक्षिणेत रहावयाचे की माघार घ्यावयाची याबाबत बहादुरशहा आणि मिरान महमदखान फारूकी यांनी परस्परात विचार विनिमय केला. दोन्ही पक्षांच्या मंत्र्यांनी असा विचार प्रकट केला की पावसाळा सुरू झाल्यानंतर नद्यांना दुथडी भरून पूर येईल आणि तेव्हा गुजरात किंवा खानदेशमधून कुमक अथवा दाणागोटा मिळविणे अशक्यप्राय होईल त्याचप्रमाणे दक्षिणेतील सुलतानांमध्ये अजूनही एकजूट होण्याची शक्यता आहे. अशा परिस्थितीत आपण ( बहादुरशहाने ) इमादशहा आणि निजामशहा यांचा मुलूख त्यांच्या ताब्यात परत सोपविणे आणि यांच्याकडून

मिळणाऱ्या नजराण्यावर संतोष मानून आपल्या देशाकडे परत फिरणे शहाणपणाचे ठरेल. बहादुरशहाने या योजनेला आपली संमती दर्शविली. त्यानुसार बुरहाण निजामशहाकडे खलिता रवाना करण्यात आला. खलिता घेऊन आलेल्या वकिलाबरोबर नजराणे देऊन निजाम शहाने त्यांची रवानगी केली. त्याने बहादुरशहाच्या नावे जाहीर दिल्या खुत्व्याचे वाचन करविले. एवढे झाल्यावर बहादुरशहा गुजरातेस परत गेला. अहमदनगर येथे परत फिरल्यावर बुरहाण निजामशहाकडे मिरान महमदखानाने आपले लढाईत घेतलेले हत्ती परत करण्यासंबंधी धरणे पाठविले. त्याप्रमाणे त्याचे हत्ती परत करण्यात आले. इमादशहाने त्याचप्रमाणे माहूर आणि पाथरी परत करण्याबद्दल तशीच मागणी केली. त्याला निजामशहाने टाळाटाळीचे उत्तर दिले आणि त्याच्या विनंतीचा बुरहाण निजामशहाने अव्हेर केला.

( २६ ) पुढील वर्षी बुरहाण निजामशहाने शहा ताहिर याला कापड, हत्ती आणि घोडे यांचा उंची नजराणा देऊन बहादुरशहाकडे रवाना केले. शहा ताहिरची भेट घेण्यास बहादुरशहाने बराच विलंब लावला आणि मिरान महमद खानाला लिहिले की बुरहाण निजामशहाने फक्त एकच वेळा खुत्बा माझ्या नावाने वाचल्याचे आणि नंतर ती प्रथा बंद केल्याचे माझ्या कानावर आले आहे ते खरे आहे का? यावर मिरान महमदखानाने बहादुरशहाला लिहून आश्वासिले की बुरहाण निजामशहा हा तुमचा आज्ञाधारक मांडलिक आहे. त्याने जर तुमच्या नावाने [ ३ ] ( २२२ ) एकदाच खुत्व्याचे वाचन केले असेल तर ते दक्षिणेतील इतर सुलतानामध्ये आपली मानहानी होऊ नये याच केवळ उद्देशाने. म्हणून मला असा विश्वास वाटतो की आपण त्याला क्षमा कराल आणि त्याच्या वकिलांची भेट घ्याल. यावर बहादुरशहाने शहा ताहिरची भेट घेतली परंतु त्याला त्याने काही काळपर्यंत सन्मानपूर्वक वागणूक न देता त्याच्याकडे दुर्लक्ष केले. परंतु अखेर आपली गाढी बुद्धिमत्ता आणि विद्वत्ता यांच्या जोरावर शहा ताहिरने गुजरातच्या सुलतानाची वाहवा संपादून घेण्यात यश मिळविले. त्यानंतर बहादुरशहाने शहा ताहिर बरोबरची आपली वागणूक बदलली. यानंतर शहा ताहिर ३ महिनेपर्यंत त्याच्या दरबारी होता. त्यानंतर बहादुरशहाने मोठ्या सन्मानपूर्वक त्याला निरोप दिला.

( २७ ) हिजरी ९३७ | इ. स १५३० | हिजरी ९३७ या वर्षी बहादुरशहाने माळवा जिंकून घेतला. या विजयाबद्दल त्याचे अभिनंदन करण्यासाठी म्हणून बुरहाण निजामशहाने त्याच्याकडे शहा ताहिर व नरसू पंडित या दोघांना रवाना केले. खानदेशच्या मिरान महमदखान याने या दोघा श्रेष्ठांचा बुरहाणपूर येथे गुजरातच्या सुलतानाबरोबर परिचय करून दिला. त्या वेळी मिरान महमदखान म्हणाला की हिंदुस्थानातील मुख्य प्रांतांचे साम्राज्य आता तिमूर घराण्याकडे आलेले आहे. दिवसेंदिवस त्या घराण्याचा भाग्यरवी वैभवाची चढती कमान गाठत आहे. अशा वेळी आपण बुरहाण निजामशहाबरोबर मैत्रीचे संबंध जोडणे

हे मुत्सद्दीपणाचे ठरेल. बहादुरशहा हा अतिशय महत्त्वाकांक्षी असा सुलतान होता आणि दिल्लीच्या बादशहाच्या आपण बरोबरीचे आहोत असे तो समजत असे. त्याने मिरान महमदखानाने दिलेला सल्ला मानला. त्याने शहा ताहिरवर मानसन्मानाची भरपूर खैरखैरात केली आणि त्याला त्वरेने बुरहाणपूरहून अहमदनगरकडे बुरहाण निजामशहाने बुरहाणपूर येथे बहादुरशहाची भेट घ्यावी यासाठी बुरहाण निजामशहाचे मन वळविण्यासाठी रवाना करण्यासाठी निरोप दिला.

( २८ ) बुरहाण निजामशहाने पहिल्याप्रथम या भेटीला आपला नकार दर्शविला परंतु अखेर शहा ताहिर आणि कवरसेन यांच्या सांगण्यावरून त्याने बहादुरशहाबरोबरील भेटीला आपण तयार असल्याचे कळविले. स्वतःच्या गैरहजेरीत त्याने आपला मुलगा राजपुत्र हुसेन निजामशहा याला राज्याच्या कारभाराकडे बघण्यासाठी कवरसेनाच्या अधिकाराखाली अहमदनगर येथे ठेवले. नंतर तो स्वतः-बरोबर सोबत म्हणून जवळ जवळ ७००० हजार घोडेस्वारांना घेऊन [ ३ ] ( २२३ ) बुरहाणपूरकडे निघाला. आपला बुरहाणपूर येथे योग्य त्या इतमामाने आदर सत्कार व्हावा म्हणून आपल्यातर्फे दोन वकील संभाजी चिटणीस आणि ख्वाजा इब्राहीम यांना पुढे पाठविले. बुरहाणपूरजवळ तापी नदीच्या किनाऱ्यावरील चंगदेवी या गावी तो येऊन पोहोचला. तेथे त्याची मिरान महमदखान याने गांठभेट घेतली आणि त्याला असे सांगितले की बहादुरशहा माझ्या सिंहासनावर बसून तुमची भेट घेईल त्यावेळी सिंहासनाच्या दोन्ही बाजूला फक्त धर्मनिष्ठ मंडळींना बसण्याची परवानगी देण्यात येईल बाकीच्या सर्वांना, मग त्यांचा दर्जा काहीही असो आपली शस्त्रे आपल्यासमोर हातात धरून बहादुरशहा समक्ष उभे रहावे लागेल.

( २९ ) मिरान महमदखानाने अशा तऱ्हेचा निरोप आपल्याला का सांगितला हे बुरहाण निजामशहाने पूर्णपणे जाणले आणि उत्तरादाखल तो काहीही बोलला नाही. परंतु मिरान महमदखान निघून गेल्यावर त्याने आपल्या खास सल्लागारांना गुप्तपणे आपल्याकडे बोलावू पाठविले आणि तो त्यांना म्हणाला की बहमनींच्या घराण्या-पासून फुटून निघून माझे स्वातंत्र्य मी जाहीर केलेले आहे. बहादुरशहाच्या सिंहासना-समोर उभे राहण्याच्या अपमानकारक प्रसंगाची मानहानी मी कोणत्याही परिस्थितीत सहन करणार नाही व भेटीला न जाता मी तो प्रसंग टाळीन, आणि परमेश्वराच्या हाती माझे भवितव्य मी सुपूर्द करीन. यावर शहा ताहिर म्हणाला की परमेश्वर दयाळू आहे आणि मला अशी आशा आहे की तो आपल्या इच्छेप्रमाणे सर्व गोष्टी घडवून आणण्याची कृपा तुमच्यावर दाखविल. तुम्ही उतावळेपणा दाखवू नये किंवा अशा तऱ्हेची निवेदने करू नयेत. कारण एक दिवस अशा तऱ्हेच्या मानहानीच्या प्रसंगाला तोंड देणे तुम्हाला मुत्सद्दीपणाच्या दृष्टिकोनातून भाग पडेल. कदाचित तुम्ही असे केल्यास या पुढचे तुमचे सर्व आयुष्य तुम्हाला सत्तेचा उपभोग घेण्यात घालविता येईल, असाही योगायोग असेल. बुरहाण निजामशहा याच्या अंगात सारासार विचार करण्याची

बुद्धी होती. त्याने अंशतः शहा ताहिरने मांडलेल्या कारणमीमांसेला आपली संमती दर्शविली. शहा ताहिर तेव्हा म्हणाला की आपल्यावर हा अपमानाचा प्रसंग येऊ नये असे काहीतरी करण्याची एक युक्ती मी शोधून काढली आहे. २३३ □ त्याने सांगितले की अलीच्या हस्ताक्षरातील कुराणाची एक प्रत माझ्यापाशी आहे. ती पहावी अशी बहादुरशहाला अतिशय इच्छा आहे. ही प्रत मी माझ्याबरोबर घेऊन [ ३ ] ( २२४ ) येईन. मी असा आलो म्हणजे त्या प्रतीला आदराच्या भावनेने सामोरे जाण्यासाठी सिंहासनावरून खाली उतरणे गुजरातेच्या सुलतानाला भाग पडेल. दुसऱ्या दिवशी ज्या वेळी भेटीची वेळ ठरली होती तेव्हा बुरहाण निजामशहा आपल्या चाकरांना घेऊन बहादुरशहाच्या तंबूपाशी आला. शहा ताहिरने ती कुराणाची प्रत आपल्या डोक्यावर ठेवली. त्याला लांब अंतरावरून येताना बघितल्यानंतर बहादुरशहाने आपला वजीर खुदावंदखान याला विचारले की शहा ताहिर डोक्यावरून काय आणत आहे? शहा ताहिरच्या डोक्यावर अलीच्या हस्तक्षरातील कुराणाची प्रत आहे असे कळल्या-बरोबर तो झटकन सिंहासनावरून खाली उतरला. कुराणाच्या प्रतीचे त्याने ३ वेळा चुंबन घेतले, आणि ती प्रत त्याने आपले डोळे आणि आपले मस्तक यावर टेकविली. यानंतर त्याने बुरहाण निजामशहाकडून मानवंदना स्वीकारली आणि आपले कुशल आहे का असे त्याला गुजराती भाषेत विचारले. यावर निजामशहाने त्याला फारशी भाषेत उत्तर दिले. यानंतर बहादुरशहा पुन्हा सिंहासनावर बसला आणि बुरहाण निजामशहा व शहा ताहिर सिंहासनासमोर उभे राहिले. शहा ताहिरसारखी पहिल्या दर्जाची धर्मनिष्ठ व्यक्ती उभी आहे असे पाहून बहादुरशहाने त्याला बसण्याची विनंती केली. परंतु आपले धनी निजामशहा हे उभे आहेत या सबबीवर त्याने बसण्याचे नाकारले. तेव्हा बहादुरशहाने निजामशहाला देखील बसण्याची विनंती केली. यावर फारशी भाषेत त्याच्याशी बोलण्यास बहादुरशहाने सुरुवात केली. त्याने त्याला विचारले की तुमच्यावर नुकत्याच ओढवलेल्या प्रसंगाला तुम्ही कसे काय तोंड दिले. यावर बुरहाण निजामशहा म्हणाला की ज्या प्रसंगाचा शेवट भरभराटीत होतो आणि जे प्रसंग संपल्यानंतर सुखाच्या गाठीभेटी घडून येतात त्यामुळे भूतकाळाच्या कटू आठवणी माणसाच्या मनातून नाहीशा करण्यास हे प्रसंग कारणीभूत ठरतात. संभाषणाच्या अखेरीला बुरहाण निजामशहा म्हणाला की गेल्या अनेक वर्षांत ज्या अनेक कटू प्रसंगांनी माझ्या सहनशक्तीची परीक्षा घेतली, त्या सर्वांचे आजच्या या भेटीच्या प्रसंगी मला पूर्णपणे भरपाई मिळून चीज झाले आहे, अशी माझी धारणा आहे. हे उत्तर ऐकल्यानंतर बहादुरशहा मिरान महमदखानाकडे वळून म्हणाला की बुरहाण निजाम उलमुल्क याने दिलेले उत्तर तुम्ही ऐकलेत का? ( बहादुरशहा [ ३ ] ( २२५ ) बुरहाण निजामशहाला अजून शहा असे संबोधित नसे ). मिरानखानाने उत्तर दिले की निजाम उलमुल्क याचे उत्तर मी ऐकले नाही. यावर बहादुरशहाने पुन्हा तोच प्रश्न विचारला आणि निजामशहाने त्याला पुन्हा तेच उत्तर दिले. नंतर बहादुरशहाने सर्वांना

ऐकू जाईल एवढ्या मोठ्या आवाजाने निजामशहाची स्तुती केली. यावर शहा ताहिर उठून उभा राहिला आणि म्हणाला की, दिवसेंदिवस निजामशहावरील बहादुरशहाची मर्जी अशीच वृद्धिंगत होत जावो. बहादुरशहाने नंतर आपल्या कमरेला बांधलेली तलवार आणि हिऱ्याने जडविलेला एक खंजीर घेऊन बुरहाण निजामशहाच्या कमरेला ही दोन्ही शस्त्रे बांधली, आणि तो म्हणाला " परमेश्वराची कृपा होवो आणि शहा ही पदवी आपल्याला फलदायी ठरो." त्याचवेळी त्याने माळव्याच्या सुलतानाकडून जिंकून घेतलेले छत्र किंवा शाही कनात त्याला नजर केली. यानंतर त्याने आपला वजीर खुदावंदखान आणि मिरान महमदखान फारूकी यांना सांगितले की तुम्ही निजामशहाला त्याच्या सत्कारासाठी उभारलेल्या शामीयान्यात घेऊन जा. हा शामीयानादेखील माळव्याचा सुलतान महमूद खिलजी याच्याकडून बहादुरशहाने जिंकून घेतला होता. दुसऱ्या दिवशी बहादुरशहाने थाटाची मेजवानी दिली. या प्रसंगी त्याने आपल्या सिंहासनासमोर सोन्याच्या खुर्च्यांवर बुरहाण निजामशहा आणि मिरान महमदखान यांना आसने दिली. ही मेजवानी संपल्यानंतर निजामशहाला त्याने ५ घोडे, २ हत्ती आणि १२ शिकारी हरणे भेट म्हणून दिली. नंतर दोघे सुलतान हे चौगानचा खेळ खेळले. बुरहाण निजामशहाने नंतर आपल्या वतीने बहादुरशहाला नजराणा अर्पण केला. बहादुरशहाला हा सर्व नजराणा अतिशय पसंत पडला. परंतु त्यापैकी कुराणाची प्रत, एक तलवार ( या तलवारीवर आबासी खलीफांपैकी एकाचे नाव कोरलेले होते. ) आणि त्याशिवाय ४ हत्ती आणि २ अरबी घोडे एवढेच घेण्याचे त्याने कबूल केले. यानंतर तो म्हणाला की मी तुम्हाला तुमच्या इतर सर्व देणग्या आणि दक्षिण देशाचा सर्व मुलूख परत देत आहे. असे म्हणून त्याचवेळी त्याने निजामशहाला अहमदनगरला परत फिरण्याची परवानगी देऊन [ ३ ] ( २२६ ) निरोप दिला. याप्रमाणे बुरहाण निजामशहाने बहादुरशहाची रजा घेतली आणि तो दौलताबाद मार्गे जाण्यास निघाला. तेथे दफन केलेल्या थोर थोर अवलियांच्या कबरींचे दर्शन घेऊन त्याने त्यांना मानवंदना केली. यानंतर त्याने हौज ई कुतलूजवळ आपला मुक्काम दिला. या ठिकाणी त्याची त्याचा मुलगा हुसेन निजामशहा, वजीर कवरसेन आणि विजापूर व गोवळकोंडा यांच्या सुलतानांच्या वकिलांबरोबर गांठभेट झाली. हे सर्वजण त्याचे अभिनंदन करण्यासाठी तेथपर्यंत आले होते.

( ३० ) बहादुरशहा आणि बुरहाण निजामशहा यांच्यामधील मतभेद अशा तऱ्हेने संपुष्टात आल्यावर बुरहाण निजामशहाला आपल्या राज्याच्या राज्यकारभाराच्या बाबींकडे लक्ष देण्यास वेळ मिळाला. त्याप्रमाणे त्याने आपला मंत्री कवरसेन याने दिलेल्या मुत्सद्दीपणाच्या सल्ल्यानुसार वागून थोड्याच अवकाशात मराठ्यांच्या ताब्यात असलेले ३० किल्ले जिंकून घेतले. या किल्ल्यांच्या अधिपतींनी अहमद निजामशहाच्या मृत्यूपासून राज्यनिष्ठेचे प्रतिक म्हणून खंडणी दिलेली नव्हती. या अधिपतींना त्याने आपल्या चाकरीत रुजू करून घेतले आणि त्यांच्या जमिनी

त्यांना जहागिरीदाखल परत दिल्या. त्याने फक्त एवढीच अट घातली की राज्याला जरूर लागेल त्या वेळी त्यांनी फौज पुरवावी. बहादुरशहाच्या भेटीच्या वेळी बुरहाणपूर येथे निजामशहाचे २३४ब अगोदर गेलेल्या ख्वाजा इब्राहीम आणि संभाजी चिटणीस या दोन वकिलांना ते अहमदनगरला परतल्यानंतर त्याने अनुक्रमे लतीफखान आणि परतबराय ( प्रतापराय ) या पदव्या देऊन त्यांचा सन्मान केला. त्याच्या विश्वासातले जे काही खास अधिकारी होते त्यांच्यामध्ये बुरहाण निजाम शहाने त्या दोघांना यापुढे रुजू करून घेतले आहे असा हुकूम काढला.

( ३१ ) हिजरी ९३८ इ. स. १५३१ } हिजरी ९३८ या वर्षी इस्माईल आदिलशहाने कल्याणी आणि कन्धार हे किल्ले अमीर बरीद शहापासून जिंकून घेण्याचे ठरविले. अमीर बरीदशहाने निजामशहाकडे [ ३ ] ( २२७ ) मदतीची याचना केली. निजामशहाने आदिलशहाला एक उपमर्दकारक पत्र लिहून या विचारापासून ताबडतोब परावृत्त होण्याबद्दल त्याला कळविले. यामुळे दोन्ही राज्यांत सरहद्दीबद्दल पुन्हा भांडणे सुरू झाली. आदिलशहाने आपल्या उत्तरात निजामशहाला कळविले की, " अहमदनगरमध्ये तुमच्यावर नुकताच जो बाका प्रसंग ओढवला होता त्याचे तुम्हास विस्मरण पडले काय? माळव्याच्या सुलतानाचे फाटके-तुटके वस्त्र अंगावर बाळगण्यात जर तुम्हाला अभिमान वाटत असेल तर तुमची ही घमेंडखोर बढाई तिरस्करणीय आहे. गुजरातेच्या सुलतानाने तुम्हाला शहा ही पदवी अर्पण केली आहे, तिच्याबद्दलही फुकट मिजास बाळगण्याचे तुम्हाला कारण नाही. कारण माझे सुलतानपद सार्वभौमाच्या वंशापासून चालत आलेले आहे. सार्वभौमाच्या घराण्याचा मी वारस आहे. महमद पैगंबराचे वंशज जे पर्शियाचे सुलतान त्यांच्या-कडून मला सुलतानपद प्राप्त झाले आहे. माझा तुम्हाला असा सल्ला आहे की तुम्ही मूर्खपणा आणि उद्धटपणा याच्या मार्गाने न जाता शहाणपणाने वागण्यास शिका. तुम्ही असे न केल्यास तुमच्या बागई निजाम या बागेत आनंदाचा उपभोग घेण्यात तुम्ही जे गर्क आहात त्याचा त्याग करण्यास मी तुम्हाला भाग पाडीन आणि रणांगणावर तलवारीच्या खणखणाटाचा आवाज तुम्हाला कसा काय आवडतो हे तरी मी पाहीन."

( ३२ ) बुरहाण निजामशहाला तसे बघितल्यास आपल्या वर्तणुकीची लाज वाटली तरीदेखील त्याने परस्पर उमरजपूरकडे कूच केले. आपल्या फौजेची जमवा-जमव करीत काही दिवस त्याने तेथे मुक्काम केला आणि नंतर त्याने इस्माईल आदिल-शहाच्या राज्याची सरहद्द ओलांडली. इस्माईल आदिलशहाने बुरहाण निजामशहाचा संपूर्ण पराभव केला आणि त्याला अहमदनगरकडे माघार घेण्यास भाग पाडले. त्याने आपले सर्व सामानसुमान आणि जवळजवळ ४००० माणसे गमाविली. त्याच्यावरील या आपत्तीने बुरहाण निजामशहाचे पूर्णपणे गर्वहरण झाले.

( ३३ ) हिजरी ९३९ } हिजरी ९३९ या वर्षी दोन्ही देशांच्या वकिलांच्या
इ. स. १५३२ } मध्यस्थीने बुरहाण निजामशहा आणि इस्माईल आदिलशहा यांची भेट झाली. तेव्हा दोघा सुलतानांमध्ये असे ठरले की बुरहाण निजामशहाने वऱ्हाड जिंकून घ्यावा आणि इस्माईल अदिलशहाने [ ३ ] ( २२८ ) तेलंगण काबीज करावा आणि दोघांनी परस्परांमध्ये बंधूभाव राखून दक्षिण देशाची आपापसात वाटणी करून घ्यावी. परंतु ही योजना इस्माईल आदिलशहाचा मृत्यू आणि त्याचे वारस आणि बुरहाण निजामशहा यांच्यामध्ये जे कलह निर्माण झाले त्यामुळे बारगळून पडली.

( ३४ ) हिजरी ९४४ } हिजरी ९४४ या वर्षी शहा ताहिर याच्या सांगण्या-
इ. स. १५३७ } वरून बुरहाण निजामशहाने खुल्व्यातून साहिबांची नावे [२३५ब] काढून टाकली आणि त्यांच्या जागी इमामांची नावे बदली म्हणून घालण्याचा त्याने हुकूम दिला. इमामांच्या निशाणांचा रंग हिरवा असल्यामुळे (असे समजले जाते की अंतिम न्यायदानाच्या दिवशी पैगंबराच्या निशाणाचा रंगही हिरवाच राहील ). बुरहाण निजामशहाने आपले छत्रचामर आणि निशाण यांचाही रंग बदलून हिरवा केला. त्याने ( परमेश्वर त्याला क्षमा करो ) काही माणसांना नेमणुका बहाल करून पहिल्या तीन खलिफांना आणि त्यांच्या अनुयायांना शिव्या देण्याची आणि त्यांची निंदानालस्ती करण्याची कामगिरी त्यांच्यावर सोपविली. अशी निंदा-नालस्ती त्यांनी मशिदीमशिदीतून आणि रस्त्यारस्त्यावर करावी अशी बुरहाण निजामशहाने आज्ञा केली. अशा तऱ्हेने आपल्या सरदारांच्या विरोधामुळे विजापूरचा युसुफ आदिलशहा जे करू शकला नाही आणि त्याबद्दलची त्याची इच्छा त्याच्या मृत्यूबरोबरच विलयाला पावली ते बुरहाण निजामशहाने कृतीत उतरवून ती इच्छा पुरी केली. परंतु आपल्या धार्मिक उत्साहाच्या हव्यासात बुरहाण निजामशहावर अनेक संकट प्रसंग कोसळले. मुल्ला पिर महमद नावाचा एक कट्टर सुन्नी होता. त्याने बुरहाण निजामशहाचे धोरण पसंत नसलेल्या अनेक विघ्नसंतोषी मंडळींना गोळा करून राज-वाड्याला वेढा दिला. त्याला निजामशहाने कैद करून बंदिवासात ठेवले. तेव्हा त्याने उडविलेली धमाल शांत झाली. सुन्नी पंथाचा अशा तऱ्हेने बुरहाण निजामशहाने केलेला अपमान बघून गुजरात, विजापूर आणि खानदेश या देशांचे सुलतान खवळले. त्यांनी परस्परांशी दोस्तीचा तह केला आणि बुरहाण निजामशहाचे राज्य आपापसात वाटून घेण्याच्या योजनेला आपली संमती दिली. यावर बुरहाण निजामशहाने [ ३ ] ( २२९ ) हुमायून बादशहाकडे आपली वकिलात पाठविली आणि गुजरातवरील स्वारीत माझी तुम्हाला मदत देण्याची तयारी आहे असे त्याला कळविले. परंतु याच दरम्यानच्या काळात शेरशहाच्या बंडाचा प्रादुर्भाव झाल्यामुळे गुजरातवरील हुमायूनची स्वारी होण्यास प्रतिबंध झाला. बुरहाण निजामशहाने काही ना काही मार्ग स्वीकारून गुजरात आणि खानदेश्या सुलतानांबरोबरील भांडण समाधानकारकपणे मिटविले.

इब्राहीम आदिलशहाने आपल्या चाकरीमधून नुकत्याच काढून टाकलेल्या सर्व शिया पंथाच्या मुसलमानांना त्याने आपल्या चाकरीत रुजू करून घेतले आणि विजापूरवर आक्रमण करण्याच्या हेतूने कूच केले. या मोहिमेत त्याला इतके यश मिळाले की, त्याने विजापूरकरांकडून १०० हत्ती आणि काही तोफा काबीज केल्या. मोठ्या विजयोन्मादाने त्याने हे हत्ती आणि तोफा अहमदनगर येथे आणल्या.

(३५) हिजरी ९४९ / इ. स. १५४२ — हिजरी ९४९ या वर्षी विजापूरच्या दरबारात बेळगावचा आसदखान आणि त्याचा धनी इब्राहीम आदिलशहा या दोघांमध्ये वितुष्ट निर्माण झाले. या परिस्थितीचा फायदा निजामशहाने घेतला आणि अमिर बरीदशहाला दोस्तीचा तह करण्याबद्दल पाचारण केले. आणि याचवेळी त्याने अशी बातमी फैलावली की आपल्या धार्मिक भावनांचा मान राखण्यासाठी आसदखानाने आम्हा दोघा सुलतानांना विजापूरच्या राज्यात येण्याचे आमंत्रण केले असून आम्ही तसे केल्यास बेळगाव हे शहर त्याने माझ्या ताब्यात देण्याचे कबूल केले आहे. या गोष्टीमध्ये जरी सत्याचा यत्किंचितही लवलेश नव्हता तरी विजापूरच्या शत्रूंनी मोठ्या कसोशीने ह्या बातमीला प्रसिद्धी दिली. ते आपल्या कामगिरीत इतके यशस्वी झाले की इब्राहीम आदिलशहाचे मन आपल्या वजीराविरुद्ध कधी नव्हते एवढे कलुषित झाले. बुरहाण निजामशहाने सोलापूरवर चाल केली. सोलापूर त्याने जिंकून घेतले आणि ख्वाजा जहान दक्कनी याच्याकडे साडेपाच जिल्ह्यांचा मुलूख त्याने सोपविला. नंतर त्याने बेळगावकडे कूच केले आणि त्या शहराचा त्याने ताबा घेतला. त्याच्या आगेकूचीत त्याच्या अधिकाऱ्यांना ज्या ज्या ठिकाणी विरोध झाला त्या त्या ठिकाणांची त्याने लुटालूट आणि जाळपोळ केली. इब्राहीम आदिलशहाचे मन शत्रुविरुद्ध चाल करून जाण्याविषयी वळविण्याबद्दल आसदखानाने प्रयत्नांची पराकाष्ठा केली परंतु आपल्याला दगाफटका होईल याची त्याला भिती वाटली. [ ३ ] ( २३० ) आसदखान आणि आदिलशहा यांच्या मनात निर्माण झालेल्या संशयाचे स्वरूप इतक्या विकोपाला गेले की बुरहाण निजामशहाला आपण जाऊन मिळालो तरच आपली धडगत आहे असा आसदखानाने विचार केला. त्याप्रमाणे तो आपल्या हाताखाली असलेल्या ६००० सैनिकांना घेऊन बुरहाण निजामशहाला जाऊन मिळाला. त्यानंतर बुरहाण निजामशहाने सरळ विजापूरवर चाल केली. इब्राहीम आदिलशहा अशा तऱ्हेने आपल्या वजिराला मुकला आणि त्याच्या सभोवार असलेल्या कोणावरही त्याचा विश्वास नव्हता. या परिस्थितीत त्याने विजापूर सोडले आणि इमादशहाकडून कुमक येऊन पोहोचेपर्यंत त्याने कुलबर्ग्याचा आश्रय घेतला. वऱ्हाडचे सैन्य कूच करीत बुरहाण निजामशहाच्या सैन्याजवळ काही काळानंतर येऊन पोहोचले. आदिलशहाच्या मदतीस चाललेले सैन्य इतक्या जवळ आलेले पाहून आसदखानाला निजामशहाची बाजू सोडून जाण्याची आणि आपल्या देशाच्या दोस्ताच्या फौजेला जाऊन मिळण्याची संधी प्राप्त झाली. त्याप्रमाणे आसदखान इमादशहाच्या फौजेला जाऊन मिळाला. हे

पाहिल्यानंतर बुरहाण निजामशहाने ताबडतोब अहमदनगरकडे माघार घेतली. तेथपर्यंत दोस्तांच्या फौजांनी ( म्हणजे वऱ्हाड आणि विजापूर यांच्या संयुक्त सैन्याने ) त्याचा पाठलाग केला. आता आपल्या राजधानीचे शहर सोडून जाण्याची पाळी त्याच्यावर येऊन शहर सोडून जाणे त्याला भाग पडले. अहमदनगर शहर याप्रमाणे त्याने आक्रमकांच्या जणू काही ताब्यातच दिले आणि दौलताबादच्या मजबूत किल्ल्याचा त्याने आश्रय घेतला. याठिकाणी अमिर बरीदशहा हा मरण पावला. तेव्हा बुरहाण निजामशहाने तह केला आणि सोलापूरचे ५½ जिल्हे हे त्याने इब्राहीम आदिलशहाच्या पुन्हा हवाली केले.

( ३६ ) पुढील वर्षी बुरहाण निजामशहाने शहा ताहिर याला आपला वकील म्हणून गोवळकोंड्याच्या जमशीद कुतुबशहाच्या दरबाराकडे तो सिंहासनावर आल्याबद्दल त्याचे अभिनंदन करण्यासाठी रवाना केले. त्याचवेळी त्याने आपण विजयनगरचा हिंदू राजा रामराजा याच्याशी संगनमत करून विजापूर राज्याविरुद्ध एकजुटीचा तह करू अशी गुप्तपणे बोलणी लावली. [ ३ ] ( २३१ )

( ३७ ) हिजरी ९५३ इ. स. १५४६ } हिजरी ९५३ या वर्षी रामराजाच्या चिथावणीवरून बुरहाण निजामशहाने कुलबर्गा घेण्यासाठी चाल केली. त्याचा प्रतिकार करण्यासाठी इब्राहीम आदिलशहाने विजापूरहून कूच केले. तो हूरचीन या गावी आल्यावर त्याला असे आढळून आले की भीमानदीच्या पूर्वतीरावर बुरहाण निजामशहा मजबुतीने ठाण मांडून बसला आहे. नदी ओलांडून जाणे अशक्य आहे असे आढळून आल्यामुळे त्याने नदीच्या पलिकडल्या तीरावर आपली छावणी दिली. यानंतर पाऊस सुरू झाला. त्यामुळे नदीच्या दोन्ही बाजूला परस्परांसमोर दोन्ही देशांच्या फौजा जवळजवळ तीन महिने कसलीही हालचाल न करता स्वस्थ राहिल्या. सरतेशेवटी होत चाललेल्या दिरंगाईला कंटाळून इब्राहीम आदिलशहाने नदी ओलांडून जाण्याचा मार्ग शोधून काढला. नदी ओलांडून त्याने निजामशाही फौजांवर हल्ला चढविला आणि त्यांचा संपूर्ण पराभव केला. निजामशाही सैन्याने २५० हत्ती आणि १७० तोफा आणि हत्यारांचे गाडे एवढी सामग्री युद्धामध्ये गमाविली. या युद्धाच्या प्रसंगी इब्राहीम आदिलशहाने आपल्या अंगात किती असामान्य साहस आणि शौर्य आहे याचाही प्रत्यय या युद्धाच्या वेळी आणून दिला. परंतु तो स्वतः मात्र या युद्धात मिळालेल्या विजयाचे श्रेय आसदखानाच्या अद्वितीय वर्तनाला देत असे. आसदखानाला त्याने या कारणास्तव त्याच्या ताब्यात असलेल्या अगोदरच्या जहागिरी व्यतिरिक्त इतर अनेक जिल्हे जहागिरीदाखल बहाल केले.

( ३८ ) या पराभवानंतर बुरहाण निजामशहाने आपला विश्वासू मंत्री शहा ताहिर याला अली बरीदशहाकडे मदतीची याचना करण्यासाठी रवाना केले. अली बरीदशहाने मात्र अशी मदत देण्यास आपला नकार कळविला. यामुळे पुढीलवर्षी बिदरविरुद्ध ससैन्य चालून जाण्यास बुरहाण निजामशहाला निमित्त मिळाले. त्याने

बिदरवरील आपल्या मोहिमेच्या कारवाईची सुरुवात औशाच्या किल्ल्याला वेढा देऊन केली. दरम्यान अली बरीदशहाने इब्राहीम आदिलशहाकडे निरोप पाठविला की आपण जर माझ्या मदतीसाठी कूच करून आला तर मी आपल्या हवाली कल्याणीचा किल्ला करण्याचे वचन देतो. आदिलशहाने ते मान्य केले आणि विजापूरच्या [ ३ ] (२३२) फौजा बिदरच्या फौजांना कल्याणी येथे येऊन मिळाल्या. औशाचा वेढा उठविण्यात दोस्तांच्या फौजांना यश प्राप्त झाले. निजामशाही फौजांबरोबर किल्ल्यापासून ४ मैल अंतरावर त्यांची लढाई झाली. या लढाईत दोस्तांचे मोठे नुकसान होऊन त्यांचा पराभव झाला. निजामशाही सैन्याचा जय होऊन काही कालावधीनंतर औशाचा किल्ला त्यांच्या हाती पडला. तेथून निजामशहाने उदगीरवर चाल केली. उदगीरचा त्याने पाडाव केला आणि तेथून त्याने कन्धारच्या दिशेने कूच केले. कन्धारचा वेढा उठविण्याचे कामी दोस्तांनी आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली. परंतु दुसऱ्यांदा त्यांना पराभव खावा लागून त्यांचे सर्व जड सामानसुमान निजामशाही सैन्याच्या हाती पडले. कन्धारचा यानंतर लवकरच पाडाव झाला आणि हिजरी ९५५ या वर्षी बुरहाण निजामशहा

हिजरी ९५५ } आपल्या राजधानीकडे परत फिरला. अहमदनगरच्या वाटेवर
इ. स. १५४८ } विजापूरमधील एका राजकीय पक्षाचे प्रतिनिधी त्याला भेटले.

त्यांनी त्याला असे निवेदन केले की इब्राहीम आदिलशहाच्या जुलमाला आणि गैर-कारभाराला लोक अतिशय वैतागून गेलेले आहेत. विजापूर दरबारातील अमिरांची इच्छा त्यामुळे इब्राहीम आदिलशहाला गादीवरून काढून टाकून त्याचा धाकटा भाऊ राजपुत्र अबदुल्ला याला त्याचे जागी बसविण्याची आहे. या सुमारास राजपुत्र अबदुल्ला याने गोव्याच्या पोर्तुगीजांचा आश्रय घेतला होता. परंतु यावर पोर्तुगीजांनी कळविले होते की बुरहाण निजामशहाची मदत मिळाल्याशिवाय आम्ही याबाबत काहीही करू शकत नाही. वरील योजना अमलात आणण्यासाठी गोवळकोंड्याचा जमशीद कुतुबशहा याला अहमदनगरच्या सुलतानाबरोबर एकजूट करण्यासाठी म्हणून आवाहन करण्यात आले. याप्रमाणे तह झाल्यानंतर अहमदनगर आणि गोवळकोंड्याच्या सुलतानांनी विजापूरच्या रोखाने चाल केली. बुरहाण निजामशहाने प्रथम विजापूरच्या प्रदेशावर आक्रमण केले पण बेळगाव जिंकून घेण्याचे कामी त्याला अपयश आल्यामुळे त्याला माघार घेणे भाग पडले. याच सुमारास त्याच्या खास मर्जीमधील वजीर शहा ताहिर याचा मृत्यू झाल्यामुळे त्याला राजधानीकडे परत फिरण्याखेरीज दुसरा मार्ग उरला नाही. अहमदनगर येथे परतल्यावर त्याने वजीराच्या अधिकाराची चिन्हे [ ३ ] (२३३) कासीम बेग हकीम आणि गोपाळराव नावाचा ब्राह्मण या दोघांचे हाती सुपुर्द केली.

( ३९ ) याच सुमारास विजापूरचा उमराव बेळगावचा जहागिरदार आसदखान हा मरण पावला. त्या संधीचा फायदा घेऊन बुरहाण निजामशहाने पुन्हा एकदा विजापूरच्या राज्यावर हल्ला करण्याचे ठरविले. त्याने आपले वकील रामराजाकडे पाठविले आणि विजापूरविरुद्ध संगनमत करण्यासाठी त्याला आवाहन केले. या

प्रसंगी दोन्ही राज्यांमध्ये नजराणे आणि परस्परांस साहाय्य देण्याची कबुली यांची देवाणघेवाण झाली. ही गोष्ट कानावर पडताच विजापूरच्या दरबारात विजयनगर राज्याचे कायम असलेले जे वकील त्यांना उघडउघड अपमानास्पद वागणूक देण्यास सुरुवात झाली. तेव्हा त्यांनी रितीप्रमाणे विजापूरच्या सुलतानाचा निरोप देखील न घेता मोठ्या संतापाने विजापूर सोडले आणि ते विजयनगरला चालते झाले. विजयनगरला आल्यावर त्यांनी विजयनगरच्या दरबाराने बुरहाण निजामशहाबरोबर मैत्रीचा तह करण्याचे ठरविले होते त्याबद्दल प्रतिक्रिया म्हणून इब्राहीम आदिलशहाने आपल्या-बरोबर जी वागणूक केली त्याची सविस्तर हकीकत रामराजाला सांगितली. सरते-शेवटी ते म्हणाले की आम्ही जर पळालो नसतो तर आम्हाला बहुतेक ठारच मारण्यात आले असते. आपल्या वकिलांचा जो अपमान करण्यात आला त्यामुळे रामराजाने अतिशय चिडून बुरहाण निजामशहाला लिहिले की, " बिदरच्या बरीदशहाने इब्राहीम आदिलशहाच्या मैत्रीखातर माझ्या मैत्रीचा त्याग केला, अशा परिस्थितीत त्याच्या-पासून कल्याणीचा किल्ला जिंकून घेणे हा एकच मार्ग मला योग्य वाटतो. "

( ४० ) यावर बिलकुल वेळ न दवडता बुरहाण निजामशहाने अहमदनगरहून कूच केले. त्याने कल्याणीला वेढा दिला, आणि किल्ल्याचे बाहेरच्या जगाशी असलेले सर्व दळणवळण त्याने परिणामकारकरित्या बंद पाडले. किल्ल्याला मदत पोहोचविण्या-साठी इब्राहीम आदिलशहाने कूच केले. शत्रूच्या दृष्टिपथात येईल इतक्या अंतरावर तो आला. तेथे त्याने आपली छावणी दिली, आणि चारी बाजूला मोर्चे उभारले. बुरहाण निजामशहाची वेढा उठविण्याची इच्छा नव्हती, म्हणून त्यानेही आपल्या छावणीची मजबूती केली. शत्रूच्या छावणीकडे जाणारे रस्ते रोखून धरण्यासाठी आदिलशहाने आपले मराठा घोडदळ रवाना केले. आपल्या घोडेस्वारांचा उपयोग त्याने शत्रूची रसद मारण्याकडेही केला. हे स्वार आपल्या कार्यात इतके यशस्वी झाले की अन्नधान्याच्या तुटवड्यामुळे निजामशाही फौजांवर मोठी हलाखीची [३] (२३४) परिस्थिती ओढवली. अशा परिस्थितीत बुरहाण निजामशहाने आपल्या सरदारांची एक बैठक बोलावली. त्यापैकी काहींनी वेढा उठविण्याचा मार्ग सुचविला आणि तह करण्यासाठी म्हणून अहमदनगरकडे माघार घेण्याचा सल्ला दिला. परंतु शहा जाफर आणि कासीमबेग यांनी शत्रूवर अचानक आणि जोरदार हल्ला चढविण्याची शिफारस केली. हा सल्ला बुरहाण निजामशहाने मानला आणि त्याप्रमाणे सैफउद्दीन ऐनउल्मुल्क याने इतर अनेक तुर्की अधिकाऱ्यांना बरोबर घेऊन रमजानच्या उपवासाच्या सकाळी दिवस उजाडता उजाडता विजापुरच्या सैन्यावर अचानक हल्ला चढविला. इब्राहीम आदिलशहा त्यावेळी हमामखान्यात होता. त्याला जेमतेम पळून जाण्याइतका अवधी मिळाला आणि तो पळून बीड आणि परंड्याकडे गेला. या अचानक हल्ल्यामुळे विजापूरच्या सैन्याची इतकी दाणादाण उडाली की त्यांनी आपल्या राहुट्या, सामानसुमान आणि तोफखाना तसेच टाकून काढता पाय घेतला. ही सर्व साधनसामुग्री निजामशाही

सैन्याच्या हाती पडली. याच वेळेला निजामशाही सैन्याने कल्याणीच्या किल्ल्यावर हल्ला चढविला. फारसा प्रतिकार न होता तो किल्लाही निजामशाही सैन्याच्या ताब्यात आला. या पराजयानंतर शत्रूच्या हातून आपल्या प्रदेशाचा विध्वंस होऊ नये म्हणून इब्राहीम आदिलशहाने शत्रूच्याच प्रदेशातून पलायन केले. तो एकाएकी परंडा किल्ल्यासमोर येऊन हजर झाला आणि किल्ल्याचे दरवाजे रखवालदारांनी बंद करून घेण्याचे अगोदर तो किल्ल्यात घुसला. त्याने किल्ल्याचा ताबा घेतला आणि त्याच्या देखरेखीचे काम आपल्या एका दक्षिणी अधिकाऱ्यावर सोपविले. नंतर त्याने आजूबाजूच्या मुलुखात जाळपोळ आणि लुटालूट केली आणि लोकांकडून जबरदस्त खंडणी वसूल केली. परंतु बुरहाण निजामशहा चाल करून येतो आहे असे पाहताच त्याने विजापूरच्या दिशेने माघार घेतली. निजामशाही सैन्याने परंड्याच्या दिशेने आपली आगेकूच चालू ठेवली. निजामशाही सैन्य किल्ल्यापासून ४० मैल अंतरावर येऊन पोहोचले तोच इब्राहीम आदिलशहाने किल्ल्याच्या रक्षणासाठी ठेवलेल्या भ्याड अधिकाऱ्याने रातोरात किल्ल्यातून पळ काढला. ही हकीकत ज्यावेळी [ ३ ] ( २३५ ) घडली [२३६] त्या काळात राहात असलेल्या शहा जमालउद्दीन अंजू याने मला सांगितले की परंड्याच्या सुभेदाराने एकच आग्रह धरिला की " मी बुरहाण निजामशहाच्या सैन्यातील तुताऱ्यांचे आवाज ऐकले " आणि याच बोलण्याला तो चिकटून राहिला. अर्थात त्या वेळी बुरहाण निजामशहा ४० मैल अंतरावर होता आणि सुभेदाराने ऐकलेला हा आवाज म्हणजे दुसरे तिसरे काहीही नसून त्याच्याच खोलीत गुणगुणाऱ्या एका माशीचा आवाज होता. सुभेदार पळून गेल्यानंतर तिसऱ्या दिवशी बुरहाण निजामशहाच्या सैन्याने किल्ला रिकाम्या स्थितीत ताब्यात घेतला. किल्ला ख्वाजा जहान दक्कनी याच्या ताब्यात देऊन बुरहाण निजामशहा अहमदनगर येथे परत फिरला.

( ४१ ) हिजरी ९५७ / इ. स. १५४९ } पुढील वर्षीच बुरहाण निजामशहाने विजापूरवर आक्रमण केले आणि विजापूर राज्याचा बहुतेक प्रदेश आपल्या सैन्याच्या पायाखाली घातला. त्याला कसलाही प्रतिकार झाला नाही. रायचूर किल्ल्याच्या जवळपास त्याची आणि रामराजाची मुलाखत झाली त्यात असे ठरले की दोघांनी विजापुरच्या प्रदेशावर हल्ला चढवून आपल्याला पाहिजे असेल तेवढ्याच मुलुखावर हात मारावा. त्याचप्रमाणे रामराजाने रायचूर आणि मुद्गल हे किल्ले आणि या किल्ल्यांच्या अधिपत्याखाली असलेला कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील सर्व मुलुख घ्यावा आणि बुरहाण निजामशहाने सोलापूर आणि कुलबर्गा यावर आक्रमण करावे.

( ४२ ) यानुसार बुरहाण निजामशहाने सोलापुरच्या किल्ल्याला वेढा दिला. तीन महिने वेढा चालल्यानंतर किल्ल्यावर हल्ला चढवून किल्ल्याचा पाडाव करण्यात आला. बुरहाण निजामशहा यानंतर कुलबर्ग्याकडे कूच करण्याच्या विचारात होता. तोच

त्याला खबर मिळाली की रामराजाने रायचूर आणि मुद्गल यांचा पाडाव केला असून तो विजयनगरकडे परतला आहे. तेव्हा बुरहाण निजामशहानेही अहमदनगरकडे परत फिरावे हे योग्य आहे असा विचार केला.

( ४३ ) हिजरी ९६१ इ. स. १५५३ } हिजरी ९६१ यावर्षी बुरहाण निजामशहाने पुन्हा एकदा रामराजाबरोबर संगनमत केले आणि विजापूरच्या रोखाने चाल केली. त्याला प्रतिकार करणे अशक्य झाल्या. [३] (२३६) मुळे इब्राहीम आदिलशहाने पन्हाळयाच्या किल्ल्याकडे माघार घेतली. विजयनगर आणि अहमदनगरच्या संयुक्त फौजांनी विजापूरला वेढा दिला तोच बुरहाण निजामशहाला एकाएकी आतड्याच्या भयंकर विकाराने घेरले. त्यामुळे त्याला ताबडतोब राजधानीकडे परतणे भाग पडले. यानंतर लवकरच त्याचा मृत्यू झाला. त्याचे प्रेत कुजू नये म्हणून त्यात मसाल्याची सुगंधी द्रव्ये भरण्यात आली आणि प्रेत करबला येथे रवाना करण्यात आले. अलीचा मुलगा आणि पैगंबराचा नातू हसन याच्या कबरीजवळ त्याच्या शवाचे दफन करण्यात आले.

( ४४ ) बुरहाण निजामशहाचा वयाच्या ५४ व्या वर्षी मृत्यू झाला. त्याने एकंदर ४७ वर्षे राज्य केले. त्याच्या दोन स्त्रियांपासून त्याला एकंदर चार मुलगे झाले. त्यापैकी हुसेन आणि अबदूल कादर हे त्याची आवडती नर्तकी अमिना हिच्यापासून आणि शहाअली आणि मिरान महमद बाकर हे युसुफ आदिलशहाची मुलगी बिबी मरियम हिच्यापासून. त्याशिवाय त्याला शहा हैदर नावाचा आणखी एक मुलगा होता. ह्याचे ख्वाजा जहान दक्नी याच्या मुलीबरोबर लग्न झालेले होते. २३७□ २३८□

## हुसेन निजामशहा पहिला [ ३ ] ( २३७ )

( ४५ ) हुसेन निजामशहा आपल्या बापाचे मृत्यूनंतर गादीवर आला. त्यावेळी त्याचे वय १३ वर्षांचे होते. त्याचा सख्खा भाऊ राजपुत्र अब्दुल कादर इतर राजपुत्रांसह त्याच दिवशी अहमदनगरमधून पळून गेला. या क्षणापासून अहमदनगरच्या राज्यामध्ये दोन पक्ष निर्माण झाले. पहिला पक्ष हुसेन निजामशहाची बाजू उचलून धरणारा परदेशी मुसलमान आणि हबशी यांचा आणि दुसरा अबदुल कादरचा अनुनय करणारा दक्षिणी मुसलमान आणि हिंदू यांचा. अखेर मात्र अबदुल कादरचा पाठपुरावा करणाऱ्यांनी त्याचा त्याग केला तेव्हा अबदुल कादर हा वऱ्हाडात पळून गेला. आणि तेथे त्याने वऱ्हाडचा सुलतान इमाद उलमुल्क याच्यापाशी आश्रय घेतला.

( ४६ ) शहा अली आणि मिरान महमद बाकर हे दोघेजण त्यांचा चुलता विजापूरचा इब्राहीम आदिलशहा याजकडे पळून गेले शहा हैदर हा आपला सासरा परंड्याचा सुभेदार ख्वाजा जहान दक्नी याजकडे पळून गेला आणि तेथून त्याने आपल्या

सासऱ्याच्या मदतीने अहमदनगरच्या तख्तावर आपला हक्क सांगितला. [ ३ ] (२३८) सिंहासनावर हक्क सांगणाऱ्या शहा हैदर याजवर चाल करून जाण्यास हुसेन निजामशहा बिलकुल कचरला नाही. इतकेच नव्हे तर त्याने ख्वाजा जहान आणि शहा हैदर यांजवर हल्ला करून त्याना विजापूर येथे पळून जाण्यास भाग पाडले. परंडा याप्रमाणे निजामशाही फौजांच्या हाती पडले. ही घटना घडून आल्यानंतर विजापूरच्या इब्राहीम आदिलशहाने उघड उघड शहा हैदर आणि ख्वाजा जहान यांचा पाठपुरावा केला आणि त्याने हुसेन निजामशहाविरुद्ध युद्ध पुकारले. बुरहाण निजामशहाच्या कारकिर्दीत सोलापूरचा किल्ला अहमदनगरच्या ताब्यात आला होता. त्या किल्ल्याविरुद्ध आदिलशहा चाल करून गेला. दरम्यान हुसेन निजामशहाने वऱ्हाडच्या इमादशहाबरोबर दोस्तीचा तह केला. इमादशहाने त्याच्याकडे मदतीदाखल ६००० घोडेस्वार रवाना केले. त्यानंतर हुसेन निजामशहाने सोलापूरचा वेढा उठविण्यासाठी कूच केले. या मोहिमेची संपूर्ण हकीकत इब्राहीम आदिलशहाच्या इतिहासात दिलेली आहे.

( ४७ ) पूर्वी सैफऐन् उल्मुल्क हा निजामशाही सरदार अहमदनगर सोडून विजापूरच्या आश्रयास गेला होता. परंतु त्या राज्यातून त्याला काढून लावण्यात आले तेव्हा त्याने अहमदनगर राज्यात परत येण्यासाठी परवानगी मागितली. हुसेन निजाम शहाने ती परवानगी त्याला दिली. काही कालानंतर हुसेन निजाम-शहाने विश्वासघाताने ऐनउल्मुल्क याला ठार मारले. ऐनउल्मुल्क याचा मुख्य आश्रित काबूलखान हा होता. त्याने मोठ्या शौर्याने ऐनउल्मुल्कच्या कुटुंबीय मंडळींचे प्राण वाचविले, आणि त्यांना सुरक्षितपणे गोवळकोंडा येथे पोहोचविले. गोवळकोंड्याचा सुलतान इब्राहीम कुतुबशहा याने काबूलखानाला आपल्या चाकरीत घेतले. साऱ्या दक्षिण देशात ऐनउल्मुल्क हा आपल्या शौर्याबद्दल आणि त्याच्या हाताखालील घोडेस्वारांच्या अंगी वसत असलेल्या कुशलतेबद्दल प्रसिद्ध होता. आपल्या हाताखालील घोडेस्वारांबरोबर तो बंधुत्वाच्या नात्याने वागत असे. यासुमारास विजापूर येथे इब्राहीम आदिलशहा मरण पावला. त्याचा फायदा घेऊन हुसेन निजाम-शहाने गोवळकोंड्याच्या इब्राहीम कुतुबशहाबरोबर संगनमत करून विजापूरच्या राज्यावर आक्रमण करण्यासाठी कूच केले. परंतु कुतुबशहाने मनापासून [ ३ ] ( २३९ ) या स्वारीत हुसेन निजामशहाला साथ दिली नाही आणि तो आपल्या राजधानीकडे निघून गेला. त्यामुळे हुसेन निजामशहालाही अहमदनगरकडे माघारी फिरणे भाग पडले. इब्राहीम आदिलशहानंतर अली आदिलशहा हा विजापूरच्या गादीवर आला होता. त्याने विजयनगरचा रामराजा आणि इब्राहीम कुतुबशहा यांजबरोबर मैत्रीचा तह केला. हुसेन निजामशहाने देखील वऱ्हाडच्या इमादउल्मुल्काबरोबर संधान बांधले. इमाद-उल्मुल्काने हुसेन निजामशहाची हिजरी ९६७ यावर्षी गोदावरीच्या तीरावर सोनपेठ मुक्कामी भेट घेतली. याप्रसंगी इमादउल्मुल्कच्या मुलीबरोबर हुसेन निजाम शहाचा विवाहसमारंभ साजरा झाला.

हिजरी ९६७ | इ. स. १५५९

( ४८ ) याचवर्षी हुसेन निजामशहाने आपले दोन सरदार महमद उस्ताद विजापूरी आणि छलबी रूमीखान यांना देवदंडयाच्या किल्ल्यावर पाठविले[२३९०]. हा किल्ला समुद्र-किनाऱ्यावर पोर्तुगीजांनी बांधला होता. पोर्तुगीजांनी त्यांच्याबरोबर तह केला आणि अहमदनगर राज्याच्या प्रजाजनांचा आम्ही छळ करणार नाही असे कबूल केले. हुसेन निजामशहाने आपल्या सैन्यासह खानदेशच्या मुलखावर देखील आक्रमण केले आणि गाळण्याचा किल्ला जिंकून घेतला.

( ४९ ) दरम्यानच्या काळात विजापूर, गोवळकोंडा आणि विजयनगर या देशांच्या राजांनी निजामशाही प्रदेशावर आक्रमण केले. शत्रसंधी करावयाचा असेल तर कल्याणी आणि सोलापूर हे किल्ले आमच्या स्वाधीन करा अशी त्यांनी हुसेन निजामशहाकडे मागणी केली. हुसेन निजामशहाने ही अट मान्य करण्याचे नाकबूल केले तेव्हा वरील तिन्ही राज्यांच्या फौजांनी एकजुटीने अहमदनगर राज्यावर हल्ला केला. १,००,००० घोडेस्वार आणि ९,००,००० पायदळ एवढी प्रचंड फौज घेऊन ते अहमदनगर शहरापाशी येऊन पोहोचले.

( ५० ) इतक्या प्रचंड फौजेशी सामना देणे हुसेन निजामशहाला [३] (२४०) शक्य न झाल्यामुळे त्याने अहमदनगरहून पळून जाऊन पैठण गाठले. तेथून त्याने वऱ्हाडचा इमाद उलमुल्क, खानदेशचा मिरान मुबारक शहा फारूकी आणि बिदरचा अली बरीदशहा यांजकडे आपले वकील पाठविले आणि आपल्या मदतीसाठी ताबडतोब कूच करून या अशी त्यांजकडे याचना केली. अलि बरीदशहाचा भाऊ खान जहान याने काही काळापूर्वीच बिदर सोडले होते आणि तो इमाद उलमुल्क याच्या चाकरीत शिरला होता. त्याने अहमदनगरच्या सुलतानाला कसलीही मदत न देण्याविषयी दर्या इमाद उलमुल्क याचे मन वळविले. एवढेच नव्हे तर सहा हजार घोडेस्वार माझ्या दिमतीस द्या आणि अहमदनगरच्या सरहद्दीवर हल्ला करण्याची मला परवानगी द्या याबद्दल त्याने दर्या इमाद उलमुल्क याच्यावर दडपण आणले. दर्या इमाद उलमुल्क याने या गोष्टीला परवानगी दिली. खानजहान असे काहीतरी करील अशी अटकळ हुसेन निजामशहाने अगोदरच बांधली होती. त्यामुळे निजामशाही फौजेच्या एका घोड-दळाच्या तुकडीने खानजहान याचा संपूर्ण पराभव केला. या पराभवामुळे खानजहान याला इमाद उलमुल्क याच्याकडे जाण्याची लाज वाटली आणि तो आदिलशाही फौजेला येऊन मिळाला. आता दोस्तांच्या सैन्यांनी अहमदनगरला वेढा दिला. परंतु अहमदनगरचा किल्ला जिंकून तो आदिलशहाने आपल्या राज्यात सामील करावा ही गोष्ट इब्राहीम कुतुबशहाला पसंत पडली नाही. तेव्हा त्याने आपल्या छावणीतून किल्ल्यातील शिबंदीकडे रसदीचा पुरवठा होऊ दिला आणि तिकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले. याचवेळी कुतुबशहाच्या चाकरीत असलेल्या मुल्लाइनायतउल्ला नेवायत याने पैठण येथे असलेल्या हुसेन निजामशहाबरोबर आणि किल्ल्यात कोंडल्या गेलेल्या शिबंदीबरोबर सारखा पत्रव्यवहार चालू ठेवला. अशा तऱ्हेच्या घडामोडी फार काळ

गुप्त राहणे शक्य नव्हते. साहजिकच अलि आदिलशहा आणि रामराजा यांनी इब्राहीम कुतुबशहाकडे याचा जबाब मागितला. परंतु त्याने जबाब देण्याची दखल न घेता रातोरात छावणी सोडली आणि गोवळकोंड्याकडे कूच केले. त्याचा अधिकारी मुल्ला इनायतउल्ला याने प्रथम किल्ल्यात प्रवेश करून घेतला आणि नंतर तो पैठण येथे हुसेन निजामशहाला जाऊन मिळाला. खानजहान याचा पराभव झाल्यानंतर त्याने अहमदनगर राज्यावर जो हल्ला केला होता त्याची भरपाई करण्यासाठी म्हणून दर्या इमाद उलमुल्क याने खूप मोठे सैन्य जहांगीर खानाच्या हाताखाली [ ३ ] ( २४१ ) हुसेन निजामशहाच्या मदतीसाठी पाठविले. हे सैन्य हुसेन निजामशहाला येऊन मिळाले. त्याने या सैन्याचा उपयोग किल्ल्याला वेढा घालून बसलेल्या दोस्तांच्या फौजेची रसद तोडण्यासाठी केला. त्यामुळे दोस्तांच्या फौजेत भयंकर दुष्काळ निर्माण झाला. एकंदर सर्व परिस्थिती ही अशी जुळून आली की दोस्तांना अहमदनगरचा वेढा उठवून अष्टी येथे माघार घेऊन तळ देणे भाग पडले. अष्टी येथे गेल्यानंतर दोस्तांनी असे ठरविले की सैन्याची एक तुकडी परंड्यावर आणि दुसरी औशावर पाठविण्यात यावी. नंतर सैन्यासाठी भरपूर रसदीची तरतूद केल्यानंतर अहमदनगरच्या किल्ल्याला वेढा देण्यासाठी परत फिरावे.

( ५१ ) परंतु निजामशहाने आपले दोन अधिकारी कासीम बेग आणि मुल्ला इनायतउल्ला यांना रामराजाकडे तहाची याचना करण्यासाठी पाठविले होते. रामराजाने पुढील अटींवर अहमदनगरबरोबर तह करण्यास आपली संमती दिली. त्या अटी अशा :

( १ ) हुसेन निजामशहाने कल्याणीचा किल्ला अली आदिलशहाला द्यावा.

( २ ) दर्या इमाद उलमुल्क याच्या सहाय्यक फौजेचे अधिपत्य जहांगीरखान याजकडे होते. त्याने दोस्तांच्या फौजांचा भयंकर उच्छाद मांडला होता. निजामशहाने जहांगीरखानाचा वध करावा.

( ३ ) हुसेन निजामशहाने रामराजाला भेट देण्याचे आणि त्याच्या हातातून विडा[२४०] घेण्याचे मान्य करावे. आपल्या राज्याचा बचाव व्हावा या हेतूने या अटींना हुसेन निजामशहाने आपली मान्यता दिली. रणामध्ये शौर्य गाजविलेल्या जहांगीरखानाचा वध करण्यासाठी त्याने मारेकऱ्यांची एक टोळी त्याच्या तंबूत पाठवून त्याला ठार मारले.

( ५२ ) अशा तऱ्हेने तहाच्या दुसऱ्या अटीचे त्याने पालन केले. [ ३ ] ( २४२ ) रामराजासारख्या काफराच्या चिथावणीवरून त्याने एका कट्टर मुसलमानाचा वध करविला आणि " राजे रजवाड्यांच्या शब्दांवर कोणीही विश्वास ठेवू नये, " या उक्तीतील सत्याची प्रचिती अशा तऱ्हेने हुसेन निजामशहाने आणून दिली. यानंतर तो रामराजाच्या छावणीकडे गेला. हुसेन निजामशहाने छावणीत प्रवेश केल्यावर रामराजा उठला, आणि त्याने त्याचा हात आपल्या हातात घेतला. हुसेन निजामशहा याला आपल्या स्वतःबद्दल अतिशय अभिमान वाटत असे. त्याने पाण्याचे एक भांडे

आणि तस्त मागविले आणि रामराजाच्या स्पर्शामुळे आपले हात जणू काही दूषीत झाले आहेत असे दाखवून तस्तामध्ये हात धुऊन टाकले. हे पाहिल्यावर रामराजा आपल्या भाषेत उद्गारला की, " हा जर माझा पाहुणा नसता तर याचे हात मी तोडले असते आणि त्याच्या मानेभोवती टांगून ठेवले असते. " नंतर त्यानेही पाणी मागविले आणि आपले हात धुवून टाकले. दोन्ही बाजूकडील भावना इतक्या प्रक्षुब्ध झाल्या की दोन्ही पक्ष त्याच जागी हमरीतुमरीवर येऊन मारामारी करतात की काय असे वाटू लागले. हुसेन निजामशहाने कल्याणीच्या किल्ल्या रामराजाच्या स्वाधीन करून म्हटले की " ह्या मी तुम्हाला भेट म्हणून देत आहे. " रामराजाने ताबडतोब त्या आदिलशहाकडे रवाना केल्या. नंतर त्याने हुसेन निजामशहाला पानाचा विडा दिला. यावर अली आदिलशहाला न भेटता हुसेन निजामशहा अहमदनगरला चालता झाला. तेथे आल्यानंतर त्याने अहमदनगरचा किल्ला फिरून दगडाने बांधला. हा किल्ला पूर्वी फक्त मातीत बांधण्यात आला होता. त्याचप्रमाणे हुसेन निजामशहाने किल्ल्याभोवती एक खोल खंदक खणण्याची आज्ञा केली. अहमदनगर आणि विजयनगर यांच्यामध्ये तह घडवून आणण्याचे कामी हुसेन निजामशहाच्या वतीने कासीम बेग आणि मुल्ला इनायतउल्ला व रामराजाच्या वतीने व्यंकटाद्री आणि येलतमूराज यांनी भाग घेतला होता.

(५३) हिजरी ९७० इ. स. १५६२ } हिजरी ९७० या वर्षी हुसेन निजामशहा आणि इब्राहीमशहा हे कल्याणीच्या परिसरात एकमेकास भेटले. त्याठिकाणी हुसेन निजामशहाची मोठी मुलगी बिबी जुमली हिचा विवाह इब्राहीम कुतुबशहाबरोबर साजरा करण्यात आला. त्यानंतर ताबडतोब त्यानी कल्याणीच्या किल्ल्याला वेढा दिला. या परिस्थितीत त्यांच्यावर रामराजा आणि अली आदिलशहा यांनी हल्ला केला. त्यांना बिदरहून अली बरीदशहा आणि [ ३ ] ( २४३ ) वऱ्हाडहून बुरहाण इमादशहा हे दोघेजण येऊन मिळाले. बुरहाण इमादशहा हा नुकताच आपला बाप दर्या इमादशहा याच्या मृत्यूनंतर गादीवर आला होता. हुसेन निजामशहाने अब्रूची चाड न बाळगता जहांगीरखानाचा जो खून करविला होता त्यामुळे बुरहाण इमादशहा हा आतल्याआत हुसेन निजामशहावर जळत होता. शत्रूचे सैन्य आपल्यावर चालून येत आहे असे पाहून हुसेन निजामशहाने आपला जनाना औशाच्या किल्ल्यात पाठवून दिला. नंतर त्याने निरनिराळ्या पल्ल्याच्या ७०० तोफा आणि ५०० हत्ती यांसह इब्राहीम कुतुबशहा समवेत कूच केले आणि तो शत्रूपासून १२ मैल अंतरापर्यंत येऊन पोहोचला. त्याने त्या ठिकाणी जेमतेम मुक्काम केला न केला आहे तोच एक प्रचंड वादळ घोंघावत आले आणि त्या वादळाने हुसेन निजामशहाच्या छावणीतील सर्व तंबूंची विल्हेवाट लावून टाकली. इतक्यात मुसळधार पावसाचा मारा सुरू झाला आणि त्यात त्याची जनावरे आणि विशेषतः तोफाही पूर्णपणे कुचकामी झाली. निजामशहाने आपली छावणी दिली होती तो प्रदेश दाट

काळ्याभोर मातीचा होता. तुफान पडलेल्या पावसाने तिथे अगदी राडा होऊन गेला आणि त्यात हुसेन निजामशहाचा तोफखाना रुतून बसला. दुसऱ्या दिवशी सकाळी शत्रूच्या बारगीर घोडेस्वारांनी इब्राहीम कुतुबशहाच्या छावणीवर सर्व बाजूनी हल्ले चढविले. कोणताही प्रतिकार न करता इब्राहीम कुतुबशहाच्या सैन्याने पळ काढला. कुतुबशहा आपल्याला सोडून छावणीतून पळून गेल्याचे हुसेन निजामशहाने जेव्हा पाहिले तेव्हा त्यानेही काढता पाय घेण्याचे ठरविले. या माघारीमध्ये त्याने रणांगणावर आणलेल्या ७०० तोफांपैकी जेमतेम ४० तोफा त्याला आपल्याबरोबर नेणे शक्य झाले.[२४१□]

(५४) तिसऱ्या दिवशी हुसेन निजामशहाने ज्या काही तोफा बरोबर घेतल्या होत्या त्यांचाही त्याग करणे त्याला भाग पडले. तोफा तशाच टाकून त्याने [३](२४४) अहमदनगरकडे पळ काढला. माघार घेताना आपले शाही किनखाबाचे छत्र चामर मात्र त्याने आपल्या बरोबर घेतले. जरी त्याच्याजवळ जेमतेम १००० घोडेस्वार होते तरी शत्रूच्या सहा हजार घोडेस्वारांची फळी फोडून तो पार झाला. ठराविक आणि नेमलेल्या वेळी नमाज पढण्याचा हुसेन निजामशहाने कडक शिरस्ता पाळला होता. एके दिवशी दुपारी शत्रू त्याच्या अगदी पाठीवर आलेला होता. अशा वेळी घोड्यावरून उतरून नमाज पढण्यामध्ये किती धोका आहे याची त्याला त्याच्या अधिकाऱ्यांनी जाणीव दिली. परंतु हुसेन निजामशहाने त्याच्या अधिकाऱ्यांनी त्याला दिलेल्या इशाऱ्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले. त्याने दाखविलेल्या असामान्य धैर्याचा त्याच्या शत्रूंना अतिशय अचंबा वाटला आणि काही अंतरावर पाठलाग करण्याचे थांबवून त्यांनी निजामशहाच्या अप्रतीम शौर्याची प्रशंसा केली. नमाज पढून झाल्यानंतर त्याच्या असे दृष्टोत्पत्तीस आले की आपल्या कमरेवर सोन्याचा कमरपट्टा आहे. सोन्याचा कमरपट्टा घालून नमाज पढणे हे अतिशय निषेधयुक्त आहे याची निजामशहाला जाणीव झाली. त्याने कमरपट्टा काढून फेकून दिला आणि पुन्हा त्याने नमाज पढून पुरे केले. आता निजामशहाचा पाठलाग करणे अप्रस्तुत आहे अशा निष्कर्षाप्रत शत्रू येऊन पोहोचला आणि त्याचा पाठलाग करण्याचे सोडून देण्याचे त्यांनी ठरविले. त्यानंतर हुसेन निजामशहाने अहमदनगरच्या किल्ल्यात भरपूर रसदीचा पुरवठा केला आणि स्वतः जुन्नरच्या किल्ल्याचा आश्रय घेण्यासाठी त्याने कूच केले. दोस्तांनी पुन्हा अहमदनगरच्या किल्ल्याला वेढा दिला. रामराजाच्या हिंदू सैनिकांनी मुसलमानी प्रजा आणि त्यांची मालमत्ता यांच्यावर कल्पनाही करता येणार नाही एवढे अत्याचार आणि मानखंडना करणारी कृत्ये केली. त्यांनी मुसलमानांच्या मशिदी उध्वस्त केल्या आणि स्त्रियांच्या अब्रूचे अपहरण केले. अलि आदिलशहाला या अत्याचारांची घृणा आली आणि त्याने रामराजाला अहमदनगरचा वेढा उठवून हुसेन निजामशहाचा जुन्नरकडे पाठलाग करण्याबद्दल सल्ला दिला. शत्रू आपल्या पाठलागावर पुन्हा आला आहे हे पाहिल्यावर हुसेन निजामशहाने जवळपासच्या उंच पर्वतराजींचा आसरा घेतला.

त्याने हुसेन रुस्तुमखान दक्कनी, आधमखान हबशी आणि सखाजी कोळी या आपल्या तिघा अधिकाऱ्यांना सैन्य घेऊन शत्रूच्या छावणीभोवती घिरट्या घालण्याचे आणि त्याची रसद तोडण्याचे कामगिरीवर रवाना केले. त्यांनी दोस्तांच्या छावणीभोवतालचा प्रदेश इतका उजाड आणि उध्वस्त करून टाकला की त्यामुळे शत्रूला पाऊल पुढे टाकणेही अशक्यच होऊन बसले. हुसेन रुस्तुम खानाची आणि शत्रू [३](२४५) सैन्याची कानूर्‌या खेडेगावापाशी गाठ पडली. अलिआदिलशहा हा त्या वेळी शिकारीसाठी गेल्यामुळे छावणीत गैरहजर होता. तेव्हा रुस्तुम खानाने विजापूरच्या सैन्यावर एकाएकी छापा घातला. यावेळी झालेल्या धुमश्चक्रीत अलिआदिलशहाचा चुलता ठार मारला गेला. परंतु विजापूरच्या सैन्याने अखेर बाजू रुस्तुमखानावर इतक्या यशस्वीरित्या उलटविली की हुसेनखान आणि त्याचे दोन हजार सैनिक रणांगणावर ठार मारले गेले. पावसाळ्याला सुरुवात होण्याचे अगोदर दोस्तांनी पुन्हा अहमदनगरला वेढा घालण्यासाठी कूच केले. सिना नदीच्या किनाऱ्यावर किल्ल्याच्या दक्षिणेला रामराजाच्या सैन्याने तळ दिला. त्यावेळी डोंगरामध्ये मुसळधार पावसाने कहर केला. रात्रीच्या वेळी नद्यांना भयंकर पूर चढला. या पुरात दोस्त सैन्याचे ३०० घोडे आणि सामान सुमान वाहून नेणारी असंख्यात जनावरे बुडाली. त्याशिवाय कमीतकमी २० पेक्षा जास्त असे उच्च दर्जाचे अधिकारी आणि २५ हजारांपेक्षा अधिक सैन्यामधील लहान-मोठे अधिकारी नदीला आलेल्या प्रचंड पुरात वाहून गेले. या भयंकर दुश्चिन्हामुळे रामराजाने अहमदनगर किल्ल्याचा वेढा उठविला आणि कर्नाटकच्या दिशेने कूच केले. अली आदिलशहाने त्याचाच कित्ता गिरवला, आणि नळदुर्गच्या किल्ल्याकडे, त्या किल्ल्याची संरक्षणाच्या दृष्टीने मजबूती करण्यासाठी कूच केले. जेव्हा दोस्तांच्या फौजा होटगी येथे पोहोचल्या तेव्हा दाणापाण्याची व्यवस्था करण्याच्या मिषाने रामराजाने तेथे मुक्काम केला, आणि त्या संधीचा फायदा घेऊन त्याने विजापूर आणि गोवळकोंडा यांच्या काही जिल्ह्यांची लुटालूट केली. अखेर आपल्या राजधानीला परत फिरण्याचे अगोदर त्याने अलीआदिलशहा आणि इब्राहीम कुतुबशहा या दोघांकडून बराचसा मुलूख तोडून घेऊन तो आपल्या राज्यात सामील केला.

(५५) अली आदिलशहाने नळदुर्ग किल्ल्यावर मूर्तजाखान अंजू याची किल्लेदार म्हणून नेमणूक केली, आणि तो विजापूरकडे परतला. त्यावेळी सोलापूर जिल्हा हा हुसेन निजामशहाच्या ताब्यात होता. विजापूरच्या अधिकाऱ्यांनी वारंवार या जिल्ह्यात आक्रमणे केली. सोलापूरवर आता हल्ला होणार अशी भिती वाटल्यामुळे [३] (२४६) निजामशहाने लढाऊ सैनिक देऊन मोठ्या बंदोबस्ताने शहरावर हल्ला झाल्यास आणि कितीही काळपर्यंत वेढा चालू राहिल्यास अन्नधान्य पुरेसे पडावे म्हणून १ हजार बैलांवर धान्यांच्या गोणी लादून त्या सोलापूरकडे रवाना केल्या. नळदुर्ग येथे मूर्तजाखानाला सोलापूरकडे चाललेल्या या तांड्याची खबर मिळाली. त्याने तावडतोब बारगीर घोडेस्वारांची एक मोठी तुकडी घेऊन नळदुर्गवरून कूच केले आणि सोलापूर

व परंडा यांच्यामध्ये तो निजामशाही फौजेवर तुटून पडला. दोन्ही फौजात लढाई झाली, आणि त्यात निजामशाही फौजेचा पराभव झाला. त्यानी १५० हत्ती गमावले. विजापूरच्या बारगीर घोडेस्वारांना मिळालेल्या विजयाचा उन्माद चढला. त्यांनी लुटालूट करण्यास आणि इतस्ततः फैलावण्यास सुरवात केली. मूर्तजाखानाने हत्तींची रवानगी विजापूरकडे केली, आणि तो स्वतः नळदुर्गकडे परतला. दरम्यान निजामशाही फौजेपैकी काही सैनिकांना मूर्तजाखानाने पकडले होते आणि नंतर सोडून दिलेले होते. त्यांनी आपल्या मुख्य सैन्याकडे जाऊन मूर्तजाखानाचे सैन्य कसे विस्कळीत झालेले आहे याची हकिकत आपल्या अधिकाऱ्यांना निवेदन केली. यावर त्यानी जवळजवळ २ हजार घोडेस्वारांची जमवाजमव केली, आणि आदिलशाही सैनिकांचा पाठलाग सुरू केला. त्यांनी एकाएकी मूर्तजाखानावर हल्ला केला, त्याला पकडले आणि त्याची खानगी अहमदनगरकडे केली. सोलापूर येथे शिबंदीला प्रतिकारासाठी रसद पोहोचविण्याचा हुसेन निजामशहाचा निर्धार अद्याप कायम होता. त्याने स्वतः अहमदनगरहून आपल्या सैन्यासह कूच केले आणि सोलापूर शहरात १२ हजार गोणी इतके धान्य कुमक म्हणून यशस्वीरित्या पोहोचविले.

(५६) हिजरी ९७२ / इ. स. १५६४ } ज्या वर्षी रामराजा या विजयनगरच्या हिंदू राजाच्या वाढत्या सामर्थ्याचा नायनाट करण्यासाठी अहमदनगर, विजापूर, बिदर आणि गोवळकोंडा येथील मुसलमान सुलतानांनी तह करून एकजूट केली ते वर्ष म्हणजे हिजरी ९७२ हे होय. या सर्व सुलतानांची सैन्ये एकत्रित झाली आणि त्यांनी दक्षिणेच्या दिशेने कूच केले. या सैन्याने कृष्णा नदी ओलांडली आणि तेथूनच १२ मैल अंतरावर असलेल्या हुकेरी नदीवर त्यांनी आपला तळ दिला. या सैन्याला प्रतिकार करण्यासाठी रामराजाने ७० हजार घोडेस्वार आणि ९० हजार पायदळ एवढी सेना घेऊन कूच केले. या सैन्यात [ ३ ] ( २४७ ) तिरंदाज आणि तोफखान्यातील गोलंदाज या शिवाय बऱ्हंशी बंदुका चालविणारेच अधिक होते. दक्षिणेच्या सुलतानांनी रामराजाबरोबर तह करण्यासाठी आपली तयारी दाखविली. आमची सैन्ये कूच करून येत असतांना जे तुमचे जिल्हे आम्ही ताब्यात घेतले आहेत ते तुम्हाला परत करू असे वचनही त्यांनी रामराजा तह करण्यास कबूल व्हावा म्हणून त्यास दिले. सुलतानांनी असा पवित्रा घेण्याचे कारण म्हणजे रामराजाच्या इतक्या प्रचंड सैन्याबरोबर मुकाबला करण्यास आपली शक्ती अपुरी पडेल असा जो विचार त्यांनी केला हे होय. परंतु रामराजाने कसल्याही तऱ्हेच्या तडजोडीला साफ नकार दिला. त्याने आपला भाऊ व्यंकटाद्री याला २ लक्ष पायदळ, २५ हजार घोडेस्वार आणि ५०० हत्ती एवढे सेनादल बरोबर देऊन डाव्या फळीवर अलि आदिलशहाचा प्रतिकार करण्यास पाठविले. आपला दुसरा भाऊ येलतमराज याला त्याने २५ हजार घोडेस्वार, २ लक्ष पायदळ आणि ५०० हत्ती देऊन इब्राहीम कुतुबशहा आणि अली बरीद यांना उजव्या फळीवर प्रतिकार करण्यासाठी रवाना केले.

तो स्वतः त्याच्या शेजारच्या देशातील राजांनी पाठविलेले १५ हजार निवडक सैनिक, १ हजार हत्ती आणि ५ लक्ष पायदळ एवढा सैनासंभार घेऊन सैन्याच्या मध्यभागी हुसेन निजामशहाच्या सैन्याला प्रतिकार करण्यासाठी उभा ठाकला. त्याची इच्छा इब्राहीम कुतुबशहा आणि अलि आदिलशहा यांना जन्मभर लोखंडी पिंजऱ्यामध्ये बंदिस्त करून ठेवण्याची होती. म्हणून त्याने आपल्या सैनिकांना शक्य झाल्यास त्या दोघांना जिवंत पकडून कैदी म्हणून आणण्याचा आदेश दिला. त्याने आपल्या हाताखालील सैन्याच्या तुकडीला शक्य झाल्यास हुसेन निजाम शहाचे शिर धडावेगळे करून आपल्यापाशी आणण्यास सांगितले.

(५७) रामराजाबरोबर कोणत्याही अटीवर तह होण्याची आशा न दिसल्यामुळे निराश झालेल्या मुसलमान सुलतानांनी प्राणपणाने शत्रूबरोबर मुकाबला करण्याचे ठरविले. त्यांनी पुढीलप्रमाणे आपल्या फौजेची लढाईसाठी रचना केला. अलि आदिलशहाने उजवी बाजू संभाळली, हुसेन निजामशहा हा आघाडीच्या मध्यावर उभा ठाकला, आणि इब्राहीम कुतुबशहा आणि अलिबरीद यांनी डाव्या फळीचा ताबा [ ३ ] ( २४८ ) घेतला. शत्रूवर हल्ला करण्यासाठी कूच करण्याचे अगोदर प्रत्येक फळीतील सेना विभागाने १२ इमामांच्या सन्मानार्थ १२ निशाणे उभी केली. हुसेन निजामशहाच्या आघाडीवर निरनिराळ्या पल्ल्यांच्या ६०० तोफा होत्या. एकेका ओळीत २०० तोफा अशा तऱ्हेने तोफांच्या ३ ओळी करण्यात आल्या होत्या. पहिल्या ओळीत भारी तोफा होत्या. दुसऱ्या ओळीत कमी पल्ल्याच्या तोफा होत्या आणि तिसऱ्या ओळीत जंबूरुख अथवा तोफगोळे टाकणारी फिरती यंत्रे होती. या सर्व तोफ खान्यावर अधिकारी म्हणून छलबी रूमीखान या अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली होती. रूमीखानाने मध्य आशिया खंडात कर्तबगार अधिकारी म्हणून नाव कमावले होते, आणि युरोप खंडातही त्याने तोफखान्यावर काम केले होते. त्याने जो व्यूह रचला होता तो शत्रूच्या नजरेस पडून शत्रू सावध होऊ नये म्हणून त्याच्या आघाडी वर २००० परदेशी तिरंदाजांची फळी उभारण्यात आली. त्यांनी पुढे चाल करून येणाऱ्या शत्रूवर बाणांचा अखंड वर्षाव चालू ठेवला. हिंदूचे सैन्य जसजसे आगेकूच करू लागले तसतसे हे तिरंदाज मागे झाले. हिंदूचे सैन्य याप्रमाणे तोफखान्याच्या अगदी नजीक येऊन पोहोचले. त्यांच्यावर मुसलमानांच्या तोफखान्याने इतका अचूक आणि प्रचंड भडिमार केला की त्यांची भयंकर प्राणहानी होऊन त्यांनी गोंधळात माघार घेतली. परंतु या आकस्मिक हल्ल्याने त्यांच्यामध्ये जो घबराट उडाला होता त्यांतून ते झटपट सावरले आणि त्यांनी आपली जमवाजमव केली. रामराजाने त्यांच्यामध्ये द्रव्य वाटले आणि आणखी द्रव्याची त्यांना भुलावणी दाखवून दुसऱ्यांदा मुसलमानांच्या तोफखान्यावर हल्ला करण्यासाठी म्हणून त्याना उद्युक्त केले. यावेळी हिंदूंच्या सैन्याने जो हल्ला केला त्यामुळे मुसलमानांची सर्व आघाडी पेटून उठली. हिंदूंनी मुसलमानांच्या आघाडीच्या मध्यावर जो हल्ला केला तो इतका प्रखर होता की मुसलमानांच्या

डाव्या आणि उजव्या फळीवरील सैन्याने माघार घेतली. शत्रू अतिशय जवळ येऊन ठेपला तर त्यावर हल्ला करण्यासाठी म्हणून छलबी रूमी खानाने तोफांत तांब्याची नाणी ठासून भरली होती. या तोफांनी केलेला मारा इतका नाशकारक ठरला की पाच हजारापेक्षा जास्त सैनिक तोफांच्या तोंडाजवळ मरून पडले. यानंतर हिंदूंनी माघार घेतली. मुसलमानी तोफखान्यावरील आलेला हिंदूंचा हल्ला परतविण्यात आला. या घटनेने लढाईचा निकाल जवळजवळ लागल्या सारखाच झाला. शत्रूमध्ये उडालेल्या गोंधळाचा फायदा मुसलमानी सेनाविभागाच्या मध्यावर हुसेन निजामशहाच्या हाताखालील विजापुरी सैन्यातील सेनापती किश्वरखान लारी याने घेतला. त्याने तोफांच्या रांगेतील रिकाम्या जागेमधून आपले पाचहजार घोडेस्वार [३](२४९) पुढे घुसविले आणि माघार घेणाऱ्या शत्रूचा रामराजाच्या सेनाविभागाच्या मध्यापर्यंत पाठलाग केला. तेथे रामराजा हा पायी पळून जाण्याचा प्रयत्न करीत असताना निजामशाही सैन्यातील एका हत्तीने त्याला गाठले आणि आपल्या सोंडेत त्याला पकडले. रामराजाला हुसेन निजामशहासमोर आणण्यात आले. रामराजाचा हुसेन निजामशहाच्या हुकुमावरून शिरच्छेद करण्यात आला. रामराजाचे सर्व सैन्य विजयनगरकडे पळून गेले. यानंतर झालेल्या घटनांची संपूर्ण हकीकत आदिलशाही घराण्याच्या इतिहासात यापूर्वीच कथन करण्यात आलेली आहे. याठिकाणी एवढेच सांगितले तरी पुरे आहे की विजयनगरचा सर्व प्रदेश मुसलमानी सैन्याचा हाती आला. यानंतर हुसेन निजामशहा अहमदनगरला परतला. व्यसनांच्या अतिरेकाने त्याच्या शरीराची भयंकर हानी झाली आणि त्यातच काही कालानंतर त्याचा अंत झाला. त्याच्या पाठीमागे त्याचे चार मुलगे आणि चार मुली होत्या. पुढील शब्दामध्ये त्याच्या मृत्यूची आठवण गुंफण्यात आली आहे. [२४२D]

दक्षिणेच्या सूर्याचे तेज अव्यक्त झाले.

## मुर्तजा निजामशहा

## ऊर्फ

## दिवाणा अथवा वेडा निजामशहा [३](२५०)

(५८) मुर्तजा[२४३D] निजामशहा जेव्हा गादीवर आला तेव्हा तो अल्पवयी होता. त्यामुळे त्याची आई खुनजा हुमायून ही सहा वर्षेपर्यंत राजप्रतिनिधी होती आणि राज्याच्या सर्व बाबींचे काम त्या कालापर्यंत तिने सांभाळले. तिने आपल्या तिघा भावांना-ऐनउलमुल्क, ताजउलमुल्क आणि एतिबार खान-राज्यातील पहिल्या प्रतीचे उमराव बनविले. तिने मुल्ला इनायतउल्ला याची राज्याचा वकील आणि पेशवा

या अधिकारावर नेमणूक केली. ती दररोज दरबारात हजर राही आणि चिकाच्या पडद्याआड बसून दरबारातील कामकाज पाही; तिचा मुलगा मुर्तजा निजामशहा हा मात्र त्याच्या वयाला साजेलशा व्यवसायात आपल्याला गुंतवून घेई.

(५९) निजामशाही दरबारातील कारभाराची अशा तऱ्हेची [३] (२५१) परिस्थिती असताना विजापूरच्या अलि आदिलशहाने आपले सैन्य घेऊन हिंदूवर (विजयनगर) चाल केली. अनागोंदी येथे विजयनगरच्या प्रांतातच आता त्यांची सत्ता उरली होती आणि त्यांचा राजा स्वर्गवासी रामराजाचा भाऊ व्यंकटाद्री हा पेणकोंडा येथे रहात असे. दुसरा काहीच उपाय न उरल्यामुळे आणि भयंकर संकटाने ग्रासल्यामुळे व्यंकटाद्रीने खूनजा हुमायून हिच्याकडे मदतीची याचना केली. तिने आपल्या सर्व सैन्यासहित आपला तरुण मुलगा मुर्तजा निजामशहा याला बरोबर घेऊन विजापूरच्या राजाविरुद्ध चाल केली. अहमदनगरच्या फौजांनी केलेल्या आक्रमणामुळे अनागोंदीहून माघार घेऊन आपल्या राज्याच्या संरक्षणासाठी पाठीमागे येणे अलि आदिलशहाला भाग पडले. परंतु यानंतर लवकरच अहमदनगर आणि विजापूर या दोन मुसलमानी राज्यांमध्ये तह झाला. या तहानंतर विजापूर आणि अहमदनगर या दोन राज्यांच्या सुलतानांनी वऱ्हाडचा बुरहाण इमादशहा याचा वकील आणि पेशवा तुफाल खान याच्या विरुद्ध मैत्रीचा करार केला. तुफालखानाने बुरहाण इमादशहाला बाजूला सारून आपल्या हातात सर्व सत्ता बळकावली होती. या तहाप्रमाणे आदिलशाही आणि निजामशाही फौजांनी वऱ्हाडवर आक्रमण केले आणि त्या प्रदेशांत लुटालूट केली. पावसाळा सुरू होण्यापूर्वी त्यांच्या फौजा आपापल्या राज्यांकडे परत फिरल्या. दोन्ही फौजा आपापल्या राजाकडे जात असताना आदिलशहाने अहमदनगरच्या तरुण सुलतानाला विश्वासघाताने पकडण्याचा प्रयत्न केला. परंतु अलि आदिलशहाच्या या बेताची माहिती अगोदरच मुर्तजा निजामशहाची आई राजप्रतिनिधी खूनजा हुमायून हिला लागली होती. तिने त्वरेने रातोरात छावणी सोडली आणि मलली नदी पार केली. दरम्यान नदीला आलेल्या प्रचंड पुरामुळे निजामशाही आणि आदिलशाही फौजा आपोआपच परस्परांपासून विभागल्या गेल्या आणि निजामशाही फौजांना अहमदनगरच्या किल्ल्यामध्ये सुखरूपपणे पोहोचणे शक्य झाले.

(६०) हिजरी ९७५ } इ. स. १५६७ } हिजरी ९७५ या वर्षी अलि आदिलशहाने निजामशाही राज्यावर स्वारी केली. अहमदनगर राज्यातील अनेक ठिकाणे त्याने काबीज केली आणि निजामशाही फौजांचा पराभव केला. दरम्यान राज्य प्रतिनिधी खूनजा हुमायून हिने राज्यातल्या लायक माणसांना बाजूला सारून आपल्या नातेवाईकांना मोठमोठ्या जागा देण्याचे जे धोरण [३] (२५२) स्वीकारले होते त्यामुळे त्या सर्व वर्गामध्ये अतिशय चिडीची भावना निर्माण झाली. सरतेशेवटी सुलतान मुर्तजा निजामशहा याची सहकारी मंडळी—शहा जमालउद्दीन हुसेन अंजू, कासीम बेग हकीम आणि इतर—यांनी त्याच्या आईच्या वर्तनाबद्दल त्याच्याकडे

तक्रार केली. त्यावर मुर्तजाशहाने उत्तर दिले की माझे सर्वच मंत्री आणि वजीर माझ्या आईशी एकनिष्ठ आहेत. अशा परिस्थितीत तिने जो अधिकार बळकाविला आहे त्याला मी सुरुंग लावून माझ्या हाती सत्ता कशी काय घेऊ? यावर त्यांनी उत्तर दिले की जर तुमची परवानगी असेल तर तिच्या पक्षाकडे असलेल्या काही सरदारांना सहज आपल्याकडे वळवून घेता येईल आणि आपला कार्यभाग साधता येईल. यावर मुर्तजा निजामशहाने त्यांच्या बेताला आपली संमती दिली. तेव्हा वर उल्लेखिलेले अमिर आपल्या मित्रमंडळीसमवेत काही काळानंतर राजवाड्याकडे गेले. तिथे मुर्तजा निजामशहा आपल्या आईबरोबर बसलेला त्यांना दिसला. आपले गुपित आता उघडकीस आले असे मुर्तजा निजामशहाच्या बालिश बुद्धीला वाटले. आता आपली आई याचा वचपा काढणार म्हणून आपले प्राण तिच्या क्रोधापासून बचावावे म्हणून त्याने तिला सांगितले की राज्यातल्या काही अधिकाऱ्यांनी तुला पकडण्याचे कारस्थान रचले होते. यावर खूनजा हुमायून हिने ताबडतोब तिच्याविरुद्ध कारस्थान करणाऱ्या मुख्य मुख्य अधिकाऱ्यांना पकडून बंदिस्त केले.

(६१) हिजरी ९७७ इ. स. १५६९ } हिजरी ९७७ या वर्षी राजमाता खूनजा हुमायून हिने आपला मुलगा मुर्तजा निजामशहा याला बरोबर घेऊन विजापूरचा सेनापती किश्वरखान याने केलेल्या आक्रमणाला तोंड देण्यासाठी चाल केली. कूच करत ते धामणगाव येथे येऊन पोहोचले. मुर्तजा निजाम शहा याला आता आपले हित अनहित कळू लागले होते. तेव्हा त्याने आपल्या आईच्या लगामरूपी बंधनातून स्वतःची सुटका करून घेण्याचा निश्चय केला. या हेतूने त्याने राज्याच्या मुख्य अमिरांना आपल्या बाजूला वळवून घेतले आणि नंतर हबश-खान याला खूनजा हुमायूनकडे पाठवून असे कळविले की, यापुढे तू कोणत्याही प्रकारे राजकारणात भाग घेऊ नयेस आणि इतर राजघराण्यांतील स्त्रियांप्रमाणे निवृत्तीत आयुष्य कंठावेस असे आम्हाला वाटते. हा निरोप मिळाल्यावर तिला भयंकर संताप आला. तिने आपल्या अनुचरांना बोलाविले, आपल्या चेहऱ्यावर बुरखा टाकून ती घोड्यावर स्वार झाली आणि राजवाड्याबाहेर पडली. आपल्यापाशी तिने धनुष्यबाण, तलवार, आणि खंजीर ही शस्त्रे घेतली. परंतु तिच्याकडून थोडासाच प्रतिकार झाल्यावर तिला पकडण्यात आले. तिचा सेवकगण पळून गेला. [३](२५३) यानंतर राज्याच्या कारभाराची सूत्रे मुर्तजा निजामशहाने आपल्या हाती घेतली. त्याने नंतर फौजेची जमवाजमव केली आणि विजापूरचा किश्वरखान याच्यावर हल्ला करण्याच्या उद्देशाने धारूरच्या दिशेने कूच केले.

(६२) शत्रूच्या[२४४] छावणीपासून थोड्या अंतरावर तो येऊन पोहोचल्यानंतर किश्वरखानाकडून त्याच्याकडे बंद लखोटा घेऊन एक जासूद आला. मुर्तजाशहाने लखोटा उघडून आतील मजकूर वाचला. आतील मजकुरात इतक्या उद्धटपणाची भाषा वापरलेली होती की, मुर्तजा निजामशहा संतापाने अगदी वेडापिसा होऊन गेला

घोड्यावर स्वार होऊन त्याने अशी प्रतिज्ञा केली की, धारूरच्या किल्ल्यात प्रवेश मिळाल्याशिवाय मी घोड्यावरून उतरणार नाही. एवढे बोलून त्याने घोड्याला टाच मारली आणि तो वेगाने किल्ल्याकडे निघाला. त्याच्या बरोबरच्या सरदारांनी त्याला विनवून सांगितले की, किल्ले जिंकून घेण्यासाठी घोडदळाचा काहीही उपयोग होत नाही, त्याचप्रमाणे मूठभर माणसेही कामास येत नाहीत. तेव्हा आपण अविचाराने शत्रूवर हल्ला करून आपले जीवित धोक्यात आणण्याचे साहस करू नये. यावर मुर्तजा निजामशहा म्हणाला की, मी परमेश्वराची कसम खाऊन सांगतो की, तलवारीच्या घावांनी मी किल्ल्याचा दरवाजा फोडून काढीन, आणि शत्रू सैनिकांच्या प्रेतांचा खच पाडून किल्ल्यात जाण्यासाठी वाट करून घेईन. जर विजयश्रीने मला माळ घातली, तर मला काहीच अपाय होऊ शकत नाही आणि जर मला मृत्यू यावा ही विधिघटना असेल तर तो धोका टाळण्याचा प्रयत्न करणे निरर्थक आहे. मुर्तजा निजामशहाच्या मनाचा ठाम निश्चय बघितल्यानंतर त्याच्या अधिकाऱ्यांनी त्याची अशी विनवणी केली की, कृपा करून आपण निदान चिलखत तरी अंगावर चढवावे. तसे करण्यास युद्धाच्या नियमाप्रमाणे पैगंबराची अनुमती आहे. मुर्तजाशहाने या गोष्टीला आपली संमती दिली आणि त्याप्रमाणे चिलखत अंगावर चढवून शत्रूवर हल्ला करण्यासाठी तो पुढे सरसावला. किल्ल्याच्या दरवाजाजवळ पोहोचल्यावर किल्ल्याच्या तटावरून त्याच्यावर बंदुका, बाण आणि अग्निबाण यांचा एकच वर्षाव करण्यात आला. या माऱ्याखाली त्याचे अनेक सैनिक आणि काही हत्ती आणि घोडे मारले गेले. तरीदेखील मुर्तजानिजामशहा आपल्या निश्चयापासून रेसभरही मागे सरला नाही आणि कोणत्याही तऱ्हेची जखम न होता तो सुरक्षित राहिला. सरते शेवटी किल्ल्यावरून होणारा गोळीबार एकाएकी थांबला. यामुळे मुर्तजा निजामशहा विस्मयचकित झाला. त्याने या गोष्टीचे कारण शोधून काढण्यासाठी आपली माणसे रवाना केली. कसल्याही तऱ्हेचा प्रतिकार न होता त्याच्या सैनिकांनी किल्ल्यात प्रवेश केला. तेव्हा त्यांना असे आढळून आले की, किल्ला खाली करून शत्रू निघून गेला आहे. बहुधा एखादा बाण चुकून किश्वरखानाच्या हृदयाचा भेद करून गेला असावा, कारण किश्वरखानाचे प्रेत जमिनीवर पडलेले होते. मुर्तजा निजामशहाच्या विजयी सैनिकांनी त्याचे मस्तक धडावेगळे केले आणि किल्ल्याच्या [ ३ ] ( २५४ ) तटावर टांगून ठेवले. आपल्याला मिळालेल्या विजयाबद्दल प्रार्थना करून सुलतानाने परमेश्वराचे आभार मानले. आता निजामशाही सैन्याने गोवळकोंड्याचा इब्राहीम कुतुबशहा याजबरोबर संगनमत करून विजापूरवर आक्रमण केले. अर्थात् पुढे मुर्तजा निजामशहाने शहा अबूल हसन याने केलेल्या कारस्थानामुळे इब्राहीम कुतुबशहाशी इतके वैर धरले की इब्राहीम कुतुबशहाला आपली छावणी निजामशाही सैन्याच्या हाती लुटालूट करण्यासाठी ठेवून पळून जाण्याखेरीज दुसरा मार्ग उरला नाही. यानंतर थोड्याच काळाने अलि आदिल शहा व मुर्तजा निजामशहा या दोघांमध्ये तह झाला.

मुर्तजा निजामशहा अहमदनगरला परत फिरला. तेथे आल्यावर त्याने जमालउद्दीन हुसेन याची आपला मुख्य वकील आणि पेशवा म्हणून नेमणूक केली. यानंतर तो पोर्तुगीजांच्या ताब्यात असलेल्या रेवदंड्यांच्या किल्ल्यावर चाल करून गेला. परंतु वेढा काही महिने चालल्यानंतर निजामशहाला तो उठविणे भाग पडले. कारण पोर्तुगीजांनी नजराणे आणि विशेषतः दारू यांची लाच दिल्याने निजामशाही अधिकाऱ्यांनी आपल्या धन्याचा विश्वासघात केला आणि पोर्तुगीजांना समुद्रमार्गे कुमक आणण्याचे कामात अडथळा निर्माण केला नाही.[२४५ ब] या मोहिमेवरून परतल्यानंतर सुलतानाने आपल्या अनेक अधिकाऱ्यांना बडतर्फ केले आणि राज्याचा मुख्य वकील म्हणून चेंगीझखानाची नेमणूक केली. चेंगीझखानाच्या अंगी असामान्य कर्तृत्व होते. त्याने काळजीपूर्वक लक्ष देऊन राज्याच्या कारभाराची घडी पूर्वस्थितीप्रत नेली. त्याने आपल्या हिकमतीने अलि आदिलशहा आणि इब्राहीम कुतुबशहा यांच्यामध्ये होऊ घातलेला मैत्रीचा करार मोडून काढला आणि आपला धनी निजामशहा आणि अली आदिलशहा यांच्यामध्ये एकोपा घडवून आणला. दोन्ही सुलतानांची भेट राज्यांच्या सरहद्दीपाशी झाली, आणि त्यात असे ठरले की अलि आदिलशहाने वऱ्हाड आणि बिदर यांच्यापासून मिळणाऱ्या उत्पन्नांच्या बरोबरीइतका मुलूख कर्नाटकातून जिंकून आपल्या ताब्यात घ्यावा, तर मुर्तजानिजामशहाला ही दोन्ही राज्ये [ ३ ] ( २५५ ) अनुक्रमे तुफालखान आणि अलिबरीदशहा यांच्याकडून हिसकावून घेऊन आपल्या ताब्यात घेण्याची पूर्णपणे मुभा देण्यात यावी.

( ६३ ) हिजरी ९८० इ. स. १५७२ } हिजरी ९८० या वर्षी मुर्तजा निजामशहाने वऱ्हाड-वर आक्रमण केले. त्याचा सेनापती चेंगीझखान याने दाखविलेले शौर्य आणि चातुर्य यांच्या जोरावर त्याने तुफालखानाला एलिचपूर-मधून हाकलून लावले. इतकेच नव्हे तर तुफालखान आणि त्याचा मुलगा समशेर-उलमुल्क या दोघांना पळून जाऊन डोंगराळ मुलखाचा आश्रय घेणे भाग पडले. त्यांचे २०० हत्ती आणि त्याशिवाय सर्व जड सामानसुमान निजामशहाने काबीज केले. जवळ जवळ ६ महिनेपर्यंत तुफालखानाचा या जंगलातून त्या जंगलात निजामशाही फौजा पाठलाग करीत होत्या. ६ महिन्याच्या अखेरीस एका अरुंद खिंडीत निजामशाही फौजांनी त्याची वाट अडवून त्याला कोंडले. येथे तो खरा निजामशाही फौजेच्या तावडीतच सापडावयाचा परंतु वाटेमध्ये मीर मुसा माजिंदरानी या एका अंधश्रद्धाळू अवलियाने त्याची गाठ घेऊन धर्माच्या भोळसट सबबीखाली त्याचा पुष्कळसा काला-पव्यय केला. सुलतानाच्या मनात १२ इमामांच्या बद्दल जी प्रेमभावना होती तिच्यावर नेमके बोट ठेवून मीरमुसाने सुलतानाला आपल्याला १२ हजार होनाइतकी रक्कम दिल्याखेरीज पुढे कूच करून न जाण्याचा इशारा दिला. मीरमुसा याने केलेल्या विनंतीप्रमाणे त्याच्या पदरात १२ हजार होन टाकीपर्यंत सुलतानाने त्याच ठिकाणावर मुक्काम केला. चेंगीझखानाने सुलतानाची विनवणी केली की छावणीतील तंबू ठोकून

होईपर्यंत मीरमुसाला पैसे देण्याचे पुढे ढकलावे. परंतु सुलतानाने त्याची विनंती अमान्य केली. या भानगडीत जो वेळ गेला त्यामुळे तुफालखानाला पलायन करून जाण्याची संधी मिळाली. तो बुरहाणपूरकडे पळून गेला, आणि त्याने खानदेशच्या सुलतानाकडे संरक्षण मागितले. परंतु मुर्तजा निजामशहा आपल्यावर सूड उगवील या जाणिवेने तुफानखानाला संरक्षण देण्याची खानदेशच्या सुलतानाला भिती वाटली.

(६४) हिजरी ९८० इ. स. १५७२ } तेथून तुफालखान वऱ्हाडकडे परत फिरला आणि नरनाळ्याच्या डोंगरी किल्ल्याचा त्याने आश्रय घेतला. तेथून त्याने दिल्लीपती बादशहा अकबर याजकडे मदतीची याचना केली. अकबराने मुर्तजा निजामशहाकडे आपला वकील पाठविला आणि त्याला ताबडतोब वऱ्हाडवरील आक्रमणापासून परावृत्त होण्याची ताकीद दिली. परंतु [ ३ ] ( २५६ ) मुर्तजा निजामशहाने या ताकिदीकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले. थोड्याच अवधीत नरनाळा आणि वऱ्हाडमधील इतर सर्व महत्त्वाचे किल्ले मुर्तजा निजामशहाच्या हाती पडले. तुफालखान, त्याचा धनी सुलतान बुरहाण इमाद उलमुल्क आणि इमादशाही घराण्यातील सर्व पुरुषमाणसे आणि बायकामंडळी यांना कैद करण्यात येऊन वऱ्हाडमधल्या अहमदनगरने घेतलेल्या किल्ल्यांपैकी एका किल्ल्यात त्यांना बंदिस्त करण्यात आले. काही काळानंतर तेथे त्या सर्वांचा मृत्यू झाला. असे म्हणतात की त्यांना विषप्रयोग करून ठार मारण्यात आले असावे.

(६५) वऱ्हाडमधील मोहीम आटोपल्यानंतर मुर्तजा निजामशहा अहमदनगरकडे परत फिरण्याच्या विचारात होता. परंतु चेंगीझखानाने त्याला असे निवेदन केले की अलि आदिलशहा हा विजयनगरचा प्रदेश जिंकून घेऊन आपली ताकद वाढविण्याच्या मार्गाला लागला आहे. अशा वेळी अहमदनगर राज्याने स्वस्थ न बसता पूर्वी ठरल्याप्रमाणे अहमदाबाद बिदर जिंकून घेण्यासंबंधीची योजना पुरी पाडण्याच्या मार्गाला लागणे हे मला अतिशय श्रेयस्कर वाटते. चेंगिजखानाचा सल्ला मुर्तजा निजामशहाला पटला आणि त्याप्रमाणे त्याने अहमदाबाद बिदरच्या दिशेने कूच केले. दरम्यान खानदेशचा सुलतान मिरान महमदशहा याने मुर्तजा निजामशहा हा आता वऱ्हाडमधून निघून गेला आहे या संधीचा फायदा घेऊन वऱ्हाडचा भूतपूर्व सुलतान दर्या इमादउलमुल्क याचा आपण मुलगा आहोत असे सांगून वऱ्हाडच्या गादीवर हक्क सांगणाऱ्या एका इसमाला साहाय्य करण्यासाठी ३००० घोडेस्वार आणि ७ ते ८ हजार पायदळ एवढे सैन्य वऱ्हाडात रवाना केले. निजामशाही सैन्याच्या ताब्यातील अनेक ठिकाणांवरून त्यांना हाकलून देण्यात आणि वऱ्हाडचा बराच मोठा भाग आपल्या ताब्यात परत मिळविण्याचे कामी या फौजेला यश आले. ही बातमी कळताच मुर्तजा निजामशहा मोठ्या घाईघाईने पुन्हा वऱ्हाडकडे परत फिरला. त्याने आपल्याबरोबर सैन्याची लहानशी तुकडी घेऊन वऱ्हाडात प्रवेश केला आणि मुख्य फौजेला बरोबर घेऊन आपल्या पाठोपाठ येण्याची चेंगीझखानाला आज्ञा दिली.

निजामशाही सैन्याचा एक सेनापती सय्यद मुर्तजा याने मुर्तजा निजामशहाच्या अगोदर कूच केले होते. त्याच्या बरोबर ८००० घोडेस्वारांची फौज होती. त्याची वर उल्लेखिलेल्या तोतयाशी गाठ पडली. सय्यद मुर्तजा याने तोतयाला पळवून लावले आणि त्याच्या अनुयायांची पांगापांग केली. दरम्यान मुर्तजा निजाम [ ३ ] ( २५७ ) शहाने रोहनखेडा घाटाच्या मार्गाने खानदेशात घुसून बुरहाणपूरच्या अगदी दरवाजापर्यंतचा त्या राज्याचा मुलूख उध्वस्त करून टाकला.

( ६६ ) चेंगीझखानाला असिरचा किल्ला बघण्याची अतिशय उत्कंठा होती. या किल्ल्याचा आसरा मिरान महमदशहा फारुकी याने घेतला होता. त्या किल्ल्याची पाहणी करण्यासाठी म्हणून चेंगीझखान तेथे ८००० घोडेस्वार घेऊन गेला. मिरान महमदशहाने चेंगीजखानाचा मदतीचा मार्ग तोडण्यासाठी म्हणून आपल्या फौजेची एक तुकडी पाठविली. परंतु चेंगीझखानाने या तुकडीचा हल्ला परतवून लावून शत्रूचे भयंकर नुकसान केले. इतकेच नव्हे तर त्या तुकडीतील काही अधिकारीही त्याने कैद केले. यानंतर मुर्तजा निजामशहा हा स्वतः असिरच्या किल्ल्यावर चाल करून गेला. तेथून त्याने आपल्या सैन्याच्या तुकड्या किल्ल्याभोवतालच्या प्रदेशात रवाना केल्या. त्यांनी तो प्रदेश इतका उध्वस्त केला की माणसांची नावनिशाणी देखील तेथे राहिली नाही. सरतेशेवटी मिरान महमदशहाने दंडादाखल भलीमोठी रक्कम मुर्तजा निजाम शहाकडे भरली आणि नंतर मुर्तजा निजामशहाने खानदेशातून आपल्या फौजा काढून घेण्याचे कबूल केले.

( ६७ ) यानंतर थोड्याच काळाने इब्राहीम कुतुबशहाचा वकील मिर्जाखान इस्पहानी हा मुर्तजा निजामशहाचा बिदरवरील नियोजित हल्ला होऊ नये म्हणून प्रयत्न करण्यासाठी निजामशाही छावणीत येऊन पोहोचला. आपला उद्देश साध्य करून घेण्यासाठी त्याने बरीच मोठी रक्कम चेंगीझखानाला देऊ केली. चेंगीझखानाला या गोष्टीचा संताप आला. त्याने रकम घेण्याचे नाकारून इस्पहानीला बजावले की माझी इच्छा असली तर सारा निजामशाही खजिना माझ्या दिमतीला हजर आहे. अर्थात् तो यावर असे म्हणाला की आम्ही बिदरचा पाडाव केल्यानंतर मात्र अकबर बादशहाचे दक्षिणेवर सर्व शक्तिनिशी जे संभाव्य आक्रमण होण्याची शक्यता आहे त्याविरुद्ध मुर्तजा निजामशहा, इब्राहीम कुतुबशहा आणि अलि आदिलशहा यांनी एकजूट करणे जरूर आहे. चेंगीझखानाला लाच देऊन आपल्याकडे वळवून घेण्यात अपयश आल्यामुळे इस्पहानी याने आपला बेत सिद्धीस नेण्यासाठी साहिबखानाला आपल्या बाजूला वळवून घेण्याचा डाव टाकला. साहिबखान हा मुर्तजा निजामशहाच्या खास मर्जीतला होता आणि चेंगीझखानाने त्याला आपल्या वागणुकीने दुखावले होते. मिर्जाखान इस्पहानी याने साहिबखानापाशी चेंगीझखानाबद्दल असा आरोप केला की चेंगीझखानाचा बेत वऱ्हाडात स्वतंत्र राज्य स्थापून सुलतानपदावर विराजमान होण्याचा आहे. अशा आरोपाने साहिबखानाला अर्थातच आनंद झाला आणि मोठ्या

खुषीने मिर्जाखान इस्पहानीच्या चेंगीझखानाविरुद्ध केलेल्या आरोपाला त्याने मान डोलावली. त्याप्रमाणे साहिबखानाने मिर्जा इस्पहानीने चेंगीझखानावर केलेला आरोप सुलतानापाशी येऊन सांगितला. परंतु साहिबखानाने चेंगीझखानाविषयी [ ३ ] (२५८) वाटत असलेल्या द्वेषबुद्धीने हा आरोप केला असावा असे मुर्तजा निजामशहाने मानून त्या आरोपावर विश्वास ठेवला नाही. साहिबखान यावर आपल्या चेंगीझखानावर केलेल्या आरोपापासून रेसभरही ढळला नाही इतकेच काय पण त्याने रडण्याचेही सोंग आणले. त्याने सुलतानाची अशी विनवणी केली की जर आपला माझ्यावर विश्वास नसला तर चेंगीझखानाच्या मूळच्या गावचाच मिर्जा खान इस्पहानी आहे त्याला आपण बोलावू पाठवावे आणि त्याला जे काही सांगावयाचे आहे ते आपण ऐकून घ्यावे. त्याप्रमाणे मुर्तजा निजामशहाने मिर्जाखानाला बोलाविले तेव्हा तुम्ही ऐकलेली बातमी खरी आहे असे सांगून मिर्जाखानाने सुलतानाची खातरजमा केली. मिर्जाखानाने सांगितलेल्या बातमीचा सुलतानाच्या मनावर बराच परिणाम झाला परंतु त्याने आणखी पुरावा मिळेपर्यंत काहीही कारवाई न करता थांबण्याचा निश्चय केला. सरते शेवटी त्याने चेंगीझखानाला आपल्यापाशी हजर होण्यास सांगितले आणि तो आल्यावर मुर्तजाशहाने आता आपल्याला सारखे रणांगणावर राहण्याचा कंटाळा आला असून आपली इच्छा आता अहमदनगरकडे परत फिरण्याची आहे असे त्याला सांगितले. यावर चेंगीझखान म्हणाला की नवीन जिंकलेल्या प्रदेशात तेथील रहिवाशांचा विश्वास संपादन करण्यासाठी म्हणून आपण स्वतः पाचसहा महिने राहाणे हे सर्व दृष्टीने योग्य आहे. परंतु जर का असे करणे आपल्याला पसंत नसेल तर आपण मला त्या कामासाठी सैन्यासह कोणत्याही परिस्थितीत मागे ठेवावे. चेंगीझखानाने केलेल्या सूचनेमुळे मुर्तजा निजामशहाची साहेबखानाने त्याच्यावर जो आरोप केला होता तो खरा असल्याबद्दलची खात्री पटली. त्याबरोबर सुलतानाने चेंगीझखानाबरोबरची आपली वागणूक तावडतोब बदलली. चेंगीझखानाच्या ही गोष्ट जेव्हा लक्षात आली तेव्हा त्याला आपल्या जीविताच्या सुरक्षिततेबद्दल भिती निर्माण झाली आणि आपण आजारी आहोत या सबबीखाली त्याने काही दिवस दरबारात हजर राहण्याचे टाळले. चेंगीझखानाच्या या वागणुकीचा परिणाम सुलतानाच्या मनात त्याच्याबद्दल आलेला संशय दृढमूल होण्यात झाला. सुलतानाने त्याला ठार मारण्याचे मनाशी ठरविले आणि त्याने आपल्या हकीमाला चेंगीझ-खानाला औषध म्हणून विषारी अर्क देण्याचा आदेश दिला. आपल्याला औषध म्हणून विष देण्यात येत आहे हे चेंगीझखानाने ओळखले आणि प्रथम ते घेण्यास नकार दिला. परंतु आपल्या नकाराचा काहीही उपयोग होणार नाही त्याची त्याला जाणीव झाली. त्याने आत्मयाग करण्याकडे मनाची तयारी केली आणि विषाचा घोट मोठ्या आनंदाने प्राशन केला. आपल्या शेवटच्या क्षणी त्याने मुर्तजा निजामशहाला उद्देशून पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, " आपला बंदा आणि

विश्वासू सेवक असा मी ( मिरक ) आपल्याला असे कळवू इच्छितो [ ३ ] ( २५९ ) की माझ्या जीवनरूपी सूर्याने हयातीची साठ दालने ओलांडली आणि झपाट्याने हयातीच्या सत्तराव्या दालनाकडे त्याची वाटचाल चालू होती. ईश्वराप्रत पोहोचण्याच्या उंबरठ्यावर मी उभा आहे आणि माझे मस्तक आपल्यापुढे विनम्रतेने लवविलेले आहे. माझ्या जीवनरूपी जलामध्ये भयानक हलाहल ओतलेला हा औषधाचा प्याला मी घटाघट पिऊन टाकला आहे. आपल्या उदारधी स्वभावामुळेच माझा अभ्युदय झाला. माझी कर्तव्यनिष्ठा आणि राजनिष्ठा ही केवळ आपल्याच आज्ञेच्या आधीन आहेत हे पूर्णपणे जाणून इतर कोठल्याही गोष्टी मी मनात न आणता माझ्या नजरेआड केल्या आहेत. मला जर तुझी इच्छा काय आहे असे विचारले तर मी असे म्हणेन की आपले जीवन आणि आपले सार्वभौमत्व ही आता माझे ठोऊ घातलेले कबरस्तान जितके चिरकाल टिकणारे आहे तितकीच चिरकाल आणि कायम टिको. मी शरीरात जीव वास करून राहात असताना आपण मला जितके चाहात होता तितकेच किंबहुना जास्त आपण मी या जगातून नाहीसा झाल्यावर मला चाहावे आणि माझी भलावणी करावी अशी आपल्याकडे माझी प्रार्थना आहे. मी माझ्या स्वतःच्या हस्ताक्षरात लिहून ठेवलेल्या आणि माझ्या अंतसमयी प्रकट केलेल्या माझ्या इच्छेप्रमाणे आपण कराल आणि राज्याच्या सर्व प्रजाजनांमध्ये अतिशय निष्ठावान आणि आपल्या चरणी सर्वस्व अर्पण केलेल्यांमध्ये सर्वश्रेष्ठ म्हणून माझी गणना कराल असा मला विश्वास वाटतो. माझी पहिली अशी इच्छा आहे की आपण माझा देह दफन करण्यासाठी करबला येथे रवाना करावा. [२६०] माझी दुसरी इच्छा म्हणजे खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांवर माझ्या अंगातील गुणवैशिष्ट्याला ते साजेलसे आहेत म्हणून आपण आपला वरदहस्त ठेवावा आणि माझ्या पदरी जे परदेशी मुसलमान माझे अनुचर म्हणून चाकरी करीत आहेत त्यांना तुम्ही आपल्या संरक्षकदलात रुजू करून घ्यावे."

( ६८ ) आपले हे अखेरचे मृत्युपत्र चेंगीझखानाने काही सूचना देऊन सय्यद मुर्तजाच्या स्वाधीन केले. नंतर तो आपल्या बिछान्यावर दुसऱ्या दिवसापर्यंत पडून राहिला. त्या दिवशी त्याचा आत्मा त्याच्या नश्वर देहास सोडून गेला. त्याच्या आत्म्याने काही क्षणासाठी उसने आणलेले हे तात्पुरते आणि नाशवंत घरकुल अशा तऱ्हेने विलयास गेले.

( ६९ ) आपल्या वजिराच्या प्रामाणिकपणाबद्दलची आणि त्याच्या आपल्या वरील खऱ्याखुऱ्या भक्तिभावाची जाणीव मुर्तजा निजामशहाला फार उशिरा झाली. चेंगीझखानाच्या मृत्यूचे मुर्तजा निजामशहाला अनिवार्य आणि अपरंपार दुःख होऊन त्याला अतिशय वाईट वाटले. अहमदनगरला परतल्यानंतर त्याने इहलोकीच्या राजकारणातून निवृत्त होण्याचा निश्चय केला. त्याने अहमदनगरमधील प्रमुख प्रमुख नागरिकांना आपल्या समक्ष बोलावून घेतले आणि त्यांना तो म्हणाला, " आपल्याला [ ३ ] (२६०) मला सांगावेसे वाटते की मी राज्य करण्याला नालायक आहे. कारण मला असे आढळून

आले आहे की बरोबर कोणते आणि चूक कोणते यांतील भेदभाव सांगण्याची कुवत माझ्यामध्ये नाही आणि म्हणून अनेक वेळा न्यायाच्या बुरख्याखाली दडून अनेकवेळा जुलूम जबरदस्तीचा गुन्हा माझ्या हातून घडलेला आहे. त्यामुळे जेव्हा सत्य गोष्ट आपोआप उघडकीस येते त्यावेळी सारासार बुद्धीप्रमाणे निर्णय घेण्याच्या शक्तीचा माझ्या अंगी जो अभाव आहे त्याचे मला दुःख होते. पैगंबराच्या वंशजांपैकी काजी बेग ह्याची माझा वकील आणि पेशवा म्हणून मी नेमणूक करीत आहे. त्यासाठी तुम्हाला मी साक्षीदार म्हणून आणि तुमच्या समक्ष ही मी नेमणूक केली आहे असे परमेश्वरासमोर अखेरच्या दिवशी सांगण्यासाठी म्हणून बोलविले आहे. त्याची नेमणूक करण्यामध्ये माझा उद्देश कायद्याप्रमाणे त्याने प्रत्येकाबरोबर आपली वागणूक ठेवावी आणि आपल्या खाजगी बाबींचा विचार न करता केवळ एखादी व्यक्ती बलवान आहे म्हणून त्या व्यक्तीला दुर्बळ व्यक्तीपेक्षा प्राधान्य देऊ नये हा आहे. जर का एखाद्या माणसाने एखाद्या दुसऱ्या स्त्रीपासून सुई जरी चोरून घेतली आणि अंतिम न्यायदानाच्या दिवशी त्या संबंधांत मला जर प्रश्न विचारण्यात आला तर मी असे उत्तर देईन की अशा तऱ्हेच्या व्यवहारात माझा कोठल्याही तऱ्हेचा संबंध नाही आणि त्या सर्व गोष्टी महमद पैगंबराच्या वंशजांपैकी एक काजी बेग यांजवर मी सोपविलेल्या आहेत.'' यानंतर मुख्य वकील आणि पेशवा काजी बेग याजकडे वळून तो म्हणाला, "सरकारच्या राज्यकारभाराची सारी सूत्रे आता तुझ्या हातात आहेत. जर का तुला राज्याचा कारभार एकट्याने चालविणे जमणार नसले तर राज्यकारभार चालविण्यासाठी तू भागीदार म्हणून अमीर उलमुल्क, मिर्जा महमद तकी आणि कासीम बेग हकीम यांना आपल्याबरोबर घे. माझी चंगीझखानाबरोबर जी वागणूक झाली त्याचा मला आता अतिशय पश्चात्ताप होत आहे. त्या सर्वशक्तीमान परमेश्वराचा क्रोध आणि तो मला जी शिक्षा करील त्याची मला अतिशय भिती वाटत असून त्यासंबंधीच्या काळजीने माझे मन अतिशय व्यथित झाले आहे. माझी आता राज्याच्या भानगडीतून निवृत्त होण्याची आणि माझे उरलेले दिवस पश्चात्तापदग्ध मनःस्थितीत आणि प्रार्थना करण्यामध्ये घालविण्याची आहे." एवढे बोलून मुर्तजा निजामशहा हा अहमदनगरच्या राजवाड्यातील एका दालनात निघून गेला. या राजवाड्याला बगदाद राजवाडा असे म्हणत. त्या राजवाड्यात त्याच्या समक्ष साहिबखानाशिवाय इतर कोणत्याही स्त्री अगर पुरुष यांना जाण्याची बंदी करण्यात आली. [ ३ ] ( २६१ )

(७०) हिजरी ९८४ इ. स. १५७६ } हिजरी ९८४ या वर्षी शिकारीच्या निमित्ताने अकबर बादशहाने दक्षिणेच्या सरहद्दीपर्यंत कूच केले. तेव्हा मुर्तजा निजामशहा हा एका बंद पालखीत बसून आणि बरोबर काही सैनिक घेऊन अकबर बादशहाच्या हालचालींचे निरीक्षण करण्यासाठी आणि आपल्या राज्याचे त्याच्या संभाव्य हल्ल्यापासून रक्षण करण्यासाठी म्हणून अहमदनगर राज्याच्या उत्तर सरहद्दीकडे गेला. त्याच्या सरदाराने जर त्याच्या विनवण्या केल्या नसत्या तर तो

अकबर बादशहावर हल्ला करण्यासाठी चाल करूनही गेला असता. परंतु आपल्या अमिरांच्या विनंतीवरून मुर्तजा निजामशहा अकबर बादशहा आपल्या राज्याकडे परत फिरेपर्यंत सरहद्दीपाशीच ठाण देऊन थांबला. अकबर परत फिरल्यानंतर तो पुन्हा अहमदनगर येथे आपल्या एकांतवासी जीवनात रममाण झाला. पावसाळ्या-मध्ये तो दौलताबाद येथे गेला. तेथे अनेक अवलियांच्या कबरी होत्या. मोठ्या धार्मिक उत्साहाने त्याने त्या कबरींना भेट देऊन त्यांचे दर्शन घेतले. एक दिवस साहिब-खानाच्या सुद्धा नकळत तो आपल्या खाजगी निवासस्थानातून बाहेर पडला, आणि पायीच इमाम रोजा याच्या कबरीकडे निघाला. त्याला तेथल्या एका रहिवाशाने ओळखले आणि सुलतान पायी निघाल्याची खबर काजी बेग याच्याकडे पोहोचवली. फार मोठ्या प्रयत्नाने काजी बेगने त्याचे मन परत फिरण्यासाठी वळविले. यानंतर सुलतान अहमदनगर येथे परत आला आणि तो हश्तबिहीश्त[२४७] या बागेमध्ये राहू लागला. या सुमारास सुलतानाच्या मर्जीतला साहिबखान आणि त्याचे सवंगडी यांनी चालविलेल्या अत्याचारांनी सीमा गाठली. साहिबखानाच्या सहकाऱ्यांमध्ये तीन हजार हलकट दक्षिणी लोकांचा भरणा होता. गलिच्छ हेतू मनात धरून ते आईबापा-पासून अनेकदा मुलांना जबरदस्तीने पळवून नेत. अशा तऱ्हेच्या एका प्रसंगात मीरमेहदी याच्या मुलीचा उल्लेख करावा लागेल. आपल्या कुटुंबाची अब्रू बचाविण्याच्या कामी तिने आपल्या प्राणांचे बलिदान दिले. या अत्याचारांमुळे काजीबेगच्या मनात जरी अतिशय संताप निर्माण झाला तरीही साहिबखानाचे सुलतानावर जे वजन [३] (२६२) होते त्याची त्याला भिती वाटली. साहिबखानाची मजल अखेर इतकी गेली की त्याने उद्धटपणे एक अमिराला आपले नांव बदलण्याचा हुकूम दिला कारण त्या अमिराचे नाव साहिबखान असेच होते. त्या अमिराने जेव्हा नकार दिला तेव्हा त्याचा नाश करण्याचे साहिबखानाने ठरविले. परंतु सलाबतखानाने ही गोष्ट होऊ दिली नाही आणि सुलतानाच्या कानावर ही परिस्थिती घातली. या गोष्टीचा साहिबखानाला राग आला आणि तो दरबारातून निघून गेला. साहिबखानाच्या गैरहजेरीमुळे सुलतानाला चैन पडेना. तो त्याच्या पाठोपाठ निघाला आणि त्याने साहिबखानाला अहमदाबाद बिदर येथे गाठले. सुलतानाने त्याच्या दोन अयोग्य अटी मान्य केल्या-वरच त्याने अहमदनगरला परत फिरण्याचे कबूल केले. पहिली अट म्हणजे सुलतानाने सलाबतखानाला त्याच्या अधिकारावरून काढून टाकावे आणि दुसरी अट म्हणजे साहिबखानाला बक्षीस देण्यासाठी म्हणून अहमदाबाद-बिदर हे शहर सुलतानाने अलीबरीद शहाकडून जिंकून घ्यावे. सुलतानाने जेव्हा बिदर शहराला वेढा दिला तेव्हा बरीदशहाने अलि आदिलशहाकडे मदतीची याचना केली. त्याप्रमाणे आदिल-शहाने मदत पाठविली.

(७१) या सुमारास सुलतानाचा भाऊ बुरहाण निजामशहा हा जुन्नरच्या किल्ल्यामधून पळाला, आणि त्याने आपल्या भावाविरुद्ध बंडाची निशाणी उभारली.

यामुळे मुर्तजानिजामशहाला अहमदनगरला ताबडतोब परत फिरणे भाग पडले. सलाबतखानालाही त्याने परत बोलाविले. यामुळे पुन्हा दुसऱ्या वेळी साहिबखान हा सुलतानाला सोडून पळाला. इकडे बुरहाण निजामशहा याचा पराभव झाला आणि तो विजापूरला पळून गेला. यानंतर सुलतानाने फिरून एकदा साहिबखानाबरोबर समझोता करण्याचा आणि त्याची समजूत पटविण्याचा प्रयत्न केला. परंतु साहिबखानाचे मन वळविण्यासाठी पाठविलेल्या उमरावांनी त्याला ठार मारले. आपल्याला प्रतिकार करत असताना साहिबखान मारला गेला अशी त्यांनी सुलतानाची समजूत घातली साहिबखानाच्या मृत्यूनंतर सलाबतखान हा मुख्य वजीर झाला. त्याला कोणीही प्रतिस्पर्धी उरला नाही. त्याने अनेक वर्षेपर्यंत वजीर म्हणून काम केले आणि आपल्या वागणुकीने लोकांना संतोष दिला. महमूदशहा बहमनीची कारकिर्द झाल्यापासून मराठ्यांच्या प्रदेशावर इतक्या उत्तम तऱ्हेने सलाबतखानाखेरीज कोणीही राज्यकारभार केला नाही.[२४८]□

(७२) हिजरी ९८८ | इ. स. १५८० | हिजरी ९८८ या वर्षी विजापूरचा अलि आदिलशहा मरण पावला. त्यानंतर त्याचा [३] (२६३) पुतण्या इब्राहीम हा गादीवर आला. त्यावेळी त्याचे वय फक्त ९ वर्षांचे होते. विजापूरचा सुलतान हा अल्पवयी आहे ही संधी विजापूरचा प्रदेश जिंकून घेण्यासाठी अतिशय उत्कृष्ट आहे असा विचार सलाबतखानाने केला. त्याने मुर्तजा निजामशहाचे मन विजापूरवर आक्रमण करण्याकरता वळविले. याप्रमाणे एक मोठे सैन्य बईजादउलमुल्क याच्या हाताखाली विजापूर विरुद्ध पाठविण्यात आले. या सैन्याचा पराभव झाला आणि सैन्याबरोबर गेलेले सर्व हत्ती विजापूरकरांनी काबीज केले. या वर्षी घडलेल्या इतर सर्व घटना विजापूरच्या इतिहासात यापूर्वीच सांगण्यात आलेल्या आहेत.

(७३) हिजरी ९९२ | इ. स. १५८४ | हिजरी ९९२ यावर्षी सुलतानाने एक भव्य वकिलात विजापूरकडे रवाना केली. या वकिलातीचा उद्देश इब्राहीम आदिलशहाची बहीण खुदीजा हिला मिरान हुसेन याजबरोबर लग्नासाठी मागणी घालण्याचा होता. ही मागणी इब्राहीम आदिलशहाने मान्य केली. यानंतर मोठ्या थाटामाटाने खुदीजा हिला अहमदनगर येथे आणण्यात आले. या सुमारास राज्यातल्या अनेक उमरावांनी सलाबतखानाला वजिरीच्या अधिकारावरून काढून टाकण्यासाठी आपापसात कट केला. तेव्हा सलाबतखानाने सुलतानाचे मन किल्ल्यामध्ये रहावयाला जाण्याकरता वळविले आणि तो स्वतः त्याच्या विरुद्ध कट केलेल्या बंडखोर अमिरांवर चालून गेला. त्याने बंडखोर अमिरांची दाणादाण उडविली. यानंतर काही काळाने दरबारातील असंतुष्ट मंडळींच्या एका गटाने सुलतानाचा भाऊ बुरहाण निजामशहा याला एका फकिराचा वेष देऊन अहमदनगरला आणले आणि त्याला सिंहासनावर बसविण्याचा कट रचला. परंतु ज्या दिवशी हा प्रयत्न करण्याचा त्यांचा बेत ठरला होता त्याचदिवशी सलाबतखानाने हा कट

उघडकीस आणला. बुरहाणने जेमतेम आपला जीव वाचविला. परंतु आता या ठिकाणी आपले जीवित सुरक्षित आहे असे त्याला वाटेना म्हणून त्याने दिल्लीपती अकबर बादशहा याच्याकडे आश्रय मागितला. त्यानंतर काही काळाने अकबरबादशहाने त्याला मिर्जा अजीजकोका याच्या हाताखाली सैन्य दिले. या सैन्याला घेऊन मुर्तजानिजामशहावर बुरहाण निजामशहाने हल्ला करण्यासाठी कूच केले. ही बातमी अहमदनगर येथे पोहोचली त्याक्षणीच मूर्तजा निजामशहाने [ ३ ] ( २६४ ) मिर्जा महमदतकी याच्या हाताखाली २० हजार सैनिकांची फौज देऊन त्याला राज्याच्या सरहद्दीकडे रवाना केले. मिर्जा महमदने खानदेशचा राजा अलीखान याच्याबरोबर आपल्या सैन्याची एकजूट करून नर्मदेच्या तीरावरील हंडीया या गावाकडे कूच केले. मिर्जा अजीजकोका याने यापूर्वीच नदी ओलांडली होती परंतु दक्षिणी फौजेवर रणांगणामध्ये आपल्याला लढाई द्यावी लागल्यास विजय मिळेल याची खात्री न वाटल्याने त्याने एकाएकी आपला मोहोरा फिरवून वऱ्हाडात कूच केले, आणि एलिचपूर व बाळापूर ही ठिकाणे काबीज केली. परंतु आपला पाठलाग होत आहे आणि ज्या मार्गाने आपण आलो त्या मार्गाने परत फिरणे शत्रूने अशक्य केले आहे असे त्याला आढळून आले तेव्हा त्याने पश्चिमेच्या बाजूने कूच केले, आणि एकाएकी सुलतानपूर आणि नंदुरबार या शहरावर घसरा केला. या शहरात त्याने लुटालूट केली, आणि तो माळव्याकडे परत फिरला. मिर्जा अजीज परत फिरल्याचे पाहून निजामशाही आणि खानदेशाच्या फौजाही आपापल्या राज्याकडे परतल्या.

(७४) यासुमारास साहिबखानाच्या जागी फतीशहा नावाच्या नर्तकावर मुर्तजा निजामशहाची मर्जी बसली. त्याने सुलतानाकडून मोठमोठ्या जमिनी आपल्या नावे बक्षिसीदाखल करून घेतल्या. सुलतानाने त्याच्यावर निहायत खुष होऊन शाही जामदारखान्यातील जडजवाहिराची त्याच्यावर मुक्त हस्ताने खैरखैरात केली. या दोन्ही गोष्टींमुळे त्याच्या हातात सत्ता संपादन करण्याचे साधन आले आणि या सत्तेचा त्याने दुरुपयोग करण्यास सुरुवात केली. सरतेशेवटी त्याने सुलतानाकडे दोन गळ्यातील रत्नहारांची मागणी केली. हे रत्नहार पूर्वी विजयनरची जी लुटालूट झाली होती त्या लुटीतून जामदारखान्यात आणले गेले होते. ह्या रत्नहारांत मौल्यवान मोती, माणके आणि पाचू बसविण्यात आलेले होते. हे रत्नहार फतीशहाला देण्यात यावे अशी मुर्तजा निजामशहाने आज्ञा दिली. परंतु ज्यांची किमतीत गणना करता येणार नाही अशा या चित्ताकर्षक वस्तू शाही खजिन्याला पारख्या व्हाव्यात ही गोष्ट होऊ नये अशी सलाबतखानाची इच्छा होती म्हणून त्याने दोन खोट्या हिऱ्यांचे बनविलेले रत्नहार मूळ रत्नहारांच्या जागी बदली केले. काही काळ गेल्यानंतर फतीशहाने त्याची करण्यात आलेली फसवणूक ओळखली. त्याने मुर्तजा निजामशहाकडे त्याबद्दल तक्रार केली. मुर्तजा निजामशहाला याचा अतिशय संताप आला आणि त्याने सलाबतखानाला जामदारखान्यातील सर्व हिऱ्यांचे दागिने [ ३ ] ( २६५ )

पाहणीसाठी राजवाड्यातील दालनात मांडण्याचा हुकूम दिला. जामदारखान्यातील अतिशय मौल्यवान असे जे दागिने होते ते सलाबतखानाने लपविले आणि उरलेले सर्व सुलतानाच्या आज्ञेप्रमाणे मांडून ठेवले. सुलतानाने काही दागिने तेथे नाहीत हे ओळखले आणि त्याला भयंकर संताप आला. आपल्यासमोर होते नव्हते तेवढे दागिने त्याने मोठा विस्तव पेटवून त्यात फेकून दिले आणि रागाने मन भरकटून गेल्यासारखा तो आपल्या दालनात निघून गेला. तो निघून गेल्यावर सलाबतखानाने आगीच्या ज्वालात दागिने भस्म होऊन जाऊ नयेत म्हणून ते वाचवण्याचा प्रयत्न केला. या आगीत काही मोत्यांनाच फक्त आगीची झळ पोहोचली होती. ह्या वेळेपासून सुलतानाला वेड लागले असा समज सर्वसाधारणपणे प्रसृत झाला.

(७५) यानंतर मुर्तजा निजामशहाने आपल्या डोक्यात असे भरवून घेतले की त्याचा मुलगा मिरान हुसेन हा त्याला सिंहासनावरून ओढून काढण्याच्या खटपटीत आहे. यामुळे मुर्तजाशहाने मिरान हुसेन याला ठार मारण्याचा प्रयत्न केला. परंतु सलाबतखानाने राजपुत्र मिरान हुसेन याच्या जीविताच्या सुरक्षिततेची डोळ्यात तेल घालून जपणूक केली. याच वेळी इब्राहीम आदिलशहाने मागणी केली की आपल्या बहिणीचा विवाहसमारंभ मिरान हुसेनबरोबर ताबडतोब साजरा तरी व्हावा किंवा राजकन्येला विजापूर येथे परत पाठविण्यात यावे. परंतु सलाबतखानाने कोणत्याच मागणीची दाद घेण्याचे नाकारले आणि मागणी आम्ही मान्य करावी असे वाटत असल्यास सोलापूरचा किल्ला आमच्या स्वाधीन करावा असे आदिलशहाला कळविले. यावर इब्राहीम आदिलशहाने अहमदनगरबरोबर युद्ध पुकारले आणि औशाच्या किल्ल्याला वेढा दिला. सलाबतखानाच्या वागणुकीचा मुर्तजा निजामशहाला अपमान वाटला आणि विश्वासघात केल्याबद्दल त्याने त्याची कानउघाडणी करून त्याला सांगितले की तुझ्या ताबेदारीला मी आता कंटाळलो आहे. यावर आपली राजनिष्ठा व्यक्त करण्यासाठी सलाबतखानाने सुलतानाला अशी विनंती केली की मी कैदी म्हणून कोठे राहावे असे कोठलेही ठिकाण आपण नेमून देऊन मला सांगा मी आपणहून माझ्या पायावर साखळदंड चढवीन आणि त्या ठिकाणी कैदी म्हणून राहण्यासाठी जाईन. मुर्तजा निजामशहाने तू दंडराजपुरीच्या किल्ल्यात जा असे सलाबतखानाला सांगितले. सलाबतखानाची मित्रमंडळी आणि त्याचे असंख्यात आश्रित तुम्ही ही भलती गोष्ट ऐकण्याच्या भरीस पडू नका असे सांगत असताना देखिल सलाबतखान सुलतानाच्या रक्षकांच्या स्वाधीन झाला. त्यांनी सलाबतखानाला बंदिवासात ठेवण्यासाठी दंडराजपुरीच्या किल्ल्याकडे नेले.

(७६) सलाबतखानाला कैदेत ठेवल्यानंतर सुलतानाने राजप्रतिनिधी म्हणून कासीम बेग हकीम याची नेमणूक केली आणि मिर्जा महमदतकी याला वजिरीच्या अधिकारावर नेमले. त्या दोघांनाही त्याने इब्राहीम आदिलशहाबरोबर तह करण्याची आज्ञा केली. यानंतर राजकन्या खुदीजा हिचा विवाह राजपुत्र मिरान हुसेन याज-

बरोबर मोठ्या थाटामाटाने साजरा करण्यात आला. या घटनेला काही [ ३ ] (२६६) काळ लोटतो न लोटतो तोच सुलतानाच्या मनात आपल्या मुलाबद्दल संशय निर्माण झाला आणि त्याने त्याचा नाश करण्याचे ठरविले. आपला हेतू साध्य करण्याकरता त्याने आपल्या वजिरांना असे सांगितले की माझ्या मुलाचा सहवास मला मिळावा अशी उत्कंठा माझ्या मनात निर्माण झाली आहे. सुलतानाच्या मनात राजपुत्राबद्दल प्रेमभावनेचा पुन्हा उद्भव झाला आहे हे बघून वजिरांना अत्यंत आनंद झाला आणि त्यांनी राजपुत्राला किल्ल्यामध्ये सुलतानाकडे पाठविले. सुलतानाने राजपुत्राबद्दल आपल्याला अतिशय माया निर्माण झाली आहे असा आभास निर्माण करून त्याला राहाण्यासाठी आपल्या खोलीशेजारीच खोली दिली. परंतु दुसऱ्या दिवशी सकाळी राजपुत्र झोपलेला असताना त्याने त्याच्या बिछान्यावरील कपड्यांना आग लावली आणि स्वतः बाहेर येऊन दरवाजाला कडी घातली. कपडे पेटल्याच्या धुराने राजपुत्राला जाग आली. त्याने अंगावरचे कपडे फेकून दिले आणि तो दरवाजाकडे धावला. दरवाजा बंद आहे असे पाहून त्याने मदतीसाठी आरडा ओरडा केला. धुरामुळे त्याचा जीव कासावीस झाला. तेवढ्यात त्याला सुलतानाच्या मर्जीतला फतीशहा याने येऊन सोडविले. त्याला घेऊन फतीशहा हा कासीम बेग हाकिम याजकडे गेला. कासीम बेगने गुप्तपणे त्याची रवानगी दौलताबादला केली. यानंतर काही वेळाने आपला मुलगा आता जळून गेला असेल अशा समजुतीने त्याच्या हाडांची राख बघण्यासाठी सुलतान त्याच्या खोलीत गेला परंतु हाडांची राख न मिळाल्यामुळे तो क्रोधाविष्ट झाला. फतीशहाने त्याला सांगितले की राजपुत्राची जळून राख झाली आहे. परंतु सुलतानाने त्याच्यावर विश्वास ठेवला नाही. फतीशहानेच त्याला आगीपासून बचावले असावे असा सुलतानाला संशय आला. त्याने राजपुत्राला ताबडतोब हजर करण्याविषयी फतीशहाला आज्ञा केली. अखेर फतीशहाने घडलेली खरी हकीकत सांगितली. यावर सुलतानाने सर्व मंत्र्यांना बोलावणे पाठविले. या सर्वांना बंदीस्त करावे असा हुकूम त्याने सोडला आणि त्यांच्या जागी त्याने दुसऱ्यांच्या नेमणुका केल्या. नवीन नेमलेल्या वजिरांनी राजपुत्राला ठार करण्याचे नाकारले. तेव्हा सुलतानाने केवळ नऊ दिवसानंतर त्यांना बडतर्फ केले, आणि राजप्रतिनिधीची जागा मिर्जाखानाला दिली.

(७१) सुलतानाला बुद्धिभ्रंश झाला आहे आणि त्याचे डोके ताळ्यावर नाही हे मिर्जाखानाने पाहिले. त्याने सुलतानाने दिलेल्या हुकुमांशी आपण पूर्णपणे सहमत आहोत असा देखावा निर्माण केला आणि फतीशहा आणि त्याचे आश्रित यांना [३] (२६७) वारंवार देणग्या देऊन त्यांची मर्जी संपादण्याचे त्याने प्रयत्न केले. परंतु गुप्तपणे विजापूरकडे त्याने पत्र लिहून कळविले की मुर्तजा निजामशहाला आता वेड लागले आहे. त्याला आपल्या मुलाचा खून करावयाचा आहे. अशा परिस्थितीत आपण जर सैन्याची एक तुकडी सरहद्दीजवळ पाठवाल तर आपल्या सैन्याचे आक्रमण झाले आहे

या सबबीखाली मी सैन्याची जमवाजमव करीन आणि उघडउघड हुसेनशहाच्या नावाने सुलतानाविरुद्ध बंडाची निशाणी उभारीन. विजापूरचा राजप्रतिनिधी दिलावरखान हा होता. त्याने वरील विनंती मान्य केली आणि आपले सैन्य अहमदनगरच्या सरहद्दीवर पाठविले. तेव्हा मिर्जाखानाने सुलतानाला विचारले की शत्रूविरुद्ध कोणती उपाययोजना करावयाची याचा मला आपण हुकूम द्यावा. सुलतानाने त्याला सांगितले की तुला योग्य वाटेल त्या उपायाची योजना तू शत्रू सैन्याविरुद्ध कर. यावर मिर्जाखानाने सैन्याची जमवाजमव केली आणि अहमदनगरहून कूच केले. राणुरी या गावापाशी आल्यानंतर मिर्जाखानाच्या हुकुमावरून तेथे अहमदनगरचे सैन्य थांबले आणि राणुरी येथे त्यांनी छावणी दिली. ते पुढे कूच करून जात नाहीत याचे सुलतानाला आश्चर्य वाटले आणि त्याने प्रस्तुत इतिहासाच्या लेखकाला त्याची कारणे शोधून काढण्यासाठी पुढे पाठविले. सुलतानाबद्दल माझ्या मनात निष्ठायुक्त प्रेम आहे याची मिर्जाखानाला जाणीव होती. तेव्हा त्याने असे अनुमान केले की, त्याचे बेत जर माझ्या नजरेस आले तर त्याची खबर मी सुलतानाकडे नेऊन पोहोचवीन. यावर मिर्जाखानाने फतीशहाला लांच देऊन सुलतान मला परत बोलावण्यासंबंधी आणि सैन्याला ताबडतोब आगेकूच करण्याबद्दल हुकूम देववील अशी तजवीज केली. फतीशहा आला त्यावेळी मी छावणीत होतो. मिर्जाखानाचे खरे डावपेच काय आहेत हे मी ओळखले होते. तेव्हा त्याने मला परत जाण्यास प्रतिबंध करणारे हुकूम सोडले. परंतु या हुकुमाची खबर मला वेळीच मिळाल्यामुळे रात्रीच मी छावणी सोडून पलायन केले. अहमदनगर शहरात आल्यावर मी जे जे काही पाहिले होते आणि ऐकले होते ते फतीशहा याला सांगितले. परंतु मी सांगितलेल्या कोणत्याच गोष्टीवर आपला विश्वास नाही अशी फतीशहाने बतावणी केली. यावर मी म्हणालो की खोटे सांगून मला माझे हितही साधावयाचे नाही किंवा कोणाचा द्वेषही करावयाचा नाही. या दोन्हीही गोष्टी मला साधावयाच्या नसल्यामुळे मिर्जाखानावर खोटा आरोप करण्याचेही मला कारण नाही. मी जी काही हकिकत सांगितलेली आहे त्या हकिकतीची सत्यता ताबडतोब दिसून येईलच. आम्ही अशा तऱ्हेने बोलत असताना दूतांनी बातमी आणली की राजपुत्र मिरान हुसेन याला आणण्यासाठी आणि त्याला सिंहासनावर बसविण्यासाठी मिर्जाखानाने दौलताबादेकडे कूच केले आहे. सुलतानावर [३] (२६८) येऊ घातलेल्या संकटरूपी वादळाचे निवारण कसे करावयाचे यासंबंधी त्याने माझा सल्ला विचारला यावर मी उत्तर दिले की, निश्चित यश मिळवून देतील असे दोनच मार्ग मला दिसतात एक म्हणजे आपण ताबडतोब आपल्या अज्ञातवासातून बाहेर पडावे आणि आपल्या रक्षक दलाला बरोबर घेऊन शहराबाहेर कूच करावे. आपण असे केल्यास बहुतेक सर्व अमीर हे मिर्जाखानाचा पक्ष सोडतील आणि आपल्याला येऊन मिळतील. यावर सुलतानाने उत्तर दिले की आजारीपणामुळे घोड्यावर बसण्याइतकी ताकद माझ्या अंगात नाही. तेव्हा मी सुलतानाला दुसरा उपाय सुचविला.

त्याला मी सांगितले की तुम्ही सलाबतखानाला दंड राजपुरीहून तावडतोब बोलावून घ्या आणि राज्याच्या मुख्य अधिकाऱ्याच्या जागेवर त्याची नेमणूक करा. राज्यांतील सर्वजणांचे त्याच्यावर प्रेम आहे आणि सर्वजण त्याला मानतात. साहजिकच तो मुख्याधिकारावर आल्यानंतर सारेजण त्याच्या निशाणाखाली जमा होतील. त्याला भेटण्यासाठी म्हणून तुम्ही स्वतः जुन्नरच्या किल्ल्यापर्यंत सामोरे जावे. सुलतानाने माझा हा सल्ला मानला. त्याने सलाबतखानाची तावडतोब सुटका करण्यात यावी असे हुकूम तातडीने रवाना केले आणि स्वतः कूच करण्याची तयारी केली. यावर फतीशहा त्याच्या पायापाशी पडला आणि रडतरडत त्याला म्हणाला की जर का आपण स्वतः राजवाडा सोडून निघून गेलात तर राजवाड्याचे रक्षक आपल्याला तावडतोब कैद करतील आणि नव्या सुलतानाला आपले मानाचे मुजरे अर्पण करण्यासाठी तयार होतील. फतीशहाने जेव्हा असे सांगितले तेव्हा सुलतानाने आपला बेत बदलला आणि सलाबतखान येण्याची वाट पाहात राजवाड्यातच राहण्याचे त्याने ठरविले. सुलतानाच्या दुर्बळपणाचे हे प्रदर्शन पाहून फौजेने मोठ्या संख्येने सुलतानास सोडून दौलताबादचा मार्ग धरला. तेव्हा मिर्जाखान हा तेथून त्वरेने राजपुत्र मिरान हुसेन याला बरोबर घेऊन सलाबतखान अहमदनगर येथे पोहोचण्याचे अगोदरच तेथे पोहोचावे या उद्देशाने दौलताबादहून निघाला. तो ज्यावेळी अहमदनगरास पोहोचला त्या वेळी राजवाड्याच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर होती आणि मी राजवाड्याचे रक्षणार्थ शत्रूला प्रतिकार करण्याचे ठरविले. परंतु माझे सर्व सैनिक मला सोडून गेले. सुलतानापाशी एक फतीशहा आणि थोडेसे घरकाम करणारी चाकरमानी माणसे एवढीच फक्त उरली. त्यामुळे आमच्या प्रतिकाराला काहीच अर्थ उरला नाही. राजपुत्र आणि मिर्जाखान हे ४०००० सशस्त्र माणसे घेऊन किल्ल्यामध्ये घुसले. त्यांना कसलाही प्रतिकार झाला नाही किल्ल्यात घुसल्यावर त्यांनी त्यांच्या हाती जो सापडला त्याला ठार मारले. माझ्या नशिबाने राजपुत्राची आणि [ ३ ] ( २६९ ) माझी ओळख होती आणि आम्ही पाठशाळेत एकत्र शिकलो होतो आणि आम्ही दोघेही एकत्रच वाढलो होतो. या गोष्टी राजपुत्राने विचारात घेतल्या आणि माझ्या प्राणाला धक्का लावू नये असा हुकूम सोडला. आपल्या बापाच्या दालनात पोहोचल्यावर राजपुत्र मिरान हुसेन याने शब्दाने आणि प्रत्यक्ष कृतीने मुर्तजा निजामशहाचा जेवढा करता येईल तेवढा अपमान केला. मुर्तजा निजामशहा स्तब्ध राहिला आणि त्याने तिरस्कारपूर्वक फक्त एकदा त्याच्याकडे बघितले. अखेर राजपुत्राने म्यानातून आपली तलवार काढून तिचे नंगे पाते मुर्तजा निजामशहाच्या छातीवर ओढल्यासारखे करून त्याला म्हटले की, 'मी तुम्हाला यमसदनास पाठविणार आहे.'' मुर्तजा निजामशहाने यावर एक दीर्घ निश्वास सोडून उद्गार काढले, '' अहारे दिवट्या ! त्या परमेश्वराच्या कोपाचा अंगार तुझ्यावर का पडत नाही ! आपल्या बापाचे जे काही थोडे दिवस राहिलेले आहेत ते त्याला सुखाने घालवू द्यावेत आणि बापाचा योग्य तऱ्हेने आब राखावा

अशी इच्छा तो परमेश्वर तुझ्या मनात का बरे निर्माण करीत नाही." क्षणभर का होईना परंतु बापाच्या या शब्दानी राजपुत्र मिरान हुसेन याच्या मनात चलबिचल झाली आणि तो बापाच्या खोलीतून बाहेर पडला. परंतु बापाच्या मरणाची तो वाट पाहात असला तरी तो मरेल त्या क्षणापर्यंत धीर धरण्याइतकी मिरान हुसेन याची तयारी नव्हती. मुर्तजा निजामशहा त्या वेळी एका भयंकर रोगाने मरणोन्मुख झाला होता ही गोष्टही मिरान हुसेनने ध्यानात घेतली नाही. त्यामुळे अत्यंत अधीरेपणाने त्याने मुर्तजा निजामशहाला उकळत्या पाण्याचे गरमगरम वाफारे येणाऱ्या हमाम खान्यात कोंडून ठेवले अणि हमामखान्याचे दरवाजे आणि खिडक्या पक्क्या बंदोबस्ताने त्याने बंद केल्या. त्या खोलीत आता हवेचा एक कणही जाऊ शकला नसता. इतके झाल्यानंतर त्याने त्या खोलीच्या खाली एक मोठा जाळ पेटविला. अशा भयानक परिस्थितीत सुलतानाचा गुदमरल्यामुळे मृत्यू ओढवला. मिरान हुसेनने पितृहत्येचे हे भयानक कृत्य

हिजरी ९९६ } हिजरी ९९६ या वर्षी केले. मृत सुलतानाचे त्याला साजेलशा
इ. स. १५६७ } इतमामाने रोजा बागेमध्ये दफन करण्यात आले. परंतु

काही काळानंतर त्याची हाडे दफन पेटीतून काढण्यात आली आणि त्यांची रवानगी करबला येथे करण्यात आली. तेथे ती हाडे मुर्तजा निजामशहाचा बाप आणि आजा यांच्या कबरीशेजारी पुरण्यात आली. मुर्तजा निजामशहाने एकंदर २४ वर्षे आणि काही महिने राज्य केले.

(७८) अरेरे! माणसाच्या दैवामध्ये देखील कुठे स्थैर्य आहे. या भाग्याच्या वर्तुळाच्या भ्रमंतीचा थांग लागणे हे मानवी आकलनशक्तीच्या पलीकडचे आहे. काळाची तुमच्या जीवनावर जी कुरघोडी नेहमी चालू असते तिच्यापासून आपली सुटका होईल अशी फोल आशा तुम्ही उराशी बाळगू नका. कारण काळाच्या क्रूर खड्गाच्या प्रहारापासून कोणाची सुटका नाही किंवा कोणाला दयामायाही दाखविली जाणार नाही. □२५०

## मिरान हुसेन निजामशहा [३] (२७०)

(७९) मिरान हुसेन निजामशहा याचा स्वभाव अतिशय अविचारी होता. क्रूरपणा त्याच्या वर्तणुकीत वारंवार दिसून येई. अहमदनगर राज्याच्या सिंहासनावर जेव्हा तो विराजमान झाला तेव्हा त्याने आपल्या कारकिर्दीची सुरुवात जुलूम-जबरदस्ती व दडपशाही यांनी केली. त्याने मिर्जाखानाला आपला मुख्य वजीर नेमले. परंतु त्याच्या सल्ल्याकडे त्याने फारच थोडे लक्ष दिले. साहजिकच मिरान हुसेनला आपल्या हातातील बाहुले बनविण्याची जो आशा मिर्जाखानाने आपल्या मनाशी बाळगिली होती त्याबाबत मिरान हुसेनच्या वर्तनाने त्याची पूर्ण निराशा झाली. त्याचप्रमाणे सारी सत्ता आपल्या हातात ठेवण्याचे त्याचे स्वप्नही विलयाला गेले. मिरान हुसेन याने आपल्याच वयाच्या अनेक तरुणांना मोठमोठ्या अधिकाराच्या

जागांवर नेमले आणि आपली विषयलोलुपता आणि व्यसनांचा अतिरेक [ ३ ]·(२७१) यामध्ये त्यांना सहभागी केले. पुष्कळदा असे होई की, दारूच्या पूर्ण बेहोषीत असताना तो अनेक वेळा आपल्या दारुड्या सहकाऱ्यांबरोबर शहरामधून घोड्यावर बसून फेरफटका मारी आणि अनेक माणसांना त्यांचा कोणत्याही तऱ्हेचा अपराध नसताना यमसदनास पाठवी. यानंतर मिरान हुसेनच्या कानावर पुढील हकिकत पडली. ती अशी : मिर्जाखानाने गुप्तपणे मुर्तजा निजामशहाचा भाऊ शहा कासीम याला शिवनेरीच्या किल्ल्यावरून आणले आहे आणि त्याच्या बाजूने राज्यामध्ये बंडाळी निर्माण करण्यासाठी त्याला आपल्या घरात छपवून ठेवले आहे. ही बातमी कळताच मिरान हुसेन अतिशय घाबरून गेला आणि त्याने मिर्जाखानाला पकडून कैदेत टाकले. परंतु दुसऱ्या दिवशी जेव्हा त्याला असे आढळून आले की मिर्जाखानावरील आरोप सर्वस्वी असत्य आहेत तेव्हा त्याने त्याला पूर्वीच्याच अधिकाराच्या जागी नेमले आणि त्याच्यावर राज्याच्या कारभाराची जबाबदारी सोपवून पूर्णपणे आपला विश्वास टाकला. यापुढे मिरान हुसेनच्या मनात आपल्याबद्दल संशय निर्माण होऊ नये म्हणून त्याने त्याला शाही घराण्यातील हयात असलेल्या सर्व पुरुष माणसांची कत्तल करण्याचा सल्ला दिला. या सल्ल्याप्रमाणे एका दिवशीच एकंदर १५ राजपुत्रांचा खून करण्यात आला. या घटनेनंतर काही काळ गेल्यावर मिर्जाखानाची सत्ता सुलतानाच्या सवंगड्यांना जाचक होऊ लागली. तेव्हा त्यांनी मिर्जाखानावर पुन्हा विश्वासघाताचा आरोप केला. मिरान हुसेन शहाचा या गोष्टीवर विश्वास बसला. दारूच्या धुंदीत असताना तो एकदा असे उद्गार काढी की मी माझ्या हातांनी मिर्जाखानाचे शिर धडावेगळे करीन तर दुसऱ्या वेळी तो म्हणे की मी मिर्जाखानाला हत्तीच्या पायाखाली तुडवून ठार मारीन. ही परिस्थिती जेव्हा मिर्जाखानाच्या कानावर घालण्यात आली तेव्हा त्याने सुलतानाला गादीवरून काढून टाकून आपल्या जीविताला धोका पोहोचणार नाही अशी कोशीस करण्याचा प्रयत्न केला तर मिरान हुसेन शहाने मिर्जाखानाला आपल्या काबूत आणण्याचे आटोकाट प्रयत्न केले. जमादिल उल् अव्वाल महिन्याच्या १० तारखेला हिजरी ९९७ या वर्षी मिरान हुसेन आपला आवडता सेवक बंगशखान याच्या घरी गेला आणि तेथून त्याने मिर्जाखानाला मेजवानीत भाग घेण्यासाठी आमंत्रण पाठविले. यामध्ये त्याचा उद्देश मिर्जाखानाला ठार मारण्याचा होता. परंतु मिर्जाखान पूर्णपणे जागरूक होता. त्याने आपण एकाएकी आजारी पडलो आहोत [३] (२७२) अशा सबबीखाली मेजवानीला जाण्याचे नाकारले. आपला हा निरोप पोहोचविण्यासाठी त्याने आपला मित्र आगामीर याला पाठविले. आगामीर जेव्हा बंगशखानाच्या घरी पोहोचला तेव्हा मिरान हुसेनशहाचे जेवण नुकतेच झाले होते. परंतु शिष्टाचार पाळण्यासाठी म्हणून बंगशखान मिर्जाखानाबरोबर भोजन घेण्यासाठी थांबला होता.

जमादिल उल् अव्वाल १०
हिजरी ९९७
मार्च १५
इ. स. १५८८

आगामीर याने थोडेसे जेवण झाल्यावर आपल्या पोटात भयंकर कळा येत असल्याचा बहाणा केला आणि आपल्याला विषप्रयोग करण्यात आला आहे असे जाहीर करून त्याने बंगशखानाचे घर सोडले. यानंतर मिर्जाखानाने थोड्याच वेळानंतर मिरान हुसेनशहाकडे निरोप पाठवला की आगामीर मृत्युपंथाला लागला आहे आणि त्याची तुम्हाला भेटण्याची अखेरची इच्छा आहे. मनामध्ये कसलाही किंतू न बाळगता मिरान हुसेन त्याला भेटण्यासाठी बरोबर अगदी थोडे अनुयायी घेऊन किल्ल्यामध्ये गेला. तेथे त्याला मिर्जाखानाने धरले आणि बंदिस्त केले. त्यानंतर मिर्जाखानाने मिरान हुसेनशहाचा चुलता बुरहाण निजामशहा याचे दोन मुलगे लोहगडच्या किल्ल्यात बंदिवासात होते त्यांना आणण्यासाठी मिर ताहीर निशापुरी याची रवानगी केली. ते येईपर्यंत मिरान हुसेनशहाला आपण कैद केले आहे हे गुप्त ठेवून त्या दोघांपैकी एकाची सिंहासनावर बसविण्यासाठी निवड करण्याचा त्याचा बेत होता.

(८०) गेल्यापासून तिसऱ्यादिवशी मिर ताहिर हा राजपुत्रांना घेऊन परतला. एकाचे नाव इब्राहीम असे होते आणि दुसऱ्याचे इस्माईल. त्यानंतर मिर्जाखानाने राज्याच्या अनेक प्रमुख सरदारांना किल्ल्यामध्ये बोलावून घेतले आणि त्यांच्यासमोर त्याने मिरान हुसेन याला सिंहासनावरून काढून टाकल्याचे आणि धाकटा राजपुत्र इस्माईल निजामशहा याला गादीवर बसविल्याचे जाहीर केले. इस्माईलचे वय त्यावेळी फक्त बारा वर्षांचे होते तेथे जमलेली अमीरउमराव मंडळी नवीन सुलतानाला खडी ताजीम देण्यात गुंतली होती त्यावेळी किल्ल्याच्या दरवाजाजवळ मोठी दंगल माजलेली ऐकण्यात आली. तेथे लष्करातील एक अधिकारी जमालखान हा मुख्यत्वेकरून अनेक हबशी आणि दक्षिणी अधिकारी आणि सैनिक यांना घोळक्याने घेऊन आला होता. त्याने अहमदनगरचा अभिषिक्त सुलतान मिरान हुसेनशहा याजबरोबर आपली भेट करवून देण्याबद्दल मागणी केली. यावर मिर्जाखानाने त्याच्याकडे निरोप पाठविला की मिरान हुसेन हा राज्य करण्यास नालायक असल्यामुळे [ ३ ] ( २७३ ) त्याला काढून टाकण्यात आलेले आहे. त्याच्या जागी सुलतानपदावर त्याचा चुलतभाऊ इस्माईल हा आला आहे. तो तुम्हाला भेटावयास येईल आणि तुमच्या बंदगीचा स्वीकार करील. यावर जमालखानाने अधिकच दंगल माजविण्यास सुरुवात केली. त्याने आपले लोक रस्त्यांतून दवंडी पिटविण्यास पाठविले की मिर्जाखानाने आपल्या परदेशी भाडोत्री शिपायांची मदत घेऊन सुलतानाला गादीवरून काढून टाकलेले आहे आणि दुसऱ्या राजपुत्राला गादीवर बसविले आहे. त्याला जर याप्रमाणे कोणालाही गादीवर बसविण्याची मुभा देण्यात आली आणि अनियंत्रितपणे वागण्याचे स्वातंत्र्य देण्यात आले तर एतद्देशीय अमिरउमराव आणि प्रजाजन मंडळी ही सर्व या भाडोत्री वाटमाऱ्यांची गुलाम बनविली जाण्यात काहीच वेळ लागणार नाही. राजधानीमधील दक्षिणी सैनिक आणि सामान्य प्रजाजन या जाहीरनाम्यामुळे खवळून उठले आणि त्यांनी आपल्या हाती शस्त्रे घेतली. थोड्याच वेळांत ५००० घोडेस्वार

आणि पायदळी सैनिक असंख्यात प्रजाजनांबरोबर जमालखानाला जाऊन मिळाले. त्याशिवाय जमालखानाला राज्यातील सर्व हबशी मंडळींनी आपला पूर्ण पाठिंबा दिला.

(८१) मिर्जाखानाने असा विचार केला की ही दंगल जर आटोक्यात आणावयाची असेल तर त्यासाठी मिरान हुसेन याला ठार मारणे हाच एकच मार्ग आहे. याप्रमाणे त्याने आपल्या सैनिकांना मिरान हुसेनचा शिरच्छेद करण्यास फर्माविले. मिरान हुसेनचे शीर त्याने एका खांबावर अडकविले आणि किल्ल्याच्या एका तटावर त्याने तो खांब रोवून टाकला. याचवेळी किल्ल्यावरून एक माणूस खाली जमलेल्या लोकसमुहाला उद्देशून मोठ्याने ओरडून म्हणाला की सुलतानाचा मृत्यू झाला आहे. याबद्दल आता तरी तुमची खात्री पटलीच पाहिजे. तेव्हा तुम्ही आता जर काहीही गडबड न करता शांतपणे आपापल्या घरी परत जाल तर तुमचे सार्वभौम सुलतान इस्माईल निजामशहा यांच्या कृपेस पात्र व्हाल. यावर तिथे जमलेल्या पुढाऱ्यांपैकी अनेकांनी घरी परतण्याचे ठरविले. परंतु जमालखानाने ओरडून सर्वांस असे सांगितले की जर का मिरान हुसेन याला ठार मारण्यात आले तर आपण सर्वांनी त्याच्या मृत्यूचा सूड या परदेशी मुसलमानांवर घेतलाच पाहिजे आणि इस्माईल निजामशहाच्या सरकारी कामकाजाची सर्व सूत्रे आपल्या हाती घेऊन या परदेशी मुसलमानांकडून आपल्या देशाचा राज्यकारभार केला जाण्याची आपत्ती टाळली पाहिजे. यावर जमालखानाने किल्ल्यावर हल्ला करण्याचा निश्चय केला. त्याचप्रमाणे तेथे जमलेल्या लोकांनी किल्ल्याच्या दरवाजाला लागून लाकडे आणि गवत यांचे ढिगारे रचले, आणि त्याला आग लावून दिली. [३] (२७४) सूर्यास्ताच्या सुमारास दरवाजे जळून खाक झाले, परंतु राखेतील निखारे आगीने इतके धगधगत होते की मध्यरात्रीपर्यंत किल्ल्यातून बाहेर येणे किंवा किल्ल्यात जाणे हे कोणालाच जमले नाही. मध्यरात्रीच्या सुमारास मिर्जाखान आणि त्याचे सहकारी दोस्त यांनी दरवाजातून बाहेर घुसण्याचा प्रयत्न केला. दरवाजातून आपल्याला पळून जाता येईल की काय हेही त्यांनी बघितले. बाहेर जाण्याचा प्रयत्न करण्याच्या नादात अनेकजण दरवाजाबाहेर जमलेल्या लोकांकडून ठार मारले गेले. मिर्जाखान मात्र या गडबडीतून पळून जाण्यात यशस्वी झाला आणि त्याने जुन्नरच्या किल्ल्याच्या दिशेने पलायन केले. यावर सर्व दक्षिणी सैनिक, हबशी आणि तेथे जमलेला लोक-समुदाय हे किल्ल्यात घुसले आणि किल्ल्यात सापडलेल्या प्रत्येक परदेशी मुसलमानाला त्यांनी ठार मारले. या ठार मारलेल्यांची संख्या जवळ जवळ ३०० एवढी होती, आणि त्यांत मोठमोठ्या अधिकारावरील खानदानी प्रतिष्ठेची मंडळी होती. त्यांचे मुडदे किल्ल्याबाहेरील मोकळ्या मैदानात फरफटत आणण्यात आले. या मुडद्यांचे दफन न करता ते तसेच राहू द्यावेत असा हुकूम देण्यात आला. आतापर्यंत केलेल्या कत्तलीने समाधान न झाल्याने अहमदनगर शहरातील प्रत्येक परदेशी मुसलमानांची

मग त्याचा अधिकार किंवा धंदा कोणताही असो, कत्तल करण्याचा आणि त्यांची घरेदारे लुटून जाळून टाकण्याचा हुकूम जमालखानाने आपल्या अनुयायांना दिला. जमालखानाचे शिपाई आणि अनुयायी यांना असे मोकळे सोडल्यावर त्यांनी परदेशी अमीरउमराव, नोकरचाकर, मालक-व्यापारी, उद्दीम, यात्रेकरू आणि परदेशी पांथस्थ या सर्वांची सर्रास आणि कसलीही तमा न बाळगता कत्तल केली. त्यांच्या घरादारांना आगी लावण्यात आल्या. अशा तऱ्हेने ज्यांची मस्तके नुकतीच आपल्या कर्तबगारीने अस्मानाकडे झुकली होती त्यांचे छेदन करण्यात आले, आणि त्यांना मातीत तुडविण्यात आले. ज्या स्त्रियांनी आतापर्यंत चंद्र आणि सूर्य यांच्यापासून शरमेने आपले चेहरे बुरख्याआड लपवून ठेवले होते त्या स्त्रियांना त्यांच्या केसाला धरून, दारू पिऊन धुंद झालेल्या उन्मत्त जमावात फरफटत आणण्यात आले. बरोबर चौथ्या दिवशी मिर्जाखानाला जुन्नरजवळ पकडण्यात आल्यानंतर जमालखानापाशी आणण्यात आले त्याची प्रथम शहरातून गाढवावरून धिंड काढण्यात आली. नंतर त्याच्या शरीराचे तुकडे तुकडे करण्यात येऊन शहरातील निरनिराळ्या इमारतींवर ते चिकटविण्यात आले. मिर्जाखानाबरोबर त्याच्या कैद करण्यात आलेल्या अनेक मित्रांना ठार मारण्यात आले आणि त्यांची शरीरे तोफांत कोंबून [३] (२७५) हवेमध्ये उडविण्यात आली. ७ दिवसांच्या अवधीत जवळ जवळ १ हजार परदेशी मुसलमानांचा खून करण्यात आला. फक्त काही थोडेच दक्षिणी अगर हबशी अधिकाऱ्यांनी दिलेल्या संरक्षणामुळे सुटून जाऊ शकले. मिरान हुसेन निजामशहाची कारकीर्द फक्त १० महिने आणि २ दिवस टिकली. इतिहासामध्ये ज्यांनी आपल्या बापाचा खून करून राज्य मिळवलेले आहे, अशा राजपुत्रांची जी नोंद मिळते त्यात कोणाचीही कारकीर्द एक वर्षापेक्षा जास्त झाल्याचा उल्लेख आपल्याला मिळत नाही. एका कवीने म्हटल्याप्रमाणे आपल्या बापाचा नाश करणारे जे असतात त्यांना राजेपण शोभून दिसत नाही किंवा अशा हलकटांची कारकीर्द फार काळ टिकत नाही.

## इस्माईल निजामशहा [३] (२७६)

(८२) मुर्तजा निजामशहाला बुरहाण निजामशहा नावाचा भाऊ होता. बुरहाण निजामशहाने मुर्तजा निजामशहाला सिंहासनावरून खेचून काढण्याचा प्रयत्न केला पण हा प्रयत्न हाणून काढण्यात आला ही हकीकत मुर्तजा निजामशहाच्या कारकिर्दीच्या इतिहासात नमूद करण्यात आली आहे. बुरहाण निजामशहा हा आश्रयासाठी अकबर बादशहाच्या दरबारात पळून गेला. त्याच्या पाठीमागे त्याचे दोन मुलगे इब्राहीम आणि इस्माईल हे अहमदनगरमध्ये राहिले. त्यांना मुर्तजा निजामशहाने लोहगडच्या किल्ल्यात कैदेत ठेवले. मिरान हुसेन निजामशहाच्या मृत्यूनंतर वरील मुलांपैकी धाकट्याला सिंहासनावर बसविण्यात आले. त्याने इस्माईल निजामशहा हा

किताब धारण केला. अहमदनगर राज्यामधील पक्षोपपक्षांच्या संघर्षात यशस्वी झालेल्या जमालखानाने त्याच्या अधिकार ग्रहणाला मान्यता दिली. [३](२७७)

(८३) जमालखान हा मेहेदवी पंथाचा होता. त्याने इस्माईल निजामशहाचे मन त्या पंथाचा स्वीकार करण्यासाठी म्हणून वळविले. इतकेच नव्हे तर राजाच्या सर्व अधिकाराची सूत्रे या पंथाच्या अनुयायांच्या हवाली करण्याबाबत त्याच्यावर दडपण आणले. त्याच्या हातात सत्ता आल्यावर त्याने पहिल्या काही दिवसांतच मिरान हुसेन निजामशहाच्या कारकिर्दीत परदेशी मुसलमानांची जी कत्तल झाली होती त्यातून वाचलेल्यांना अहमदनगर सोडून जाणे भाग पाडले. त्याने त्यांची सर्व मालमत्ताही जप्त केली. यापैकी बहुतेकांनी विजापूरच्या सुलतानाकडे चाकरी पत्करली. यामध्ये प्रस्तुत इतिहासाचा ग्रंथकर्ता होता. त्याने कालांतराने विजापूरच्या दरबारात अधिकाराच्या जागेवर नेमणूक करून घेण्यात यश संपादन केले. मेहेदवी पंथाचे लोक हे इस्लाम धर्मापासून एक फुटीर वृत्ती धारण करणाऱ्या पंथाचे लोक आहेत. ते असे प्रतिपादन करतात की हिजरी ९६७ (इ. स. १५५०) २५१० या वर्षी स्वतःला सय्यद महमद म्हणून घेणारा हनाफी पंथातील एक इसम म्हणजेच खराखुरा या पृथ्वीवर अवतीर्ण होणारा इमाम मेहेदवी हा होय. त्यावेळी अशी काही परिस्थिती निर्माण झाली की तिचा या तोतयाने स्वतःचे हित साधण्यासाठी लाभ उठविला आणि इमाम मेहेदवीचा अवतार होण्याचीच ही चिन्हे आहेत असे भासविले. त्यामुळे हिंदुस्थानातील अनेक लोकांचा हाच इमाम मेहेदवी आहे या गोष्टीवर विश्वास बसला. सय्यद महमद हा इमाम मेहेदवी आहे या गोष्टीवर विश्वास ठेवणाऱ्यांपैकी जमालखान हा एक होता. हा जमालखान मेहेदवी या नावाने ओळखला जाई आणि इस्माईल निजामशहाच्या चाकरीत असलेल्या मेहेदवी पंथाच्या अनुयायांचा तो पुढारी समजला जाई. त्याने अनेक प्रसंगी आपल्या अंगच्या शौर्य साहसादी गुणांनी किर्ती संपादन केली होती. इस्माईल निजामशहाच्या राज्यारोहणाचे वेळी त्याच्या अंगातील साहस विशेषेकरून दिसून आले. या कावेबाज प्रमुखाच्या हातात इस्माईल निजामशहा हा एक बाहुले बनून राहिला. त्याने आपल्या कारकिर्दीची सुरुवात स्वतःच्या पंथाचे जे नाहीत त्यांचा सर्वांचा छळ करण्यास प्रारंभ केला. त्याचप्रमाणे मेहेदवी पंथाचे जे अनुयायी होते त्यांना त्याने उच्चपदावर चढविले आणि स्वतःच्या अवतीभोवती त्यांचे जणू एक वलयच निर्माण केले. एकंदर घडामोडींवर नाखूष असलेल्या सरदारांत वऱ्हाडचे अमीर होते. त्यांचे वास्तव्य अहमदनगरपासून काही अंतरावर असल्यामुळे त्यांनी सलाबतखानाची सुटका केली. सलाबतखानाला वऱ्हाडच्या [३] (२७८) सरहद्दीवर असलेल्या खेडल्याच्या किल्ल्यात बंदिस्त करून ठेवण्यात आलेले होते. मेहेदवी पंथीयांचा प्रतिकार करण्यासाठी त्यांनी सलाबतखानाच्या निशाणाखाली आपली एकजूट केली. अहमदनगरच्या राज्यामधून मेहेदवी लोकांची पूर्णपणे हकालपट्टी करण्याचा वऱ्हाडच्या अमिरांनी निश्चय केला. हा हेतू मनात धरून त्यांनी अहमद-

नगरच्या दिशेने कूच केले. विजापूरचा सुलतान त्यावेळी अल्पवयी होता आणि राज्यप्रतिनिधी म्हणून दिलावरखान हा कारभार पाहात असे. त्यानेही याच सुमारास मेहेदवींचा नाश करण्यासाठी म्हणून दक्षिणेच्या दिशेने आपल्या सैन्यासहित कूच केले.

(८४) आपल्यावर झालेल्या या दुहेरी आक्रमणामुळे जमालखानाने धीर सोडला नाही तर उलट आपल्या अनुयायांनी उत्तेजन दिल्यामुळे त्याने प्रथम सलाबतखानाविरुद्ध चाल केली. गोदावरीच्या तीरावरील पैठण या गावी त्याने सलाबतखानाचा पूर्णपणे पराभव केला आणि त्याला बुरहाणपूरच्या दिशेने माघार घेणे भाग पाडले. त्यानंतर त्याने विजापूरकडील आक्रमकांना तोंड देण्यासाठी उत्तर दिशेने चाल केली. विजापूरच्या सैन्याशी त्याची गाठ अष्टी या गावी पडली. दोन्ही फौजा परस्परांसमोर या ठिकाणी जवळ जवळ पंधरा दिवस ठाण मांडून उभ्या होत्या. दोघांनीही परस्परविरोधी अशी कोणतीही कारवाई केली नाही. सरतेशेवटी दोन्ही फौजांत तह घडून आला. या तहाच्या अटीप्रमाणे असे ठरले की मृत आदिलशहाची विधवा स्त्री आणि इस्माईल निजामशहाची आत्या चांदबिबी हिला विजापूरच्या छावणीत पाठविण्यात यावे आणि युद्धाचा खर्च भरून काढण्यासाठी म्हणून निजामशाही सरकारने विजापूर सरकारकडे २,७०,००० होन आदा करावे.

(८५) हिजरी ९९८ / इ. स. १५८९ } हिजरी ९९८ या वर्षी सलाबतखानाने बुरहाणपूरहून अर्जी पाठविली आणि अहमदनगरमध्ये परत येण्याची परवानगी आपल्याला मिळावी अशी विनंती केली. आपले देहावसान [ ३ ] ( २७९ ) अहमदनगरमध्येच व्हावे अशी इच्छा त्याने प्रकट केली होती. त्यावेळी त्याचे वय ७० वर्षांचे होते. त्याची विनंती मान्य करण्यात आली. सत्वर तो अहमदनगरात येऊन तळेगाव या[२५२] त्यानेच वसविलेल्या गावी स्थायिक झाला. त्याचवर्षी त्याला मृत्यू आला आणि तो प्रधानपदावर असताना अहमदनगरच्या दक्षिणेस असलेल्या एका टेकडीवर बांधलेल्या कबरस्थानामध्ये त्याचे दफन करण्यात आले.[२५३] निजामशाही राज्याच्या राजधानीमध्ये चाललेल्या अंदाधुंदीची हकीकत जेव्हा अकबर बादशहाच्या कानावर गेली तेव्हा त्याने बुरहाण निजामशहाला त्याच्या बंगश येथील जहागिरीवरून परत बोलाविले. बंगश हे गाव हिंदुस्थान आणि काबुल यांच्या दरम्यान आहे. त्याने त्याला असे सांगितले की तुझ्या वडिलार्जित सिंहासनावर खरा तुझा हक्क आहे. तुझ्या मुलाने आपल्या जुलमी वजिराच्या सहाय्याने त्याचा अपहार केला आहे ते मिळवून देण्यासाठी माझी, तुला फौजेचे सहाय्य देण्याची तयारी आहे. यावर बुरहाण निजामशहाने उत्तर दिले की जर मी तुमच्याकडून मदतीचा स्वीकार केला तर दक्षिणेतील प्रजाजन घाबरून जातील आणि माझ्या अधिकाराला मान्यता देण्यास विरोध दर्शवतील. तरी आपण मला माझ्या राज्याच्या सरहद्दीपर्यंत माझ्या अनुयायांसह जाण्याची परवानगी देण्यास तयार असाल तर मी तडजोडीने माझ्या प्रजाजनांची मने माझ्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न करीन. अकबराने बुरहाण

निजामशहाच्या या योजनेला आपली मान्यता दिली आणि त्याला दक्षिणेत जाण्याची परवानगी दिली. अहमदनगर राज्याचे सर्वाधिकार बुरहाण निजामशहाच्या ताब्यात येईपर्यंत त्याच्या खर्चासाठी म्हणून आपल्या राज्याच्या सरहद्दीवरील हंडिया जिल्ह्याचे उत्पन्न त्याने त्याला तोडून दिले. त्याचवेळी अकबराने खानदेशचा सुलतान राजा अलिखान याला बुरहाण निजामशहाला मदत देण्याविषयी लिहून कळविले. अहमदनगरच्या पुष्कळशा अमिरांनी बुरहाण निजामशहाकडे संधान बांधून त्याला आपला पाठिंबा दर्शविला. बुरहाणशहाने आपल्या मुलाविरुद्ध चाल केली पण त्यात त्याचाच पराभव झाला. यानंतर थोड्याच कालावधीने त्याने आपले राज्य [ ३ ] ( २८० ) मिळविण्याच्या प्रयत्नांना पुन्हा सुरुवात केली. यावेळी त्याला मोठ्या संख्येने अहमदनगरचे सैनिक आणि विजापूरच्या सुलतानाने पाठविलेली फौज येऊन मिळाली. विजापूरच्या सैन्याने त्याला मदत करण्यासाठी पुष्कळ पल्ले मजल मारली.

( ८ ) बुरहाण निजामशहाची तयारी पाहून जमालखानानेही आपल्या फौजेची जमवाजमव केली. या फौजेत १०००० मेहेदवी पंथाचे लोक होते. जमालखानाने वऱ्हाडच्या सय्यद अमजद-उल्-मुल्क याला आपल्या सर्व सैन्याला घेऊन उत्तर सरहद्दीवर राजा अलिखान आणि बुरहाण निजामशहा यांचा प्रतिकार करण्यासाठी कूच करण्याचा हुकूम दिला आणि तो स्वतः विजापूरच्या सैन्याला तोंड देण्यासाठी चालून गेला. दोन्ही फौजांची गाठ दारासून या खेड्याजवळ पडली आणि युद्धाला तोंड लागले. त्यात विजापूरचा पराभव झाला आणि त्यांनी ३०० हत्ती गमावले. त्यानंतर ४ दिवसांनी खबर आली की वऱ्हाडची फौज बुरहाण निजामशहाला जाऊन मिळाली आहे. तेव्हा जमालखानाने आपले विजयी सैन्य घेऊन विरुद्ध दिशेने बुरहाण निजामशहाचा समाचार घेण्यासाठी वऱ्हाडकडे कूच केले. इकडे इब्राहीम आदिलशहाने बारगीर व घोडदळाची आपली सर्व पथके जमालखानाच्या मागावर त्याची रसद तोडण्याकरता रवाना केली. जमालखानाची मदार आता पूर्णपणे त्याच्या मेहेदवी अनुयायांवर होती. त्याचे बरेवाईट होणे आणि त्याचे भवितव्य यांची सांगड त्याच्या मेहेदवी अनुयायांच्या अस्तित्वाबरोबर आता घातली गेली होती. जमालखानाचे सैनिक दररोज त्याचा पक्ष सोडून जात होते परंतु त्याची पर्वा न करता जमालखानाने रोहनखेडा घाटाकडे कूच केले. तिथे गेल्यावर त्याला असे आढळून आले की रोहनखेडा घाटाचा शत्रूने अगोदरच ताबा घेतला आहे. शत्रूची फळी फोडल्यास आपले नुकसान होईल याची त्याला जाणीव होती परंतु हा धोका पत्करण्याची त्याची तयारी नसल्यामुळे तो दुसऱ्या मार्गाने निघाला. हा मार्ग जाण्याला अतिशय कठीण होता आणि वाटेत पाण्याचा पुरवठा अतिशयच कमी होता. त्याने आपली छावणी देण्यासाठी एका जागेची पाहणी करून तेथे तंबू ठोकले तेव्हा त्याला अशी माहिती मिळाली की त्या जागेपासून आणखी पुढे सहा मैलांवर पाण्याचा भरपूर साठा आहे. तेव्हा त्याने त्या जागेकडे जाण्यासाठी कूच केले. तिथे पोहोचण्याचे अगोदर त्याला कळले की, शत्रूने ती जागा

अगोदरच व्यापली आहे. जमालखानाची फौज आता भयंकर संकटात [ ३ ] ( २८१ ) सापडली होती. अतिशय उष्णता आणि वाटेतल्या प्रसंगांना त्यांना द्यावे लागलेले तोंड यामुळे पुढे जाणे अगर माघार घेणेही आता संपूर्णतया अशक्य होते आणि म्हणून तो ज्या ठिकाणी आता येऊन ठेपला होता त्या ठिकाणी आपली छावणी करण्यावाचून दुसरा मार्ग त्याला उरला नाही. जमालखानाच्या फौजेने प्रथम पाणी मिळविले आणि नंतर त्याने त्यांना शस्त्रसज्ज होण्याचा हुकूम दिला. शत्रूशी दोन हात करून आपल्या भवितव्यात काय वाढून ठेवले आहे हे अजमाविण्याचा त्याचा निश्चय होता. त्याप्रमाणे त्याने शत्रूवर हल्ला केला. विजयश्रीने त्याच्या गळ्यात माळ घालून युद्धाचा डाव जवळ जवळ संपवीत आणला होता. तोच त्याला चुकून बंदुकीची गोळी लागून तो ठार झाला. त्याचा मृत्यू म्हणजे पराभवाची निशाणी ठरली. कारण त्याची फौज आता त्यांचे नेतृत्वच नाहीसे झाल्यामुळे दाही दिशांना पळून गेली. त्यांनी इस्माईल निजामशहाला आपल्याबरोबर नेले. त्याला बुरहाण निजामशहाच्या फौजांनी एका खेड्यात गाठले. त्याचा बाप बुरहाण निजामशहा याने त्याला बंदिवासात ठेवले आणि आपल्या मुलाला सिंहासनावरून काढून तो स्वतः सिंहासनावर बसला. इस्माईल निजामशहाची कारकीर्द एकंदर दोन वर्षे झाली.[२५४]□

## बुरहाण निजामशहा दुसरा [ ३ ] ( २८२ )

( ८७ ) बुरहाण निजामशहा दुसरा हा आपला भाऊ मुर्तजा निजामशहा याच्या कारकिर्दीत लोहगडच्या किल्ल्यावर बंदिवासात होता. मूर्तजा शहाने त्याच्या उदरनिर्वाहासाठी मोठी जहागीर नेमून दिलेली होती. त्यामुळे बुरहाण निजामशहाला आयुष्यातील चैनीचा आस्वाद घेता आला नाही असे म्हणता येणार नाही. ज्यावेळी साहिबखानाने मुर्तजा निजामशहाबद्दल घृणा वाटून अहमदनगर सोडले आणि मुर्तजाशहा त्याला परत आणण्याकरता त्याची मनधरणी करण्यासाठी बिदरपर्यंत गेला त्यावेळी दरबारातील काही मंडळींनी बुरहाण निजामशहाला सिंहासनावरील आपला हक्क सांगण्यासाठी प्रोत्साहन दिले. त्यांनी त्याला सांगितले की, [ ३ ] ( २८३ ) मुर्तजा निजामशहा वेडा आहे आणि राज्य करण्यास नालायक आहे. या सबबीखाली तू राज्यावर अधिकार सांग. या पक्षाकडून मिळालेल्या मदतीच्या वचनांना भुलून बुरहाण निजामशहाने लोहगडच्या सुभेदाराचे मन आपल्या बाजूला वळविले. त्याने आपल्या भोवती ६ हजार घोडेस्वार जमा केले आणि त्यांना बरोबर घेऊन अहमदनगरच्या दिशेने चाल केली. मुर्तजा निजामशहाला या बंडाळीची हकीकत कळताच तो तांबड-तोब बिदरहून अहमदनगरकडे परत फिरला. रस्त्यातून राजवाड्याच्या मार्गाकडे जात असताना त्याने आपला हत्ती एका औषधाच्या दुकानापाशी थांबविला आणि दुकानदाराला विचारले की, तुझ्याजवळ वेडेपणा दूर करील असे एखादे औषध आहे का ? तो असेही म्हणाला की, माझी इच्छा एकांतवासात जीवन कंठण्याची आहे

आणि तरीही मला राज्य करावयाचे आहे; आणि माझा भाऊ सुखोपभोगाचे जीवन जगत आहे. परंतु सार्वजनिक जीवनाच्या धकाधकीत स्वतःला लोटून द्यावे असे त्याला वाटते. आता तूच सांग आम्हा दोघांपैकी वेडा कोण? आणि दोघांपैकी या औषधाची जरुरी अधिक कुणाला आहे? यावर तो औषध-विक्रेता म्हणाला की, तुमचा भाऊच वेडा आहे कारण तुमच्या कृपाछत्राखाली सुखाने राहात असताना देखील बंड करण्याइतका कृतघ्नपणा त्याच्यात आहे. त्याने देशद्रोह करण्याचा जो घाट घातला आहे त्यामुळे त्याची कधीही भरभराट होणार नाही. यानंतर दुसऱ्याच दिवशी दोन्ही भावांत लढाई झाली. बुरहाण निजामशहाचा पराभव झाला आणि तो पळून विजापूरकडे निघून गेला. यानंतर दोनच वर्षांनीं फिरून एकदा त्याने राज्य मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला फारसे यश आले नाही. त्याने अकबर बादशहापाशी आश्रय घेतला. त्याचा मुलगा इस्माईल निजामशहा हा गादीवर येईपर्यंत तो अकबर बादशहा-पाशीच होता. त्याने आपल्या मुलाला सिंहासनावरून काढून गादी कशी बळकावली ही हकीकत वर सांगितलेली आहेच.

(८८) बुरहाण निजामशहा जेव्हा सिंहासनावर आरूढ झाला त्या वेळी त्याचे वय बरेच होते. आपले वय झाले आहे हे लक्षात न घेता आणि आपण एका राज्याचे सुलतान आहोत ह्या गोष्टीचाही विचार न करता त्याने वयाला न शोभणाऱ्या अशा सुखोपभोगात स्वतःला गुंतवून घेतले. त्याच्या कारकीर्दीत त्याने केलेली पहिली गोष्ट म्हणजे जमालखानाने मोठ्या प्रयासाने आणि मेहेनतीने मेहेदवी पंथाची जी स्थापना केली होती, त्या पंथाचे उच्चाटन करण्यासाठी त्याने काढलेला वटहुकूम ही होय— इतकेच नव्हे तर त्या पंथाचे तरीदेखील पालन करणाऱ्या सर्वांना ठार [ ३ ] (२८४) करण्यात यावे, अशा आज्ञा बुरहाण निजामशहाने दिल्या. याचा परिणाम असा झाला की अहमदनगर राज्यातून मेहेदवी पंथाची पूर्णपणे हकालपट्टी झाली. बुरहाण निजामशहाने शिया पंथाची अहमदनगर राज्यात पुन्हा स्थापना करून त्या पंथाला त्याच्या पूर्वीच्या वैभवाप्रत नेऊन पोहोचविले. याचा परिणाम असा झाला की, मिर्जाखानाच्या बंडामुळे अहमदनगरच्या राज्यातून जे परदेशी मुसलमान हाकलले गेले होते त्यापैकी बरेचसे परत आले. विजापूर राज्याचा भूतपूर्व प्रतिनिधी दिलावरखान हा होता. त्यालाही इब्राहीम आदिलशहाचे राज्य सोडून बिदरच्या राज्याचा आश्रय घेण्यासाठी पळून जाणे इब्राहीम आदिलशहाच्या त्याच्या जवळील वागणुकीमुळे भाग झाले होते. तोही आता निजामशहाच्या दरबारात दाखल झाला. बुरहाण निजामशहाने त्याचा योग्य प्रकारे आदरसत्कार केला. दिलावरखानाला आश्रय दिल्यामुळे इब्राहीम आदिलशहाने बुरहाण निजामशहाला पत्रे लिहून आपला निषेध कडक शब्दांत त्याला कळविला. बुरहाण निजामशहाने या पत्रांना अत्यंत अपमानकारक असे उत्तर पाठविले. परिणामी दोन्ही राज्यांत युद्धाचा प्रसंग निर्माण झाला. त्याची हकीकत इब्राहीम आदिलशहा दुसरा याच्या इतिहासात कथन केली आहे.

( ८९ ) हिजरी १००१ इ. स. १५९२ [२५५□] हिजरी १००१ या वर्षी बुरहाण निजामशहाने आपले सैन्य घेऊन रेवदंड्याच्या पोर्तुगीजांविरुद्ध चाल केली. त्याने बरेचसे सैन्य चेऊल या समुद्रकाठच्या बंदराकडे पाठविले. पोर्तुगीजांच्या रेवदंड्याच्या बंदरातील प्रवेशाला अडथळा निर्माण करणे शक्य व्हावे म्हणून त्याने या फौजेला चेऊल येथे एक किल्ला बांधण्याचा हुकूम दिला. या किल्ल्याला त्याने कोरला असे नाव दिले. पोर्तुगीजांनी रात्रीच्या वेळी आपली जहाजे हाकारून तेथून पलायन केले. परंतु खूपशी कुमक घेऊन ते परत माघारी आले. [२५६□, २५७□] त्यांच्या कब्जात किनारपट्टीवरील जी अनेक बंदरे आली होती [ ३ ] (२८५) तेथून त्यांनी ही कुमक आणली. यानंतर त्यांनी दोन वेळा रात्रीच्या सुमारास मुसलमानांवर हल्ले केले. प्रत्येक हल्ल्यात त्यांनी ३ ते ४ हजार दक्षिणी मुसलमानांना ठार मारले. मुसलमानांचा असा धुव्वा उडालेला पाहून बुरहाण निजामशहाने कोरल्याच्या किल्ल्याला कुमक म्हणून फरहादखानाच्या अधिपत्याखाली ४ हजार सैनिकांची एक तुकडी रवाना केली. दमण आणि वसई येथूनही फौजेच्या कुमकेची अपेक्षा होती. यानंतर बुरहाण निजामशहाने रेवदंड्याची नाकेबंदी करण्याच्या कामासाठी बहादूरखान गिलानी याला कोरला किल्ल्याच्या सुभेदारीवर नेमले आणि त्याच्याकडे सर्व परदेशी मुसलमानांच्या फौजेचे अधिपत्य सोपविले. कोरल्यावरील मुसलमानी शिबंदी इतकी जागरूक राहिली की, त्यांच्यावर अचानक हल्ला करून त्यांना पेचात पाडणे पोर्तुगीजांना शक्य नव्हते. त्यानंतर पोर्तुगीजांनी कोरल्याच्या किल्ल्यावर जेव्हा पुन्हा हल्ला केला तेव्हा त्यांना २०० युरोपियन आणि २०० तद्देशीय पोर्तुगीज शिपाई गमवावे लागले. या घटनेनंतर रेवदंड्याचा वेढा इतका सख्त करण्यात आला आणि कोरल्याच्या किल्ल्यावरून रेवदंड्याच्या बंदराची इतकी कडक नाकेबंदी करण्यात आली की समुद्रातून किल्ल्याकडे पोर्तुगीजांना मदत मिळणे अशक्य झाले. शत्रू आता शरणागती देणार असा समय प्राप्त झाला होता. अशा वेळी बुरहाण निजामशहाने आपल्या जुलमी वागणुकीचा इतका कहर केला की, त्याच्या अनेक अधिकाऱ्यांनी छावणी सोडली आणि ते अहमदनगरकडे चालते झाले. या सुमारास पोर्तुगीजांच्या मालकीची ६० जहाजे कोरल्याच्या अगदी नजीक आली. या जहाजांवर भरपूर लढाऊ सैनिक आणि युद्धसामुग्री होती. रात्रींच्या काळोखाच्या दाट आवरणाखाली ही जहाजे नांगरटीसाठी सुरक्षितपणे रेवदंडा बंदरात पोहोचली. या जहाजातून ४००० सैनिक रेवदंडा बंदरात उतरले, आणि [२५८□] दुसऱ्या दिवशी सकाळी भर उजेडात कोरल्यावर हल्ला करण्यासाठी त्यांनी कूच केले. युरोपियन सैनिक आपल्यावर हल्ला करण्यासाठी येत आहेत हे पाहून अनेक मुसलमान शिपाई गोंधळून जाऊन सैरावैरा किल्ल्याकडे पळत सुटले. त्यांचा इतका सख्त पाठलाग पोर्तुगीजांनी [ ३ ] ( २८६ ) केला की पोर्तुगीज सैनिक त्यांच्या पाठोपाठ किल्ल्याच्या दरवाजाजवळ पोहोचले आणि त्यांनी मुसलमानी सैनिकांवर हल्ला करून सरसकट त्यांची कत्तल करण्यास सुरुवात

केली. त्यांचे शत्रुबरोबरील प्रमाण एकास-दोन असे होते तरी बुरहाण निजामशहाच्या सैनिकांनी पोर्तुगीजांना फारच थोडा प्रतिकार केला. पोर्तुगीजांच्या तलवारीला १२ हजाराच्यावर मुसलमान बळी पडले. दक्षिणी मुसलमानांच्या झालेल्या या नाशाचे बुरहाण निजामशहाला दुःख झाले नाही. याउलट त्याने ही कत्तल म्हणजे एक दैवी इष्टापत्तीच मानली. त्याने अहमदनगरच्या राज्यात परदेशी मुसलमानांना मोठ्या अधिकार-पदांवर नेमले, आणि त्यांना चेऊलकडे कूच करून जाण्याचा हूकूम दिला. पोर्तुगीजांवर त्याच वेळी हल्ला करण्याचा त्याचा बेत होता परंतु त्याने तो पुढे ढकलला. कारण इब्राहीम आदिलशहाला गादीवरून काढून टाकण्याच्या प्रयत्नात त्याचा भाऊ इस्माईल आदिल हा होता त्याला बुरहाणशहा मदत करण्यात गुंतला होता. त्यानुसार बुरहाण (हिजरी १००३ इ. स. १५९४) निजामशहा याने हिजरी १००३ या वर्षी अहमदनगरहून बेळगावच्या दिशेने कूच केले. परंतु परंडा येथे आल्यावर त्याला असे कळले की राजपुत्र इस्माईल याला इब्राहीम आदिलशहाने कैद करून ठार मारलेले आहे. यामुळे पाणउतारा झाल्यासारखा बुरहाण निजामशहा हा अहमदनगरकडे परतला. तेथे थोड्याच कालावधीनंतर भयंकर तापाने त्याला घेरले. इकडे इब्राहीम आदिलशहाने आपला भाऊ इस्माईल आदिल याला पाठिंबा दिल्याबद्दल बुरहाण निजामशहाला शासन करण्याचे ठरविले आणि अहमदनगरच्या सरहद्दीवरील मुलख उद्ध्वस्त करण्याचा आपल्या सैन्याला हुकूम दिला. यावर बुरहाण निजामशहाने आपले वकील पेणकोंडा येथे विजयनगरचा व्यंकटाद्री याच्याकडे मैत्रीचा तह करण्यासाठी रवाना केले. त्याप्रमाणे व्यंकटाद्रीने अहमदनगरबरोबर तह करण्यास आपली अनुमती दिली. या तहाप्रमाणे असे ठरले की दक्षिणेकडून व्यकंटाद्रीने विजापूरवर आक्रमण करावे आणि बंकापूरचा किल्ला जिंकून घ्यावा, व बुरहाण निजामशहाने उत्तरेकडून चढाई करून सोलापूरचा पाडाव करावा. याप्रमाणे दोन्हीबाजूंनी अहमदनगर आणि विजयनगर यांनी विजापूरवर चढाई केली. सोलापूरवरील हल्ल्यात सोलापूर किल्ल्याच्या तट-बंदीखाली अहमदनगरचा सेनापती उझबेक बहादूर हा ठार झाला आणि त्याच्या फौजेचा पराभव झाला. या बातमीने अगोदरच संत्रस्त झालेल्या बुरहाण निजामशहाची प्रकृती अधिकच नाकरुस्त झाली. त्याच्या दुखण्याने तो [ ३ ] ( २८७ ) बिछान्याला जखडला गेला. त्याने आपला मुलगा इब्राहीम याला बोलावू पाठविले. त्याचा थोरला मुलगा इस्माईल याचा गादीवरील अधिकार त्याने दूर सारला आणि इब्राहीमला आपला वारस म्हणून नेमले. याचे कारण इस्माईलची शियापंथीयांचा शत्रू आणि कट्टर मेहेदवी म्हणून प्रसिद्धी होती. बुरहाण निजामशहाच्या मृत्यूपूर्वी इस्माईल गादीवर येणार अशी बातमी फैलावली. त्यामुळे अनेक परदेशी मुसलमान आपापल्या अधिकाराच्या जागा सोडून विजापूरकडे पळून गेले. इस्माईल हाच बुरहाण निजामशहानंतर गादीवर यावा असे वाटणाऱ्यांपैकी इखलासखान २५९८ मोवलीद हा एक होता. त्याची मजल इस्माईलशहाच्या वतीने सैन्य उभारून अहमद-

नगरवर चाल करून जाण्यापर्यंत गेली. यावर आपण रोगाने पीडित आहोत याची तमा न बाळगता बुरहाण निजामशहा हा पालखीत बसला आणि बरोबर सैन्य घेऊन त्याने हुमायूनपूरच्या दिशेने कूच केले. राजपुत्र इस्माईल याचा त्याने पराभव केला. इस्माईल पळून परंड्याकडे गेला. या धावपळीमुळे बुरहाण निजामशहाला अतिशय अशक्तपणा आला आणि राजधानीला परतल्यानंतर दुसऱ्या दिवशी म्हणजे १८ शाबान हिजरी १००३ या दिवशी तो मरण पावला. त्याची कारकीर्द एकंदर ४ महिने आणि १६ दिवस झाली. सुप्रसिद्ध लेखक मौलाना जहूरी याने आपला **साकीनामा** हा ग्रंथ बुरहाण निजामशहाला अर्पण केला. **साकीनाम्यात** जवळ जवळ ४ हजार ओव्या आहेत.

शाबान १८
हिजरी १००३
मे १५
इ. स. १५९४

## इब्राहीम निजामशहा [ ३ ] ( २८८ )

( ९० ) आपल्या बापाच्या मृत्यूनंतर इब्राहीम निजामशहा हा गादीवर आला. त्याच्या बापाने मरतेसमयी प्रगट केलेल्या इच्छेप्रमाणे त्याने मियामंजू दखनी याला आपला मुख्य वजीर नेमले. मियामंजू हा इब्राहीम शहाचा बाप बुरहाण निजामशहा दुसरा याचा शिक्षक होता. इब्राहीमशहा गादीवर आल्यावर इखलासखानाने त्याच्याकडे आपल्याला क्षमा करण्यात यावी अशी याचना केली. इथे ही गोष्ट लक्षात ठेवण्याजोगी आहे की बुरहाण निजामशहाच्या कारकिर्दीत त्याने प्रत्यक्ष इब्राहीम निजामशहाला रणांगणात विरोध केला होता. हे जरी खरे असले तरी इब्राहीमशहा आणि त्याचा नवीन वजीर यांनी इखलासखानाच्या अंगातील साहस आणि त्याचा महत्त्वाकांक्षी स्वभाव या गोष्टी विचारात घेतल्या आणि त्याची क्षमायाचनेची विनंती मान्य करणे शहाणपणाचे आहे असे ठरविले. त्याप्रमाणे इखलासखान हा अहमदनगरला येऊन दाखल झाला आणि त्याने आल्याबरोबर आपल्याभोवती हबशी आणि मोवलीद यांची मोठ्या संख्येने जमवाजमव करण्यास सुरुवात केली. ही गोष्ट जेव्हा मियामंजूच्या दृष्टोत्पत्तीस आली तेव्हा त्यानेही आपल्या अनुयायांना [ ३ ] ( २८९ ) एकत्र आणण्यास सुरुवात केली. त्याचा परिणाम असा झाला की, थोड्याच दिवसांत अहमदनगरमध्ये दोन पक्ष अस्तित्वात आल्यासारखे दिसून आले. प्रत्येक पक्षाने आपल्यालाच पुढारीपणाचा मान मिळावा आणि राजकारणात अग्रेसरत्व मिळावे असा अट्टाहास धरला. परिणामी अहमदनगर राज्यामध्ये अतिशय अंदाधुंदीची परिस्थिती निर्माण झाली आणि यादवी युद्ध अटळ आहे असे वाटू लागले. दरबारात दोन्ही पक्षांच्या अनेक बैठकी होत त्या वेळी प्रामुख्याने विजापूरच्या सुलतानावर चाल करून जाणे हे योग्य आहे किंवा नाही या एकाच गोष्टीची चर्चा होत असे. इब्राहीम निजामशहा गादीवर आल्यानंतर त्याच्या बापाच्या मृत्यूबद्दल दुखवटा व्यक्त करण्यासाठी आणि तो गादीवर आल्याबद्दल त्याचे अभिनंदन करण्यासाठी त्याकाळी

प्रचलित असलेल्या रूढीप्रमाणे इब्राहीम आदिलशहा दुसरा याचा वकील मीर सफवी हा अहमदनगर येथे आला होता. त्याच्याबरोबर इखलासखान आणि मियामंजू यांच्या पक्षानुयायांनी अतिशय उद्धटपणाची वर्तणूक केली. मीर सफवी यांचा जन्म सुप्रसिद्ध सय्यद घराण्यात झालेला होता. ही गोष्ट ध्यानात घेतल्यावर त्यांचे मीर सफवी-बरोबरचे वर्तन हे निश्चितपणे अश्लाघ्य होते. इब्राहीम आदिलशहाच्या कानांवर मीर सफवीचा अपमान झाल्याची हकीकत जेव्हा गेली तेव्हा त्याने अहमदनगरविरुद्ध युद्ध पुकारले. अहमदनगर राज्यात निर्माण झालेल्या दुहीमुळे इब्राहीम निजामशहाच्या हातातील सत्ता जवळ जवळ नाहीशी झाली होती. त्याला पाठिंबा देण्यासाठी म्हणून इब्राहीम आदिलशहाने शहादुर्गकडे कूच केले. विजापुरी फौजेला तोंड देण्यासाठी इखलासखानाने तयारी केली. परंतु मुख्य वजीर मियामंजू याने त्याच्याशी बोलणी सुरू करून असे सुचविले की, यावेळी इब्राहीम आदिलशहाबरोबर आपण तह करावा म्हणजे अकबर बादशहा दक्षिणेवर जी स्वारी करण्याच्या विचारात आहे त्या स्वारीला दक्षिणेतील सर्व फौजांना एकत्रित करून एकजुटीने तोंड देता येईल. परंतु इखलासखानाला त्याच्या बेतापासून परावृत्त करण्यात मियामंजूला यश मिळाले नाही. त्याने आपले सर्वस्व पणाला लावून इब्राहीम आदिलशहाबरोबर लढाई करण्याचा धोका पत्करण्याचा निश्चय केला. मियामंजूने यावर आपले काहीच मत दिले नाही परंतु इब्राहीम निजामशहाने मात्र इखालासखानाच्या बेताला मान्यता दिली. जेव्हा निजामशाही फौजा आपल्या राज्याच्या सरहद्दीजवळ पोहोचल्या तेव्हा त्यांना असे दिसून आले की आदिलशाही फौजांनी अजून अहमदनगरच्या मुलुखावर आक्रमण केलेले नाही. हे पाहिल्यानंतर मियामंजूने पुन्हा एकदा सुचविले की दोन्ही राज्यांमध्ये समझोता घडवून आणण्यासाठी विजापूरबरोबर तहाची बोलणी सुरू करावी. इब्राहीम निजामशहा यावेळी व्यसनाच्या अतिरेकात बुडून गेला [३] (२९०) होता. त्याने या बेताला साफ अमान्यता दर्शविली आणि पुढे कूच करण्याचा आपल्या सैन्याला हुकूम दिला. याप्रमाणे त्याने आपल्या राज्याची सरहद्द ओलांडून विजापूरच्या हद्दीत प्रवेश केला आणि विजापूरच्या मुलखातील खेड्यांमधून जबरदस्तीने वसुली केली. आदिलशाही सेनापती हमीदखान हा आघाडीवर होता. त्याने अहमदनगरच्या फौजांना प्रतिकार करण्यासाठी कूच केले. मियामंजूने जेव्हा पाहिले की परिस्थिती भयानक रूप धारण करत आहे तेव्हा त्याने आपले काही गुप्त अनुचर हमीदखानाकडे पाठविले आणि इब्राहीम निजामशहाच्या वर्तनाबद्दल त्याची क्षमा मागितली. हमीदखानाला पाठविलेल्या निरोपात त्याने कळविले की, इब्राहीम निजामशहा अजून पोरकट स्वभावाचा आहे. त्याने स्वतःला दारूच्या व्यसनात धुंद करून घेतलेले आहे. हल्ली तो कपटी आणि कारस्थानी लोकांच्या हातात सापडलेला आहे. चालू महिना हा जिल्हजचा महिना आहे. या महिन्यात मुसलमानांनी परस्परांशी युद्ध करणे हे धर्मविहीत आहे. म्हणून माझी आपल्याला अशी विनंती आहे की इब्राहीम निजामशहावर हल्ला करण्याचे

आपण थोडा काळपर्यंत स्थगित करावे. दरम्यानच्या कालावधित इब्राहीम निजामशहाचे मन मी तहाला मान्यता देण्यासाठी वळवीन. याप्रमाणे आपण विजापूरवर हल्ला करणार नाही असा शब्द मियामंजूने हमीदखानाला दिला तेव्हा हमीदखानाने निजामशाही फौजांना टाळले आणि त्यांच्यापासून दोन मैलांच्या अंतरावर त्याने आपली छावणी दिली. इब्राहीम निजामशहाने हे जेव्हा पाहिले तेव्हा त्याला असे वाटले की हमीदखानाने अहमदनगरच्या फौजांपुढे आपण कमजोर आहोत हे जाणून वरील पवित्रा घेतलेला आहे. तेव्हा इब्राहीम निजामशहाने दुसऱ्या दिवशी हमीदखानावर हल्ला करण्याचे ठरविले. अशा तऱ्हेचा मूर्खपणा इब्राहीम निजामशहाने करू नये म्हणून त्याला परावृत्त करण्याच्या प्रयत्नात मियामंजू आणि अहमदनगरच्या सैन्यांतील अनेक अधिकारी यांनी सारी रात्र जागून काढली परंतु इब्राहीम निजामशहा सारखा दारू पीतच राहिला, आणि दुसऱ्या दिवशी त्याने हमीदखानावर हल्ला केला. दोन्ही फौजांत एकंदर ५०००० घोडेस्वार आणि शिवाय अनेक पायदळी सैनिक होते. अहमदनगर आणि विजापूर यांची सैन्ये परस्परास भिडली आणि एकच रणधुमाळी माजली. युद्ध चालू असताना एक विलक्षण प्रकारची घटना घडून आली. निजामशाही फौजेच्या उजव्या फळीने आदिलशाही फौजेची डावी फळी मोडून काढली तर डाव्या फळीने शत्रूच्या उजव्या फळीच्या सैनिकांना जबरदस्त मार देऊन त्यांना [३](२९१) माघार घ्यावयास लावली आणि लढाईच्या मैदानापासून त्यांचा जवळ जवळ ६ मैलां-पर्यंत पाठलाग केला. इब्राहीम निजामशहा हा सैन्याच्या उजव्या फळीबरोबर होता. त्याला असे वाटले की आपल्या फौजांनी शत्रूवर विजय मिळविला आहे. आदिलशाही सैन्याची उजवी बाजू सुहेलखानच्या अधिपत्याखाली होती. त्याने रात्र पडली तरी आपली जागा सोडली नाही. रात्र झाल्याबरोबर त्या दिवसापुरते युद्ध समाप्त झाले. दुसऱ्या दिवशी सकाळी आपला शत्रू अजून आपल्यासमोर ठाण मांडून उभा आहे हे पहिल्यानंतर दोन्ही पक्षांना आश्चर्याचा धक्का बसला. इब्राहीम निजामशहाने सारी रात्र दारू पिण्यात घालविली होती. वरील प्रकार पाहून त्याने कडक मदिरेचे पेल्यावर पेले रिते केले आणि आपल्या सैनिकांना शस्त्रसज्ज होऊन शत्रूवर हल्ला करण्याचा हुकूम दिला. अहमदनगरच्या फौजेपैकी पुष्कळ सैनिक आदिलशहाच्या उजव्या फळीवरील सैनिकांचा पाठलाग करावयास गेल्यामुळे गैरहजर होते. विजापूरच्या फौजेत आता मुख्य सेनापतीच्या खालोखाल उपसेनापती म्हणून सुहेलखानाकडे अधिकार होते. त्याने आदिलशाही फौजेचे सर्व सेनाधिकार आपल्याकडे घेतले आणि इब्राहीम निजामशहाच्या अधिपत्याखाली हल्ला करून आलेल्या निजामशाही फौजेच्या प्रखर हल्ल्याला तोंड देण्यासाठी तो पुढे सरसावला. दुर्दैवाने इब्राहीम निजामशहाच्या मस्तकात बंदुकीची गोळी लागून तो ठार झाला आणि त्याची फौज त्याच्या मृत देहाला बरोबर घेऊन अहमदनगरच्या दिशेने पळून गेली. त्याच्याबरोबर मियामंजू हा पण गेला. अहमदनगर येथे गेल्यावर त्याने अहमद नावाच्या मुलाला दौलताबादहून आणविण्या-

साठी माणसे पाठविली. अहमदचे वय १२ वर्षांचे होते आणि तो बादशाही घराण्यांपैकी एक आहे अशा समजुतीखाली त्याला दौलताबादच्या किल्ल्यावर बंदिस्त करून ठेवण्यात आले होते. त्याचवेळी इब्राहीम निजामशहाचा अल्पवयी मुलगा बहादूर याची त्याने चावंडच्या किल्ल्यावर बंदिवासात ठेवण्यासाठी म्हणून रवानगी केली. चार महिन्यांच्या छोट्याशा कारकिर्दीनंतर इब्राहीम निजामशहाच्या राजवटीचा अशा तऱ्हेने अंत झाला.[२६०]

## अहमदशहा ताहिरचा मुलगा [३] (२९२-२९३)

(९१) इखलासखान आणि त्याचे अनुयायी यांनी राज्याच्या इतर अमिरांना मसलतीत घेऊन आपल्या मूर्खपणामुळे आणि अविचारामुळे बेजबाबदार वर्तनाच्या इब्राहीम निजामशहाचा पूर्णपणे नाश केला. त्याचवेळी मियामंजू हा अहमदनगरमध्ये येऊन दाखल झाला आणि त्याने राज्याचा खजिना आणि अहमदनगरचा किल्ला आपल्या ताब्यात घेतला. इखलासखान आणि इतर अधिकारी हे देखील अहमदनगरात दाखल झाले. अहमदनगर राज्याचा कारभार कशा तऱ्हेने चालविता येईल यासंबंधी योजना आखण्यासाठी विचारविनिमय करण्याकरता मियामंजूने त्यांना किल्ल्यात बोलावणे पाठविले. मृत इब्राहीम निजामशहाची आत्या चांदबिबी हिचा पाठपुरावा सर्व हबशी सरदारांनी केला. त्यानी असे सुचविले की इब्राहीम निजामशहाचा अजून अल्पवयी असलेला एकुलता एक मुलगा बहादूर याला तिच्या राजपालकत्वाखाली सिंहासनावर बसवावे. परंतु मियामंजूने ही योजना झिडकारली. तेव्हा सर्वानुमते असे ठरले की, निजामशाही घराण्यातील एक पुरुष अहमद हा तूर्त दौलताबादेस आहे त्याला सिंहासनावर बसवावे. या बेतानुसार एक औपचारिक प्रतिनिधी मंडळ मोठ्या इतमामाने शहाताहीरचा मुलगा अहमद याला आणण्यासाठी तेथे रवाना करण्यात आले. अहमद याला १० जिल्हज हिजरी १००३

जिल्हज १० हिजरी १००३ ऑगस्ट ६ इ. स. १५९४

रोजी राज्याभिषेक करण्यात आला आणि १२ इमामांच्या नावे खुत्ब्याचे वाचन करण्यात आले. राज्याच्या सर्व अमीर-उमरावांनी जवळ जवळ सर्व राज्य जहागिरीत आपापसात वाटून घेतले. नंतर त्यांनी इब्राहीम निजामशहाचा पोरका मुलगा बहादूर याला त्याची आत्या चांदबिबी हिच्या पालकत्वाखालून काढून घेतले आणि जबरदस्तीने चावंडच्या किल्ल्यात बंदिवासात ठेवण्यासाठी पाठवले. त्यानंतर लवकरच अहमदशहा हा निजामशही घराण्यातील पुरुष नसून त्याने अहमदनगरच्या सिंहासनावर जो अधिकार सांगितला त्याला कोणताही पुरावा नाही या गोष्टी उघडकीस आल्या. यावर इखलासखान आणि इतर हबशी सरदार यांना अहमदशहाच्या सिंहासनावर बसण्याच्या योजनेला पाठिंबा दिल्याबद्दल पश्चाताप झाला. अहमदशहाच्या घराण्याच्या कुलवृत्तांताची हकीकत पुढीलप्रमाणे आहे. [३] (२९४)

(९२) अहमद निजामशहाचा मुलगा पहिला बुरहाण निजामशहा याचा मृत्यू झाल्यानंतर त्याचा मुलगा हुसेन निजामशहा हा गादीवर आला. त्याला पाच भाऊ होते.

(१) महमद खुदाबंदा
(२) शहा अली
(३) महमद बाकर
(४) अब्दुल कादर
(५) शहा हैदर

त्यांच्या मनामध्ये असा विचार आला की, सिंहासनावर बसलेल्या आपल्या भावाच्या द्वेषाग्नीत आपली आहुती पडण्याची शक्यता आहे म्हणून ते राज्य सोडून पळून गेले. मुर्तजा निजामशहाच्या कारकिर्दीच्या अखेरच्या काळात स्वत:ला शहा ताहीर म्हणवून घेणारा एक इसम दौलताबाद येथे आला. त्याने असे जाहीर केले की, महमद खुदाबंदा याला बंगालमध्ये अमुक दिवशी मृत्यू आला आणि मी स्वतः खुदाबंदाचा औरस मुलगा असून बंगालमध्ये माझ्यावर विपन्न अवस्था ओढवल्यामुळे मी दक्षिणेत आलो आहे. मुर्तजा निजामशहाच्या सरदारांनी या गोष्टीची सत्यासत्यता शाबीत करण्याच्या इच्छेने ही सर्व परिस्थिती बादशहाच्या आणि विशेषतः अहमदनगरचा सुप्रसिद्ध वजीर सलाबतखान याच्या कानांवर घातली. त्यावेळी या परिस्थितीचा समाधानकारकपणे उलगडा झाला नाही. कारण बंगाल आणि दक्षिणेमधील मोठे अंतर आणि ज्यावेळी ही घटना घडली त्यानंतर उलटलेला बराच कालावधी. परंतु शहाताहीर याने आपण राजवंशातील असल्याचा दावा सांगितल्याने आणि कदाचित् एखादे वेळी तो प्रत्यक्ष सिंहासनावर अधिकार सांगण्याची भिती असल्याने त्याला एका किल्ल्यात बंदीस्त करून ठेवण्यात आले. यानंतर काही काळाने राजपुत्र खुदाबंदा याला जाणणाऱ्या काही मान्यवर मंडळींना, पुढे अहमदनगरच्या गादीवर आलेल्या बुरहाण निजामशहाची भेट घेण्यासाठी आणि वरील गोष्टीची शहानिशा करण्यासाठी आग्रा येथे अकबर बादशहाच्या दरबारात पाठविण्यात आले. यावेळी बुरहाण निजामशहा हा आग्रा येथे अकबर बादशहाच्या दरबारात राहात होता. बुरहाण निजामशहाने शहाताहीरने सांगितलेल्या गोष्टीचा [ ३ ] (२९५) पूर्णपणे इन्कार केला आणि असे सांगितले की माझा चुलता राजपुत्र खुदाबंदा हा प्रत्यक्ष माझ्याच घरात मरण पावला. त्याच्या घराण्यातील जी काही पुरुष आणि बायकामाणसे अजूनपर्यंत हयात आहेत ती सर्व माझ्या घरी आग्रा येथे राहात आहेत. याउप्पर जर कोणा एखाद्याने आपण खुद्द खुदाबंदाचा मुलगा आहोत असे सांगितले असले तर हे विधान साफ चुकीचे आहे आणि असे सांगणारी व्यक्ती तोतया आहे. यावर वजीर सलाबतखान म्हणाला की ज्याअर्थी त्या माणसाने आपण राजपुत्र खुदाबंदा याचा मुलगा असल्याचे जाहीर केले आहे त्याअर्थी ही गोष्ट खोटी आहे याबद्दल लोकांची समजूत करणे अतिशय कठीण जाईल. उलट या गोष्टीमुळे सिंहासनावर

आपला अधिकार आहे असे सिद्ध करण्यासाठी त्याच्या हाती एक हत्यार दिल्यासारखे होईल. अशा परिस्थितीत त्या माणसाला आयुष्यभर एकाद्या किल्ल्यात बंदिवासात ठेवणे हे शहाणपणाचे ठरेल. याप्रमाणे शहा ताहीर याला बंदिवासात ठेवण्यात आले. काही वर्षांनंतर शहा ताहीर मरण पावला. त्याच्या पाठीमागे त्याचा एक मुलगा ह्यात होता. त्याचे नाव अहमद. आपल्या नसानसात राजघराण्यातील पुरुषाचे रक्त वाहात आहे असा जो दावा अहमद याने मांडला त्याला मियामंजू याने पाठिंबा दिला आणि यापूर्वी सांगितल्याप्रमाणे त्याला सिंहासनावर बसविण्याची योजना मांडली. तेव्हा मोवलीद आणि हबशी या सहवर्तमान इखलासखान याला खरी वस्तुस्थिती काय आहे याची जाणीव झाली. तेव्हा त्यांनी अहमदचा पक्ष सोडला. यानंतर मियामंजू याने दक्षिणी लोकांना बरोबर घेऊन मोठ्या संख्येने अहमदनगर किल्ल्याच्या नजिक असलेल्या काळ्या चबुत्र्याच्या मैदानात तळ दिला. इखलासखानाच्या नेतृत्वाखाली जमा झालेल्या लोकांची पांगापांग करण्यासाठी मियामंजूने आपला मुलगा मियाहसन याला ७०० घोडेस्वार देऊन रवाना केले. तो स्वतः अहमदला घेऊन एकंदर परिस्थितीचा काय निकाल लागतो ते बघण्यासाठी किल्ल्याच्या तटावर गेला. तेथून त्याला इखलासखान आणि मियाहसन यांच्यात मारामारी सुरू झाल्याचे दिसून आले. या धुमश्चक्रीचा निकाल काय लागतो त्याबाबत बराच वेळपर्यंत अनिश्चितता राहिली. तेवढ्यात बंडखोरांपैकी एकाने मारलेल्या बंदुकीची गोळी अहमदच्या डोक्यावर असलेल्या छत्रावर येऊन लागली आणि त्यामुळे किल्ल्यात एकच गोंधळाचे वातावरण निर्माण झाले. अहमद मेला असे लोकांनी उद्गार काढले आणि त्याच शब्दांचा पुनरुच्चार किल्ल्याच्या तटावरून झाला. साहजिकच ही बातमी परस्परांत लढणाऱ्या इखलासखान आणि मियाहसन यांच्या सैन्यात पसरली. मियाहसन [ ३ ] ( २९६ ) याने त्वरित रणांगणातून पळ काढला आणि माघार घेत घेत तो किल्ल्यामध्ये घुसला. यामुळे इखलासखानाच्या लोकांचा आत्मविश्वास वाढला आणि त्यांनी आगेकूच करण्यास सुरुवात केली. त्यांनी किल्ल्याची सख्त नाकेबंदी केली आणि किल्ल्यात जाण्याच्या नेहमीच्या वाटा बंद करून किल्ल्याला वेढा दिला. त्याचवेळी इखलासखानाने दौलताबादच्या सुभेदाराला निरोप पाठवून दुसऱ्या बुरहाण निजामशहाच्या कारकिर्दीच्या वेळेपासून दौलताबादच्या किल्ल्यावर बंदिवासात असलेल्या नेहंगखान आणि हबशखान मोवलीद यांची सुटका करण्याचा हुकूम दिला. दौलताबादच्या सुभेदाराने ह्या हुकुमाची तावडतोब तामिली केली. परंतु इखलासखानाने असाच हुकूम चावंड किल्ल्याच्या सुभेदाराला राजपुत्र बहादूर याला हवाली करण्याबद्दल केला. त्या हुकुमाचे पालन करण्याचे मियामंजू याच्या लेखी आज्ञेशिवाय चावंडच्या सुभेदाराने नाकारले. दरम्यान इखलासखानाने अहमदनगरच्या बाजारात बहादूरच्या वयाचाच एक मुलगा पैदा केला आणि तोच इब्राहीम :निजामशहाचा वंशज आणि निजामशाही घराण्याच्या तख्त्याचा कायदेशीर वारस असल्याचे जाहीर

केले. आपल्या जाहीरनाम्याच्या जोरावर त्याने जवळ जवळ १० ते १२ हजार घोडेस्वारांची जमवाजमव केली. इखलासखान आणि त्याचे साहाय्यक हबशी सरदार यांना मिळालेला पाठिंबा आणि त्यांनी आपला उद्देश तडीस जावा या हेतूने केलेली तयारी पाहून मियामंजूचे धाबे दणाणले आणि त्याने निराशेच्या भरात त्यावेळी गुजरातेत सुभेदारीवर असलेला अकबर बादशहाचा मुलगा राजपुत्र मुराद मिर्जा याला पत्र लिहिले. या पत्रात त्याने मुरादला ताबडतोब आपल्या साहाय्यासाठी कूच करून येण्यास कळविले आणि त्या प्रित्यर्थ त्याने अहमदनगर राज्याच्या उत्पन्नाचा काही भाग त्याला देण्याचे कबूल केले. दक्षिणेवर यांनीही त्या उपायाने सरते शेवटी आक्रमण करण्याच्या संधीचा फायदा घेण्याच्या उद्देशाने मुराद मिर्जा याची गुजरातच्या सुभेदारीवर नेमणूक झाली होती. मियामंजूने त्याला पाठविलेल्या बोलावण्याचा त्याने पूर्णपणे फायदा घेतला. परंतु मियामंजूने त्याला पाठविलेले पत्र त्याच्या हातात पडण्याच्या अगोदर राज्यातील निरनिराळ्या भागांच्या वाटणीबद्दल हबशी सरदारांमध्ये मतभेद होऊन त्यांच्यात दुफळी पडली आणि इखलासखानाच्या छावणीत बंडाचा प्रादुर्भाव झाला. याच सुमारास त्याच्या पक्षातील अनेक दक्षिणी सरदारांनी मोठ्या संख्येने त्याचा पक्ष सोडला [ ३ ] ( २९७ ) आणि ते सर्व मियामंजू याला किल्ल्यामध्ये जाऊन मिळाले. त्यांनी इखलासखानाच्या परिस्थितीचे जे वर्णन केले त्यामुळे त्याचा आत्मविश्वास इतका वाढला की दुसऱ्या दिवशी म्हणजे शनिवार २५ मोहरम हिजरी १००४ या दिवशी त्याने किल्ल्यातून बाहेर पडून इदग्याच्या आसमंतात चाल केली आणि हबशांवर अकस्मात हल्ला चढवून त्यांचा पूर्णपणे बिमोड केला. त्याच्या हाती अनेक कैदी पडले. या कैद्यांमध्ये इखलासखानाने सुलतान म्हणून जाहीर केलेला बाजारातून धरून आणलेला मुलगा होता. यानंतर काही कालावधीने राजपुत्र मुराद मिर्जा हा ३०००० मोगल व रजपूत घोडेस्वारांना बरोबर घेऊन अहमदनगरच्या किल्ल्याजवळ येऊन ठेपला. त्याच्याबरोबर खानदेशचा सुलतान राजा अलीखान आणि अकबराचा एक सेनापती खान खानान हे दोघेजण होते. दरम्यानच्या काळात मियामंजूने हबशांना मोडून काढण्यात यश मिळविले होते आणि त्याच्या इच्छेप्रमाणे अहमदनगरमधील प्रकरणांची वासलात लागणाऱ्या मार्गाची वाटचाल चालू झाली होती. त्याला आता मुराद मिर्जा याला आपल्या मदतीसाठी बोलावणे केल्याबद्दल पश्चात्ताप झाला. त्याने राजधानीवर मुरादकडून हल्ला झाल्यास त्याचा प्रतिकार करण्याची तयारी केली. त्याने अनेक दिवस वेढा पडला तरी पुरेल एवढ्या रसदीची अहमदनगर शहरात तरतूद केली. राजधानीच्या संरक्षणासाठी त्याने आपल्या अनुयायांपैकी एक अन्सारखान याला आणि राजप्रतिनिधी म्हणून चांदबिबी हिला असे दोघांना अहमदनगरमध्ये ठेवले आणि आदिलशाही आणि कुतुबशाही सुलतानांकडून मदतीची याचना करण्यासाठी औशाच्या मार्गाने त्याने

मोहरम २५
हिजरी १००४
सप्टेंबर १८
इ. स. १५९५

कूच केले. त्याने आपल्याबरोबर अहमदनगरचा तरुण सुलतान अहमदशहा याला घेतले. ज्या क्षणापासून मियामंजू आणि अहमदशहा यांनी किल्ला सोडला त्याक्षणापासून चांदबिबीने किल्ल्याला पडलेला वेढा लढविण्याची सर्व सूत्रे आपल्या हाती घेतली. थोड्याच दिवसांत तिने अन्सारखानाचा खून करविण्यात यश [ ३ ] ( २९८ ) मिळविले आणि बहादूरशहाची अहमदनगरचा सुलतान म्हणून द्वाही फिरविली. राज्याचा सर्व कारभार तिने आपल्या हाती घेतला. या कामी तिला महमदखानाचे साहाय्य झाले. यानंतर तिने समशेरखान हबशी आणि अफझलखान बोरिशी यांना त्यांच्या अनेक अनुयायांसहित आपल्या पक्षाकडे मिळवून घेतले आणि किल्ल्यामध्ये आपल्याला येऊन मिळण्याबद्दल त्यांचे मन वळविले.

( ९३ ) त्याच वर्षी रबीउससानी महिन्याच्या २३ तारखेला राजपुत्र मुराद मिर्जा याने अहमदनगर शहराच्या उत्तरेच्या बाजूला आपली छावणी हलविली. इदग्याच्या ठिकाणावरून जेव्हा त्याचे सैन्य जाऊ लागले तेव्हा त्याच्या छावणीतील सैनिक आणि किल्ल्यावरील शिबंदी यांच्यामध्ये गोळीबार झाला मोगल फौजेने बुरहाण

रबीउससानी २३ हिजरी १००४ डिसेंबर १४ इ. स. १५९५

निजामशहा पहिला याने बांधलेली बाग हश्तबिहिस्त येथे आपला तळ टाकला. राजपुत्र मुराद याने तावडतोब बुरहाणाबाद शहरातील नागरिकांचे संरक्षण करण्यासाठी म्हणून सैन्याची एक सुसज्ज तुकडी रवाना केली. बुरहाणाबाद हे शहर बुरहाण निजामशहा दुसरा याने वसविले होते. मुरादने बुरहाणाबादमधील नागरिकांबरोबर सौजन्याने वागण्याबद्दल आपल्या सैनिकांना हुकूम दिला. त्याचप्रमाणे मोगल सैनिक ज्या प्रदेशामधून जातील तेथील सर्व रहिवाशांना सर्व तऱ्हेचे संरक्षण देण्याबद्दलही त्याने आपल्या सैनिकांना बजाविले. त्याने असा आदेश दिला की तुम्ही ताब्यात घेतलेल्या प्रदेशातील रहिवाशांबरोबर अशा तऱ्हेने वागल्यास मोगलांच्या चांगुलपणावर त्यांचा विश्वास बसून तुमच्यावर अवलंबून राहण्याकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ती होईल. दुसऱ्या दिवशी राजपुत्र मुराद स्वतः छावणीबाहेर पडला आणि आपल्या फौजेतील स्थापत्यशास्त्रज्ञांच्या सल्ल्यानुसार किल्ल्याला वेढा देण्याचे कामासाठी मोर्चे कोठे उभारावे यासंबंधी पाहाणी केली. पहाणी केलेल्या जागांवर मोर्चे उभारावे असे ठरले. नंतर त्याने किल्ल्यातील सर्व शिबंदीला वेढा घालता येईल अशा तऱ्हेने किल्ल्याभोवतालच्या वेगवेगळ्या मोक्याच्या जागा आपल्या सैन्यातील प्रत्येक तुकडीकडे वाटून दिल्या. याच महिन्याच्या

रबीउससानी २७ हिजरी १००४ डिसेंबर १७ इ. स. १५९५

२७ तारखेस शहाबाजखान नावाचा मोगल सेनापती घोड्यावर स्वार झाला आणि आपण शिकारीसाठी जात आहोत अशी बतावणी करून त्याने छावणीमधून बुरहाणाबादकडे दौड केली. शहाबाजखानाची त्याच्या शिपायांबाबत अतिशय हुकुमशाहीची वृत्ती असल्याबद्दल आणि सर्व प्रजाजनांबद्दल अतिशय क्रौर्यपूर्ण वागणूक असल्याबद्दल प्रसिद्धी होती. बुरहाणाबाद येथे पोहोचल्यावर त्याने राजपुत्र मुरादच्या हुकुमाविरुद्ध आपल्या फौजेला तेथे लुटालूट करण्याबद्दल प्रवृत्त केले आणि त्या कामी [ ३ ] (२९९)

त्याने स्वतःच पुढाकार घेतला. याचा परिणाम असा झाला की जेमतेम एका तासाभराच्या अवधित अहमदनगर आणि बुरहाणाबाद ही शहरे लुटून साफ फस्त करण्यात आली. मुरादच्या कानांवर या लुटालुटीची हकीकत जेव्हा गेली तेव्हा त्याने त्यात भाग घेणाऱ्यांना कैद करण्यास फर्माविले. कैद करताना ज्यांच्याजवळ प्रत्यक्ष लुटीचा माल मिळाला त्या सर्वांना छावणीसमोर फासावर चढविण्यात यावे असा हुकूम त्याने दिला. परंतु या दोन्ही शहरांच्या रहिवाशांनी मोगलांच्या वचनावर विश्वास ठेवून राहण्याचे साफ नाकारले आणि रातोरात दोन्ही शहरे सोडून ते पळून गेले.

( ९४ ) यावेळी किल्ल्यामधील सरकाराशिवाय निजामशाही दरबारात आणखी तीन पक्ष होते ही गोष्ट नमूद करणे अत्यावश्यक आहे.

पहिला पक्ष म्हणजे मियामंजू आणि त्याचा बगलबच्चा अहमदशहा यांचा. त्यांनी आपला मुक्काम इब्राहीम आदिलशहाकडे मदतीची याचना करण्यासाठी आदिलशाही राज्याच्या सरहद्दीवर केला होता.

दुसरा पक्ष इखलासखानाचा. त्याने दौलताबाद शेजारीच छावणी दिली होती. तेथून जवळपासच त्याने मोती नावाच्या एका मुलाला पैदा केले होते आणि तोच खरा अहमदनगरच्या गादीचा कायदेशीर वारस आहे असे जाहीर केले होते.

तिसरा पक्ष नेहंगखान हबशी याचा. तो विजापूरच्या राज्याच्या मुलुखात गेला होता. तेथे पहिल्या बुरहाण निजामशहाचा मुलगा शहा अली हा होता. त्याचे वय आता सत्तराच्या वर होते. नेहंगखानाने त्याला विजापूरमधील अज्ञातवासातून बाहेर पडण्यास आणि बादशहा म्हणून छत्रचामरे धारण करण्यास संमती देण्यासाठी म्हणून उद्युक्त केले होते.

( ९५ ) इखलासखानाने १२००० घोडेस्वार घेऊन अहमदनगरकडे कूच केले. तो अहमदनगरकडे कूच करून जात असताना दौलतखान लोदी या मोगल अधिकाऱ्याने ६००० मोगल घोडेस्वार घेऊन मुरादच्या हुकुमाप्रमाणे त्याच्यावर हल्ला केला आणि गोदावरीच्या तीरावर त्याचा संपूर्ण पराभव केला. हा विजय मिळाल्यानंतर न थांबता तो पैठण येथे येऊन दाखल झाला. पैठण हे शहर त्या काळी अतिशय भरभराटलेले असे होते. त्याने ते शहर पूर्णपणे लुटले आणि अंगावर पांघरायला [ ३ ] ( ३०० ) पुरा कपडा राहिला नाही अशी तेथील रहिवाशांची दैना करून टाकली.

(९६) जरी चांदबिबीने बहादूर निजामशहाच्या नावे द्वाही फिरविली होती तरी तो चावंडच्या किल्ल्यात अजून बंदिस्त होता. मियामंजू हा देखिल अहमदशहाबरोबर बऱ्याच मोठ्या सैन्यासह विजापूरच्या सरहद्दीवर होता. त्याने नेहंगखान आणि शहा अली यांच्याकडे बोलणी लावून त्यांचे मन चांदबिबीला सर्वांनी किल्ल्यात जाऊन मिळण्याबद्दल वळविणे हेच सद्यःपरिस्थितीत शहाणपणाचे आहे असे ठरविले. या बेताला नेहंगखानाने मान्यता दिली आणि आपल्या फौजेला कूच करण्याचा हुकूम दिला. त्याच्या फौजेत ७००० सैनिक होते. कूच करीत तो अहमदनगरपासून

१२ मैलांवर येऊन ठेपला. तेथून मोगलांच्या छावणीची हालहवाल काय आहे आणि छावणीचा कोट फोडून किल्ल्यात घुसण्याची कितपत शक्यता आहे ह्याची खातरजमा करण्यासाठी आपला एक हेरकरी त्याने रवाना केला. त्याला अशी बातमी कळली की किल्ल्याच्या पूर्व बाजूला वेढा पडलेला नाही आणि तेवढा एकच मार्ग किल्ल्यामध्ये उत्तम तऱ्हेने त्याला प्रवेश करता येण्याजोगा खुला आहे. यावर नेहंगखानाने रातोरात कूच केले. त्याने सभोवार टेहळण्यांची पथके ठेवून आणि दोन्ही बगलांना संरक्षक सैनिक ठेवून संरक्षणाची उत्तम तजवीज केली. किल्ल्यापासून तीन मैल अंतरापर्यंत आल्यावर त्याला असे आढळून आले की किल्ल्यामध्ये प्रवेश करण्यासाठी जो सरळ मार्ग किल्ल्याच्या दिशेने होता त्या मार्गावरच मोगलांच्या छावणीचा काही भाग पसरलेला आहे. येथे असलेले मोगल सैनिकांचे पथक त्या दिवशीच हश्तबिहिस्त बागेतून तेथे पाठविण्यात आले होते. या पथकामध्ये एकंदर १००० सैनिक असून त्यांचे अधिपत्य खानखानानकडे होते. आदल्या दिवशी सकाळी जेव्हा राजपुत्र मुराद हा मोर्चांची पाहणी करण्यासाठी गेला होता तेव्हा नजर चुकीने किल्ल्याच्या त्या भागाला वेढा घालण्याचा राहून गेल्याचे त्याच्या लक्षात आले होते. याचा परिणाम म्हणून वरील पथक त्याने तेथे रवाना केले. नेहंगखानाने प्रखर वेढ्याची फळी फोडून किल्ल्यामध्ये घुसण्याचे ठरविले. त्याने अचानक मार्गात असलेल्या मोगल सैनिकांच्या पथकांवर हल्ला केला आणि अनेक मोगल सैनिक कापून काढले. मोगल ठाण्याला रसद पाठविण्यात आली परंतु तेवढ्यात नेहंगखान त्यांची फळी फोडून आपल्याबरोबरील थोड्याशा सैनिकांसह किल्ल्यात घुसला. शहा अली याला मात्र नेहंगखानाबरोबर आत घुसणे शक्य न झाल्यामुळे त्याने माघार घेण्याचा प्रयत्न केला. परंतु या प्रयत्नात त्याच्या जवळ जवळ ७०० सैनिकांना दौलतखान [ ३ ] (३०१) लोदीच्या हाताखालील मोगल सैनिकांनी कापून काढले.

( ९७ ) विजापूरच्या इब्राहीम आदिलशहाला या पराभवाची हकीकत कळल्याबरोबर आणि मोगलांचे सामर्थ्य केवढे अफाट आहे याची जाणीव झाल्यावर त्याने आपला खोजा सुहेलखान याला आपल्या राज्याच्या सरहद्दीवर शहादुर्ग येथे २५००० घोडेस्वार देऊन पाठविले आणि पुढील हुकुमाची वाट पाहात तेथे थांबून राहण्याची त्याला आज्ञा दिली. या ठिकाणी त्याला ताबडतोब मियामंजू आणि अहमदशहा आणि त्याचप्रमाणे इखलासखान हे येऊन मिळाले. अहमदनगरचे सरकार बचावण्यासाठी राज्यातील सर्व अमिरांची एकी करावी या आशेने इखलासखानाने तात्पुरते आपापसातील खाजगी मतभेदाचे प्रश्न दूर सारले होते. या फौजेला लगोलग हैद्राबादहून कुतुबशहाने अतिशय तातडीने रवाना केलेला आपला सरदार महेदी कुली सुलतान तुर्कमान हा आपल्या ६००० घोडेस्वारांसहित येऊन मिळाला.

( ९८ ) शहादुर्ग येथे जमा झालेल्या सैन्याच्या या प्रचंड जमवाजमवीची हकीकत राजपुत्र मुराद मिर्जा याच्या कानावर आली. (या सुमारास त्याच्यामध्ये

आणि त्याचा सेनापती खानखानान याच्यामध्ये काही गोष्टींवरून मतभेद निर्माण झाले होते.) त्याने ताबडतोब आपल्या युद्धमंडळाची बैठक बोलावली. युद्धमंडळाने असे ठरविले की शहादुर्ग येथील फौजेकडून किल्ल्याची वेढ्यातून सुटका करण्याचे प्रयत्न होण्याचे आतच किल्ल्यावर शक्य तो लवकर हल्ला चढविण्यात यावा. या बेताप्रमाणे

रज्जब १ हिजरी १००४ फेब्रुवारी २० इ. स. १५९६

काही दिवसांतच किल्ल्याच्या एका बाजूकडील तटाखाली ५ सुरुंग बांधण्यात आले. या सुरुंगांत बंदुकीची दारू ठासून भरण्यात आली होती. ज्या ठिकाणाहून हल्ला करण्याचे मुक्रर करण्यात आले तो सुरुंग सोडून बाकीचे सर्व सुरुंग मंगळवार रज्जब १ च्या रात्री चुना आणि दगड यांनी बांधून काढण्यात आले. दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व सुरुंगांचा धडाका उडवून देण्यात यावा असा निर्णय घेण्यात आला.

( ९९ ) किल्ल्यातील शिबंदीने प्रतिकारात दाखविलेले असामान्य धैर्य पाहून ख्वाजा महमदखान शिराजी याला कौतुक वाटले. अशा लोकांचा हकनाक बळी जावा ही गोष्ट त्याला आवडली नाही. म्हणून त्या दिवशी रात्री तो किल्ल्याच्या तटाच्या भिंतीपाशी गेला आणि किल्ल्यावरील लोकांना त्यांच्यावर ओढवलेल्या [ ३ ] ( ३०२ ) भयंकर संकटाची त्यांना जाणीव दिली. यावर किल्ल्यावरील शिबंदीने चांदबिबीच्या सांगण्यावरून मोगलांनी भरलेले सुरुंग नष्ट करण्याच्या कामाला सुरुवात केली. चांदबिबीने त्याना आपले स्वतःचे उदाहरण या कामगिरीमध्ये घालून दिले. दिवस उजाडेपर्यंत त्यांनी दोन सुरुंगांचा नाश केला होता आणि उरलेल्यांच्या शोधामध्ये ते होते. त्याच वेळी राजपुत्र मुराद मिर्जा याने खानखानान याला न सांगता आपल्या सैन्याला छावणी-बाहेर पडण्याचा हुकूम दिला आणि खानखानानला बरोबर न घेता किल्ल्यावर हल्ला करण्याचे ठरविले. किल्ल्यावरील शिबंदी तिसऱ्या सुरुंगातील दारू काढण्याच्या प्रयत्नात गुंतली होती. हा सुरुंग सर्वांत मोठा होता. त्याचवेळी राजपुत्र मुराद याने सुरुंग उडविण्याचा हुकूम दिला. त्यामुळे झालेल्या स्फोटात शिबंदीतील अनेक लोक ठार झाले, आणि किल्ल्याची अनेक गज भिंत कोसळून पडली. किल्ल्याच्या भिंतीला खिंडार पडलेले पाहाताच किल्ल्यावरील अनेक प्रमुख अधिकाऱ्यांनी पळून जाण्याची तयारी केली. या उलट चांदबिबीने अंगावर चिलखत चढविले, चेहऱ्यावर बुरखा टाकला आणि हातात नंगी तलवार घेऊन ती किल्ल्याला पडलेल्या खिंडाराच्या रक्षणासाठी धावून गेली. चांदबिबीने प्रगट केलेल्या या असामान्य साहसाने पळून जाणाऱ्यांना पाठीमागे खेचून आणले आणि त्यांच्यापैकी एकूण एक माणसांनी तिच्या सहाय्यार्थ लढाईमध्ये उडी घेतली. राजपुत्र मुराद आणि हल्ला करणारे मोगल सैनिक दुसऱ्या सुरुंगाच्या स्फोटाची वाट पाहात होते. तेवढ्या वेळात किल्ल्यावरील शिबंदीला किल्ल्याभोवतालच्या खंदकात तोफगोळे, दारू आणि इतर ज्वालाग्राही वस्तू टाकण्याची आणि किल्ल्याच्या तटाला पडलेल्या खिंडारावर तोफा डागण्याची संधी मिळाली.

( १०० ) सरते शेवटी मोगलांनी किल्ल्यावर हल्ला चढविण्यासाठी आगेकूच

केले. तटाला ज्या ठिकाणी खिंडार पडले होते त्याच्या पायथ्याशी शिबंदीने प्रतिकाराची कमाल केली. त्यांनी केलेल्या तोफांच्या भयंकर भडिमारामुळे मोगलांचे अतोनात नुकसान झाले. मेलेल्या माणसांच्या ढिगाऱ्यांनी खंदक भरून गेला होता. संध्याकाळी ४ वाजल्यापासून तो रात्र पडेपर्यंत मोगलांच्या टोळ्या खिंडारावर एका पाठोपाठ सरीप्रमाणे कोसळत होत्या. परंतु मोगलांचा हा मारा यशस्वीपणे परतवून लावण्यात आला. खिंडाराचे संरक्षण करण्याच्या कामात चांदबिबीला सर्वांनी पाहिले होते. तिने याप्रसंगी साहसाची जी अचाट कृत्ये केली ती शत्रूच्या छावणीत संभाषणाचा विषय बनली, आणि साऱ्या जगभर तिच्याबद्दल प्रशंसेचे उद्‌गार कानांवर [३] (३०३) येऊ लागले. अहमदनगर राज्याची राज्यप्रतिनिधी या अधिकारात तिला आतापर्यंत चांदबिबी या साध्या नावाने ओळखत. परंतु तिच्या असामान्य शौर्याने तिला चांद सुलताना हे नाव मिळवून दिले. सर्व रात्रभर तिने किल्ल्याला पडलेल्या खिंडाराची जी दुरुस्ती चालली होती त्यावर देखरेख ठेवली आणि दिवस उजाडताच तटाला पडलेले खिंडार ७ ते ८ फूट एवढ्या उंचीपर्यंत बांधून काढण्यात आले. त्यावेळी अहमदनगर, विजापूर आणि गोवळकोंडा यांच्या संयुक्त फौजा कूच करीत बीडपर्यंत आल्या होत्या. दुसऱ्या दिवशी चांदबिबीने किल्ल्यावरील शिबंदीची रसदीपायी झालेली दुरावस्था पत्र लिहून त्यांना कळविली आणि ताबडतोब किल्ल्याच्या मदतीला निघून येण्याबद्दल त्यांना आवाहन केले. दुर्दैवाने ही सर्व पत्रे शत्रूच्या हातात पडली. ती मुरादने दोस्तांच्या फौजांकडे पुढे रवाना केली परंतु त्याचबरोबर एक पत्र लिहून त्यांना तुम्ही येण्याची त्वरा करा, तुमची गाठ घेण्यास मी अतिशय उत्सुक आहे असेही कळविले. जितक्या लवकर याल तितके बरे असेही एक वाक्य त्याने खवचटपणे लिहिले.

(१०६) अहदनगरमधील शिबंदीच्या मदतीस निघालेल्या दोस्त फौजांच्या हाती ही पत्रे पडताच त्यांनी माणिकदौंड डोंगराच्या वाटेने अहमदनगरकडे कूच केले. या सुमारास मोगलांच्या छावणीत अन्नधान्याच्या तुटवड्यामुळे आधीच हलाखीची परिस्थिती निर्माण झाली होती. त्यात दोस्त-फौजा जवळ येऊ लागल्यामुळे अधिकच भर पडली. दोस्तांच्या फौजांनी किल्ल्याला वेढा देऊन बसलेल्या मोगल फौजांची कुमक मारण्याचे आपले काम अविरत चालू ठेवले. अशा परिस्थितीत मुरादने किल्ल्यावरील शिबंदीबरोबर तडजोडीची भाषा सुरू करणे योग्य ठरेल असा निर्णय घेतला. वऱ्हाडचा प्रांत मोगलांना तोडून दिल्याची सनद आपल्याला मिळण्याच्या अटीवर आणि वऱ्हाडवरील आपले सार्वभौमत्व अहमदनगर राज्याने अधिकृतरित्या सोडून दिल्याची कबुली दिल्यास आपण अहमदनगरचा प्रदेश सोडून जाऊ असे त्याने कबूल केले. प्रथम चांद सुलताना हिने या अटी झिडकारल्या. परंतु नंतर तिने विचार केला की, जर का दोस्तांच्या फौजांचा पराभव झाला तर या अटींना देखील शत्रूकडून पुढे मान्यता मिळणार नाही. म्हणून तिने तहावर सही केली. यानंतर [३] (३०४)

मोगलांनी दौलताबाद आणि जयपूर-कोटलीघाट या मार्गाने अहमदनगर राज्यातून आपले सैन्य परत नेले.

(१०२) मोगलांचा वेढा उठल्यानंतर तीन [२६१] दिवसांनी दोस्तांचे सैन्य तेथे येऊन पोहोचले. अहमदशहाशी सर्वजण निष्ठा व्यक्त करतील अशी मियामंजू याची अपेक्षा होती. परंतु किल्ल्यावरील अमिरांनी या गोष्टीला पसंती देण्यास साफ साफ नकार दिला. नेहंगखानाने मियामंजूला किल्ल्यात न घेता किल्ल्याचा दरवाजा बंद केला आणि बहादूरशहाला चावंड किल्ल्यावरील त्याच्या बंदिवासातून आणण्यासाठी फौजेची एक तुकडी रवाना केली. अहमदनगर राज्यामध्ये अंतर्गत यादवी युद्धाला हा जो प्रारंभ झाला होता तो मोडून काढण्यासाठी चांद सुलताना हिने आपला पुतण्या विजापूरचा सुलतान इब्राहीम आदिलशहा याच्याकडे मदत पाठविण्याबद्दल विनंती केली. आदिलशहाने तिच्या मदतीसाठी मुस्तफाखान याला ४ हजार घोडेस्वारांची तुकडी देऊन पाठविले. त्याच वेळी त्याने मियामंजू याला पत्र लिहून कळविले की अहमदशहा याच्या अहमदनगरच्या सिंहासनावरील अधिकाराचा दावा मांडण्याचे तू जे प्रयत्न चालविले आहेस ते तू ताबडतोब सोडून दे आणि विजापूर येथे निघून ये. तेथे आल्यावर एकंदर परिस्थितीचा साधक-बाधकपणे विचार करता येईल. या पत्राप्रमाणे मियामंजू याने सुहेलखान आणि मुस्तफाखान यांच्या समवेत विजापूरकडे प्रयाण केले. विजापूर येथे तो पोहोचल्यावर इब्राहीम आदिलशहाने अहमद हा निजामशाही घराण्याचा खराखुरा वारस नाही याबद्दल खात्रीपूर्वक खातरजमा करून घेतली. त्याने अहमदशहाच्या नावे त्याच्या हयातीपर्यंत भरपूर जहागिरी त्याला बहाल करून दिली आणि आपल्या राज्याच्या अमिरांमध्ये मिया मंजूचे नाव दाखल केले. [२६२][२६३]

## बहादूर निजामशहा [३] (३०५)

(१०३) बहादूर निजामशहा याला चांवंडच्या किल्ल्यावरील त्याच्या बंदिवासातून मुक्त करून आणण्यात राणी चांद हिला यश प्राप्त झाल्यावर त्याची अहमदनगरचा सुलतान म्हणून जाहीररित्या द्वाही फिरविण्यात आली. यानंतर तिने आपला स्नेही आणि सल्लागार महमदखान याची वजिरीच्या जागेवर नेमणूक केली. [३] (३०६) परंतु त्याने थोड्याच काळात (आणि हे काही जगाच्या चालिरिती बघता फारसे वावगे नव्हते.) राज्याची सत्ता पूर्णपणे हातात आल्यावर सरकारातील मुख्य मुख्य अधिकाराच्या जागांवर आपले अनुयायी आणि नातलग यांना बढती देऊन नेमण्यास सुरुवात केली. मोगलांबरोबर झालेल्या संघर्षात त्यांनी आपल्या शौर्याने नाव कमावले होते त्यांची त्याने उचलबांगडी केली. अशा तऱ्हेची अधिकार पदच्युती ते मुकाटपणे सहन करतील अशी अपेक्षा करणे म्हणजे निव्वळ भ्रम होता. तेव्हा महमदखानाने

नेहंगखान आणि समशेरखान हबशी यांना पकडून कैदेत टाकणे हाच शहाणपणाचा मार्ग आहे असा विचार केला. यावर आपल्यावरही असाच प्रसंग ओढवेल या भितीने राज्यातील इतर अमीरउमराव राज्याचा त्याग करून पळून गेले.

( १०४ ) या घडामोडी चालल्या असताना दिल्लीच्या फौजांनी वऱ्हाड ताब्यात घेतला होता आणि त्या अजून जवळपासच्या मुलुखातच ठाण मांडून होत्या. राजधानीत महमदखानाचे वजन आणि सामर्थ्यही अमर्याद होते. अशा परिस्थितीत राणी चांदला असे दिसून आले की आपल्या हातातील सत्ता अस्तंगत होण्याचा समय आता अगदी नजिक आला आहे. तेव्हा तिने आपला पुतण्या इब्राहीम आदिलशहा याला पत्र लिहून अहमदनगरच्या राजकारणात हस्तक्षेप करण्याबद्दल त्याला विनविले आणि त्याला विनंती केली की अहमदनगरमधील अधिकार आता महमदखानाने बळकाविले आहेत, त्याचा बिमोड करून अहमदनगरच्या सरकारची पुनर्घटना करण्यासाठी मोठे सैन्य अहमदनगरला पाठविण्याची व्यवस्था करावी. या विनंतीप्रमाणे आदिलशहाने सुहेलखानाला वरील प्रमाणे कार्यवाही करण्यासाठी अहमदनगरला सैन्य घेऊन पाठविले आणि राणी चांदच्या मर्जीला येईल त्याप्रमाणे स्वतःची वर्तणूक ठेवण्याचा आणि त्याप्रमाणे वागण्याचा त्याला हुकूम दिला.

( १०५ ) हिजरी १००५ इ. स. १५९६ } हिजरी १००५ या वर्षाच्या सुरुवातीला सुहेलखान हा अहमदनगरला येऊन पोहोचला. अहमदनगरमध्ये त्याला प्रवेश करण्यास महमदखानाने प्रतिकार केला तेव्हा सुहेलखानाने किल्ल्याला वेढा दिला. किल्ल्याची नाकेबंदी चार महिनेपर्यंत चालली. आपल्याविरुद्ध बलशाली असा पक्ष निर्माण झालेला आहे हे महमदखानाला जेव्हा आढळून आले तेव्हा त्याने वऱ्हाडमध्ये तेथे असलेल्या मोगल फौजेचा सरसेनापती खानखानान याला पत्रे लिहून आपल्याला येऊन मिळण्याविषयी कळविले आणि [ ३ ] ( ३०७ ) त्याबदली अहमदनगरचे राज्यावर आपण दिल्लीच्या बादशहाचे नावे राज्यकारभार चालवू असे त्याने खानखानानला वचन दिले. महमदखानाने जीवावर उदार होऊन ठरविलेल्या या योजनेची कुणकुण किल्ल्यावरील शिबंदीच्या कानावर गेली तेव्हा शिबंदीच्या शिपायांनी महमदखानाला पकडले आणि त्याला राणी चांदच्या हवाली केले. या एकाच गोष्टीमुळे राणी चांदची सत्ता किल्ल्यावर पुन्हा प्रस्थापित झाली. तिने ताबडतोब नेहंगखान हबशी याची सुटका केली आणि त्याची नेमणूक राज्याचा पेशवा म्हणून केली. यानंतर तिने सुहेलखानाला मानाचा पोषाख आणि काही वस्तू भेटीदाखल दिल्या आणि त्याला विजापूर येथे परत जाण्याची परवानगी दिली. विजापूरच्या वाटेवर तो असताना भीमा नदीच्या काठावर राजापूर ह्या खेड्यात त्याचा मुक्काम झाला. तेथे त्याला असे कळले की अहमदनगरबरोबर झालेल्या कराराप्रमाणे मोगलांनी वऱ्हाड आपल्या ताब्यात घेतला आहे. एवढेच नव्हे तर पाथरी आणि इतर गावे ज्यांचा वरील कराराप्रमाणे वऱ्हाडात समावेश झाला

नव्हता यांच्यावर हल्ला करून ती उद्ध्वस्त करून टाकली आहेत. ही बातमी कानावर पडल्यावर त्याने कूच करून पुढे जाण्याचा विचार रद्द केला आणि या नवीन निर्माण झालेल्या परिस्थितीबद्दल इब्राहीम आदिलशहाला लिहून कळविले. मोगलांनी केलेल्या हल्ल्यांची अशाच तऱ्हेची हकीकत राणी चांद हिने विजापूर आणि हैद्राबादच्या सुलतानांना लिहून कळविली. सुहेलखानाने मोगल आक्रमकांवर चाल करून जावे असा हुकूम आदिलशहाने त्याच्याकडे पाठविला. त्याने महमद कुली सुलतान यालाही आपली फौज घेऊन सुहेलखानाबरोबर सहकार्य करण्याचा आदेश दिला. या फौजेला अहमदनगरहून रवाना करण्यात आलेले २०००० स्वार येऊन मिळाले. अशा तऱ्हेने सुहेलखानाच्या हाताखाली एकंदर ६०००० घोडेस्वारांचे सैन्य जमा झाले. या सैन्यासह त्याने वऱ्हाडकडे कूच केले आणि सोनपेठ या गावी आपला मुकाम केला.

(१०६) या वेळी मोगल सेनापती खानखानान हा जालना येथे छावणी करून होता. त्याने आपल्या सैन्याच्या सर्व तुकड्यांना छावणीकडे परतण्याचा हुकूम दिला आणि तो स्वतः शहापूर येथे राजपुत्र मुराद याजकडे पुढील कारवाई काय करावयाची यासंबंधी हुकूम घेण्यासाठी दाखल झाला. तेथे त्याला खानदेशाचा राजा अलीखान, राजा जगन्नाथ आणि इतर मातबर सरदार मंडळी येऊन मिळाली. शहापूरहून खानखानान हा जालन्याकडे परत फिरला आणि तेथून त्याने तावडतोब दक्षिणेच्या फौजांच्या दिशेने मोर्चा वळवून गोदावरीच्या तीरावर आपली छावणी [ ३ ] ( ३०८ ) दिली. शत्रूच्या अगदी नजिक त्याने मोक्याच्या जागा धरल्या आणि आपले मोर्चे उभारले. जवळ जवळ पंधरा दिवसपर्यंत विरोधी सैन्याच्या घोडदळांत बारीकसारीक चकमकीशिवाय मोठी अशी लढाई झालीच नाही. मोगलांनी मोठ्या युद्धाचा या काळात प्रसंग येऊ दिला नाही याचे कारण त्यांना दक्षिणी शिपायांची युद्धक्षमता अजमावून पाहावयाची होती. परंतु जमादिउससानी महिन्याच्या पंधराव्या दिवशी खानखानानने आपल्या सैन्याची युद्धासाठी व्यूहरचना केली. हा दिवस म्हणजे हिजरी १००५ जमादिउससानी महिन्याची १८ तारीख होय. मोगलांच्या हल्ल्याला सकाळी ९

| | |
|---|---|
| जमादिउससानी १८<br>हिजरी १००५<br>जानेवारी २६<br>इ. स. १५९७ | वाजता सुरुवात झाली, आणि लढाईलाही त्याचवेळी सुरुवात झाली. दुपारी ३ वाजेपर्यंत म्हणण्याइतका युद्धाचा भडका उडाला नाही. परंतु त्यानंतर मात्र दोन्ही सैन्यांत तुंबळ युद्ध सुरू झाले. विजापूरकडून झालेल्या तोफांच्या भडिमारात |

खानदेशचा राजा अलीखान आणि राजा जगन्नाथ हे ठार झाले. परंतु मोगल घोडदळाच्या प्रखर हल्ल्याला तोंड देणे निजामशाही आणि कुतुबशाही फौजांना अशक्य झाले, आणि सूर्योदयापूर्वी त्यांनी माघार घेतली. सुहेलखानाने मात्र अतिशय शौर्याने प्रतिकार करून आपली बाजू एकट्याने टिकवून धरली. आदिलशाही घोडदळाने मोगलांची फळी फोडली आणि त्यांना चेपीत चेपीत शहापूरपर्यंत मागे रेटले. तेथे राजपुत्र मुराद हा आपली छावणी रिकामी करण्याच्या बेतात होता. तोच त्याला असे कळले

की खानखानानने कणखर प्रतिकार करून आपली फळी टिकवून धरली आहे. राजपुत्र मुराद आपली छावणी मोडण्याच्या विचारात आहे हे दक्षिणी लोकांनी पाहिले तेव्हा हा आपला विजयच झाला आहे असे समजून त्यांनी लुटालूट करण्यास सुरुवात केली. सुहेलखानाने त्यांना प्रतिकार करण्यासाठी केलेल्या कोणत्याच प्रयत्नांना त्यांनी जुमानले नाही, आणि त्यांनी केलेली लूट आपल्याबरोबर घेऊन ते आपापल्या राजधान्यांकडे चालते झाले.

( १०७ ) रात्रीचे काही प्रहर उलटून गेल्यावर खानखानान आणि सुहेलखान यांना असे आढळून आले की, ते एकमेकांपासून बंदुकीच्या गोळीच्या एका टप्प्याच्या अंतरावर आहेत. या परिस्थितीची जाणीव होताच त्यांनी आपापल्या विस्कळीत झालेल्या फौजांना एकत्रित आणण्यासाठी कसोशीने प्रयत्न केले. सकाळ झाली तेव्हा दोन्ही फौजा परस्परांवर हल्ला करण्याच्या तयारीने एकमेकांसमोर [३] ( ३०९ ) खड्या उभ्या ठाकल्या. खानखानानने सुहेलखानाकडे युद्ध थांबविण्याचा प्रस्ताव मांडला. परंतु समझोता करण्याची आपली बिलकूल तयारी नाही असे सुहेलखानाने कळविले आणि मोगलांवर आपल्या तोफांच्या भडिमाराला सुरुवात केली. आदल्या दिवशीपेक्षा अतिशय प्रखर अशा युद्धाला सुरुवात झाली. अखेर आदिलशाही सैन्याचा पराभव झाला. अगदी थोड्या सैनिकांना बरोबर घेऊन सुहेलखानाला माघार घेणे भाग पडले. तो कसाबसा शहादुर्गला जाऊन पोहोचला. आदल्याच दिवशी निजामशाही आणि कुतुबशाही फौजांनी पळ काढला होता. निजामशाही फौजा अहमदनगरकडे आणि कुतुबशाही फौजा गोवळकोंड्याच्या मार्गाने माघार घेत राहिल्या. या विजयानंतर खानखानानने आपले बहुतेक सैन्य वऱ्हाडमधील नरनाळा आणि गावीलगड हे किल्ले जिंकून घेण्यासाठी रवाना केले आणि तो स्वतः जालना येथेच मुक्काम[२६४□] करून राहिला.

( १०८ ) राजपुत्र मुराद याचा सादीक महमदखान हा शिक्षक होता. तो ५ हजारी मनसबदार होता. त्याच्या चिथावणीवरून राजपुत्र मुराद याने खानखानानला असे कळविले की या विजयानंतर न थांबता मोगल सैन्याने ताबडतोब अहमदनगर जिंकण्याकरता कूच करावे आणि अहमदनगर राज्याचा सर्व प्रदेश ताब्यात घ्यावा. यावर खानखानानकडे असे कळविले की वऱ्हाडमधील अनेक मजबूत किल्ले अजून जिंकून आपल्याला ताब्यात घ्यावयाचे आहेत. तेव्हा निजामशाही प्रदेशावर आक्रमण करण्यासाठी आपण पुढील वर्षापर्यंत थांबणे हे शहाणपणाचे ठरेल. खानखानानने त्याच्याशी सहमत होण्यास विरोध दाखवून वेगळे मत प्रदर्शित केल्यामुळे राजपुत्र मुराद याला आपला अपमान झाल्यासारखे वाटले आणि म्हणून त्याने दिल्ली येथे आपला बाप अकबर बादशहा याला लिहून खानखानानबद्दल त्याच्याकडे तक्रार केली. आपल्या तक्रारीला पुष्टी देण्यासाठी त्याने शहापूर येथील आपल्या [ ३ ] ( ३१० ) छावणीमधून बादशहाकडे आणखी काही खाजगी पत्रे रवाना केली. अखेर अकबर

बादशहाने खानखानान याला परत बोलाविले आणि त्याच्या जागी दक्षिणेतील
हिजरी १००६ } फौजांचा सरसेनापती या अधिकारावर शेख: अबुल फजल[२६५□]
इ. स. १५९७ } याची नेमणूक केली.[२६६□]

( १०९ ) दरम्यान अहमदनगरचा मुख्य वजीर आणि पेशवा नेहंगखान याने आपल्या हाती अमर्याद सत्ता प्राप्त करून घेतली आणि राणी चांद हिला पकडण्याचा घाट घातला आणि त्याचप्रमाणे अहमदनगरचा पोरका सुलतान आणि अहमदनगर राज्याचा कारभार यांची व्यवस्था आपल्या हाती आणण्याचे दृष्टीने कारवाया सुरू केल्या. राणी चांदला जेव्हा त्याच्या वरील बेताची कुणकुण लागली तेव्हा तिने किल्ल्याचे दरवाजे बंद करून घेतले आणि सुलतानाला आपल्या ताब्यात घेऊन नेहंग-खानाला किल्ल्यात प्रवेश करून देण्याचे नाकारले. तिने त्याला बजाविले की पूर्वी-प्रमाणे तू सार्वजनिक कामाच्या बाबींची वाघलात किल्ल्यात न लावता अहमदनगर शहरातच राज्याचा सर्व कारभार बघावास. काही दिवसपर्यंत नेहंगखानाने बिनतक्रार चांदबिबीच्या हुकुमाला मान तुकविली पण अखेर त्याने आपला चांगुलपणाचा बुरखा टाकून दिला आणि किल्ल्यावर हल्ला चढविला. राजपक्षीय मंडळी आणि बंडखोर यांच्यामध्ये अनेक लहानमोठ्या चकमकी उडाल्या. या भांडणात इब्राहीम आदिलशहाने दोन्ही पक्षांत समेट घडून यावा यासाठी प्रयत्न केले परंतु दोन्ही पक्षांनी तहाची बोलणी धुडकावून लावली. दुसऱ्या पक्षाने आपल्याला कोणतीही अट घातल्याशिवाय पूर्णपणे शरणागती द्यावी असा प्रत्येकाने हट्ट धरला. नेहंगखानाच्या हातात स्थानिक कारभार असल्यामुळे त्याने आपल्या सामर्थ्यात हळूहळू वाढ केली होती. त्याने खान-खानान हा आता दक्षिणेत नाही त्याचा फायदा घेतला. पावसाळ्यालाही सुरुवात झाली होती. गोदावरी दुथडी भरून वाहात होती. कोठल्याही ठिकाणी नदीला उतार नव्हता. अशा परिस्थितीत त्याने बीड शहराचा ताबा मोगलांपासून घेण्याकरता आपल्या सैन्याची एक तुकडी रवाना केली. निजामशाही फौजेला प्रतिकार करण्यासाठी बीड शहराचा सुभेदार शेरखान हा शहरापासून १२ मैल चाल करून आला. [३] (३११) परंतु युद्धात त्याला जखम होऊन त्याच्या फौजेचा पराभव झाला. मोठ्या कष्टाने तो बीड-पर्यंत जाऊन पोहोचला. त्याच्या पाठोपाठ निजामशाही फौजांनी चाल करून जाऊन बीड शहराला वेढा दिला. शेरखानाने दिल्लीला पत्र लिहून आपल्याला कुमक पाठविली ज त नसल्याबद्दल अकबर बादशहाकडे तक्रार केली आणि आपली एकंदर परिस्थिती त्याच्या कानावर घातली. अकबर बादशहा खानखानानला दक्षिणेत पुन्हा परत पाठविण्याच्या आणि अबुल फजल याला माघारी बोलावून घेण्याच्या विचारात होता. त्याच वेळी त्याला, व्यसनाच्या अतिरेकामुळे राजपुत्र मुराद, याला शहापूर येथे मृत्यू आल्याची बातमी कळली. तेव्हा बादशहाने आपला सर्वांत धाकटा मुलगा राजपुत्र दानियल मिर्जा याची दक्षिणेच्या सुभेदारीवर नेमणूक केली आणि खानखानान याला दक्षिणे-तील फौजांचा सरसेनापती म्हणून त्याच्याबरोबर जाण्यासाठी नियुक्त केले. ते जेमतेम

राज्याच्या सरहद्दीपर्यंत पोहोचले न पोहोचले तोच शेख अबुल फजल याच्या अत्याग्रहा-
(हिजरी १००८ / इ. स. १५९९) वरून अकबर बादशहा हा स्वतः हिजरी १००८ या वर्षी दक्षिणेकडे कूच करून येण्यासाठी निघाला. बुरहाणपूर येथे आल्यावर त्याने दक्षिणेमधील राजकीय परिस्थितीबद्दल वास्तपुस्त केली. तेव्हा त्याला असे कळले की राणी चांद आणि नेहंगखान यांच्यामधील फाटाफुटीमुळे अहमदनगर राज्यात अजून अस्थिरतेची परिस्थिती आहे. त्यामुळे अकबराने खुद्द असिरच्या किल्ल्याला वेढा दिला आणि राजपुत्र दानियल मिर्जा आणि खानखानान यांना अहमदनगरवर पाठविले. यावर नेहंगखान हबशी याने बीडला घातलेला वेढा उठविला आणि १५००० घोडेस्वार आणि पायदळी फौज घेऊन जयपूर कोटलीघाट ताब्यात घेण्याच्या उद्देशाने कूच केले. त्या ठिकाणी मोगलांचा प्रतिकार करण्याचे त्याने ठरविले. परंतु नेहंगखानाच्या या बेताची माहिती अगोदरच लागल्यामुळे राजपुत्राने जयपूर कोटली घाटातून कूच करण्याचे टाळले आणि मनूर खेड्यावरून असलेल्या मार्गाने तो अहमदनगरकडे निघाला. आपल्यावर बाजू उलटल्याचे पाहून आणि मोगल फौजांना प्रतिकार करणे अशक्य झाल्याने नेहंगखानाने आपल्याजवळील जड सामानसुमानाला आग लावून दिली आणि त्याने अहमदनगरकडे माघार घेतली. तेथे त्याने आपली तडजोड करण्याची इच्छा आहे असे चांदबिबीला कळविले परंतु तिने त्याचे कोणतेही म्हणणे [ ३ ] ( ३१२ ) ऐकून घेण्यास नकार दिल्यामुळे त्याने जुन्नरच्या दिशेने पळ काढला. कसलाही प्रतिकार न होता मोगल फौजा किल्ल्यापर्यंत पोहोचल्या. पूर्वीप्रमाणेच त्यांनी किल्ल्याला वेढा दिला आणि किल्ल्याभोवती सुरुंगाची पेरणी करण्यास सुरुवात केली. राणी चांदचे धैर्य यत्किंचितही कमी झाले नव्हते. पण दुर्दैव तिच्या हात धुऊन पाठीस लागले. तिच्या भोवताली असलेल्या सर्वांवरचा तिचा विश्वास उडाला. तिने या परिस्थितीत किल्ल्यामधील एक वरच्या दर्जाचा अधिकारी आणि खोजासरा हमीदखान याच्याकडे सल्ला मागितला. त्याने असे सांगितले की आपण सर्वांनी लढा द्यावा आणि मोगलांच्या विरुद्ध किल्ल्याचे रक्षण करावे. यावर राणी चांद उत्तरली की गेल्या काही वर्षांपासून ज्या अनेक अधिकाऱ्यांची मला माहिती आहे त्यांचे हातून झालेले आचरण बघित-ल्यावर मी त्यांच्यापैकी कोणावरही विश्वास टाकू शकत नाही. माझ्या मते किल्ल्यावरील शिबंदीच्या जीविताबद्दल आणि त्यांच्या मालमत्तेबद्दल मोगलांनी सुरक्षिततेची हमी दिल्यास किल्ला खाली करण्यासंबंधीच्या वाटाघाटी मोगलांबरोबर सुरू करणे हाच या परिस्थितीत शहाणपणाचा आणि योग्य उपाय आहे असे मला वाटते. मोगलांनी वरील अट मान्य केल्यास माझ्यामते आपल्या तरुण बादशहाला घेऊन जुन्नरकडे जाणे हेच अधिक श्रेयस्कर ठरेल. राणी चांद असे म्हणाल्यावर हमीदखान किल्ल्यातून रस्त्यावर बाहेर पडला आणि त्याने पुकारा केला की चांद सुलताना ही अहमदनगरचा किल्ला मोगलांच्या ताब्यात देण्यासाठी त्यांच्याबरोबर संगनमत करून राहिली आहे.

यानंतर हमीदखानाला पुढे करून अदूरदर्शी आणि कृतघ्न अशी सर्व दक्षिणी मंडळी चांद सुलतानाच्या खाजगी महालात शिरली आणि त्यांनी तिला ठार मारले.[२६७] ही घटना घडल्यानंतर थोड्याच दिवसांच्या कालावधीत मोगलांनी किल्ल्याच्या तटाखाली सुरुंगांचा स्फोट करण्यात यश मिळविले. तटाला अनेक खिंडारे पडली. मोगलांनी ताबडतोब किल्ल्यावर हल्ला चढवून किल्ला आपल्या ताब्यात घेतला. त्यांनी कोणावरही यत्किंचितही दयामाया दाखविली नाही. बहादूरशहासह राजघराण्यातील सर्व मुला-मुलींना कैद करण्यात आले. अहमदनगरचा दुर्दैवी सुलतान बहादूरशहा याला त्याची सर्व बादशाही चिन्हे आणि जडजवाहिर या सहवर्तमान बुरहाणपूर येथे अकबर बादशहाकडे रवाना करण्यात आले. या सुमारासच असिरचा किल्ला मोगलांच्या ताब्यात आला. बादशहाने खानदेशचा प्रांत आणि दक्षिणेतला जिंकून घेतलेला मुलुख राजपुत्र दानियलच्या ताब्यात सोपविला आणि त्याने आपले राजधानीचे शहर अकबराबाद आग्रा इकडे कूच केले. आपला बादशहा कैद झाला तरी [३] (३१३) त्याची तमा न बाळगता निजामशाही सरदारांनी शहा अलीचा मुलगा मुर्तजा याचे नावे सुलतान म्हणून द्वाही फिरविली आणि काही काळपर्यंत परंड्याला आपली राजधानी हलविली.

(११०) बहादूर निजामशहाची कारकीर्द एकंदर तीन वर्षे झाली. मी या ग्रंथाचा कर्ता हे लिहीत असताना तो दुर्दैवी राजपुत्र अजूनही ग्वाल्हेरच्या किल्ल्यात बंदिवासात आहे.[२६८] [२६९] [२७०]

## मुर्तजा निजामशहा दुसरा [३] (३१४)

(१११) अकबर बादशहा उत्तरेकडे परतल्यानंतर भूतपूर्व निजामशाही सरकारातील दोन व्यक्तींनी आपले धाडस आणि कर्तृत्व यांच्या बळावर लौकिक कमावला. त्यापैकी एक म्हणजे मलिक अंबर. हा हबशी होता आणि दुसरा मियाराजू दख्खनी.[२७१] या दोघांनी मोगल फौजा प्रचंड संख्येने दक्षिणेत असताना देखील अजूनपर्यंत निजामशाही राज्याचा बहुतेक सर्व मुलूख आपल्या ताब्यात ठेवण्यात यश मिळविले आहे.

(११२) यापैकी मलिक अंबरच्या ताब्यात कुतुबशाही आणि आदिलशाही राज्यांच्या सरहद्दीपासून उत्तरेकडे बीडपासून एक कोसापर्यंत आणि [३] (३१५) अहमदनगरपासून ४ कोसांपर्यंत पसरलेला आणि त्याशिवाय दौलताबादच्या पश्चिमेकडे ८ कोसांपर्यंत आणि चेऊलच्या बंदरापासून तेवढ्याच अंतरापर्यंत पसरलेला एवढा मुलूख आहे.

( ११३ ) मिया राजूच्या ताब्यात उत्तरेकडे दौलताबादेपर्यंत आणि दक्षिणेस गुजराथच्या सरहद्दीपासून अहमदनगरपर्यंत ६ कोस यामध्ये असलेला मुलूख आहे. मलिक अंबर आणि मिया राजू हे दोन्ही निजामशाही अधिकारी तोंडदेखले का होईना परंतु दुसऱ्या मुर्तजा निजामशहाबरोबर आपण राजनिष्ठ आहोत असे दाखवितात. आपली राजनिष्ठा व्यक्त करण्यासाठी त्यांनी प्रथम सुलतानाला राहाण्याकरिता म्हणून औशाचा किल्ला त्याच्या ताब्यात दिला आणि त्याच्या उदरनिर्वाहाकरिता सभोवतालच्या काही खेड्यांचा वसूल त्याला नेमून दिला. परंतु सुलतानाच्या या दोन पक्षपात्यांमध्ये परस्परांबद्दल अतिशय मत्सराची भावना होती, आणि त्यामुळे दोघांमध्ये तंटेबखेडे निर्माण होत. अहमदनगर किल्ल्याचा मोगल सुभेदार खानखानान हा होता. त्याला जेव्हा मलिक अंबर आणि मिया राजू यांच्यामध्ये असलेल्या मत्सराची हकिकत कळली तेव्हा त्याने वऱ्हाडमधील सैन्याच्या एका तुकडीला कूच करून तेलंगणाच्या सरहद्दीवरील मलिक अंबरच्या ताब्यातील एक छोटासा जिल्हा ताब्यात घेण्याचा हुकूम केला. मोगलांच्या आक्रमणाची बातमी कळताच मलिक अंबरने ६ ते ७ हजार घोडेस्वारांची एक तुकडी घेऊन मोगलांचा प्रतिकार करण्यासाठी चाल केली. त्याने मोगलांवर विजय मिळविला, आणि त्यांनी घेतलेला जिल्हा परत काबीज केला. ही बातमी कळताच खानखानान याने तावडतोब आपला मुलगा मिर्जाइरीच याला ५ हजार निवडक घोडेस्वार देऊन मलिक अंबरवर हल्ला करण्यासाठी आणि मोगलांच्या सामर्थ्याला लागलेला अपयशाचा डाग धुऊन काढण्यासाठी रवाना केले. मिर्जाइरीच आणि मलिक अंबर यांची गाठ नांदेड शहराजवळ पडली. दोन्ही फौजांत घनघोर रणसंग्राम झाला. दोन्ही बाजूचे अनेक शिपाई रणांगणावर पडले. परंतु अखेर दक्षिणी फौजांचा पराभव झाला. मलिक अंबर हा जखमी होऊन रणांगणावर पडला. परंतु त्याच्या शिपायांच्या अप्रतिम शौर्यामुळे शत्रूच्या हातात युद्धबंदी म्हणून पडण्याच्या आपत्तीतून त्याची सुटका झाली. मलिक अंबरला [३] (३१६) सोडविण्यासाठी त्याच्या अनेक सैनिकांना आपल्या प्राणांचे बलिदान करावे लागले. मलिक अंबर त्याला झालेल्या जखमांतून बरा झाला, आणि त्याने तावडतोब अधिक सैन्याची जमवाजमव करण्यास सुरुवात केली. मलिक अंबरचा धाडसी स्वभाव आणि देशात असलेली त्याची अमाप लोकप्रियता यांची खानखानानला जाणीव होती. त्याला अशी भीती वाटली की, सरतेशेवटी केवळ संख्येच्या बळावर इतक्या असामान्य कर्तृत्वाच्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली मोगलांचा पराभव करणे दक्षिणी लोकांना सुलभ होईल. ह्या कारणाकरता खानखानानने त्याच्याबरोबर तहाची बोलणी सुरू करण्याकडे आपला कल दाखविला. याउलट मलिक अंबरला मियाराजूच्या शत्रुत्वाची पूर्णपणे जाणीव होती आणि मोगलांनी नुकताच जो त्याच्यावर हल्ला केला होता तो मियाराजूच्या चिथावणीवरून झाला असावा असा त्याला दाट संशय होता. म्हणून त्याने तहाची बोलणी करण्यास मोठ्या आनंदाने आपली अनुमती दर्शविली. त्याप्रमाणे मोगल

आणि मलिक अंबर यांच्यामध्ये तह झाला, आणि परस्परांच्या प्रदेशाच्या सीमा कोणत्या असाव्या याबद्दल निश्चिती झाली. हा तह झाल्यापासून तो आतापर्यंत मलिक अंबर आणि खानखानान याचे संबंध अतिशय मित्रत्वाचे आहेत.

(११४) या सुमारास व्यंकटराव कोळी, फरहादखान मोवलिद, आणि मलिक संदाल खोजासरा ह्यांनी इतर काही अधिकाऱ्यांसह मलिक अंबरचा पक्ष सोडला आणि ते औसा येथे दुसऱ्या मुर्तजा निजामशहाला जाऊन मिळाले. तेथे त्यांनी मोठी फौज जमविली. आपल्यापासून फुटून निघालेल्या या अधिकाऱ्यांविरुद्ध मलिक अंबरने चाल केली, आणि औसा किल्ल्याच्या तटबंदीखालीच त्यांच्यावर हल्ला करून त्यांची पांगापांग केली. या लढाईत व्यंकटराव कोळी याला मलिक अंबर याने कैद केले. इतर अधिकारी मुर्तजा निजामशहाला बरोबर घेऊन किल्ल्यात पळून गेले. दुसऱ्या दिवशी त्यांनी मलिक अंबरबरोबर तह केला. फार काळपर्यंत मलिक अंबरला परंडा आपल्या ताब्यात घेण्याची इच्छा होती. त्याने सुलतानाला आपल्याबरोबर घेऊन त्या किल्ल्याकडे कूच केले. किल्ल्याचा सुभेदार मित्तनखान हबशी हा होता. किल्ल्याच्या सुभेदारीवर तो जवळजवळ २० वर्षे होता. त्याने सुलतानाला असे कळविले की मी आपल्याला भेटण्यास येईन. आपल्या हुकमाचा ताबेदार म्हणून आपल्याला किल्ल्यात प्रवेश देण्यास मी तयार आहे. परंतु मलिक अंबर याने मोगल सेनापतीशी तह केला आहे आणि म्हणून तो जवळजवळ त्यांच्या पक्षापैकीच एक झाला आहे आणि मलिक अंबरला किल्ल्यात प्रवेश देण्यास मी कोणत्याही अटीवर तयार नाही. मलिक अंबरने यावर कळविले की माझ्या विरुद्ध नुकतेच जे विश्वासघाताचे आणि [ ३ ] ( ३१७ ) घातपाताचे प्रकार झाले त्यामुळे मोगल सेनापती खानखानान याजबरोबर मैत्रीचा तह करणे मला भाग पडले ही गोष्ट खरी आहे. परंतु मी निजामशाही घराण्याचा खराखुरा आणि एकनिष्ठ सेवक आहे आणि शरीरात रक्ताचा अखेरचा थेंब असेपर्यंत त्या घराण्याच्या संरक्षणासाठी लढण्याची माझी तयारी आहे. मलिक अंबर याने आपल्या वर्तनाचे जे स्पष्टीकरण दिले त्याचा मित्तनखानावर कोणत्याही तऱ्हेचा परिणाम झाला नाही. मुर्तजा निजामशहा आणि मित्तनखान यांची हातमिळवणी होऊ नये यासाठी म्हणून मलिक अंबरने मुर्तजा निजामशहाला तात्पुरते राजकैदी म्हणून वागविण्याचे ठरविले. फरहादखान आणि मलिक संदाल यांना जेव्हा मलिक अंबरने मुर्तजा निजामशहाला कैद केल्याची बातमी कळली तेव्हा ते परंड्याकडे पळाले आणि त्यांनी किल्ल्यात प्रवेश केला. मलिक अंबरने किल्ल्याला वेढा दिला परंतु जवळजवळ एक महिन्यापर्यंत त्यांनी वेढ्याचा प्रतिकार केला. सरते शेवटी किल्ल्याचा सुभेदार मित्तनखान याच्या मुलाने किल्ल्यावरील रहिवाशांना क्रूरपणाची वागणूक दिल्यामुळे त्यांनी त्याच्याविरुद्ध बंड करून त्याला ठार मारले. तेव्हा मित्तनखानाला किल्ल्यामधून पळून जाऊन स्वतःचा जीव बचावणे भाग पडले. त्याच्याबरोबर फरहादखान आणि मलिक संदाल हेही पळाले. ते सर्वजण विजापूर येथे गेले आणि

आदिलशाही सुलतानाच्या चाकरीत शिरले. परंड्याच्या शिबंदीने काही काळपर्यंत प्रतिकार केला. अखेर मलिक अंबरने दुसऱ्या मुर्तजा निजामशहावरील सर्व निर्बंध काढून टाकले. तेव्हा त्याला मुर्तजा निजामशहाला किल्ल्यात प्रवेश करून देण्यास परवानगी मिळविता आली. मलिक अंबर मात्र किल्ल्याच्या बाहेरच तळ देऊन राहिला.

( १९५ ) हिजरी १०१३ } इ. स. १६०४ } हिजरी १०१३ या वर्षी राजपुत्र दानियल याने बुरहाणपूरहून दौलताबाद आणि नाशिकच्या मार्गाने इब्राहीम आदिलशहाच्या मुलीबरोबर लग्न करण्यासाठी म्हणून अहमदनगरच्या रोखाने कूच केले. पूर्वी मलिक अंबर याने त्याचे सार्वभौमत्व मान्य केले होते. तेव्हा दानियल याने अशी अपेक्षा केली की मलिक अंबरप्रमाणेच मियाराजू हा देखील त्याचे अभिनंदन करण्यासाठी त्याची भेट घेईल आणि [ ३ ] ( ३१८ ) त्याचे दक्षिणेवरील सार्वभौमत्व मान्य करील. याच उद्देशाने राजपुत्र दानियल याने त्याला आपल्या छावणीकडे येण्यासाठी बोलावू पाठविले. परंतु राजपुत्राच्या वचनावर मियाराजू याचा विश्वास नसल्यामुळे त्याने राजपुत्राची भेट घेण्यास नकार दिला. जरी मोगलांबरोबर समोरासमोर युद्धाला उभे राहणे त्याला शक्य नव्हते तरी त्याने आपल्या हाताखालील ८००० घोडदळाचा साहाय्याने दानियलच्या फौजेला सळो की पळो करून सोडले. अखेर जालन्याहून कुमक आणण्याकरता खानखानानकडे निरोप पाठविणे राजपुत्र दानियलला भाग पडले. खानखानान हा स्वतः झपाट्याने ५००० घोडदळाला घेऊन कूच करून आला आणि राजपुत्राला येऊन मिळाला. यामुळे मियाराजूला माघार घेणे भाग पडले. राजपुत्र दानियल हा आपल्या नवपरिणीत वधूला घेऊन अहमदनगरहून परतला. त्याने गोदावरीच्या तीरावर पैठण येथे मुक्काम केला. आपला विवाह समारंभ साजरा करण्यासाठी तेथे काही दिवस त्याने मुक्काम केला. यानंतर त्याने बुरहाणपूरकडे कूच केले आणि खानखानान आपल्या जालन्याकडील छावणीकडे निघून गेला.

( १९६ ) दरम्यान दुसऱ्या मुर्तजा निजामशहाने आपल्याकडून मियाराजूकडे माणसे पाठविली आणि मलिक अंबर याजकडून त्याला जी वाईट वागणूक मिळत होती त्याजबद्दल त्याच्याकडे तक्रार केली. मुर्तजा निजामशहाला मियाराजूचा सक्रिय पाठिंबा होता. त्याने परंड्यापर्यंत चाल केली. वाटेत त्याला कोणताही प्रतिकार झाला नाही. तेथे त्याने मुर्तजाशहाची भेट घेतली आणि आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा बिमोड करण्याचे त्याला वचन दिले. मियाराजू आपल्यावर चालून येत आहे हे जेव्हा मलिक अंबरला कळले तेव्हा त्यानेही त्याचा प्रतिकार करण्यासाठी कूच केले. परंडा किल्ल्याच्या तटबंदीजवळ दोन्ही फौजा तळ देऊन राहिल्या. एका महिन्याच्या अवधित दोन्ही फौजांत अनेक चकमकी झडल्या. या बहुतेक चकमकीत मियाराजूच्या पक्षालाच विजय मिळत गेला. तेव्हा मलिक अंबरने खानखानान याला अनेकवार पत्रे लिहून जालन्याहून मदत पाठविण्यासंबंधी त्याची याचना केली.

( ११७ ) त्यावेळी बीडचा मोगल सेनापती आणि सुभेदार मिर्जाहुसेन अलीबेग हा होता. त्याला खानखानानने ताबडतोब ३००० घोडेस्वार घेऊन मलिक अंबरच्या मदतीसाठी जाण्यास फर्माविले. त्याप्रमाणे हुसेनअलीबेग हा ३००० घोडेस्वार घेऊन परंड्याला गेला. तेथे गेल्यावर त्याने मियाराजूच्या फौजेवर हल्ला केला [ ३ ] ( ३१९ ) आणि त्याचा पराभव केला. मियाराजू पळून दौलताबादेकडे निघून गेला.

( ११८ ) या सुमारास राजपुत्र दानियल याचा मृत्यू झाला. त्याच्या जागी खानखानानची नेमणूक झाली. आपल्या अधिकारावर रुजू होण्यासाठी तो जालन्याहून बुरहाणपूर येथे गेला. राजपुत्राचा मृत्यू आणि खानखानानचे उत्तरेकडे जाणे या संधीचा मलिक अंबरने फायदा घेतला आणि प्रतिचढाईला सुरुवात केली. त्याने त्याप्रमाणे आपल्या फौजांची जमवाजमव केली आणि दौलताबाद येथे तो मिया राजूविरुद्ध चाल करून गेला. परंतु झालेल्या लढाईत त्याचा पुन्हा पराभव झाला आणि म्हणून त्याने खानखानानकडे मदतीसाठी याचना केली. परंतु खानखानानने दौलताबाद येथील एकंदर परिस्थितीचा आढावा घेतला आणि तो स्वतःच तिथे कूच करून गेला. जवळजवळ सहा महिने पर्यंत त्याने मलिक अंबर आणि मियाराजू यांना परस्परांवर हल्ला करण्यापासून थोपवून धरले. यावेळी मलिक अंबरला असे दिसून आले की खानखानानचा कल आपल्या प्रतिस्पर्ध्याकडे अधिक झुकला आहे तेव्हा त्याने खानखानानच्या इच्छेला मान देण्यातच शहाणपणा आहे असे ठरविले आणि त्याच्याबरोबर तह करण्यास मान्यता दिली. यानंतर मलिक अंबर परंड्याला परतला आणि खानखानान जालन्याकडे निघून गेला. परंतु तेथे मलिक अंबरने जेव्हा असे पाहिले की दुसरा मुर्तजा निजामशहा हा त्याच्याविरुद्ध सारखी कारस्थाने करीत आहे आणि त्याला प्रतिस्पर्धी पक्ष निर्माण करीत आहे तेव्हा त्याने मुर्तजाशहाला सिंहासनावरून काढून टाकण्याचे आणि त्याच्या जागी कमी उपद्रव देण्याऱ्या अशा एखाद्या नामधारी व्यक्तीला सिंहासनावर बसविण्याचे ठरविले.

( ११९ ) या बाबतीत त्याने विजापूरच्या इब्राहीम आदिलशहाबरोबर विचारविनिमय केला. परंतु त्याने याबाबतीत आपले हात झटकून या योजनेला पाठिंबा देण्यास आपला विरोध दर्शविला. अखेर मलिक अंबरने मुर्तजाशहाला सिंहासनावरून काढून टाकण्याचा बेत सोडून दिला. हिजरी १०१६ या वर्षी त्याने मुर्तजाशहाला वागणुकीबाबत पुष्कळच स्वातंत्र्य दिले आणि तो त्याला अधिक सन्मानाने वागवू लागला. याचा परिणाम असा झाला की दोघांमध्ये परस्परांबद्दल विश्वासाची भावना वाढत गेली. त्याचवर्षी मुर्तजा निजामशहा हा आपला सेनापती मलिक अंबर याच्या समवेत १०००० फौज बरोबर घेऊन परंडा येथून जुन्नरवर चाल करून गेला. मुर्तजा निजामशहाने पुन्हा जुन्नर हे निजामशाही राज्याची राजधानीचे ठिकाण केले. तेथून त्याने दौलताबादवर मियाराजू विरुद्ध [ ३ ] ( ३२० ) सैन्याची रवानगी केली. काही कालानंतर मियाराजूचा पराभव झाला आणि त्याला कैद

हिजरी १०१६ }
इ. स. १६०७ }

करण्यात आले. त्याच्या ताब्यातील प्रदेश पुन्हा एकदा निजामशाही सरकारच्या अमलाखाली आला. मलिक अंबर[२७२] मात्र दिवसेंदिवस आपल्या राज्याच्या वैभवात आणि सामर्थ्यात भर घालीतच राहिला. आजच्या घटकेला निजामशाही घराण्याच्या सिंहासनावर शहा अलीचा मुलगा दुसरा मुर्तजा निजामशहा विराजमान झालेला आहे. त्याच्या राज्याचा कारभार त्याचा वजीर मलिक अंबर चालवीत आहे. पण प्रत्यक्षात तर वस्तुस्थिती अशी दिसते की ह्या राज्याचा विनाशकाल आता समीप आला आहे. कारण दिल्लीचा बादशहा हे राज्य जिंकून आपल्या राज्याला जोडण्याच्या योग्य संधीची वाट पहात असल्यासारखे दिसत आहे. परमेश्वराच्या मनात काय घाटत आहे ते एक परमेश्वरच जाणे.[२७३, २७४, २७५, २७६, २७७]

# पुस्तक तिसरे

## प्रकरण तिसरे

### आदिलशहा या नावाने माहीत असलेल्या विजापूरच्या सुलतानांचा इतिहास

### युसुफ आदिलशहा [ ३ ] ( ३-४ )

( १ ) अबुल मुजफ्फर युसुफ आदिलशहा याने आदिलशाही घराण्याची स्थापना केली. हा ओटोमन कुटुंबातील रुमच्या एका बादशहाचा मुलगा होता. याचा बाप आगा मुराद हिजरी ८५४ ( इ. स. १४५१ ) या वर्षी मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा मोठा मुलगा महमूद हा गादीवर आला. या प्रसंगी ( राज्याच्या ) मंत्र्यांनी पुढीलप्रमाणे विचारविनिमय केला. आगा मुराद याच्या कारकिर्दीच्या सुरुवातीस मुस्तफा नावाच्या माणसाने आपण एलदरम बयाजीद याचा मुलगा आहोत असे जाहीर करून राज्यामध्ये मोठी धामधूम उडवून दिली होती. हे ध्यानात घेता राजघराण्यातील एकाच राजपुत्राला यापुढे हयात राहू देणे श्रेयस्कर होय. ( मंत्र्यांच्या ) या सूचनेला सुलतान महमूद याने आपली संमती दिली. त्याचा भाऊ युसुफ हा त्या वेळी पोरसवदा होता. त्याला ठार मारण्यात यावे असा महमूद याने हुकूम केला. या हुकुमाची अंमलबजावणी करणाऱ्यांनी युसुफच्या आईकडे जाऊन युसुफला आपल्या हवाली करण्यास सांगितले. तसे करण्यात त्यांचा उद्देश युसुफला गळा दाबून ठार मारल्यानंतर त्याच्या मृत देहाचे जाहीर प्रदर्शन करण्याचा होता. राणीने आपल्या अल्पवयी मुलाच्या प्राणाची भीक युसुफच्या मारेकऱ्यांजवळ मागितली. तिने अशीही विनवणी केली की राज्याचे हितसंबंध सुरक्षित राखण्यासाठी इतक्या कठोर बलिदानाची आवश्यकताच जर असेल तर युसुफच्या प्राणदानाची वेळ एक दिवसाने पुढे ढकलली जावी कारण तेवढ्या अवधित या विषादपूर्ण प्रसंगाला तोंड देण्यासाठी तिला तिच्या मनाची तयारी करता येईल. मंत्र्यांनी तिची विनवणी मान्य केली. आपल्या मुलाचा जीव वाचविण्यासाठी मिळालेल्या या संधीचा फायदा घेण्याचे राणीने ठरविले. त्याप्रमाणे तिने सावा या गावचा एक व्यापारी ख्वाजा इमादउद्दीन याला [ ३ ] ( ५ ) बोलावू पाठविले. इमादउद्दीन जवळून राणी बहुधा नेहमी इराणातून आलेल्या मालाची खरेदी करीत असे. ( तो आल्यावर ) तिने त्याच्याजवळ ताबडतोब काही गुलाम विकावयाचे आहेत काय याबद्दल चौकशी केली. ख्वाजाने आपल्यापाशी पाच जॉर्जियन आणि दोन सिरकॅशियन गुलाम विकाऊ आहेत असे उत्तर केले. या गुलामामध्ये एक

सिरकॅशियन गुलाम असा होता की सर्वसाधारणपणे त्याच्यामध्ये आणि राजपुत्र युसुफमध्ये बरेचसे साम्य होते. या गुलामाला तिने विकत घेतले आणि त्याच वेळी युसुफला तिने इमादउद्दीनच्या स्वाधीन केले. इमादउद्दीनला तिने मोठी रक्कम देऊ केली आणि सुलतानाच्या राज्याबाहेर सुरक्षित अशा जागी युसुफला घेऊन जाण्याबद्दल त्याची करुणा भाकली. पैशाच्या लोभाने ख्वाजा इमादउद्दीन याने ही कामगिरी पत्करली आणि त्याच रात्री अल्पवयी युसुफला बरोबर घेऊन तो मार्गस्थ झाला. दुसऱ्या दिवशी सकाळी मंत्रिमंडळी राणीच्या महालाच्या दरवाजापाशी दाखल झाली आणि त्यांनी युसुफची तिच्याजवळ मागणी केली. त्यांच्यापैकी एकाला तिने आपल्या महालात घेतले. या मंत्र्यावर तिचा पूर्ण विश्वास होता. तिने त्याला प्रांजळपणे आपण केलेल्या बनवाबनवीची हकीकत सांगितली आणि त्याच्यावर देणग्यांची खैरखैरात करून हा मामला तडीस नेण्याचे त्याच्याकडून वचन घेतले. त्या सिरकॅशियन गुलामाला युसुफ समजून गळा दाबून ठार करण्यात आले. युसुफचा तथाकथित मृतदेह कफनात गुंडाळून त्या मंत्र्याकडून बाहेर काढण्यात आला. त्या मंत्र्याच्या प्रामाणिकपणाबद्दल कोणालाही यत्किंचितही संशय नसल्यामुळे कसलीही तपासणी न करता त्या मृतदेहाचे दफन करण्यात आले.

( २ ) ख्वाजा इमादउद्दीन याने तरुण युसुफला अर्दबील या गावी नेले. तेथे शेख सुफी नावाचा पूज्य अवलिया होता. त्याच्या शिष्यगणांमध्ये त्याने [ ३ ] ( ६ ) युसुफचा समावेश करून दिला. त्यानंतर त्याने युसुफला सावा या शहरात नेले. युसुफला जेव्हा सातवे वर्ष लागले तेव्हा ख्वाजाने त्याला त्याच्या जन्मासंबंधीचे गुपित सांगितले. त्यानंतर ख्वाजाने युसुफची आपल्या मुलाबरोबर शाळेत रवानगी केली. पुढील वर्षी सावा येथे युसुफच्या आईने आपल्या मुलाची हालहवाल काढण्यासाठी एका माणसाला पाठविले. जाण्यायेण्यात या माणसाचे एकंदर नऊ महिने खर्च झाले. तो आपल्या परतीच्या मार्गाला लागला. अलेक्झांड्रिया येथे तो भयंकर आजारी पडला. इतका की त्याला तेथे एक वर्ष आणि सहा महिने राहणे भाग पडले. नंतर तो राणीकडे परतला आणि त्याने तिला युसुफने स्वतः लिहिलेले पत्र दिले. या पत्रात युसुफने आपल्या आईला स्वतःच्या ख्याली खुशालीची तिला आनंद देणारी हकीकत दिली होती. युसुफच्या आईने आपल्या मुलाला सुरक्षित ठेवण्याबद्दल ( परमेश्वराजवळ ) कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी गोरगरिबांना दान दिले. यानंतर थोड्याच कालावधीनंतर तिने युसुफकडे त्याच्या दाईची रवानगी केली. दाईबरोबर तिचा मुलगा गजनफर बेग २७८□ आणि मुलगी दिलशद आगा यांनाही तिने पाठविले आणि आपल्या मुलांच्या उपयोगी पडावी म्हणून तिने मोठी रक्कम त्याजबरोबर दिली. या सर्वांना सोबत म्हणून तिने आपल्या पूर्वीच्याच सेवकाची रवानगी केली. वयाची सोळा वर्षे पूर्ण होईतोपर्यंत युसुफ हा सावा येथेच राहिला. याचवेळी युसुफच्या दाईने त्याच्या जन्माबद्दलची गुप्त हकीकत अविचारीपणे प्रकट केली. सावाचा सुभेदार अक्कुइनलू






(Akkooinloo) जमातीतील एक तुर्क होता. त्याच्या कानावर ही हकिकत गेली. (या परिस्थितीत) साव्याहून सुरक्षितपणे युसुफला निसटून जाऊ देण्यासाठी सुभेदाराने युसुफकडून ४०० तुमान एवढे द्रव्य उकळले. साव्याच्या सुभेदाराची उचलबांगडी होईतोपर्यंत कुम या ठिकाणी राहण्याचा युसुफचा बेत होता. परंतु काही कालानंतर तो कुम सोडून निघाला आणि कशान, इस्फहान ही गावे करत तो अखेर [ ३ ] ( ७ ) शिराज येथे येऊन पोहोचला. तेथे अशी एक दंतकथा प्रचलित आहे की खिज्र नावाचा अवलिया युसुफच्या स्वप्नात आला आणि त्याने त्याला पर्शिया ( इराण ) सोडून जाण्याची आणि हिंदुस्थानकडे रवाना होण्याची आज्ञा केली. हिंदुस्थानात त्याला सार्वभौम सत्ता प्राप्त होईल असे त्या अवलियाने युसुफला सांगितले. या आदेशानुसार युसुफने शिराज सोडले आणि तो समुद्र किनाऱ्याच्या रोखाने निघाला. गुम्रून येथे तो हिंदुस्थानकडे जाणाऱ्या जहाजावर चढला आणि हिजरी ८६४ या वर्षी दाभोळ येथे पोहोचला. तेथे आल्यावर त्याचा ख्वाजा महमूद गुर्जिस्तानी याजबरोबर परिचय झाला. हा व्यापारी व्यापार धंद्याच्या निमित्ताने दाभोळ येथे आला होता. युसुफ हा त्यावेळी फक्त १७ वर्षांचा होता. युसुफचे एकंदर स्वरूप आणि चालचलणूकही एकदम डोळ्यात भरण्याजोगी आणि विशेष उल्लेखनीय अशी होती. याचे कारण म्हणजे त्याला सावा येथे मिळालेले उत्तम शिक्षण हेच होते. ख्वाजा गुर्जिस्तानी याने अहमदाबाद बिदर येथे आपल्या समवेत चलण्याबद्दल युसुफचे मन वळविले. बिदर येथे ( बहमनी राज्याचा ) वजीर ख्वाजा महमूद गावान याने त्याला एक जॉर्जियन गुलाम म्हणून विकत घेतले आणि त्याची शाही शरीररक्षक दलात भरती केली. ही हकिकत प्रस्तुत ग्रंथकर्त्याला ( फरिश्ता ) युसुफ आदिलखान याने विजापूर येथे युसुफ आदिलशहा या नावाने जेव्हा आपले स्वातंत्र्य पुकारले त्यावेळी साव्याचा मिर्जा महमद याजकडून कळली. हा मिर्जा महमद म्हणजे युसुफ आदिलखानाचा मुख्य वजीर गियासुद्दीन याचा मुलगा. हीच हकिकत शहा हुसेन अंजू याचा मुलगा शहाजमालउद्दीन हुसेन याने आपल्या इतिहास ग्रंथात कथन केली आहे. याच हकिकतीचा पाठपुरावा बहमनी घराण्यातील ख्वाजा नज्र या गृहस्थाने केला आहे. गुलबर्गा येथे ( बहमनी ) राजपुत्र अहमद याचे लग्न बिबी मुसती [२७९□] हिच्याबरोबर जेव्हा झाले तेव्हा तिने इतर सर्व राण्यांच्यावर अग्रस्थान घेतले. याबाबत नंतर जेव्हा तिच्याकडे तक्रार करण्यात आली तेव्हा तिने उत्तर दिले की युसुफ आदिलशहाची मुलगी आणि रुमच्या दोन बादशहांची पुतणी आणि नात या तिच्या संबंधांकडे पाहता दक्षिणेच्या कोणत्याही ( राजघराण्यातील ) स्त्रीपेक्षा आपण कमी आहोत असे समजण्याचे काही कारण आहे असे आपणाला वाटत नाही. बिदरचा [ ३ ] ( ८ ) अमीर बरीद याने पुढे हे विधान खोटे ठरविण्याचा प्रयत्न करण्यासाठी कॉन्स्टॅन्टीनोपल येथे आपल्यातर्फे काही इसम पाठविण्याची तसदी घेतली. परंतु या विधानाला पुष्टी देणारा वस्तुनिष्ठ पुरावा इतका बळकट होता की हा विषय पुन्हा उकरून काढ-

ण्याची कोणीही तसदी घेतली नाही. युसुफ आदिलखानाला सवाई ही [२८०] संज्ञा प्राप्त झाली याचे कारण सावा येथे त्याचे सर्व शिक्षण झाले ही वस्तुस्थिती होय असे म्हटले जाते.

( ३ ) यानंतर दोन-तीन महिन्यांनी ख्वाजा महमूद गावान याने राजमातेच्या पसंतीने युसुफची घोडदळाचा प्रमुख मोतद्दार अजीमखान याचे हाताखाली नेमणूक केली. अजीमखान हा स्वतः आता वृद्ध आणि दुबळा झाला होता. युसुफ या कामाला योग्य आहे असे त्याला आढळून आले. तेव्हा त्याने युसुफची घोडदळाच्या खात्याची सर्व कामे बघण्यावर नियुक्ती केली. यामुळे महमदशहा बहमनीच्या समोर जाण्याची संधी अनेकवार युसुफला प्राप्त झाली. युसुफकडे महमद शहा बादशहाचे लक्ष वेधले. अजीजखानाचा मृत्यू झाल्यावर ( ख्वाजा महमूद गावान याच्या शिफारसीवरून ) युसुफकडे घोडदळाच्या प्रमुख मोतद्दाराचे सर्व अधिकार देण्यात आले. परंतु या खात्याचे हिशेब ठेवणाऱ्या ब्राह्मण अधिकाऱ्याबरोबर मतभेद झाल्यामुळे युसुफने आपल्या अधिकाराचा राजीनामा दिला. यानंतर त्याने दरबारातला एक अमीर निजामउलमुल्क तुर्क यांची दुय्यमकी पत्करली. युसुफने त्याच्याबरोबरील स्नेहसंबंध इतके वाढविले की तो त्याला आपल्या भावासमान लेखू लागला.

( ४ ) पुढे निजामउलमुल्क याची वऱ्हाडचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. त्याने आपला मित्र युसुफ याला दरबाराकडून आदिलखान ही पदवी देवविली. त्याजबरोबर त्याला ५०० घोड्यांचा मनसबदार करण्यात आले. निजामउलमुल्काने वऱ्हाडच्या सुभेदारीवर जाताना युसुफ याला आपल्याबरोबर नेले. निजामउलमुल्क पुढे खेडला येथे ठार मारला गेला. तेव्हा युसुफ आदिलखान यानें खेडल्याच्या किल्ल्यात शस्त्र सज्ज शिबंदी ठेवली आणि तो सैन्यासहित मागे फिरला. त्याची [३] (९) मोहीम पूर्णपणे यशस्वी झाली होती आणि अगणित लूट त्याला मिळाली होती. त्याच्या ताब्यांत तीस हत्तीही आले होते. या त्याच्या कामगिरीबद्दल सुलतानाची त्याने शाबासकी मिळविली होती. या वेळेपासून युसुफ आदिलच्या भाग्यरवीचे तेज दिवसें-दिवस वृद्धिंगत होऊ लागले.

( ५ ) कालांतराने महमदशहा ( बहमनी )चा मृत्यू झाला. बहमनींच्या राज्यात जिकडेतिकडे अंदाधुंदी माजली. अशा वेळी राज्यातील बहुतेक परदेशी अधिकारी आणि सैनिक यांनी युसुफ आदिलखानाचा पक्ष स्वीकारला. युसुफला असे दिसून आले की महमूदशहाचे सर्व मंत्री त्याचा ( युसुफचा ) नाश करण्याचा हेतू मनात बाळगून आहेत. तेव्हा त्याने आपली कुटुंबिय मंडळी आणि अनुयायी या समवेत अहमदाबाद बिदर सोडले आणि विजापूरकडे प्रयाण केले. त्याने स्वतंत्र राज्याची स्थापना करण्याचा मनाशी निश्चय केला आणि त्याप्रमाणे वेगवेगळे प्रदेश जिंकून आपल्या ताब्यातील प्रदेशात भर घातली.

( ६ ) ज्यावेळी उत्कर्षाच्या हुमारूपी [२८१] पक्षाने आपल्या पंखांची सावट युसुफ

आणि मलिक अहमद बहरी यांच्या मस्तकावर पसरली त्यावेळी म्हणजे हिजरी ८९५ यावर्षी (इ. स. १४८९) युसुफने आपल्या नावे सार्वजनिकरित्या खुत्बा वाचला जावा असा आदेश दिला. बादशाही चिन्हांचे निदर्शक अशी छत्रचामरे त्याने धारण केली आणि त्यावेळी सर्व परदेशीयांनी युसुफ आदिलला एकमुखाने सुलतान म्हणून मान्यता दिली. ज्याला शस्त्र धारण करता येते त्याच्यासाठीच खड्ग असते आणि जो जेता होऊ शकतो त्याच्यासाठीच राज्य असते या कुरणातील उक्तीचा यावेळी प्रत्यय आला. या घटनेनंतर त्याने महमूदशहा बहमनीच्या सुभेदारांकडून अनेक किल्ले हिसकावून घेतले. भीमानदीपासून तो विजापूरपर्यंतच्या सर्व प्रदेशावर त्याने आपली सत्ता स्थापन केली. या प्रदेशातील सर्व रहिवाशांनी युसुफच्या सत्तेपुढे आपली मान तुकविली. त्याने जेव्हा अहमदाबाद बिदर सोडले होते तेव्हा अनेक दक्षिणी अधिकाऱ्यांनी त्याच्या पक्षाचा त्याग केला होता ते त्याला आता येऊन मिळाले. त्यामुळे त्याची सत्ता दिवसेंदिवस वाढत गेली. [३] (१०)

(७) कासीम बरीद तुर्क याची स्वतःची आकांक्षा विजापूर येथे राज्य स्थापन करावे अशी होती. त्याने विजयनगरच्या राजाला पत्र लिहून कळविले की मुद्गल आणि रायचूर हे किल्ले युसुफ आदिलकडून त्याने हिसकावून घेतल्यास ते त्याला तोडून देण्याची महमूदशहा बहमनीची तयारी आहे. यावेळी बहादूर गिलानी याजकडे गोवा आणि दर्याबाद (दक्षिणेच्या भाषेत या प्रदेशाला कोकण असे संबोधले जाते) हा प्रदेश होता. त्याने युसुफ आदिलखानाच्या प्रदेशावर हल्ला करावा असे त्याला आवाहन करणारी पत्रेही त्याजकडे रवाना करण्यात आली.

(८) विजयनगरच्या राजाचा सेनापती तिम्मराज हा होता. त्याने तुंगभद्रा नदी ओलांडली आणि मुद्गल आणि रायचूरपर्यंतचा प्रदेश उद्ध्वस्त करून टाकला. बहादूर गिलानीने जमखिंडीचा किल्ला जिंकून घेतला. या हल्ल्यांचा प्रतिकार शस्त्र सामर्थ्याच्या जोरावर करण्याची ताकद युसुफ आदिलखानापाशी नव्हती. म्हणून त्याने तिम्मराजाबरोबर तडजोड केली आणि बहादूर गिलानीला आपल्या प्रदेशातून हाकलून लावले. त्याने जमखिंडीचा किल्ला परत घेण्याचा प्रयत्न केला नाही परंतु आपल्या-जवळील ८००० परदेशी सैनिकांसमवेत त्याने कासीम बरीदच्या विरुद्ध राजधानीकडे मोर्चा वळविला.

(९) कासीम बरीद याने मलिक अहमद बहरी आणि त्याचप्रमाणे परंड्याचा सुभेदार ख्वाजाजहान दख्खनी यांजकडे मदतीची याचना केली. त्याप्रमाणे ख्वाजाजहान त्याला येऊन मिळाला. बिदरहून महमूदशहा बहमनी दुसरा याला बरोबर घेऊन सैनिकांनी कूच केले. त्याची गाठ युसुफ आदिलशहाबरोबर नळदुर्गच्या जवळ पडली. दोन्ही फौजांत लढाई झाली. (विजापूरच्या) सैन्याच्या मध्यभागी युसुफ आदिलखान होता. उजव्या फळीवर दर्याखान होता आणि डाव्या फळीचे नेतृत्व फख्र उलमुल्कतुर्क याजकडे होते. त्याशिवाय युसुफ आदिलखानाचा दुधभाऊ गजनफर बेग [३] (११)

हा १००० परदेशी धनुर्धाऱ्यांची स्वतंत्र पलटण आपल्या अधिपत्याखाली तयार ठेवून प्रसंग पडल्यास ( उपयोगात आणण्यासाठी ) सज्ज होता. युद्धाला तोंड लागल्याबरोबर कासीम बरीदने सुलतानाला बरोबर घेऊन रणांगणांतून काढता पाय घेतला. कासीम बरीदच्या पलायनाबरोबर युसुफ आदिलखान आणि मलिक अहमद बहरी यांनी युद्ध थांबविले. रणांगणावरच त्यांनी परस्परांशी तह केला आणि ते आपापल्या राज्यांकडे परतले. बहमनी ( सुलतानां)च्या इतिहासकाराने या युद्धाचे वर्णन वेगळ्या तऱ्हेने केले आहे. तो म्हणतो की मलिक अहमद बहरी स्वतः रणांगणावर ( हजर ) नव्हताच. रणांगणावर त्याचा सेनापती ख्वाजाजहान हाच फक्त ( हजर ) होता. त्या इतिहासकाराच्या हकीकतीप्रमाणे या युद्धात युसुफ आदिलखानाचा पराजय झाला आणि त्याने विजापूरकडे माघार घेतली; काही काळानंतर त्याने आपल्या शत्रूबरोबर तह केला. त्यानंतर जेव्हा त्याला कळले की विजयनगरला अंतर्गत मतभेदांनी ग्रासले आहे तेव्हा त्याने रायचूर पुन्हा जिंकून घेण्यासाठी चाल केली.

( १० ) कृष्णा नदीच्या काठावर पोहोचल्यानंतर युसुफ आदिलखानाने काही काळ शिकारीत घालविला. परंतु अतिश्रमामुळे त्याला सर्दी आणि हिंवताप आला आणि त्यामुळे दोन महिने त्याला अंथरुणावर पडून राहावे लागले. या कालावधित त्याचा दुधभाऊ गजनफर बेग हा राज्याची सर्व कामे बघत असे. दरम्यान विजयनगरचा प्रधान तिम्मराज याने विजयनगरच्या तरुण राजाबरोबरील आपले सर्व मतभेद मिटविले आणि तो प्रचंड सैन्यासहित रायचूरवर चाल करून आला. या सैन्याने युसुफ आदिलखानाच्या फौजेत दहशत निर्माण केली. युसुफ आदिलखानाला बरे वाटावे म्हणून त्याच्या प्रजेने मनोभावाने प्रार्थना केली. काही काळाने युसुफ आदिलखानाला बरे वाटल्यावर त्याने मदिना, करबला आणि नजफ येथील धार्मिक वृत्तीची माणसे आणि सय्यद जमात याजमध्ये ६०,००० रुपयांची खैरखैरात केली. युसुफ आदिलखान जेव्हा हिंदुस्थानात आला तेव्हा त्याच्याबरोबर एकाच जहाजातून ख्वाजा अबदुल्ला हिरवी [२८२a] हा आला होता. त्याच्या स्वाधीन युसुफ आदिलखानाने मोठी रक्कम केली. त्याला युसुफ आदिलखानाने सावा येथे मशीद बांधावी आणि उरलेली रक्कम त्या शहरातील गोरगरिबांमध्ये वाटून टाकावी असा आदेश दिला [ ३ ] (१२)

( ११ ) दरम्यान युसुफ आदिलशहाकडे खबर आली की तिम्मराजाने तुंगभद्रा ओलांडली असून तो विजापूरकडे चाल करून येत आहे. युसुफ आदिलखानाने आपल्या सैन्याची जमवाजमव केली. आपल्यापाशी एकंदर ८००० ( दोन घोडे असलेले ) घोडेस्वार आणि २०० लहानमोठे हत्ती आहेत असे त्याला दिसून आले. गजनफर बेग, मिर्जा जहांगीर आणि दाऊदखान लोदी हे त्याच्या खास मर्जीतले अधिकारी होते. त्यांना उद्देशून तो म्हणाला की या सैन्याच्या जोरावर शत्रूचा पराजय करता येईल असा आपल्याला विश्वास आहे. एवढे सांगून शत्रूवर चाल करून जाण्याचा आपला निश्चय त्याने वरील अधिकाऱ्यांना विदित केला.

दुसऱ्या दिवशी त्याने त्याप्रमाणे कूच केले आणि तिम्मराजाच्या फौजेपासून थोड्या अंतरावर त्याने आपली छावणी दिली. छावणीची जागा त्याने आपल्या अधिकाऱ्यांमध्ये परिस्थितीचा जास्तीत जास्त उठाव घेता येईल अशा तऱ्हेने वाटून दिली. शत्रूचा अचानक हल्ला आपल्या छावणीवर आल्यास बंदोबस्त म्हणून त्याने छावणीभोवती मोर्चेबंदी उभारली. अशा तऱ्हेने कोणत्याही तऱ्हेची चकमक न झडता अनेक दिवस गेले. अखेर हिजरी ८९८ या वर्षी रज्जब महिन्यात (एप्रिल १४९३) शनिवारी दोन्ही फौजा आपापल्या छावण्यातून बाहेर पडून युद्धासाठी उभ्या ठाकल्या. युद्धाच्या सुरुवातीला झडलेल्या चकमकीत युसुफ आदिलखानाचे ५०० सैनिक ठार झाले आणि त्यामुळे उरलेल्या सैनिकांनी गोंधळात माघार घेतली. या सुमारास सुदैवाने शत्रूकडून कैद झालेल्या युसुफ आदिलखानाच्या एका अधिकाऱ्याने आपली सुटका करून घेतली. त्याने येऊन असे सांगितले की शत्रू यावेळी (बेसावधपणे) लुटालूट करण्यात पूर्णपणे गुंतला आहे आणि अशा वेळी शत्रूवर हल्ला केल्यास ते अतिशय फायदेशीर ठरेल. हे ऐकल्यावर युसुफ आदिलशहाने आपल्या सैन्याची पुनर्रचना केली आणि शत्रूवर पुन्हा हल्ला चढविण्यासाठी तो सज्ज झाला. तिम्मराजाला मात्र आपल्या सर्व सैन्याची जमवाजमव करता आली नाही. युसुफ आदिलशहाला तोंड देण्यासाठी त्याने ७००० घोडेस्वार, बरेचसे पायदळी शिपाई आणि ३०० हत्ती रणांगणात उभे केले. आदिलशहाने आपल्या सैन्यासहित तिम्मराजावर [ ३ ] (१३) इतक्या त्वेषाने हल्ला चढविला की या हल्ल्याचा मारा सहन न झाल्यामुळे त्याने रणांगणात २०० हत्ती आणि एक हजार घोडे सोडून पळ काढला. हे हत्तीघोडे आणि त्याशिवाय ६० लक्ष होन जडजवाहीर आणि इतर मौल्यवान लूट आदिलशहाच्या हाती पडली. तिम्मराज आणि विजयनगरचा राजा हे दोघेजण विजयनगरकडे पळून गेले. लढाईत झालेल्या जखमांमुळे विजयनगरच्या राजाला रस्त्यातच मृत्यू आला. तिम्मराजाने राज्याची सूत्रे बळकाविली. विजयनगरच्या बऱ्याचशा प्रमुख सरदारांनी तिम्मराजाच्या या कृत्याबद्दल विरोध दर्शविला त्यामुळे विजयनगरच्या राज्यात बेदिली माजली. युसुफ आदिलखानाला यामुळे राज्याच्या त्या बाजूच्या सरहद्दीसंबंधात थोडे तरी स्वास्थ्य लाभले.

(१२) (बहमनी सुलतानांचा इतिहासकार) दुस्तूरखान याबाबत असे सांगतो की युसुफ आदिलखानाने पुढील युक्तीचा अवलंब करून युद्धात विजय मिळविला. आपल्या सैन्यामध्ये उडालेला गोंधळ पाहिल्यानंतर युसुफ आदिलखानाने तिम्मराजाकडे निरोप पाठवून तहाची याचना केली. त्याने आपण आपल्या ताब्यातील प्रदेशाबाबत विजयनगरच्या राज्याशी निष्ठा बाळगण्यास तयार आहोत (त्याचे सार्वभौमत्व आपल्याला मान्य आहे) असे कळविले. हा निरोप आल्याबरोबर तिम्मराज आणि विजयनगरचा राजा हे रणांगणामध्ये वाटाघाटी करण्यासाठी बरोबर ३०० ते ४०० अनुयायी आणि आपले प्रमुख सरदार घेऊन आले. तेव्हा आपल्या सर्व सैन्यासहित

युसुफ आदिलखानाने त्यांच्यावर अचानक हल्ला चढवून त्यांचा पूर्ण मोड केला आणि त्यांच्यापैकी ७० उच्चपदस्थ व्यक्तींना ठार मारले. सैन्यातील म्होरकी मंडळी ठार झाल्यामुळे विजयनगरच्या फौजेत घबराट पसरला आणि त्यांनी रणांगणातून पळ काढला. त्यांची सबंध छावणी युसुफ आदिलखानाच्या फौजेने लुटली.

( १३ ) आपल्या या विजयानंतर युसुफ आदिलखानाने राव जंग बहादूरखान याला ५० हत्ती आणि एक लक्ष होन बहाल केले आणि रायचूर आणि मुद्गल ह्या किल्ल्यांचा पाडाव करण्यासाठी सैन्याची एक तुकडी देऊन त्याची रवानगी केली. ही कामगिरी त्याने चाळीस दिवसांच्या अवधित पार पाडली. त्यानंतर युसुफ आदिलशहा आपली राजधानी विजापूर येथे परतला. या विजयामुळे युसुफ [३] (१४) आदिलशहाच्या संपत्तीत फार मोठी भर पडली, त्याच्या सामर्थ्यांत वाढ झाली आणि त्याच्या सत्तेला पुष्टी मिळाली. असे म्हणतात की युसुफ आदिलशहाने आपल्याला मिळालेल्या विजयाची अधिकृत खबर महमूदशहा बहमनी याजकडे पाठविली आणि नजरभेट म्हणून दोन भपकेबाज अंगरखे आणि घोडे त्याच्याकडे रवाना केले. या अंगरख्याच्या कडा मौल्यवान खड्याच्या महिरपीनी भरण्यात आल्या होत्या. घोड्यांना सोन्याचे नाल मारण्यात आले होते आणि त्यांच्यावरील खोगीर आणि त्यांचे लगाम यांना हिरे जडविण्यात आले होते.

(१४) बहादूर गिलानीने पूर्वी युसुफ आदिलखानाकडून जमखिंडी जिंकून घेतले होते. जमखिंडीवर चाल करून जाण्यासाठी युसुफ आदिलखान आता तयारी करत होता. याच वेळी गुजरातच्या सुलतानाकडून बहादूर गिलानीविरुद्ध तक्रारी आल्यामुळे त्याच्याविरुद्ध चाल करून जाण्याचे महमूदशहा बहमनीने ठरविले. या प्रसंगी या स्वारीत महमूदशहाबरोबर हजर राहण्यासाठी म्हणून युसुफ आदिलखानाने आपला सेनापती कमालखान दख्खनी याला ५००० घोडेस्वार देऊन पाठविले. जमखिंडीचा पाडाव झाला. जमखिंडी युसुफ आदिलखानाच्या स्वाधीन करण्यात आले. याप्रसंगी झालेल्या लढाईत बहादूर गिलानी हा ठार मारला गेला. महमूदशहा बहमनी या मोहिमेवरून परतल्यानंतर युसुफ आदिलखान त्याला भेटण्यासाठी सामोरा. गेला. महमूदशहाला तो विजापूर येथे घेऊन गेला. विजापूर शहराभोवती नुकतीच दगडाची भिंत बांधण्यात आली होती. विजापूरमध्ये युसुफ आदिलखानाने महमूदशहा बहमनीचे दहा दिवस मोठ्या थाटामाटाने आगत-स्वागत केले. महमूदशहा जेव्हा जाण्यासाठी निघाला तेव्हा त्याला युसुफ आदिलखानाने २० हत्ती, ५० घोडे, हिऱ्याने जडविलेली चार कंकणे आणि इतर भारी किमतीच्या दुर्मिळ आणि मौल्यवान वस्तू नजर केल्या. यापैकी महमूदशहाने फक्त एका हत्तीचाच स्वीकार केला आणि इतर सर्व वस्तू परत पाठविल्या. युसुफ आदिलखानाला त्याने एक खाजगी निरोप पाठवून कळविले की या वस्तू आपला वजीर कासीम बरीद बळकावेल म्हणून आपण त्या परत करीत आहो. या वस्तू तुम्ही आमच्या म्हणून स्वतःजवळ ठेवा. तुम्ही आमचे एकनिष्ठ [ ३ ] (१५)

सेवक आहात. आम्ही ज्या जाळ्यात हल्ली अडकलो आहोत त्यातून जेव्हा तुम्ही आमची सुटका कराल तेव्हा त्या वस्तू तुम्ही आम्हाला परत कराव्या.

(१५) महमूदशहाला कासीम बरीदच्या बंधनातून त्वरित मुक्त करणे युसुफ आदिलखानाला सहजतया शक्य होते परंतु अशा तऱ्हेची कारवाई करणे त्याला उचित वाटले नाही. म्हणून त्याने महमूदशहा बहमनीला कळविले की अशा तऱ्हेची योजना अंगीकारण्यात अहमदनगरचा मलिक अहमद बहरी आणि त्याचप्रमाणे गाविलगडचा इमादउल्मुल्क हे जर तयार होत असतील तरच ती यशस्वी होऊ शकेल. म्हणून आपण राजधानीला पोहोचल्याबरोबर या दोघांकडे निरोप पाठवून आपल्या नाठाळ वजिराला शिक्षा करण्यासाठी मला सामील होण्याबद्दल त्यांची मने वळवा. युसुफ आदिलखानाच्या या आश्वासनाने महमूदशहा बहमनीचे समाधान झाले आणि त्याने आपल्या राजधानीकडे प्रयाण केले. त्याने विजापूर सोडण्याचे अगोदर युसुफ आदिलखानाने त्याजकडे गुप्तपणे मोठी रक्कम पोहोचती केली. या मोहिमेत महमूदशहा-बरोबर कासीम बरीद आणि कुतुबउल्मुल्क हेही हजर होते. त्यांनाही युसुफ आदिल-खानाने बऱ्याचशा वस्तू भेटीदाखल दिल्या.

(१६) यावेळी दस्तुर दिनार या हबशी खोजाच्या ताब्यात कुलबर्गा, सागर, आळंद हे जिल्हे आणि इतर किल्ले व भीमा आणि तुंगभद्रा या नद्यांमधील जिल्हे एवढा प्रदेश होता. हिजरी ९०१ या वर्षी (इ. स. १४९५) आपण आपले स्वतंत्र राज्य प्रस्थापित करावे अशी ईर्ष्या त्याला निर्माण झाली. या इच्छेने प्रेरित होऊन त्याने मलिक अहमद बहरी याजबरोबर संधान बांधले. त्याने मलिक अहमदला असे कळविले की ज्याप्रमाणे फतेउल्ला इमादउल्मुल्क याने वऱ्हाडात युसुफ आदिलशहा-बरोबर संगनमत करून शाही चिन्हांचा स्वीकार केला, तद्वत आपण मला शाही चिन्हांचा स्वीकार करण्यासाठी पाठिंबा दिल्यास आपल्या मैत्रीला ते साजेलसेच होईल. मलिक अहमद बहरी याचा बाप निजामउल्मुल्क याने दस्तुर दिनार याला आपला मुलगा म्हणून मानलेले होते. त्यामुळे मलिक अहमदच्या पाठिंब्याची आपण अपेक्षा केली तर त्यात काही वावगे नाही असे दस्तुर दिनार याला वाटले. असा विचार मनाशी करून दस्तुर दिनार याने छत्रचामरादी राजचिन्हे स्वीकारली. [३] (१६) त्यानंतर बहमनींची राजधानी अहमदाबाद बिदरच्या अंकित असलेले अनेक जिल्हे त्याने बळकाविले आणि कासीम बरीदच्या अधिकाऱ्यांची हकालपट्टी केली.

(१७) कासीम बरीद याने याप्रसंगी युसुफ आदिलखानाकडे मदतीची मागणी केली. त्याप्रमाणे युसुफ आदिलखानाने आपले सेनानी गजनफर बेग, दर्याखान आणि इतर अधिकारी यांना बहमनी सुलतानाच्या मदतीकरता रवाना केले. त्याबरोबरच त्याने महमूदशहाला लिहून कळविले की या स्वारीवर मी स्वतःच येणे योग्य होते. परंतु मी स्वतः आलो असतो तर दस्तुर दिनारच्या मदतीला आपल्या सर्व सैन्यासहित मलिक अहमद बहरी याने स्वतःच जाण्याचे ठरविले असते ही

शक्यता माझ्या नजरेसमोर आली. असे झाले तर युद्ध निष्कारणच लांबेल. यानंतर कालांतराने बातमी आली की मलिक अहमद बहरीच्या चिथावणीवरून ख्वाजाजहान दक्कनी याने बरेच मोठे सैन्य घेऊन दस्तुर दिनारच्या मदतीकरता परंड्याहून कुलबर्ग्याकडे कूच केले आहे. त्याबरोबरच मलिक अहमद हा देखील कूच करून जाण्याची तयारी करीत आहे. अशा परिस्थितीत आपण आपल्या फौजेला जाऊन मिळणे श्रेयस्कर असा युसुफ आदिलखानाने विचार केला. त्याप्रमाणे त्याने महमूदशहा बहमनी आणि कासीम बरीद यांजबरोबर संपर्क साधला आणि त्वरेने आपल्या सर्व सैन्यासहित दस्तुर दिनारविरुद्ध चाल केली. त्यांना विरोध करण्यासाठी दस्तुर दिनारने चाल केली. त्याच्याजवळ ८००० घोडेस्वार, बव्हंशी हबशी आणि परण्ड्याचा ख्वाजाजहान याच्या हाताखाली मलिक अहमद बहरीने साहाय्यार्थ पाठविलेले १२००० सैनिक होते. दोन्ही फौजांत घनघोर लढाई झाली. दस्तुर दिनारचा पराभव होऊन त्याला कैद करण्यात आले. कासीम बरीदच्या सांगण्यावरून महमूदशहाने त्याला ठार मारण्याचीच शिक्षा दिली असती परंतु तसे झाल्यास कासीम बरीदचे स्थान अधिक बळकट होईल आणि तसे होऊ देणे इष्ट नाही असे वाटून युसुफ आदिलखानाने त्याचेबाबत रदबदली केली. दस्तुर दिनारकडे पुन्हा कुलबर्ग्याचा ताबा देण्यात आला. यानंतर महमूदशहाची भेटसुद्धा [३] (१७) न घेता युसुफ आदिलखान विजापूरला परत आला. महमूदशहा आणि दस्तुर दिनार हे आपापल्या राजधान्यांकडे निघून गेले. दस्तुर दिनारला येऊन मिळण्यासाठी मलिक अहमद बहरी याने कूच केले होते. दोन्ही पक्षात तह झाल्याचे जेव्हा त्याला समजले तेव्हा तो देखील अहमदनगरकडे परत फिरला.

(१८) हिजरी ९०३ ( इ. स. १४९७ ) या वर्षी महमूदशहा बहमनीने युसुफ आदिलखानाची अल्पवयीन मुलगी बिबी मुसती हिची आपला मुलगा अहमदशहा याजबरोबर विवाह करण्यासाठी मागणी केली. कुलबर्गा हे ठिकाण विवाहाचा साखरपुडा करण्यास योग्य आहे असे ठरवून महमूदशहा आणि युसुफ आदिलखान तेथे येऊन पोहोचले. या घटनेमुळे आपली फार मोठी मानहानी झाली असे दस्तुर दिनार याला वाटले. याप्रसंगी युसुफ आदिलखानाने महमूदशहाला खाजगीरित्या असे सांगितले की महमूदशहाची जर कासीम बरीदला अधिकारावरून काढून टाकण्याची इच्छा असेल तर त्याने आपल्याकडे ( विजापूरकडे ) दस्तुर दिनारच्या ताब्यात हल्ली असलेले जिल्हे सोपवून द्यावे. कारण विजापूरच्या ताब्यातील मुलूख आणि कासीम बरीदचा जहागिरीचा प्रदेश यामध्ये दस्तुर दिनारच्या ताब्यातील जिल्हे आहेत. हे जिल्हे जर आपल्या ताब्यात आले तर त्यामध्ये सैन्य घुसविण्याची सोयिस्कर सबब आपल्याला मिळेल आणि या बेताची खबर मलिक अहमद बहरी अथवा कासीम बरीदला मदत करण्याची ज्यांची इच्छा आहे त्यांच्या कानावर जाण्याचे अगोदर कासीम बरीदची हकालपट्टी करण्याची संधी आपल्याला मिळेल.

महमूदशहाने या योजनेला आपली मान्यता दिली आणि त्याप्रमाणे वरील जिल्हे युसुफ आदिलखानाकडे सोपविले. दस्तुर दिनारच्या अधिकाऱ्यांची हकालपट्टी करण्यात आली. ( युसुफ आदिलखानाचा ) प्रतिकार करणे शक्य न झाल्यामुळे दस्तुर दिनारने वरील जिल्ह्यांव्यतिरिक्त असलेल्या आपल्या प्रदेशात गोवळकोंड्याचा सुलतान कुलीकुतुबखान याचा दुय्यम म्हणून राहण्यास मान्यता दिली. या घटनेमुळे कासीम बरीद घाबरून गेला. आपली मानहानी झाली आहे असे त्याला वाटले. तो महमूहशहाला सोडून निघाला आणि आपल्या अनुयायांना बरोबर घेऊन त्याने आळंदकडे कूच केले.

(१९) यानंतर युसुफ आदिलखानाने महमूदशहाला बरोबर घेऊन [३](१८) कासीम बरीदवर चाल करण्यासाठी कूच केले. महमूदशहाबरोबर सुलतान कुली कुतुबशहा आणि मलिक इलियास हे होते. कासीम बरीदचा त्यांनी गुंजोटी या गावापाशी पराभव केला. पराजित कासीम बरीदने निरनिराळ्या किल्ल्यांचा आश्रय घेतला. या विजयानंतर सोन्याच्या झालरीने मढविलेला एक उंची गालिचा जमिनीवर पसरण्यात आला. महमूदशहाने युसुफ आदिलखानाचा हात धरून त्याला आसनावर बसण्यास सांगितले. युसुफ आदिलखान या गोष्टीला प्रथम अनुमती देईना परंतु महमूदशहाने अतिशय आग्रह केल्यावर त्याने आसन स्वीकारले. या बैठकीत असे ठरले की पुढील वर्षी उपस्थित असलेल्या सर्वांनी कूच करून जावे आणि कासीम बरीदची सत्ता पूर्णपणे उखडून काढावी. वर उल्लेखिलेल्या लढाईत मलिक इलियास हा ठार मारला गेला. त्याची जहागिर युसुफ आदिलखानाने त्याचा मुलगा महमद याला बहाल केली आणि त्याला ऐनउल्मुल्क ही पदवीही दिली. यानंतर महमूदशहाला सोडून युसुफ आदिलखान विजापूराकडे परतला.

(२०) पुढील वर्षी युसुफ आदिलखानाने दस्तुर दिनारविरुद्ध चाल केली. परंतु मलिक अहमद बहरी त्याच्या साहाय्यार्थ चालून आल्यामुळे युसुफने बिदरच्या दिशेने माघार घेतली. तेथे त्याला सुलतान कुली कुतुबखान आणि वऱ्हाडचा इमाद-उल्मुल्क यांजकडून मदतीची आश्वासने मिळाली. यावर दस्तुर दिनार आणि मलिक अहमद बहरी यांनी प्रत्यक्ष संघर्षाचा प्रसंग आणू देण्याचा धोका न घेता आपापल्या राजधान्यांकडे कूच केले. विजापूरला परतल्यानंतर युसुफ आदिलखानाने मलिक अहमद बहरी आणि इमादउल्मुल्क यांजकडे आपले वकील रवाना केले. त्याने असा प्रस्ताव मांडला की अनेक सार्वभौम सत्ताधिशांनी राज्य करण्याला दक्षिण देश (विस्ताराने) अतिशय लहान आहे. तरी आपण तिघांनी आपल्या सुरक्षिततेसाठी एकजूट करावी आणि सबंध देश व्यापून टाकण्याच्या दृष्टीने पाऊले टाकावी. दीर्घ वाटाघाटीनंतर असे ठरले की माहूर, रामगीर, आणि खुदावंदखान हबशी याच्या ताब्यातील सर्व प्रदेश इमादउल्मुल्क याने घ्यावा; दौलताबाद, अंतूर, जालना [३](१९) हे किल्ले आणि या किल्ल्यांपलीकडील गुजरातच्या सरहद्दीपर्यंत पसरलेला सर्व प्रदेश

—२५

मलिक अहमद याने घ्यावा; युसुफ आदिलखानाने आपल्या वाटणीचा प्रदेश म्हणून दस्तुर दिनार आणि ऐनउल्मुल्क यांच्या ताब्यातील मुलुख हिसकावून घ्यावा; आणि कासीम बरीदला सुलतान कुली कुतुबउल्मुल्क याचा प्रदेश व्यापण्याची परवानगी देण्यात यावी. हा प्रदेश त्याने राजधानीचे शहर अहमदाबाद बिदर आणि बिदरच्या सभोवताली असलेला इतर मुलुख यांचा अंकित म्हणून सांभाळावा. या तहाच्या अटीप्रमाणे असे ठरले की या तहात सामील असलेल्या पक्षांनी या तहाने आखून दिलेल्या योजनेशी विसंगत असे काहीही करू नये. परंतु तसा प्रसंगच निर्माण झाल्यास या योजनेप्रमाणे कृती करण्यासाठी एकजूट निर्माण करावी.

(२१) या तहाच्या अटीप्रमाणे युसुफ आदिलखानाने ऐनउल्मुल्क हा आपले सार्वभौमत्व मान्य करण्यास राजी आहे किंवा नाही याची प्रचीती घेण्यासाठी त्याच्याकडे आपल्या समक्ष ताबडतोब हजर होण्यासाठी याने असा हुकूम रवाना केला. यापूर्वी युसुफ आदिलखान केव्हाही त्याला लिहिताना समतेच्या भूमिकेवरून लिहीत असे. ऐनउल्मुल्क याने वरील आज्ञेचा मोठ्या आनंदाने स्वीकार केला. त्याने असे जाहीर केले की आपल्या एकनिष्ठेला कसोटीला लावल्यानंतर युसुफ आदिलखान आपल्याला एकनिष्ठ मानतो अशी आपली खात्री झाली आहे. त्याने या प्रसंगाबद्दल गोव्याच्या किल्ल्यात एक आठवडाभर आनंदोत्सव साजरा केला आणि ६००० घोडेस्वार घेऊन विजापूरकडे कूच केले. तेथे युसुफ आदिलखानाने तो आपला एक सामान्य नागरिक आहे असे समजून त्याची भेट घेतली आणि एकाद्या सिंहासनाभिषिक्त राज्याधिपतिप्रमाणे त्याच्याकडून आपले आगतस्वागत करून घेतले. यानंतर त्याने ऐनउल्मुल्क याला मानाचा पोषाख अर्पण केला

( २२ ) वर उल्लेखिलेल्या दक्षिण देशाचे विभाजन करणाऱ्या तहाप्रमाणे जर कृती झाली तर त्यात आपला संपूर्ण नाश ओढविणार आहे हे जेव्हा दस्तुर दिनार याला कळून चुकले तेव्हा त्याने अमीर बरीद याजकडे मदतीची याचना केली. अमीर बरीद ह्याने आपल्या बापाच्या मृत्यूनंतर त्या वेळी महमूदशहा बहमनीचा वजीर म्हणून सूत्रे हाती घेतली होती. अमीर बरीद याने दस्तुर दिनार याला मदत [ ३ ] ( २० ) करण्यासाठी म्हणून ३००० घोडेस्वार रवाना केले. दस्तुर दिनार याने भीमा नदीच्या काठावर तळ दिला. या ठिकाणी त्याला परंड्याचा ख्वाजाजहान आणि त्याचा भाऊ जैनखान हे येऊन मिळाले. ख्वाजाजहान आणि जैनखान यांना उपरिनिर्दिष्ट विभाजनाच्या कराराच्या भागिदारीतून मलिक अहमद याने वगळले होते. ते दोघेजण आपल्याबरोबर ५००० घोडेस्वार घेऊन आले. या वेळी मलिक अहमद हा दौलताबाद जिंकून घेण्यात आणि गुजरातच्या सुलतानाने त्याच्यावर केलेल्या आक्रमणापासून आपला बचाव करण्यात गुंतला होता.

( २३ ) आपले शत्रू आपल्यापेक्षा संख्याबलाने वरचढ आहेत याची फिकीर न करता युसुफ आदिलखानाने आपल्या फौजेची जमवाजमव केली. विजयनगरच्या

सैन्यापासून घेतलेली लूट त्याने आपल्या फौजेत मुक्त हस्ताने वाटून दिली. त्यानंतर त्याने विजापूरहून कूच केले आणि शत्रूपासून दहा मैल अंतरावर त्याने आपला तळ दिला. दुसऱ्या दिवशी त्याने आपल्या फौजेची युद्धासाठी तयारी केली. गजनफर बेग याचा भाऊ महमद कुली बेग याच्या हाताखाली २००० निवडक घोडेस्वार आघाडीचे म्हणून त्याने पुढे रवाना केले. शत्रूच्या छावणीपासून दोन मैल अंतरावर तळ देऊन त्याचे लक्ष वेधून घेण्यासाठी हल्लेखोरांच्या टोळ्या शत्रूवर पाठविण्याची त्याने महमद कुली बेग याला आज्ञा दिली. त्याच वेळी दस्तुर दिनार याजकडे त्याने निरोप पाठवून त्याला असे आश्वासन दिले की जर तो शरण जाण्यास आणि आपले सार्वभौमत्व मानण्यास तयार असेल तर आपल्या सरकारात आपण त्याला आणि त्याच्या सर्व अनुयायांना मोठे मानाचे स्थान देण्यास तयार आहो. परंतु मूर्खपणामुळे आपण पुढे केलेला सहकार्याचा हात झिडकारण्याची त्याला दुर्बुद्धी झाली तर त्याचे भवितव्य पुढे होणाऱ्या युद्धाचा निकालच ठरवील.

(२४) दस्तुर दिनार याने युसुफ आदिलखानाच्या अटी झिडकारल्या आणि हबशी घोडेस्वारांची एक मोठी तुकडी त्याने युसुफ आदिलखानाच्या आघाडीवर आलेल्या सैनिकांवर हल्ला करण्यासाठी पुढे रवाना केली. या तुकडीचा पराभव झाला. त्यातील सैनिकांची भयंकर कत्तल झाली आणि अनेक हत्ती आणि घोडे विजयी पक्षाच्या हाती पडले. दुसऱ्या दिवशी सकाळी शत्रूशी सामना देण्यासाठी [३] (२१) युसुफ आदिलखानाने चाल केली आणि शत्रूच्या छावणीजवळ पुढीलप्रमाणे आपल्या सैन्याची व्यूहरचना केली. गजनफर बेग उजव्या फळीवर, हैदर बेग ताब्रिजी डाव्या फळीवर आणि खुद्द युसुफ आदिलशहा निवडक दलासमावेत आघाडीच्या मध्यावर अशी सैनानींची नियुक्ती झाली. त्याशिवाय मिर्जा जहांगीर कुमी याच्या हाताखाली प्रतिहल्ला चढविणाऱ्या लष्करी शिपायांच्या तुकड्या डाव्या फळीबरोबर देण्यात आल्या. दस्तुर दिनार याला आपल्या संख्याबलाचा आत्मविश्वास वाटत होता. त्यानेही आपल्या फौजेला युद्धासाठी उभे ठाकले. हिंदुस्थानात त्या काळी प्रचलित असलेल्या युद्धतंत्राप्रमाणे दस्तुर दिनारच्या सर्व सैनिकांनी लोखंडी चिलखते घातलेली होती. त्याने आपले गजदळ आघाडीवरील निरनिराळ्या भागांत विखुरले होते आणि भडिमार करणारी यंत्रे सेनादलाच्या समोर आणून उभी केली होती. युद्धाला तोंड लागले आणि मिर्जा जहांगीर याने प्रथम चाल करून विजेच्या वेगाने शत्रूवर हल्ला चढविला. त्याच वेळी गजनफर बेग आणि हैदर बेग यांनी एकसमयावच्छेदेकरून उजव्या आणि डाव्या फळीवरून शत्रूवर इतक्या प्रचंड वेगाने चाल केली की त्यांच्या हल्ल्याच्या माऱ्यापुढे कोठल्याही प्रतिकाराचा टिकाव लागला नाही. परमेश्वराची जणू काही तशी इच्छा होती म्हणूनच की काय या हल्ल्यामध्ये दस्तुर दिनार मारला गेला. भयचकित झाल्यामुळे गोंधळून गेलेल्या त्याच्या सैनिकांनी रणांगणातून पळ काढला. गजनफर बेग याला या धुमश्चक्रीत जखम झाली होती. तो युसुफ आदिलखानाच्या

नजिक आला आणि त्याचे अभिनंदन करण्यासाठी म्हणून त्याने आणि इतर सरदारांनी युसुफ आदिलखानापुढे गुडघे टेकून त्याला मानाचे मुजरे केले. विजयश्रीने माळ घातल्यामुळे प्रचलित पद्धतीला अनुसरून त्यांनी युसुफ आदिलखानाच्या मस्तकाभोवती द्रव्य आणि हिरे ओवाळून टाकले. युसुफ आदिलखानाने आपला साहसी भाऊ गजनफर बेग याच्या डोळ्यांचे आणि कपाळाचे चुंबन घेतले आणि त्याला गाढ आलिंगन दिले. त्याने आपल्या देखरेखीखाली गजनफर बेगच्या जखमांना औषधोपचार केला, परंतु हे सर्व व्यर्थ गेले. कारण पवित्र कुराणाच्या वचनात सांगितल्याप्रमाणे—

"जेव्हा मृत्यूची सावट पडते तेव्हा आपण एक क्षणभरही त्याला अडवू शकत नाही."

तीन दिवस आणि रात्री हा वीरपुरुष मृत्यूशी अखंड झुंज देत होता पण अखेरीस तो या नश्वर जगाचा त्याग करून गेला. [ ३ ] (२२)

(२५) गजनफर बेगच्या मृत्यूमुळे युसुफ आदिलखानाला अतिशय दुःख झाले. परंतु त्याने त्याच्या उत्तरक्रियेचे सर्व संस्कार पार पाडले आणि युद्धासाठी कंबर कसून कुलबर्गा, सागर आणि मृत दस्तुर दिनारच्या ताब्यातील सर्व किल्ले आणि प्रदेश त्याने जिंकून घेतला. आपल्या विश्वासातील अधिकाऱ्यांकडे त्या प्रदेशाचा ताबा त्याने सोपविला. त्यानंतर मोठ्या विजयोन्मादाने तो विजापूरकडे परत फिरला. शहरात परत आल्यावर त्याने मिर्जा जहांगार आणि हैदर बेग यांना त्यांनी युद्धात दाखविलेल्या शौर्याबद्दल राज्यातील सर्व अमिरांमध्ये मानाचे स्थान दिले. दस्तुर दिनारबरोबर झालेल्या युद्धात ज्या ज्या अधिकाऱ्यांनी आणि सैनिकांनी मर्दुमकी गाजविली होती त्या सर्वांवर त्याने मानमरातब आणि बक्षिसी यांची खैरखैरात केली.

(२६) याप्रमाणे युसुफ आदिलखान आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर ऐश्वर्याच्या शिखरावर पोहोचला. यासमयी त्याने एक धार्मिक संकल्प पार पाडण्याचे ठरविले. अनेक वर्षांपासून हा संकल्प पार पाडण्याचा त्याने आपल्या मनामध्ये निश्चय केला होता. हा हेतू मनात धरून त्याने हिजरी ९०८ ( इ. स. १५०२ ) या वर्षी आपल्या प्रमुख नागरिकांची एक परिषद भरविली. या परिषदेला त्याने मिर्जा जहांगीर, हैदर बेग आदि शिया पंथीय मंडळी, त्याचप्रमाणे शिया पंथ अनुसरणारे सय्यद अहमद हिरवी आणि इतर विद्वान मंडळी यांनाही पाचारण केले. त्यांच्या समोर त्याने भाषण केले. भाषण करतांना त्याने सांगितले की खुद्द महमद पैगंबर आपल्या स्वप्नात आले होते आणि आपल्याला आज जे मानाचे स्थान प्राप्त झाले आहे त्याचे भविष्य कथन करून त्यांनी आपले अभिनंदन केले. त्याच वेळी आपण असा निश्चय केला की जर कधीकाळी स्वप्नात झालेला दृष्टान्त फलद्रूप झाला तर इमामांनी पुरस्कारिलेल्या धर्मतत्त्वांचा ( म्हणजे शिया पंथाचा ) आपण प्रचार करू आणि त्यांच्या नामाभिधानाचा जयजयकार करून व्यासपीठांना दुमदुमुन टाकू. आपल्या वरील निश्चयाला ज्यावेळी तिम्मराज आणि बहादूर गिलानी यांनी आपल्या प्रदेशावर हल्ला केला आणि

आपल्या हातातून राज्याची सर्व सूत्रे जवळजवळ हिसकावून घेतली त्या वेळी आपण उजाळा दिला. आता आपण जमलेल्या सर्व मंडळींनी वरील गोष्ट कृतीत उतरविण्यास हीच वेळ योग्य आहे किंवा नाही याबद्दल मत द्यावे अशी माझी इच्छा आहे. [३] (२३)

(२७) जमलेल्या मंडळींनी आदिलशाही घराण्याचा भाग्योदय व्हावा यासाठी एकमुखाने परमेश्वराची प्रार्थना केली. जमलेल्यांपैकी काहींनी आदिलशहाच्या ठाम निश्चयाला अनुमती दर्शविली तर त्यांच्यापैकी जे सुज्ञ होते त्यांनी असे मत प्रकट केले की आपली सत्ता अजून केवळ बाल्यावस्थेत आहे; महमूदशहा बहमनी हा जरी दुर्बळ असला तरी त्याला अजून सर्वजण दक्षिण देशाचा कायदेशीर सुलतान म्हणून मान्यता देतात; एवढेच नव्हे तर आपल्या स्वतःच्या अमीरउमरावांपैकी तुर्क, दक्षिणी आणि हबशी हे सुन्नी पंथाचे अनुकरण करणारे आहेत आणि त्याशिवाय आपल्याभोवती पसरलेल्या दक्षिणेतील राज्यांचे सुलतान, मलिक अहमद निजाम-उल्मुल्क बहरी, अमीर बरीद आणि इतर हे आपापल्या धार्मिक भावनांचे पालन करण्याबाबत फार काटेकोर आणि आस्थेवाईक आहेत. अशा परिस्थितीत राज्यातील स्थित धर्मपंथामध्ये बदल घडवून आणल्यास आपल्या एकट्याच्या ताकदीवर निभावून नेता येणार नाही एवढ्या विरोधी शक्ती एकत्र येण्याची अधिक शक्यता आहे. यावर युसुफ आदिलशहाने उत्तर दिले की ज्या परमेश्वराने अत्यंत चांगुलपणाने आपल्याला राज्यपदावर चढविले आहे त्या परमेश्वराला साक्ष ठेवून आपण प्रतिज्ञा केली आहे आणि आपल्याला असा पूर्ण विश्वास आहे की त्या प्रतिज्ञेची पूर्तता केल्यावर त्याच परमेश्वराचा वरदहस्त आपल्याला पूर्णपणे पाठिंबा देईल. याच वेळेला अशी बातमी आली की पर्शियाचा सुलतान शहा इस्माईल सफवी याने आपल्या राज्यात सर्वत्र शिया धर्माची स्थापना केली आहे. युसुफ आदिलखान हा सफवी घराण्याच्या परंपरेवर विश्वास ठेवणारा होता. या बातमीने त्याचा निश्चय दृढतर झाला. आपली योजना कृतीत उतरविण्यासाठी त्याने ताबडतोब उपाययोजना केली.

(२८) त्यानंतर एका शुभ दिवशी विजापूरच्या किल्ल्यातील भव्य मशिदीत त्याने मोठ्या थाटामाटाने आणि समारंभाने पदार्पण केले. युसुफ आदिलखानाच्या आज्ञेने मदिनेतील एक पूज्य सय्यद नकीबखान हा व्यासपीठावर उभा [३] (२४) राहिला आणि शिया पंथियांच्या पद्धतीप्रमाणे त्याने अली हा परमेश्वराचा मित्र असल्याचा आपण दाखला देत आहोत अशी नमाज पढण्यासाठी मोठ्याने आरोळी दिली आणि त्यानंतर त्याने १२ इमामांच्या नावाने खुत्ब्याचे जाहीररित्या २८३□
पठण केले. हिंदुस्थानामध्ये जाहीररित्या अशा तऱ्हेचा विधी घडवून आणण्यांचे धाडस दाखविणारा युसुफ आदिलशहा हा पहिलाच सुलतान होता. अशा तऱ्हेचा विधी करण्याचे धैर्य युसुफ आदिलशहाने दाखविले तरीसुद्धा आपल्या प्रजेने साहिबाच्या २८४□
संबंधी बदनामीकारक आणि शिवराळ भाषा उच्चारण्यास त्याने प्रतिबंध केला. याचा परिणाम असा झाला की धर्म वेडाचे भयानक विष इतस्ततः फैलावले जाण्यास

ओघानेच प्रतिरोध झाला. यामुळे जाफरची विद्वान शिष्यमंडळी आणि त्याचप्रमाणे महमद हनीफ याने पुरस्कारिलेल्या धर्मतत्त्वांचा गाढा अभ्यास केलेली मंडळी आणि शिया पंथाचे पालन करणारे प्रजाजन हे सर्व मित्रत्वाने एकत्र नांदू लागले. निरनिराळ्या पंथियांच्या मशिदीमध्ये प्रत्येकजण दुसऱ्याच्या धर्मपालन विधीमध्ये हस्तक्षेप न करता आपापल्या धर्मश्रद्धेप्रमाणे स्वतःला प्रणीत असलेल्या परमेश्वराचे पूजन करू लागले. जणू काही कायद्याने आखून दिल्याप्रमाणे चाललेल्या या शिस्तबद्ध संयमी वागणुकीकडे पाहिल्यानंतर धर्मगुरू आणि तडीतापसी यांना अतिशय विस्मय वाटला. युसुफ आदिलशहाच्या अंगी अद्भूत कर्तृत्वशक्ती वसत आहे आणि त्या शक्ती-मुळेच हा चमत्कार घडून आला आहे असे त्यांनी प्रतिपादन केले. प्रस्तुत ग्रंथकर्त्याच्या मनात हे ऐकल्यानंतर काही सुलतानांनी धर्मपालनाच्या बाबतीत जी सहनशीलता दाखविली त्या संबंधात काही आख्यायिका येतात. वाचकांच्या माहितीसाठी त्या याठिकाणी सादर कराव्या असे प्रस्तुत ग्रंथकर्त्याला ( फरिश्ता ) वाटते. त्या आख्यायिका पुढीलप्रमाणे आहेत--

(२९) पर्शियामध्ये मौलाना गियासुद्दीन नावाचा एक अतिशय सुप्रसिद्ध अवलिया होता. त्यांच्या अंगी असलेल्या कर्तृत्वामुळे आणि त्याच्या सत्चारित्र्यामुळे त्याच्या-बद्दल लोकांना अतिशय आदर वाटत असे. त्याला एकदा इब्राहीम आदिलशहाने विचारले की इस्लामच्या सर्व पंथांमध्ये श्रेष्ठ पंथ कोणता ? त्यावर त्याने [३] (२५) उत्तर दिले की एखाद्या राजवाड्यामध्ये एकदा श्रेष्ठ सम्राट आसनस्थ झाला आहे. त्या राजवाड्यामध्ये प्रवेश करण्यासाठी अनेक दरवाजे आहेत. त्यातील कोणत्याही दरवाजाने तुम्ही गेलात तरी तुम्हाला सम्राटाचे दर्शन घडते आणि सम्राटाच्या समक्ष तुम्ही जाऊ शकता. तुमचे कार्य आणि सिद्धी त्या सम्राटाबरोबर आहे. त्या सम्राटाकडे जाण्यासाठी असलेल्या दरवाजाबरोबर नाही. इब्राहीम आदिलशहाने त्या अवलियाला फिरून विचारले की त्याच्या मते सर्वोत्कृष्ट पंथ कोणता ? त्याने उत्तर दिले की प्रत्येक पंथातील अत्युत्कृष्ट व्यक्ती ही नेहमीच श्रेष्ठतर पंथाचे पालन करीत असते. या उत्तराने इब्राहीम आदिलशहा खूष झाला आणि त्याने मौलाना गियासुद्दीनवर बक्षिसांची खैरात केली.

( ३० ) अशारितीने शियापंथियांच्या रिवाजाप्रमाणे युसुफ आदिलशहा याने विजापूर राज्यात खुत्बा वाचला आणि शिया पंथाची तत्त्वे प्रस्थापित केली. त्याचेच अनुकरण दर्याखान, फखउल्मुल्क तुर्क आणि इतर प्रमुख अमिरांनी केले आणि शिया पंथाचा स्वीकार केला. परंतु काही कट्टर सुन्नींनी तसे करण्याचे नाकारले आणि युसुफ आदिलशहाची चाकरी सोडून जाण्याची आपली इच्छा प्रकट केली. पंथपरि-वर्तनाच्या सार्वजनिक प्रतिक्रियेची खबर जेव्हा युसुफ आदिलशहाच्या कानावर गेली तेव्हा त्याने राज्यातल्या प्रत्येक व्यक्तीला आपापल्या मताप्रमाणे धर्मपालन करण्याची मुभा दिली. "माझा धर्म माझ्यापाशी आणि तुमचा तुमच्यापाशी" या तत्त्वाचा त्याने

स्वीकार केला. त्यामुळे अखेर सर्वत्र समाधानाचे वातावरण निर्माण झाले. या सुमारास युसुफ आदिलशहा हा ऐनउल्मुल्क गिलानी याच्या वाढत्या वर्चस्वामुळे संत्रस्त झाला आणि त्याने त्याची सैन्यातील मनसब खालसा केली. ऐनउल्मुल्कचा बाप हयात असताना त्याच्या ताब्यात असलेले जिल्हे आदिलशहाने आपल्याकडे घेतले आणि ऐनउल्मुल्कला आपला चरितार्थ चालविण्यासाठी त्या जिल्ह्यांच्या बदली हुक्केरी आणि बेळगावची जहागिरी दिली. दरबार सोडून त्याने आपल्या जहागिरीच्या गावी जावे आणि आपल्या मताप्रमाणे धर्मतत्त्वाचे पालन करावे अशी सुभाही त्याने त्याला दिली. त्याचप्रमाणे सर्व सुन्नी अमिरांना आपापल्या जहागिरी-मध्ये साहिबाच्या नावे खुत्ब्याचे पठण करण्यास आपली परवानगी त्याने जाहीर केली आणि सार्वजनिकरित्या आपल्या मताप्रमाणे पूजाअर्चनाचे विधी प्रत्येकाने केल्यास त्याला आपला विरोध नाही असे त्याने सांगितले. युसुफ आदिलशहाने [ ३ ](२६) जरी इतके उदारमतवादी धोरण स्वीकारले तरी देखील सुन्नी पंथाच्या कट्टर प्रमुख अनुयायांच्या वागणुकीवर सक्त नजर ठेवणे त्याला आवश्यक वाटले.

(३१) मलिक अहमद बहरी आणि अमर बरीद हे सुन्नी पंथाचे कट्टर आणि आस्थेवाईकपणे अनुकरण करणारे होते. दक्षिणेमध्ये प्रचलित असलेल्या धर्मामध्ये याप्रमाणे होत असलेला आमूलाग्र बदल पाहून त्यांना धास्ती वाटली आणि त्यांनी या परिवर्तनाचा कडक शब्दांत निषेध केला. अखेर त्यांनी दोस्तीचा तह करून आदिलशहाच्या मुलखावर आक्रमण केले. अमीर बरीद याने गुंजोटी आणि युसुफ आदिलशहाने दस्तुर दिनारकडून हिसकावून घेतलेल्या अनेक जिल्ह्यांवर आपला कबजा केला, तर मलिक अहमद बहरी याने विजापूर दरबाराकडे आपले वकील पाठवून नळदुर्गचा किल्ला तावडतोब आपल्या स्वाधीन करण्याची मागणी केली. आपल्या प्रदेशावर विनाकारण झालेल्या ह्या आक्रमणाची युसुफ आदिलशहाला अतिशय चीड आली. त्याने संतापाने मलिक अहमद बहरीच्या पत्राला प्रत्युत्तर दिले आणि तावडतोब गुंजोटीवर चाल करून ते ठिकाण आपल्या कबजात घेतले. महमूद-शहा बहमनी आणि अमीर बरीद यांनी आता सुलतान कुली कुतुबउल्मुल्क, इमाद-उल्मुल्क आणि खुदावंदखान हबशी यांजकडे मदतीची याचना केली. सुलतान कुली हा अंतर्यामी शिया पंथाचा चाहता होता. परंतु अजून त्याने बहमनी सुलतानांचे वर्चस्व झुगारून दिले नसल्याकारणाने आपल्या अधिकाऱ्यांच्या सल्लामसलती-नुसार आपली फौज महमूदशहाच्या छावणीच्या दिशेने हलविली. परंतु इमादउल्मुल्क आणि खुदावंदखान यांनी निरनिराळ्या सबबी पुढे करून कालहरण केले आणि आदिलशहाविरुद्ध एकत्र झालेल्या दोस्तांना मिळण्याचे टाळले. यावर अमीर बरीद याने आपला मुलगा जहांगीरखान याला अहमदनगर येथे पाठविले. तेथे त्याने मलिक अहमद बहरी याची इतकी मनधरणी केली आणि त्याला इतके भरीस घातले की त्याने १०००० घोडेस्वार आणि तोफखान्याची एक तुकडी घेऊन त्याच्याबरोबर

कूच केले. यांत अमीर बरीद आणि सुलतान कुली कुतुबशहा यांच्या सैन्याची भर पडल्यावर एक प्रचंड फौज एकवटली गेली. या सेनासंभाराचे नाममात्र नेतृत्व महमूद-शहाकडे होते. या फौजेच्या मानाने युसुफ आदिलशहाची फौज कमजोर होती. तेव्हा आपल्यापेक्षा प्रबळ असलेल्या सेनेबरोबर तुंबळ लढाईचा प्रसंग आणणे [ ३ ] ( २७ ) धोक्याचे आहे असा त्याने विचार केला. आपला अल्पवयी पाच वर्षांचा मुलगा इस्माईल याला त्याने सर्व संपत्ती आणि हत्ती यांसह आळंदहून विजापूरला रवाना केले. विजापूर शहराचे संरक्षण करणे आणि एकंदर परिस्थितीबाबत योग्य तो निर्णय घेणे ही कामे त्याने कमालखान दख्खनीवर सोपविली. यानंतर त्याने कुलबर्गा शहराचे संरक्षणासाठी दर्याखान आणि फख्रउल्मुल्क तुर्क यांची नियुक्ती केली आणि स्वतः ऐनउल्मुल्क आणि इतर अनेक परदेशी अधिकारी व त्याच्याशी पूर्णपणे एकनिष्ठ असलेले ६००० घोडेस्वार यांना घेऊन बीडकडे कूच केले. वाटेत त्याने मुलखाची जाळपोळ आणि नासधूस केली. युसुफ आदिलशहा आपल्या प्रदेशात लुटालूट करीत चालला आहे असे पाहून मलिक अहमद बहरी हा महमूदशहा बहमनी, अमीर बरीद आणि कुतुबउल्मुल्क यासहवर्तमान त्याच्या पाठलागावर निघाला. युद्धाची झळ आपल्या प्रदेशाला लागू नये म्हणून वरील मार्गाचा अवलंब युसुफ आदिलशहाने केला होता. त्याने आपल्या शत्रूबरोबर उघड उघड सामना देण्याचे जरी टाळले तरी त्याच्या-भोवती तो सतत घिरट्या घालीत राहिला. त्याच्या सैनिकांना त्याने त्राहिभगवान करून सोडले आणि त्यांची रसद त्याने तोडली. परंतु त्याच्या या हिकमतीत त्याला म्हणावे तितके यश आले नाही आणि त्याची फौज सारख्या दौडीने दमून गेली. तेव्हा त्याने प्रथम दौलताबादच्या आसमंतातला मुलूख उद्ध्वस्त केला आणि इमाद-उल्मुल्कच्या मैत्रीवर विसंबून तो वऱ्हाडात शिरला. इमादउल्मुल्क त्या सुमारास गावील येथे आपल्या सैन्यासहित छावणी करून होता. त्याने या वादात संपूर्ण तटस्थता पाळण्याचे आणि आपल्या प्रदेशाचे संरक्षण होईल एवढ्यापुरतेच या वादात लक्ष घालण्याचे ठरविले. अर्थात् इमादउल्मुल्क याने युसुफ आदिलशहाचे स्नेहभावाने स्वागत केले. परंतु आपण जर युसुफ आदिलशहाला उघड उघड पाठिंबा दिला तर त्याच्याविरुद्ध एकवटलेले दक्षिणेतील सुलतान वऱ्हाडवर स्वारी करतील असे त्याला वाटले म्हणून त्याने युसुफ आदिलशहाला असे सांगितले की त्याच्याविरुद्ध त्याच्या-शत्रूंनी केलेली एकजुट मोडून काढण्याची एखादी योजना आखली जाईतोपर्यंत सद्यस्थितीत त्याने बुरहाणपूरचा आसरा घेणेच योग्य होईल. इमादउल्मुल्क [३] (२८) याने युसुफ आदिलशहाच्या मनावर ठामपणे असेही बिंबविण्याचा प्रयत्न केला की शत्रूबरोबर समझोता घडवून आणण्याच्या दिशेने एक पाऊल म्हणून त्याने विजापुरात सुन्नी पंथाच्या चालिरितींचे पुनरुत्थापन करावे. इमादउल्मुल्क याने दिलेला सल्ला मानणे योग्य आहे अशी युसुफ आदिलशहाची खात्री पटली आणि त्याने त्यानुसार कमालखानाकडे हुकुमनामे रवाना केले. दरम्यान युसुफ आदिलशहाने इमादउल्मुल्क

याचा निरोप घेतला आणि बुरहाणपूरकडे कूच केले. खानदेशच्या सुलतानाने त्याचे त्याला साजेलशा इतमामाने आगत-स्वागत केले.

( ३२ ) इकडे इमादउल्मुल्क याने आपल्या अगदी जवळच्या नात्यातील एका इसमास मलिक अहमद बहरी आणि सुलतान कुली कुतुबउल्मुल्क यांजकडे रवाना केले. त्याने त्याजबरोबर असा निरोप पाठविला की अमीर बरीद याला स्वतःसाठी विजापूर बळकाविण्याची इच्छा आहे आणि त्यासाठी त्याने धर्मरक्षणाच्या मिषाखाली युसुफ आदिलशहाचा नाश करण्याचा घाट घातला आहे. इमादउल्मुल्क याने पुढे असे कळविले की अमीर बरीद याच्या ताब्यात आता फारच थोडा प्रदेश आहे. अशा परिस्थितीत बहमनी सुलतानाच्या निव्वळ नावाखाली त्याला जर एवढी गोष्ट साध्य करता येणे शक्य झाले आणि पुढे-मागे त्याच्या अमलाखाली फार मोठा प्रदेश आला तर ओघानेच दक्षिणेतील आपल्या सर्वांचेच स्वातंत्र्य धोक्यात येईल. कोणत्याही परिस्थितीत कोणाही व्यक्तीला दुसऱ्याच्या धार्मिक बाबतीत हस्तक्षेप वा ढवळाढवळ करण्याचा यत्किंचितही अधिकार नाही. कारण सरतेशेवटी त्या सर्वसाक्षी परमेश्वरा-समोर प्रत्येकाला आपापल्या कृत्यांचा जबाब निश्चितच द्यावा लागेल. अशी जरी वस्तुस्थिती असली तरी देखील युसुफ आदिलशहाने आता शिया पंथाचे पालन करण्यासंबंधी काढलेला फतवा अधिकृतपणे मागे घेतला आहे आणि सुन्नी पंथाच्या तत्त्वांचे पुन्हा अंगीकरण केले जावे अशा तऱ्हेचा हुकूम विजापूरकडे रवाना केला आहे. अशा परिस्थितीत युसुफ आदिलशहाविरुद्ध युद्ध चालू ठेवण्यात आपल्या मते कोणतेही सयुक्तिक कारण आता दिसत नाही. आपल्या निरोपाचा समारोप करताना इमादउल्मुल्क याने मलिक अहमद बहरी आणि कुतुबउल्मुल्क यांना ठामपणे सांगितले की युद्ध करून स्वतःला कमकुवत करून घेण्याऐवजी आणि अमीर बरीद सारख्या कावेबाज व्यक्तीकडून फसविले जाण्याऐवजी तुम्ही आपापल्या राज्यांकडे परत जाणे हेच इष्ट होय. मलिक अहमद बहरी आणि सुलतान [ ३ ] ( २९ ) कुली कुतुबउल्मुल्क हे इमादउल्मुल्कसारख्या वृद्ध आणि अनुभवी मुत्सद्याच्या उपदेशपर गोष्टी सांगण्याला अतिशय मानीत असत. त्याने केलेल्या कारणमीमांसेने त्यांची खात्री पटली आणि एका रात्री एकाएकी सुलतान महमूदशहाचा निरोपही न घेता ते आपापल्या राजधान्यांकडे चालते झाले.

(३३) आपले दोस्त आपल्याला एकाएकी सोडून का गेले याच्या कारणांची अमीर बरीद याला काहीच कल्पना नव्हती. त्याने इमादउल्मुल्क याजकडे विजापूरवर आक्रमण करण्यासाठी मदत मागितली. परंतु विफल वाटाघाटी करण्यातच बरेच दिवस निष्कारण मोडून त्याचा कालापव्यय झाला. दरम्यान युसुफ आदिलशहा हा बुरहाणपूराहून गावील येथे येऊन पोहोचला. आपण कोणत्या भयंकर परिस्थितीत सापडलो आहोत याची अमीर बरीदला आता जाणीव झाली. त्याने आपली छावणी तशीच सोडली आणि फक्त काही अनुचर बरोबर घेऊन त्याने सुलतान महमूदशहाला

बरोबर घेऊन पलायन केले. वऱ्हाडच्या फौजेने त्याची छावणी लुटून फस्त केली. युसुफ आदिलशहाने इमादउल्मुल्क याचा निरोप घेतला आणि जवळजवळ तीन महिन्यांच्या अनुपस्थितीनंतर तो विजापुराकडे परत फिरला. आपल्या शत्रूकडून आपल्याला आता काही भय नाही याबद्दल तो निश्चिंत झाला आणि त्याने सार्वजनिक-रित्या शिया पंथाचे आचार-विचार आचरणात आणण्यास पुन्हा सुरुवात केली. आणखी प्रदेश जिंकून आपल्या राज्याची वाढ करण्याचा विचार त्याने मनातून काढून टाकला आणि आपले सारे लक्ष त्याने राज्यातील परिस्थितीमध्ये सुधारणा घडवून आणण्याकडे केंद्रिभूत केले. या सुमारास त्याने पर्शियाचा राजा शहा इस्माईल सफवी याजकडे आपला वकील सय्यद अहमद हिरवी याला नजराणा आणि स्नेह-संबंधाचे निदर्शक असे आदेश देऊन रवाना केले आणि आपल्याला शिया पंथाच्या संस्थापनेमध्ये आलेल्या यशाचा वृत्तांत देणारी हकीकत त्याला कळविली.[२८५□]

(३४) हिजरी ९१५ | इ. स. १५१० | हिजरी ९१५ या वर्षी फिरंग्यांनी गोवा शहरावर अचानक हल्ला केला आणि गोव्याचा सुभेदार आणि अनेक मुसलमान प्रजाजन यांना ठार मारले. ह्या घटनेचा वृत्तान्त कळताच युसुफ आदिलशहाने अतिशय झपाट्याने ३००० निवडक दक्षिणी आणि परदेशी [३] (३०) सैनिकांना बरोबर घेऊन कूच केले आणि फिरंग्यांवर अचानक हल्ला करून किल्ला पुन्हा ताब्यात घेतला [२८६□] आणि अनेक फिरंग्यांना ठार मारले. तथापि काही फिरंग्यांनी आपल्या जहाजांत बसून समुद्राकडे पळून जाण्यात यश मिळविले. गोव्याच्या संरक्षणाची भरपूर तरतूद केल्यानंतर युसुफ आदिलशहा विजापूरला परतला. विजापूर येथे जलोदराच्या विकाराने त्याला मृत्यू आला. त्यावेळी त्याचे वय ७५ वर्षांचे होते. त्याने एकंदर २१ वर्षे मोठ्या वैभवाने राज्य केले. सय्यद अहमद हिरवी हा आदिलशहाच्या दरबारी मंडळींपैकी एक बराच काळ आदिल-शहाच्या दरबारात वास्तव्य करून होता. युसुफ आदिलशहा याच्या अंगी मुत्सद्दीपणा होता आणि मानवी स्वभावाचे त्याला नैसर्गिकतया आकलन करता येत असे, असे सय्यद अहमद हिरवी याने आपल्याला सांगितले असे शहा ताहिर म्हणतो. त्याच-प्रमाणे त्याला उत्तम व्यक्तिमत्त्व लाभले होते. त्याच्या अंगी उत्कृष्ट वक्तृत्वकला होती आणि ज्याप्रमाणे विद्वान म्हणून त्याला कीर्ती लाभली होती तितकीच औदार्य आणि शौर्य या गुणांबद्दल त्याची प्रसिद्धी होती. तो चतुर लेखक होता आणि उत्तम काव्याचा दर्दी आणि जाणकार होता. इतकेच नव्हे तर कधी कधी तो स्वतः काव्य-रचना करी. आदिलशहाच्या काळात संगीतकलेमध्ये जे नावाजलेले अग्रगणी होते त्या सर्वांपेक्षा युसुफ आदिलशहाच्या अंगी संगीताबद्दलची आवड आणि त्यामधील बारकावे जाणून घेण्याची बुद्धिमत्ता अधिक बाणली होती. या संगीताच्या मुकुट-मणींना त्याने भरपूर बिदागी देऊन आपल्या दरबारात हजेरी लावण्याबद्दल आवाहन केले. त्याने स्वतः दोन-तीन वाद्यांवर आपले अप्रतिम हस्तकौशल्य दाखवून सर्वांकडून

वाहवा मिळविली होती आणि अनेकदा संगीताच्या धुंद वातावरणात विहरत असताना त्याने स्वतः रचलेल्या काव्याला आपल्या गळ्यातील सुरांची साथ दिली होती. राजकारणाचा खेळ खेळत असताना जीवनातले सारे सुख त्याने भरपूर उपभोगले परंतु आपल्या राजकीय इर्षेच्या आड त्याने आपली सुखासिनता कधीही येऊ दिली नाही. आपल्या अधिकाऱ्यांना न्यायीपणाने आणि प्रामाणिकपणाने वागण्याबद्दल त्याची नेहमी ताकीद असे आणि तो आपल्या स्वतःच्या वर्तनाने जीवनातील ह्या अमोल मूल्यांशी आपण किती एकरूप झालो आहोत हे दाखवून देत असे. [३] (३१) त्याने पर्शिया, तुर्कस्तान आणि रोम या देशांमधून अनेक विद्वान मंडळी, साहसी कलंदर आणि अनेक नावाजलेले कलाकार आणि कारागीर यांना आपल्या दरबारात स्थायिक होण्यासाठी पाचारण केले. युसुफ आदिलशहाच्या उदार व्यक्तिमत्त्वाच्या छायेत या सर्वांनी सुखाने कालक्रमणा केली. युसुफ आदिलशहाच्या कारकिर्दीत विजापूरच्या किल्ल्याचे बांधकाम भरीव दगडाने करण्यात आले.

( ३५ ) जेव्हा युसुफ आदिलखानाने विजापूरचे स्वतंत्र राज्य स्थापन केले तेव्हा त्याच्या कानावर असे आले की बहमनी राज्याच्या सरकारात मुकुंदराव मराठा आणि त्याचा भाऊ असे दोघेजण अधिकारपदावर होते. त्यांनी अनेक शेतकऱ्यांना आपल्याभोवती जमवून पळ काढला आहे आणि डोंगराळ मुलुखांत मजबूत आणि मोक्याच्या जागांचा त्यांनी आश्रय घेतला आहे व युसुफ आदिलखानाच्या सत्तेला विरोध करण्याचा ठाम निर्धार केला आहे. हे जेव्हा युसुफ आदिलखानाला कळले तेव्हा त्याने २००० घोडेस्वार आणि ५००० पायदळ घेऊन त्यांच्यावर चाल केली. युसुफ आदिलखानाबरोबर झालेल्या युद्धात मुकुंदरावाचा आणि त्याच्या भावाचा पराभव झाला आणि त्यांची बायकामुले युसुफ आदिलखानाच्या हाती लागली. यामध्ये मुकुंदरावाची बहीण होती. तिच्याशी युसुफ आदिलखानाने निक्का लावला आणि तिला बुबुजीखानम ही पदवी दिली. बुबुजीखानमपासून त्याला तीन मुली आणि इस्माईल नावाचा मुलगा झाला. युसुफ आदिलखानानंतर हाच गादीवर आला. तीन मुलींपैकी सर्वांत मोठी मरियम हिचे लग्न अहमदनगरचा बुरहाण निजामशहा बहरी याजबरोबर झाले. दुसरी खुदिजा हिचा विवाह गावील आणि वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमादउल्मुल्क याजबरोबर झाले आणि तिसरी बिबी मुसीती हिचा विवाह यापूर्वीच सांगितल्याप्रमाणे कुलबर्ग्याचा अहमदशहा बहमनी याजबरोबर झाला.[२८७]

## इस्माईल आदिलशहा [३] (३२-३३)

(३६) इस्माईल आदिलशहा हा जेव्हा तख्तावर आला तेव्हा राज्याचा कारभार व्यवस्थित तऱ्हेने करण्या इतके मोठेपण त्याच्या अंगी आले नव्हते. त्यामुळे राज्याच्या कारभाराची सारी सूत्रे कमालखान दख्खनी याच्या हाती

सोपविण्यात आली. कमालखान हा सुलतान महमूदशहा बहमनी दुसरा याच्या दरबारातील एक प्रतिष्ठित उमराव होता. परंतु युसुफ आदिलशहाने आपले स्वातंत्र्य पुकारल्यानंतर कमालखान याने युसुफ आदिलशहाकडे चाकरी पत्करली. युसुफ आदिलशहाने त्याला आपला मिरनोबत केले. यानंतर विजयनगरच्या तिम्मराजा-बरोबरच्या झालेल्या युद्धात त्याने असामान्य शौर्य गाजविले आणि युसुफ आदिल-शहाच्या तो खास मर्जीतला बनून त्याचे दरबारी वजन वाढले, इतके की त्याच्या हाती मुख्य वजिरीचे अधिकार आले. आपल्या अंतःकाळी युसुफ आदिलशहाने त्याला बोलावू पाठविले आणि आपला मुलगा इस्माईल हा वयात येईतोपर्यंत त्याचा राज-प्रतिनिधी म्हणून काम बघण्याची त्याला आज्ञा केली. त्याचप्रमाणें त्याने दर्याखान, फखउल्मुल्क, मिर्जा जहांगीर, हैदर बेग आणि राज्याचे इतर अधिकारी यांना आपापसात एकोप्याने वागण्याचे आणि कमालखानाशी मैत्रीचे संबंध ठेवण्याबद्दल अतिशय कळकळीने आवाहन केले. युसुफ आदिलशहाचा हा आदेश ध्यानात ठेवून हे सर्व कमालखानाला आपला वरिष्ठ मानून त्याला योग्य तो मान देत. त्याचप्रमाणे राज्याची सर्व सूत्रे त्याच्या मार्गदर्शनावर सोपवून त्याने दिलेल्या हुकुमांचे ते पालन करीत.

(३७) कमालखानाने आपल्या नवीन अधिकारपदाचा स्वीकार केल्या [३] (३४) नंतर सुन्नी पंथाची पुन्हा स्थापना करून आपल्या अंगातील मोठ्या धोरणीपणाचा प्रत्यय आणून दिला. त्याच्या या कृतीने त्याने लोकांची मने जिंकली, त्याचप्रमाणे त्याने आपल्या सौजन्यशील वागणुकीने राज्यातील अमिरांचा पाठिंबा आणि निष्ठा संपादन केली. आपल्या शेजारील राष्ट्रांचे अहमद निजामशहा, सुलतान कुली कुतुबशहा आणि अमीर बरीद शहा आदि सुलतानांबरोबर त्याने मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले. युसुफ आदिलशहाने माघार घेतल्यानंतर युरोपियनांनी गोव्याला वेढा दिला होता आणि तेथील सुभेदाराला मोठी लाच चारून गोव्यावर आपला ताबा पुन्हा मिळविला होता. त्यांच्याबरोबरही त्याने तह केला. ही घटना इस्माईल आदिलशहा अल्पवयात सिंहासनावर आल्यानंतर घडून आली होती. सरतेशेवटी युरोपियनांनी समुद्रकिनाऱ्या-वरील इतर शहरे आणि जिल्हे यांना उपद्रव देऊ नये या अटीवर गोव्याचे बंदर त्यांनी आपल्याकडेच ठेवले. याबाबत दोन्ही बाजूत एकमत झाले. यानुसार त्या काळा-पासून पोर्तुगीजांनी गोव्यावर आपला ताबा कायम ठेवला आहे आणि या तहाच्या अटीप्रमाणे वागून आदिलशहाच्या प्रदेशावर कोणत्याही तऱ्हेचे आणखी आक्रमण केलेले नाही.

(३८) याप्रमाणे राज्यकारभाराच्या बाबींचा व्यवस्थितपणे बंदोबस्त केल्यानंतर कमालखानाने राजप्रतिनिधी म्हणून आणखी काही काळ काम पाहिले. दरम्यान दर्याखान आणि फखउल्मुल्क यांचा मृत्यू झाला. तेव्हा त्याने त्यांची जहागीर आपले नातेवाईक आणि आश्रित यांच्यामध्ये वाटून टाकली. त्याशिवाय

त्यांच्याकरता त्यानं मानसन्मान आणि सरकारी नोकऱ्यांची तरतूद केली ते वेगळेच. याच वेळी त्याने आपल्या अनुयायांना बहाल करण्यासाठी म्हणून मिर्जाजहांगीर आणि हैदरबेग यांच्या जहागिरीतील काही परगणे हिसकावून घेतले. राज्याचे जे जे अधिकारी मृत झाले अथवा राजद्रोहाचा गुन्हा शाबीत होऊन ज्या अधिकाऱ्यांना शिक्षा झाली होती त्यांच्या ताब्यातील जमिनी त्याने जप्त केल्या आणि आपल्या माणसांमध्ये वाटून टाकल्या. या मार्गाचा अवलंब करून कमालखानाने आपली सत्ता इतकी वाढविली की त्याला जे उच्च स्थान प्राप्त झाले होते त्यामुळे सरतेशेवटी त्याचे डोके फिरून गेले. सिंहासनच आपण बळकावून घ्यावे अशा तऱ्हेचे विचार [ ३ ] ( ३५ ) त्याच्या मनात येऊ लागले. हा हेतू साध्य करण्याच्या दृष्टीने त्याच्या खुनशी बुद्धीने त्या दिशेने पावले टाकण्याकडे त्याला चालना दिली.

( ३९ ) विश्वासघातकी वजिरांच्या राक्षसी महत्त्वाकांक्षा दक्षिण देशामधल्या कायदेशीरपणे गादीवर आलेल्या सुलतानांना यापूर्वीच भयंकर मारक ठरल्या होत्या. अशा तऱ्हेने गादी बळकाविणारा पहिला मंत्री म्हणजे तिम्मराज. त्याने शिवरायाचा मुलगा, विजयनगरचा तरुण बादशहा याला विष घालून ठार मारले. आपले कुटिल हेतू साध्य करण्यासाठी त्याने बादशहाच्या अल्पवयी भावाला आपल्या हातातील खेळणे बनविले. हळूहळू त्याने राज्यातल्या जुन्या अमिरांची सत्ता झुगारून दिली, आणि सरतेशेवटी आपली सत्ता सर्व राज्यांत प्रस्थापित केली. कासीम बरीद आणि इतर यांनी दुसऱ्या महमूदशहाला नामधारी सुलतान करून सोडले, आणि सरतेशेवटी आपल्या नावे खुत्ब्याचे वाचन करण्याची प्रथा त्यांनी सुरू केली. कमालखानासमोर अशा तऱ्हेने यश मिळालेल्यांची ही सर्व उदाहरणे होती. त्यामुळे त्याचीही बुद्धी चळली. स्वातंत्र्य जाहीर करण्यासाठी लागणाऱ्या सर्व गोष्टींची तरतूद त्यानं केली आणि अमीर बरीद याला मोठ्या धूर्तपणाचे असे पत्र लिहिले. त्यात त्याने असे कळविले की जर तुम्हाला आपल्या राज्याची वाढ करावयाची असेल तर अतिशय उत्तम तऱ्हेची संधी आपणहून चालून आलेली आहे. अहमदनगरच्या राज्यावर अतिशय दुर्बळ अशा सुलतानाचे राज्य आहे आणि वऱ्हाडचा सुलतान इमादउल्मुल्क हा तारुण्याच्या सुखोपभोगात दंग होऊन गेल्यामुळे त्याला आपण काहीतरी लष्करी कामगिरी करून दाखवावी अशा तऱ्हेचे आकर्षण उरलेले नाही. अशा परिस्थितीत तुम्ही जर मला विजापूरचा राजमुगुट मिळवून देण्यासाठी मदत कराल तर अहमदनगरच्या बाबतीत तुमचे जे काही मनसुबे आहेत त्यांचा मी पाठपुरावा करीन. फार काळापासून अमीर बरीदची इच्छा आपल्या सत्तेत वाढ करण्याची होती. त्याने मोठ्या खुषीने कमालखानाच्या बेताला आपली संमती दिली. त्यानुसार दोघांमध्ये परस्पर अनाक्रमणाचा एक गुप्त तह करण्यात आला. या तहाप्रमाणे असे ठरविण्यात आले की यापूर्वी दस्तुर दिनार याच्याकडून काबीज केलेला भीमा नदीपर्यंतचा कुलबर्गा, आळंद, गुंजोटी आणि नळदुर्ग आदीकरून मुलुख अमीर बरीद याला तोडून देण्यात

यावा. उरलेला मुलूख म्हणजे विजापूर, कोकण, मुद्गल आणि रायचूर इतर काही ठिकाणासहित कमालखानाने आपल्या हाती ठेवावा. त्याने इस्माईल [ ३ ] ( ३६ ) आदिलशहाला गादीवरून दूर करावे अथवा त्याचा वध करावा, आणि नंतर त्याला वाटल्यास त्याने विजापूर आणि जैनखानाच्या ताब्यातील मुलूख जिंकून घेण्यासाठी कूच करावे.

(४०) यावर पहिल्या प्रथम अमीर बरीद याने आपला सार्वभौम दुसरा महमूदशहा याला राजवाड्यात कैदेत ठेवले आणि त्याने स्वतः कुलबर्ग्याकडे कूच केले. इकडे कमालखानानेही आपला सुलतान इस्माईल आदिलशहा याला त्याची आई बुबुजी खानम हिजबरोबर विजापूरच्या किल्ल्यात बंदिस्त केले. यानंतर तो स्वतः सैन्यासह सोलापूरवर चाल करून गेला आणि त्याने किल्ल्याला वेढा दिला. वेढा जवळजवळ तीन महिने चालू होता. अहमदनगरकडून कुमक येण्याची काहीही आशा नाही असे जेव्हा जैनखानाने पाहिले तेव्हा त्याने आपली मुलेमाणसे आणि संपत्ती यांच्या सुरक्षिततेची कमालखानाकडून हमी घेतली आणि किल्ला आणि किल्ल्यासभोवारचा ५½ जिल्ह्यांचा त्याच्या ताब्यातील मुलूख त्याने कमालखानाच्या स्वाधीन केला. अशा तऱ्हेने पूर्वी वाटणी होण्याचे कारण पुढीलप्रमाणे होते: जेव्हा बहमनी घराण्याच्या उमरावांनी आपल्या निष्ठेचे जू झुगारून दिले तेव्हा त्या वेळी प्रत्येकाने त्याच्या ताब्यात असलेला मुलूख बळकाविला. त्या वेळी ख्वाजाजहान दक्नी हा परंड्याचा सुभेदार असून त्याच्या हाताखाली ११ जिल्हे होते. त्याचा भाऊ जैनखान हा सोलापूरचा सुभेदार होता. त्याने वरीलपैकी ५½ जिल्ह्यांवर आपला हक्क सांगितला आणि त्याप्रमाणे आपला हक्क शाबीत करण्यासाठी बिदरहून शाही फर्माने मिळविण्यासंबंधी त्याने प्रयत्नही केले. परंतु अहमदनगरच्या बुरहाण निजामशहाच्या पाठिंब्यावर ख्वाजाजहानला ११ जिल्हे आपल्या ताब्यात ठेवण्यामध्ये आणि जैनखानाने बिदरच्या दरबारात ५½ जिल्हे आपल्याकडे देण्यात यावे यासाठी जो डाव टाकला होता तो हाणून पाडण्यात यश मिळाले. सरतेशेवटी अहमदशहा बहमनीच्या मृत्यूनंतर युसुफ आदिलशहा हा ख्वाजा जहान विरुद्ध चाल करून गेला आणि त्याने ख्वाजाजहान दक्नी याला आपला भाऊ जैनखान याला ११ जिल्ह्यांपैकी ५½ जिल्हे तोडून देण्यास भाग पाडले. यावेळी अमीर बरीद कुलबर्ग्याला वेढा देऊन बसला होता. कमालखानाने विजापूरच्या मुलखापैकी कबूल केलेले जिल्हे आणि ठिकाणे विजापूरच्या अधिकाऱ्यांनी त्याच्या [ ३ ] (३७) स्वाधीन केली. यावर सोलापूर येथे कमालखानाला जो विजय प्राप्त झाला होता त्याबद्दल अभिनंदनपर पत्र अमीर बरीद याने त्याला रवाना केले. यावर राजप्रतिनिधीचे काम बघणाऱ्या कमालखानाला पूर्वीपेक्षाही सत्तेची अधिक धुंदी चढली आणि आपल्या सुलतानाला गादीवरून काढून टाकण्याचे आणि राज्य बळकाविण्याचे हेतूने आणि अशा तऱ्हेने त्याने विश्वासघाताने सत्तेचा ग्रास करण्याचे जे कुटिल कारस्थान सुरू केले होते ते पुरे करण्यासाठी तो विजापूरला परतला.

(४१) विजापूरला पोहोचल्यानंतर त्याने दरबारी मंडळीकडून मानवंदना स्वीकारण्यासाठी म्हणून तरुण इस्माईल आदिलशहाला दरबारात आणण्याचा देखावा केला. आपली बाजू बळकट करण्याच्या हेतूने त्याने खासखेल अथवा शाही रक्षक दलाची संख्या ३००० परदेशी सैनिकांवरून ३०० सैनिकांवर आणली आणि उरलेल्यांना एका आठवड्याच्या आत विजापूर सोडून जाण्याचा हुकूम त्याने केला. ह्या हुकुमाचे पालन त्यांनी न केल्यास मृत्यूच्या सजेची आणि त्यांची सर्व मालमत्ता सरकारजमा करण्याची धमकी त्याने त्यांना दिली. आपण अशा तऱ्हेच्या अन्यायाला बळी पडू नये म्हणून हे सर्व दुर्दैवी निराश्रित सैनिक झपाट्याने आणि विलंब न लावता जिकडे जाता येईल तिकडे त्वरेने निघून गेले. आपण गादीवर येण्यामध्ये जे काही प्रमुख अडथळे होते त्यांची अशा तऱ्हेने उचलबांगडी कमालखानाने केली आणि निजामशाही दरबारात रूढ असलेल्या प्रथेचे अनुकरण करून ३००० घोडेस्वारांच्या अधिकाऱ्याला यापुढे तीन हजारी मनसबदार म्हणण्यात यावे असा वटहुकूम त्याने काढला. त्याचप्रमाणे त्याने मोठ्या संख्येने घोडे राऊतांची [२८८□] भरती केली. सरतेशेवटी त्याच्याशी एकनिष्ठपणे वर्तन करील असे २०००० स्वारांचे घोडदळ
सफर १ त्याच्या स्वाधीन झाल्यावर त्याने आपल्या बगलबच्च्यांना १ सफर
हिजरी ९१७ हिजरी ९१७ यावर्षी एकत्र बोलाविले. यामध्ये त्याचा हेतू इस्माईल
एप्रिल २९ आदिलशहाला गादीवरून काढण्यासाठी आपले स्वतःचे नाव
इ. स. १५११ विजापुरात खुत्व्याच्या वाचनामध्ये घालविण्यासाठी शुभ दिवस
कोणता याबद्दल त्यांच्याबरोबर सल्लामसलत करण्याचा होता. बऱ्याच वाद-[३] (३८) विवादानंतर असे ठरले की पुढील महिन्याची म्हणजे रबीउल्अव्वालची पहिली तारीख ही वरील उद्देश साध्य करण्यासाठी शुभमुहूर्ताची म्हणून गृहीत धरावी. परंतु त्याला हे कळले नाही की त्याच्या निरर्थक जीवनाच्या ग्रंथाची शेवटची पाने खरडण्यात नियतीचे टिप्पणदार त्यावेळी गढून गेले होते.

(४२) कमालखानाच्या कुटिल कारस्थानाची खबर जेव्हा इस्माईल आदिल आणि त्याची आई यांच्या कानावर गेली तेव्हा ती दोघेजण अतिशय घाबरून गेली. त्यांचे हितचिंतक जरी अतिशय थोडे होते तरी त्यांच्यावर आलेल्या भयानक प्रसंगातून त्यांची सुटका करण्याची योजना त्यांनी आखली. आदिलशाही घराण्याचे रक्षण व्हावे आणि त्याचे राजकीय वर्चस्व फार काळपर्यंत चालू रहावे ही त्या सर्वव्यापी परमेश्वराचीच इच्छा असल्यामुळे ज्योतिष्यांनी कमालखानापाशी असे निवेदन केले की आकाशात दिसून येणाऱ्या ग्रहताऱ्यांवरून आम्ही असा अंदाज बांधला आहे की चालू महिन्यातील काही दिवस तुमचा बेत पार पाडण्यासाठी म्हणून अतिशय अशुभ आहेत. तेव्हा आमचा तुम्हाला असा सल्ला आहे की तुम्हाला ज्याच्याबद्दल मनात यत्किंचितही संशय आहे अशा माणसाच्या जवळ जाण्याचे तुम्ही टाळावे. या निवेदनाचा कमालखानावर अतिशय परिणाम झाला आणि त्याने शहराची व्यवस्था

बघण्याचे काम आपल्या आश्रितांवर सोपविले. नंतर त्याने शाही राजवाड्याजवळच किल्ल्यामधील एक दिवाणखाना स्वतःच्या राहण्यासाठी मुक्रर केला आणि त्यामध्ये त्याने आपली कुटुंबीय मंडळी आणि अधिकाऱ्यासह आपल्याला जवळ जवळ कोंडून घेतले. ह्यानंतर त्याने किल्ल्याच्या दरवाज्यांना आतून मजबूत अडसर घातले आणि बाहेरच्या बाजूला रक्षक शिपायांचा पहारा ठेवला. याप्रमाणे खबरदारी घेतल्यावर आपल्याला डोकेदुखीचा भयंकर त्रास होत आहे या सबबीखाली तो बरेच दिवस एका खोलीतच राहिला. त्याला असे वाटले की आपण अशा तऱ्हेची खबरदारी घेतल्यामुळे दैवाने त्याच्या नशिबी दुर्दैवरूपी जे ताट वाढून ठेवले होते त्यांतून त्याला सहज निसटून जाता येईल. कमालखानाचा नाश करण्यासाठी राजमातेने ज्या बेताची आखणी केली होती तो सिद्धीस जाण्यासाठी कमालखानाने आपल्यासाठी जी खबरदारी घेतली होती तो पूरक आणि फायद्याची ठरली. आपली योजना सिद्धीस जावी म्हणून तिने इस्माईल आदिलशहाचा मानलेला बाप युसुफतुर्क याला तुम्ही त्याकरता माझ्या प्रतिनिधीची भूमिका स्वीकारावी म्हणून आवाहन केले. युसुफतुर्क याला कमालखानाने अतिशय अपमानास्पद अशी वागणूक दिलेली होती [ ३ ] ( ३९ ) आणि म्हणून तो कमालखानाचा प्राणपणाने द्वेष करीत असे. ह्या वृद्ध आणि अनुभवी अधिकाऱ्याने राजमातेच्या योजनेत सामील होण्यास आपली अनुमती दिली आणि त्याने असे वचन दिले की कितीही संकटे आली तरी कमालखानाला ठार करण्याची जबाबदारी मी आपल्या अंगावर घेईन. राजपुत्रावर जीव ओवाळून टाकण्यासाठी एका ऐवजी परमेश्वराने मला एक हजार वेळा जीवन का दिले नाही याचीच माझ्या मनाला खंत वाटत आहे. कारण ८००० दक्षिणी आणि हबशी लोकांविरुद्ध एकटा माणूस काय करू शकणार त्याची उघडउघड कल्पना आपल्याला करता येईलच. तरीसुद्धा कमालखान हा सिंहासनावर बसल्यास त्या क्षणीच माझा प्राण घेईल याची मला पूर्णपणे कल्पना असल्यामुळे माझ्या सुलतानासाठी यज्ञ म्हणून माझ्या जीविताचा स्वाहाकार करण्याची माझी इच्छा आहे आणि या कामी माझा कशा तऱ्हेने उपयोग होईल हे जाणून घेण्याची मला इच्छा आहे.

(४३) यानंतर राजमातेने आपल्या स्वतःच्या स्त्री-नोकरवर्गापैकी एका वृद्ध स्त्रीला बोलावू पाठविले. तिच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठी कमालखानाने हेर म्हणून त्या स्त्रीला नेमले असल्याचे तिला कळले होते. ती येताच कमालखानाच्या आजारीपणामुळे आपण अतिशय बेचैन झाल्याचा आविर्भाव राजमातेने आणला. त्याला लवकर बरे वाटावे यासाठी त्याच्यावर ओवाळून टाकण्यासाठी आणि त्याच्या प्रकृतीची ख्याली-खुशाली कळावी म्हणून त्या स्त्रीने आपल्यापासून द्रव्य घ्यावे अशी इच्छा राजमातेने प्रकट केली. ती वृद्ध नोकराणी तिच्या महालातून बाहेर पडली आणि काही पावले चालून गेली नाही तोच जणू काही आपल्याला एकाएकी आठवण झाल्याची बतावणी करून राजमातेने तिला माघारी बोलाविले आणि ती म्हणाली की

माझा विश्वासू सेवक युसुफतुर्क याची मनःस्थिती अगदी खचल्यासारखी झाली आहे आणि त्याची इच्छा मक्केच्या यात्रेला जावे अशी आहे. तेव्हा माझ्या मनात असे आहे की तू तुझ्याबरोबर त्याला घेऊन जा आणि त्याला रजा देण्याबद्दल तू कमाल-खानाला गळ घाल. त्याला निरोप देण्यासाठी नेहमीच्या पद्धतीप्रमाणे कमालखानाने आपल्या हाताने त्याला पान [२८९□] द्यावे असाही आग्रह तू धर. कमालखानाला तू असा निरोप सांग की तुम्ही असे केल्यास माझ्यावर आपला हा वैयक्तिक अनुग्रह आहे असे मी समजेन. त्या वृद्ध स्त्रीने या गोष्टीला आपली संमती दर्शविली. [ ३ ] ( ४० ) नंतर ती प्रथम कमालखानाकडे गेली. तिने राजमातेने दिलेली भेट त्याला दिली आणि तिचा निरोप अशा काही पद्धतीने सांगितला की त्यामुळे कमालखान अतिशय खूष होऊन गेला आणि त्याने युसुफतुर्क याला आपल्या महालात येऊ देण्याचा हुकूम केला. युसुफतुर्क सर्वसामान्य पद्धतीनुसार मोठ्या आदबीने आणि लीनतेने पुढे आला आणि त्याने कमालखानाला अभिवादन केले. त्याने कमालखानाच्या स्तुतीपर असे अनेक उद्गार काढले. त्यामुळे कमालखान अतिशय खूष झाला. त्याने युसुफतुर्क याला आपल्याजवळ बोलाविले आणि त्याला पान देण्यासाठी आपला हात पुढे केला. युसुफने आपल्या खांद्यावर ठेवलेल्या कपड्याच्या आच्छादनाखाली आपला हात ठेवला आणि जणू काही आपण पान घेण्यासाठीच जात आहोत अशा बतावणीने तो काही पावले पुढे गेला. त्या कपड्यावर पान ठेवण्यासाठी कमालखानाने आपला हात लांब पुढे केला. तेव्हा युसुफने विजेच्या चपळाईने त्या कपड्याखाली लपविलेला खंजिर बाहेर काढून आपल्या अंगातील सर्व शक्तिनिशी कमालखानाला छातीमध्ये भोसकले. कमालखान जमिनीवर खाली पडला आणि एकदा मोठ्याने कण्हून तावडतोब गतप्राण झाला. यावर त्याचे अनुचर युसुफतुर्कवर धावून गेले आणि त्यांनी खुनी युसुफतुर्कची आणि त्या वृद्ध स्त्रीने युसुफतुर्कजवळ संगनमत करून हे कारस्थान घडवून आणले असावे म्हणून तिची देखील तलवारीने खांडोळी केली.

( ४४ ) कमालखानाच्या आईच्या अंगात पुरुषासारखे मनोधैर्य होते. तिने नोकराचाकरांनी गडबड आणि आरडाओरडा करू नये म्हणून सक्त ताकीद दिली. तिने कमालखानाचे अंगावर पोषाख असलेले प्रेत उशांच्या आधाराने राजवाड्यातील गच्चीवर जणूकाही दरबारी मंडळींच्याकडून अभिवादन स्वीकारण्यासाठी म्हणून मसनदीवर ठेवले. नंतर तिने कमालखानाचा मुलगा सफ्दरखान याला सांगितले की तू खाली जा आणि पहारेकऱ्यांना सांग की शाही दिवाणखान्याला वेढा द्यावा आणि इस्माईलआदिलशहाला पकडावे अशी कमालखानाची आज्ञा आहे. शहराबाहेर असलेल्या फौजेलाही तिने तावडतोब शहरात चाल करून या आणि राजप्रतिनिधी कमालखान याला तुमचा सुलतान म्हणून मानवंदना द्या अशा तऱ्हेचे हुकूम रवाना केले. [३](४१)

(४५) किल्ल्यामधील सैनिकांची संख्या इस्माईल आदिलशहाला कैद करण्या-साठी पुरेशी आहे हे सफ्दरखानाने पाहिले आणि किल्ल्याचे दरवाजे त्याने बंद

—२६

करून घेतले. नंतर बंदुका, तलवारी, भाले आणि धनुष्यबाण वगैरे आयुधांनी सज्ज असलेल्या आपल्या नातेवाईक आणि अनुयायी मंडळींना घेऊन ज्या ठिकाणी इस्माईल आदिलशहा आपली आई आणि इतर कुटुंबीय मंडळी यांना घेऊन राहात होता तेथे जाण्यासाठी त्याने आपला मोहोरा वळविला. राजमातेला असे वाटले की युसुफ-तुर्क आपल्या प्रयत्नांत अयशस्वी झाला आहे आणि म्हणून संतापून जाऊन कमाल-खानाने इस्माईलला गादीवरून काढून टाकण्यासाठी आखलेल्या बेताची अंमल-बजावणी तावडतोब करण्याचे ठरविले आहे. म्हणून तिने युसुफच्या बेताबद्दल आपण अगदी अनभिज्ञ आहोत असे दाखविण्याचे आणि कमालखानाच्या संतापरूपी वादळाचे त्याची प्रशंसा करून आणि त्याला शरणागती देऊन शमन करणेच तूर्त तरी शहाणपणाचे आहे असा विचार केला. परंतु इस्माईल आदिलशहाची दिलशदआगा म्हणून मानलेली आत्या होती. ती युसुफ आदिलशहाच्या कारकिर्दीच्या उत्तरार्धात पर्शियामधून हिंदुस्थानात आली होती. तिने असा विचार प्रकट केला की अशा आणी-बाणीच्या प्रसंगी शरणागतीपेक्षा साहस आणि मनोधैर्य हीच अधिक कामाला येतील. तिने तावडतोब राजवाड्याचे दरवाजे बंद करण्याचा हुकूम दिला आणि आपला खोजा मलिक संडाल याला जनानखान्याच्या बाहेरच्या बाजूस असलेल्या पटांगणात तिचे जे थोडे फार देशबांधव पहाऱ्यावर होते त्यांजकडे पाठविले आणि त्यांना असे कळविले की तुमचा सार्वभौम सुलतान आणि तुमच्याप्रमाणेच ज्याचे पूर्वज पर्शिया-मधून आलेले होते अशा इस्माईल आदिलशहाला सिंहासनावरून काढून टाकण्यासाठी आणि त्याचा आणि त्याच्या सर्व कुटुंबीय मंडळींचा वध करण्यासाठी म्हणून कमाल-खान हा चाल करून येत आहे. तिने म्हणून त्यांना असे आवाहन केले की तुमच्या अंगी जर खरेखुरे पौरुष वास करीत असेल तर तुम्ही शत्रू हा तुमच्यापेक्षा संख्येने अधिक आहे या गोष्टीची दखल न घेता आपला सुलतान इस्माईल आदिलशहा याला देशद्रोही कमालखानाविरुद्ध तुमच्या अंगातील शौर्याला साक्ष ठेवून मदत कराल. मला अशी खात्री आहे की परमेश्वराच्या आशीर्वादाने कमालखानाने आपल्या हलकट कृतघ्न-पणाची जी परिसीमा गाठली त्यात त्याच्यावर आपल्याला सहज मात करता येईल.

( ४६ ) पहाऱ्यावर असलेल्या परदेशी सैनिकांनी आपल्या सुलतानाचे प्राण-पणाने रक्षण करण्याचा निश्चय केला. दिलशद आगा आणि बुबुजी खानम ( राजमाता ) या दोघीजणी पुरुषाचा वेष धारण करून आणि अंगावर चिलखत चढवून [ ३ ] ( ४२ ) व धनुष्यबाणासहित राजवाड्याच्या बाहेर पडल्या. त्यांच्याबरोबर सुलतान इस्माईल आदिलशहा हा देखील होता. त्याच्या मस्तकावर त्याच्या बापाचे पिवळे छत्र जनान्यातील मुर्तफा नावाच्या एका तुर्की स्त्रीने धरले होते.

( ४७ ) दरम्यान कमालखानाचा मुलगा सफ्दरखान हा दरवाजे उघडण्याच्या प्रयत्नात गुंतला होता. त्याच्यावर राजवाड्याच्या भिंतीवरून तुर्की सैनिकांनी बाणांचा वर्षाव करून त्याला तोंड दिले. इस्माईल आदिलशहा आणि जनानखान्यातील स्त्रियांनी





त्यांना साहाय्य केले परंतु शत्रू त्यांच्यापेक्षा संख्येने इतक्या पटीने अधिक होता की त्या शूर तुर्की शिपायांची शत्रूपुढे धडगत लागेल किंवा नाही याबद्दल शंकाच होती. त्यांच्यापैकी अनेकांना बंदुकीच्या गोळ्या लागून ते ठार झाले. बाकीच्यांनी माघार घेतली आणि जिकडेतिकडे निराशेची एकच कर्णकटु किंकाळी घुमली. यापूर्वी किल्ल्याची रखवालदारी मुस्तफाखान आणि सिकंदरखान कुमी यांजकडे होती. ते दुर्बल आणि क्षुल्लक आहेत असे मानून त्यांची हकालपट्टी करण्यायोग्य देखील ते नाहीत असा कमालखानाने विचार केला होता. त्यांनी जेव्हा किल्ल्यात झालेली गडबड ऐकली तेव्हा ते ५० दक्षिणी बंदुक्यांना बरोबर घेऊन राजवाड्याच्या भिंतीच्या पायथ्याशी गेले आणि दिलशदआगाच्या नावे हाक मारीत गच्चीवर चढून जाऊन सुलतानाच्या बाजूने लढणाऱ्या सैन्याला जाऊन मिळाले. जरी कमालखानाच्या सैनिकांना थोपवून धरण्यात सुलतानाच्या बाजूला तात्पुरते यश मिळाले तरी त्यांचा हल्ला यशस्वीपणे परतवून लावणे त्यांना शक्य झाले नाही. दोन्ही बाजूंची अनेक माणसे या धुमश्चक्रं त मृत्युमुखी पडत होती. यावेळी दिलशदआगाने गुप्तपणे आपला एक अनुचर भिंतीवरून शहराकडे रवाना केला आणि शहरातील सर्व परदेशियांना कळविले की तुमचा सुलतान अतिशय मोठ्या संकटात सापडला आहे तरी तुम्ही तावडतोब त्याच्या मदतीसाठी धावून या अशी माझी विनवणी आहे. तुम्ही येत असल्यास तुम्हा सर्वांना राजवाड्यापाठीमागे असलेल्या बुरुजावरून मी आत प्रवेश मिळवून देईन. ही जागा अजून बंडखोरांच्या ताब्यात आली नव्हती. तेव्हा या ठिकाणावरून सुलतानाचे अनेक चाहते धाडशी दिलशदआगाने या सर्व मंडळींनी तो बुरूज चढून यावे यासाठी खाली टाकलेल्या दोरावरून वर चढून आले. असे होता होता राजवाड्यात एकंदर १५० परदेशी तिरंदाज, ५० बंदुकची, १९ तुर्की गुलाम आणि २५ हबशी इतकी मंडळी जमा [ ३ ] ( ४३ ) झाली. दिलशदआगाने डोक्यावर बुरखा घेऊन त्यांच्या बरोबरीने युद्ध केले आणि स्फूर्ती देणारी भाषणे करून त्यांच्या वीररसाला चेतनात्मक प्रेरणा दिली. तिने त्यांना सांगितले की तुम्ही जिद्दीने लढल्यास तुमच्यावर सुलतान मोठमोठ्या मानमरातबांची खैरखैरात करील. राजवाड्यातील मंडळींची संख्या वाढली आहे हे जेव्हा सफ्दरखानाला दिसून आले तेव्हा त्याने अधिक माणसांनी आतमध्ये घुसून जाऊ नये म्हणून आत शिरण्याची सर्व प्रवेशद्वारे आपल्या ताब्यात घेतली आणि राजवाड्याच्या भिंती जमीनदोस्त करण्यासाठी तोफखाना आणून ५०० माणसांसहित राजवाड्यावर निकराने हल्ला चढविला. या हल्ल्यात राजवाड्यातील अनेक माणसे ठार झाली आणि बहुतेक सर्व दक्षिणी आणि हबशी मंडळींनी तटावरून उड्या टाकून पळ काढला. यावर सर्व परदेशी सैनिक छपून राहिले आणि तटाच्या भिंतीपाठीमागे गुपचुपपणे पुढे काय होते याची वाट बघत बसले. ते पळून गेले असावे असे सफ्दरखानाने अनुमान केले आणि राजवाड्याचा बाहेरचा दरवाजा त्याने तोडून काढून मोकळ्या पटांगणात तो घुसला. परंतु राजवाड्याचा आतील दरवाजा उखडून काढण्याच्या प्रयत्नात तो असताना त्या

शूर दिलशद आगाने राजवाड्याच्या गच्चीवरून त्यांच्यावर बंदुकीच्या गोळ्या आणि बाण यांचा एकच वर्षाव करविला आणि हल्लेखोरांमध्ये भयंकर कत्तल घडवून आणली. कमालखानाच्या पक्षातील अनेक प्रमुख मंडळी यामध्ये ठार मारली गेली वा जखमी झाली. एक बाण सफ्दरखानाचा डोळा फोडून आत घुसला आणि ज्या भिंतीवर सुलतान स्वतः उभा होता त्या भिंतीच्या खालीच तो आश्रयाकरता धावला. सुलतानाने हा सफ्दरखान म्हणून त्याला ओळखले, आणि गच्चीमधून त्याच्या डोक्यावर एक मोठा दगड गडगडत लोटून दिला. वरून येणारा दगड आपल्या डोक्यावर पडू नये म्हणून आपले अंग मुडपून सफ्दरखान उभा होता. परंतु त्या दगडाखाली चिरडून तो ठार झाला. आपला पुढारी ठार झाला हे त्याच्या सैनिकांनी पाहिले आणि ते कमालखानाच्या घराकडे पळाले. तेथे गेल्यावर त्यांना कळले की कमालखानसुद्धा ठार झाला आहे. यावर त्यांनी किल्ल्याचे दरवाजे उघडले व निरनिराळ्या दिशांकडे त्यांनी पलायन केले. खुश्रवखान तुर्क हा युसुफ आदिलशहाचा अतिशय विश्वासू गुलाम होता. त्याने बघितले की [ ३ ] ( ४४ ) राजवाड्याबाहेर असलेल्या शत्रूची संख्या फार मोठी आहे. तेव्हा त्याने दरवाजा पुन्हा बंद केला. नंतर दिलशदआगा हिने सुचविल्यावरून कमालखान आणि त्याचा मुलगा यांची मस्तके तिने सबंध शहरातील रस्त्यावरून फिरविण्यासाठी आणि लोकांच्या नजरेस दोघांच्या मृत्यूची गोष्ट आणण्यासाठी म्हणून एका रक्षकाबरोबर हल्ला करण्याच्या जागेवर पाठविली. यानंतर महमद ऐनउलमुल्क याने कमालखानाच्या सर्व प्रमुख मंडळींना एकत्र जमा केले आणि आपली घरेदारे सोडून ते शहराबाहेर पळून गेले. ऐनउल्मुल्क याने सफ्दरखानाला आपली मुलगी विवाहादाखल दिली होती. सरतेशेवटी बंडखोरांचा शहरामधून पूर्णपणे उच्छाद करण्यात आला. यानंतर सुलतान स्वतः आपला मानलेला बाप युसुफ याच्या मृत देहाला बरोबर घेऊन बाहेर आला आणि त्याच्या प्रेताचे दफन त्याने पूज्य अशा ऐनउद्दीन जुनैदी याच्या कबरी-जवळ करविले. यानंतर त्याने गोरगरिबांना दान वाटले आणि आपल्या विश्वासू सेवकाला ज्या ठिकाणी पुरण्यात आले होते त्या जागी एक घुमट उभारण्याची आज्ञा दिली. त्याचप्रमाणे एक मशीद बांधण्यासाठी त्याने हुकूम केला आणि सरकारी जमिनी त्या मशिदीचा खर्च चालविण्यासाठी नेमून दिल्या. आपल्या सर्व कारकिर्दी-भर इस्माईल आदिलशहा हा महिन्यातून एकदा या कबरस्थानास नियमितपणे भेट देत असे.

( ४८ ) दुसऱ्या दिवशी सकाळी दिवस उजाडता उजाडता सुलतान सिंहासना-रूढ झाला आणि त्याने लोकांची मानवंदना स्वीकारण्यासाठी दरबार भरविला. यासमयी दरबारातील सर्व अधिकारी आणि शहरातील सर्व रहिवाशी यांनी सुलतानाला मानवंदना दिली आणि आपल्या मानाप्रमाणे आणि कुवतीप्रमाणे सुलतानाला नजराणे अर्पण केले. शेजारील राष्ट्रांना खलिते पाठविण्यात आले. त्या खलित्यात कमाल-खानाचा मृत्यू कसा ओढवला आणि सुलतानाची सुदैवेकरून त्याच्या तावडीतून कशी

सुटका झाली याबद्दल इकीकत कळविण्यात आली. अमीर बरीदला ही हकीकत जेव्हा कळली तेव्हा त्याने कुलबर्ग्याचा वेढा उठविला. विजयनगरच्या तिम्मराजाने विजापुरातील गडबडीचा फायदा घेऊन विजापूरच्या प्रदेशावर आक्रमण केले होते. तो मात्र रायचूर समोरच रेंगाळत राहिला. इस्माईल आदिलशहा हा आपल्या सरकारची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याच्या कामात पूर्णपणे गुंतून राहिला असल्यामुळे रायचूरकडे त्याला मदत पाठविता आली नाही त्यामुळे रायचूरमधील शिबंदीने [ ३ ] ( ४५ ) अखेर शत्रूला शरणागती दिली.

( ४९ ) इस्माईल आदिलशहाने प्रथम कामगिरी केली ती ही की नुकतीच त्याच्यावर जी भयानक आपत्ती कोसळली होती त्यावेळी त्याला मदत करणाऱ्या सर्वांना त्याने बक्षिसी दिली. नंतर त्याने मिर्जा जहांगीर, रावजंग हैदरबेग आणि राज्यातील इतर उमराव जे कमालखानाच्या जाचणुकीला कंटाळून राज्य सोडून पळून गेले होते त्यांना पत्रे पाठविली आणि आपल्या दरबारात येण्याचे व आपापल्या जागांवर रुजू होण्याचे त्यांना त्याने आमंत्रण दिले. थोर राजाला शोभेलसा मनाचा उदारपणा त्याने दाखवून कमालखानाची आई आणि त्याच्या कैद करण्यात आलेल्या इतर कुटुंबीय मंडळींच्या अपराधावर त्याने क्षमारूपी लेखणीची रेघ ओढली म्हणजे त्याने त्यांच्या अपराधांची क्षमा केली. त्याने त्या सर्वांना भरपूर रक्कम दिली आणि त्यांना विजापूरचे राज्य सोडून जाण्यास फर्माविले. ज्या ज्योतिष्यांनी कमालखानाला त्याच्यावर ओढवणाऱ्या भयानक भवितव्याचे ज्योतिष वर्तवून दिले होते त्या सर्वांना त्याने आपल्या चाकरीत रुजू करून घेतले. इस्माईल आदिलशहाचा बाप युसुफ आदिलशहा याच्यावेळची सर्व जुनी जाणती मंडळी सगळीकडून विजापुरास येऊ लागली आणि त्यामुळे इस्माईल आदिलशहापाशी कणखर तुर्की आणि मोगल लोकांचा एक शूर सेनासमुदायच जमा झाला. इस्माईल आदिलशहावर आलेल्या संकटातून त्याची सुटका करणाऱ्यांपैकी खुश्राव तुर्क हा एक होता. त्याला इस्माईल आदिलशहाने आसदखान ही पदवी देऊन त्याचा सन्मान केला आणि बेळगाव त्याला जहागिरीदाखल दिले. इस्माईल आदिलशहा बंदिवासात असताना त्याने दक्षिणी अथवा हबशी लोकांना आपण चाकरीत घेणार नाही अशी प्रतिज्ञा केली होती. आपली प्रतिज्ञा त्याने पुढे जवळजवळ १२ वर्षेपर्यंत पाळली. या काळात त्याने परदेशी माणसांखेरीज इतर कोणाचाही आपल्या सैन्यात भरणा केला नाही. परंतु सरतेशेवटी त्यांनीच विनंती केल्यामुळे प्रथम त्याने हिंदुस्थानात परदेशी लोकांच्या जन्म झालेल्या मुलांची सैन्यात भरती करण्यास परवानगी दिली आणि नंतर थोडया थोडया प्रमाणात दक्षिण देशाचे जे मूळचे रहिवाशी नाहीत अशा अफगाण आणि रजपूतांची सैन्यात भरती करण्यास त्याने संमती दिली. या प्रथेचे दुसऱ्या इब्राहीम आदिलशहाच्या कारकिर्दीपर्यंत आदिलशाही दरबारात अतिशय काटेकोरपणे पालन करण्यात आले.

( ५० ) मिर्जा जहांगीर विजापूरच्या दरबारात परत आल्यावर आदिलशहाने

त्याला कुलबर्ग्याचे जिल्हे जहागिरीदाखल दिले. त्याने अमीर बरीदच्या [३] (४६) सैन्याची हाकलपट्टी केली. अमीर बरीदने आपले ४०० सैनिक या संघर्षात गमावले. त्याचप्रमाणे त्याने नुस्रताबाद सागर आणि एटगिरचे किल्लेही पुन्हा जिंकून घेतले आणि कमालखानाच्या राजप्रतिनिधित्वाच्या कालखंडात विजापूरचा जेवढा म्हणून मुलूख शत्रूने जिंकून घेतला होता तेवढा त्याने सर्वच्यासर्व पुन्हा आपल्या ताब्यात आणला. आपल्या ताब्यातील प्रदेश गेल्याचे पाहून अमीर बरीदला अतिशय संताप आला, आणि त्याने महमूदशहाच्या नावे दक्षिणेतील सर्व सुलतानांना आज्ञापत्रे पाठवून मदतीसाठी येण्याचे आवाहन केले. यावर बुरहाण निजामशहा, सुलतान कुलीकुतुबशहा आणि अलाउद्दीन इमादशहा यांनी बहमनींच्या निशाणाखाली सामील होण्यासाठी हिजरी ९२० ) आपापल्या सैन्याच्या तुकड्या रवाना केल्या. हिजरी ९२० यावर्षी इ. स. १५१४ ) अमीर बरीद याने बहमनी सुलतानाला अहमदाबाद बीदर येथून विजापूरच्या दिशेने जवळजवळ २५ हजारावर घोडेस्वारांची फौज घेऊन कूच करून जाण्यास भाग पाडले.

(५१) ही फौज त्याच्या दोस्तांच्या सैनिकांची मिळून बनलेली होती. विजापूरच्या मार्गावर त्यांनी भयंकर लुटालूट केली आणि अत्याचार केले. शत्रूला कोणताही प्रतिकार होऊ न देता इस्माईल आदिलशहाने अल्लापूर या गावापर्यंत येऊ दिले. हे शहर युसुफ आदिलशहाने बांधलेले होते, आणि विजापूरपासून ते दीड मैल अंतरावर होते. शत्रूसैन्य या गावाशी येईतोपर्यंत विजापुरातच राहणे शहाणपणाचे आहे असे त्याने ठरविले. परंतु शत्रू या गावी पोहोचताच त्याने शहर सोडले आणि बारा हजार सैन्य घेऊन तो बाहेर पडला. यामध्ये बहुतेक सर्व परदेशी घोडेस्वार होते. या सैन्याने शत्रूवर हल्ला चढविला. शत्रू आपल्यापेक्षा संख्येने वरचढ आहे या गोष्टीची तमा न बाळगता विजापूरच्या सैन्याने शत्रूचा संपूर्ण पराभव केला. शत्रूने रणांगणातून पळ काढला. महमूदशहा आणि त्याचा मुलगा अहमद हे दोघे लढाई चालू असताना रणांगणात घोड्यावरून खाली पडले. त्या दोघांना शत्रूचे सैनिक तसेच सोडून निघून गेले. पळणाऱ्या सर्व शत्रूसैनिकांचे सामानसुमान विजयी सैन्याच्या हाती पडले. बहमनी सुलतानावर ओढवलेली ही परिस्थिती जेव्हा इस्माईल आदिलशहाच्या कानावर गेली तेव्हा तो स्वतः त्याला मानवंदना करण्यासाठी गेला. त्याने त्याला घोडे आणि हिरे बसविलेले लाकूड-सामान वगैरे वस्तूंचा नजराणा अर्पण केला. आपण [ ३ ] ( ४७ ) तुम्हाला मोठ्या बडेजावाने पालखीत बसवून विजापूरला घेऊन जातो आणि अमीर बरीदच्या जाचातून तुमची सुटका करतो असेही त्याने त्याला सांगितले. परंतु महमूदशहाने विजापूर शहरात प्रवेश करण्यास आपली संमती दिली नाही आणि तो अल्लापूर नजीक छावणी देऊन राहिला. या ठिकाणी युद्धामध्ये घोड्यावरून पडल्यामुळे झालेल्या जखमा बऱ्या होईपर्यंत काही काळ तो राहिला. त्याने नंतर आदिलशहाला अशी विनंती केली की माझा मुलगा अहमद आणि तुमची बहीण बिबी मुसीती या

दोघांचा साखरपुडा यापूर्वीच झाला आहे. त्या दोघांचा विवाहसमारंभ आता उरकून घ्यावा. इस्माईल आदिलशहाने विवाहसमारंभ उरकून घेण्याला आपली संमती दिली. लग्नसमारंभ साजरा करण्यासाठी कुलबर्ग्याचे प्राचीन शहर नियुक्त करण्यात आले. दोन्ही सुलतानांनी कुलबर्गा येथे प्रयाण केले. तेथे मोठ्या थाटामाटात लग्नसमारंभ साजरा करण्यात आला. वधूची पाठवणी राजपुत्र अहमद याच्याकडे करण्यात आली. शाही जोडप्याबरोबर हजर राहण्यासाठी म्हणून ५ हजार घोडेस्वारांचे एक पथक इस्माईल आदिलशहाने पाठविले. हे ५ हजार घोडेस्वार महमूदशहाबरोबर अहमदाबाद बीदर येथे गेले. त्यांच्या आगमनाबरोबर अमीर बरीद शहर सोडून पळून गेला. यानंतर काही काळपर्यंत दुसऱ्या महमूदशहा बहमनीने स्वातंत्र्यसुखाचा मनसोक्त आस्वाद घेतला. त्याची त्याचा वजीर अमीर बरीद याच्या तावडीतून काही काळपर्यंत सुटका करण्यात आली. परंतु विजापूरच्या सैन्याने बीदर सोडले न सोडले तोच अमीर बरीद तेथे पुन्हा परतला आणि त्याने पूर्वीप्रमाणेच राज्याचा कारभार पुन्हा आपल्या हाती घेतला.

(५२) ह्या गोष्टी होण्यापूर्वी काही वर्षे पर्शियाचा सुलतान शहा इस्माईल सफवी याने हिंदुस्तानातील निरनिराळ्या राज्यांत आपले वकील पाठविले होते. विजयनगरचा राजा आणि गुजराथेचा सुलतान यांनी या वकिलांचा योग्य तो मानमरातब राखला. याच वेळी महमूदशहाकडेही सफवीचा वकील आला. महमूदशहाने त्याची योग्य ती आदब राखली. त्याला उंची नजराणे देऊन निरोप देण्याचा महमूदशहाचा बेत होता परंतु तसे करण्यास त्याला अमीर बरीदने प्रतिबंध केला. अशा तऱ्हेचा प्रसंग ओढवला असताना त्या वकिलाने इस्माईल आदिलशहाला लिहून आपल्याला [ ३ ] ( ४८ ) अहमदाबाद बीदर येथे अटकाव करून ठेवले आहे अशी तक्रार केली. पर्शियाच्या वकिलाची ताबडतोब सुटका करण्यात यावी अशी मागणी विजापूरच्या सुलतानाने केल्यावर वकिलाला जाण्यासाठी परवानगी देण्यात आली. हा वकील नंतर विजापूर येथे आला. अल्लापूर येथे इस्माईल आदिलशहाने त्याची गाठ घेतली. आदिलशहाने उंची भेटी त्याला देऊन त्याचा सत्कार केला आणि दाभोळच्या बंदरापर्यंत त्याच्या इतमामाला साजेल इतक्या माणसांचे पथक त्याच्या बरोबर देण्यात आले. दाभोळहून त्याने आपल्या पर्शियाच्या परतीच्या प्रवासाला सुरुवात केली. आपल्या वकिलाची (हिजरी ९२५ इ. स. १५१९) इतकी देखभाल केल्याबद्दल पर्शियाच्या सुलतानाने हिजरी ९२५ या वर्षी आपला एक थोर अधिकारी इब्राहीम बेग तुर्कमान याची रवानगी पत्रे आणि नजराणे देऊन इस्माईल आदिलशहाकडे केली. या नजराण्यामध्ये मौल्यवान हिरे बसविलेली एक तलवार होती. या पत्रात पर्शियाच्या बादशहाने इस्माईल आदिलशहाचा स्वतंत्र सुलतान म्हणून उल्लेख केला त्यामुळे आदिलशहा या वकिलाला भेटण्यासाठी राजधानीपासून १२ मैल सामोरा गेला. आपल्या सार्वभौमत्वाला पर्शियाच्या बादशहाने जी श्रेष्ठत्वाची मान्यता दिली होती त्यामुळे इस्माईल आदिलशहा

अतिशय खूष झाला. त्याने मोठ्या सन्मानाने आणि थाटामाटाने इब्राहीमबेगचे स्वागत केले, आणि आपल्या सैन्यातील अधिकाऱ्यांना १२ कोन असलेली शेंदरी रंगाची शिरस्त्राणे परिधान करण्याचा हुकूम केला. शेखसुफी याचे अनुयायी अशाच तऱ्हेच्या पोशाखावरून इतरांपासून ओळखले जात असत. त्याने अशीही आज्ञा दिली की प्रत्येक शुक्रवारी सुटीच्या दिवशी पर्शियाच्या राजघराण्याचे अभिष्टचिंतन करण्यासाठी मशिदीमधून प्रार्थना म्हटली जावी.

(५३) हिजरी ९२७ इ. स. १५१९ } हिजरी ९२७ या वर्षी विजयनगरच्या राजापासून मुद्गल आणि रायचूर जिंकून घेण्यासाठी कूच करण्याची इस्माईल आदिलशहाने तयारी केली. विजयनगरच्या राजाला ह्या बेताची अगोदरच माहिती मिळाल्याने त्याने मोठी फौज घेऊन कूच केले, आणि कृष्णा नदीच्या तीरावर आपली छावणी दिली. तेथे त्याला त्याचे अनेक मांडलिक येऊन [३] (४९) मिळाले. त्याच्याजवळ आता जवळ जवळ ५० हजार घोडेस्वार आणि असंख्य पायदळी सैनिक जमा झाले. विजयनगरच्या राजाच्या सैनिकांनी कृष्णा नदी ओलांडून जाण्यासाठी असलेला सर्व गलबतांचा ताबा मिळविलेला असल्या कारणाने इस्माईल आदिलशहाच्या मनात ही मोहीम पुढे ढकलावी की काय असा विचार आला. परंतु एकदा तंबू ठोकल्यावर मोहिमेला उशीर करणे म्हणजे त्यात आपली मानहानी आहे असा विचार त्याने केला. म्हणून त्याने ७ हजार घोडेस्वार घेऊन कूच केले आणि हिंदूंची छावणी असलेल्या नदीच्या किनाऱ्यासमोरच्या किनाऱ्यावर त्याने आपली छावणी दिली. त्याच्या घोडदळात बहुतेक सर्व परदेशी सैनिक होते. या ठिकाणी नदी तरून जाण्यासाठी तराफे बांधून होण्याची वाट पहात आणि नंतर शत्रूवर हल्ला करण्याच्या विचाराने तो तेथेच मुक्काम करून राहिला. या ठिकाणी आल्यावर काही दिवसांनी आपल्या राहुटीत तो विश्रांती घेत बसला असताना तंबूच्या बाहेर असलेल्या त्याच्या एका दरबारातील अधिकाऱ्याने म्हटलेली पुढील कविता त्याच्या कानावर पडली. ती अशी, " हे राजा ऊठ आणि धुळीमध्ये पेला पडून त्याचा चक्काचूर होण्याच्या आंत हा सोन्याचा चषक तू आनंदरूपी मद्याने काठोकाठ भर. " या कवितेपासून सुलतानाला जणू काही स्फूर्ती मिळाल्यासारखे झाले. त्याने आपल्या खास मर्जीतल्या मंडळींना बोलाविले. मौजरूपी गालिचा जणू काही त्याने आपल्यासमोर पसरला आणि संगीत आणि मद्य यापासून मिळणाऱ्या सुखोपभोगांचा एकच जल्लोष त्याने उडवून दिला. याप्रमाणे चाललेली मेजवानी वाजवीपेक्षा जास्त काळ चालली, आणि मद्यामुळे येणाऱ्या धुंदीचे परिणाम तेथे जमलेल्या सर्वांवर दिसून येऊ लागले. तेव्हा आपण आता नदी ओलांडावी आणि शत्रूवर हल्ला करावा या कल्पनेने त्याला घेरले. याप्रमाणे त्याने आपल्या लष्करी अधिकाऱ्यांना बोलावून नावा आणि तराफे तयार करण्यास इतका विलंब का लागत आहे याचे कारण त्यांना विचारले. त्यांनी उत्तर दिले की १०० जहाजे जवळजवळ तयार झाली आहेत व उरलेली थोडयाच दिवसांत तयार होतील. मेजवानीची धुंदी सुलतानाच्या डोळ्यांवर

अगोदरच चढलेली होती. त्याने ताबडतोब नदी ओलांडून जाण्याचे टरविले. आपले बेत कोणाला कळवू न देता तो हत्तीवर आरूढ झाला आणि जणू काही आपण देखभाल करण्यासच जात आहोत अशा मिषाने त्याने नदीच्या बाजूने कूच केले. परंतु एकाएकी त्याने असा हुकूम दिला की जितक्या सैनिकांना तराफ्यामध्ये जाता येईल तेवढ्यांनी ताबडतोब जावे आणि इतरांनी माझ्या हत्तीच्या पाठोपाठ यावे. [ ३ ] ( ५० ) अशा तऱ्हेने बाका प्रसंग ओढवून आणण्यात किती भयंकर धोका आणि अविवेक आहे हे सुलतानाला त्याच्या अधिकाऱ्यांनी पटवून देण्याचा निरर्थक प्रयत्न केला. परंतु सुलतानाने यावर काहीच उत्तर न देता आपला हत्ती नदीच्या प्रवाहात घातला. ताबडतोब त्याच्या पाठोपाठ २५० हत्तींवर बसून त्याचे काही अधिकारी आणि सैनिक गेले. त्यांचे दैव मोठे बलवत्तर म्हणून ते सुखरूप नदीच्या पलीकडील तीरावर पोहोचले आणि शत्रू त्यांना प्रतिकार करण्यास सिद्ध होईपर्यंत नदी ओलांडून जाणे ज्या दोन ठिकाणाहून शक्य होते तेथून तराफे आणि नावा यात बसून अनेक शिपायांनी त्याच वेळी नदी पार केली. परंतु हिंदूंची संख्या एवढी प्रचंड होती की सुलतानाला जय मिळण्याची यत्किंचितही आशा नव्हती. कारण त्याला प्रतिकार करण्यासाठी शत्रूचे ३० हजार सैन्य खडे होते तर त्याच्यापाशी दोन हजारावर देखील सैनिक नव्हते. परंतु इस्लामच्या वीरांनी एकदिलाने जणू काही भारून गेल्याप्रमाणे शत्रूविरुद्ध अशी काही तलवार गाजविली की काफरांचे १ हजार सैनिक रणांगणात पडले. त्यामध्ये विजयनगरचा मुख्य सेनापती संगतराय हा होता. परंतु विजयनगरच्या सैनिकांनी मुसलमानांवर तोफा, बंदुका आणि हातगोळे यांचा इतका प्रचंड भडिमार केला की त्यांच्यापैकी निम्मे सैनिक गारद झाले आणि उरलेल्यांनी जीव वाचविण्याच्या आशेने नदीमध्ये उड्या टाकल्या. सुलतानाबरोबर त्याच्याच हत्तीत बसून तुरसुन बहादूर आणि इब्राहीम बेग हे नदी पार करून गेले होते. त्यांनी हत्तीला नदीच्या प्रवाहातून पुढे काढण्याचा प्रयत्न केला. नदीच्या प्रवाहाला इतकी ओढ होती की हा आणि इतर सात हत्ती सोडून सर्व हत्ती पाण्यात बुडाले. सुलतानाने हा जो अविवेक दाखविला होता त्याबद्दल त्याला एवढे भयंकर नुकसान सोसावे लागून कडक अशी शिक्षा मिळाली. आपल्यावर पराजयाचा हा कलंक लागलेला आहे त्याची नावनिशाणी पुसली जाईपर्यंत दारूला स्पर्श करणार नाही अशी गंभीर प्रतिज्ञा सुलतानाने केली. आपल्यावर हे जे दुर्भाग्य कोसळले होते त्याची हानी भरून काढण्यासाठी म्हणून त्याने आपल्या स्वतःला पूर्णपणे वाहून घेतले.

( ५४ ) विजयनगरबरोबर झालेल्या लढाईत मिर्जा जहांगीर हा ठार झाला होता. या युद्धातील हानी भरून काढण्यासाठी कोणत्या उपाययोजनांची [३] (५१) आवश्यकता आहे यासाठी सुलतानाने आसदखानाकडे सल्ला विचारला. आसदखानाने उत्तर दिले की, आपली हानी भयंकर झालेली आहे. आपली फौजदेखील नाउमेद झाली आहे. अशा परिस्थितीत विजापूरला परतणे हे माझ्या दृष्टीने योग्य आहे. तेथे

गेल्यावर बुरहाण निजामशहाशी मैत्री करून आपण आपली बाजू बळकट करावी. आपल्या हद्दीवर ठाण मांडून बसलेला आपला शत्रू अमीर बरीद याची सरहद्दीवरून हकालपट्टी करावी आणि मगच शत्रूचा सूड घेण्याचे विचार मनात आणावे. तोपर्यंत त्याचा विचार देखील करू नये असे मला वाटते. वरील उद्दिष्टे एकदा साध्य झाल्या-नंतर मग काफरांना शिक्षा लावण्याचे काम सहजगत्या हाती घेता येईल. हा सल्ला सुलतानाला पटला आणि त्याने कृष्णेच्या तीरावरून विजापूरकडे कूच केले. त्याने आसदखानाला **सिपाह सालार** ही पदवी बहाल केली, त्याच्या जहागिरीत अनेक जिल्ह्यांची भर टाकली, आणि राज्यकारभाराच्या सर्व महत्त्वाच्या बाबतीत त्याने आसदखानाला आपल्या प्रमुख सल्लागाराचे स्थान दिले

( ५५ ) पर्शियाच्या बादशहाकडे यापूर्वी इस्माईल आदिलशहाने सय्यद अहमद हिरवी याला आपला वकील म्हणून रवाना केले होते. त्याला त्याने आता अहमदनगर आणि विजापूर या राज्यांमधील मित्रत्वाचे संबंध अधिक दृढ करण्यासाठी म्हणून आपला वकील या अधिकारात अहमदनगरकडे पाठविले. शहरानजीक शहा ताहिर आणि इतर प्रमुख सरदार यांनी त्याची भेट घेतली. नंतर बुरहाण निजामशहाने त्याची भेट घेतली. सय्यद अहमदचा त्याने मोठा मानमरातब करून सत्कार केला. यापूर्वीच परस्परांमध्ये पत्रांची देवाणघेवाण आणि इतर बोलणीचालणी झाली होती. या भेटीत असे ठरविण्यात आले की सोलापूर या शहरामध्ये विजापूर आणि अहमदनगर या राज्यांच्या सुलतानांची मुलाखत घडवून आणावी. या भेटीच्या प्रसंगी बुरहाण निजामशहाने इस्माईल आदिलशहाची बहीण बिबी मरीयम हिला मागणी घातली. दोघांचा विवाह समारंभ मोठ्या थाटाने पार पाडण्यात आला. दोन्ही सुलतानांनी हत्ती आणि घोडे आदिकरून अतिशय मौल्यवान नजराण्यांची परस्परांमध्ये देवाणघेवाण केली. दोन्ही राज्यांत याप्रमाणे मैत्रीचा जो तह झाला त्याप्रित्यर्थ आनंदोत्सव सबंध महिनाभर मोठ्या थाटामाटाने साजरा करण्यात ( ३ ) [ ५२ ] आला. हे वर्ष म्हणजे हिजरी ९३० हे होय. यानंतर दोन्ही सुलतानांनी परस्परांचा निरोप घेतला आणि ते आपापल्या राजधान्यांकडे परतले.

रजब
हिजरी ९३०
मे
इ. स. १५२४

(५६) असा दावा सांगितला जातो की, याप्रसंगी दोन्ही राज्यांत जो तह झाला त्या तहात इस्माईल आदिलशहाने आपल्या बहिणीच्या लग्नाचा हुंडा म्हणून बुरहाण निजामशहाला सोलापूरचा [२९०] किल्ला आणि किल्ल्या सभोवारचा ५। जिल्ह्यांचा मुलूख देण्याचे कबूल केले. हा मुलूख कमालखानाने जैनखानाकडून जिंकून घेतला होता. परंतु तहामधील या कलमाची अंमलबजावणी ताबडतोब करण्यात आली नाही हे मात्र निःसंशय होते. काही काळपर्यंत बुरहाण निजामशहाने जाणून-बुजून झालेल्या या चुकवाचुकवीकडे दुर्लक्ष केले. परंतु पुढील वर्षी त्याने वऱ्हाडचा सुलतान इमादशहा आणि बीदरचा प्रतिनिधी अमीर बरीद यांचे सहकार्य मिळविले.

या तिघांनी बरोबर ४० हजार फौज घेऊन सोलापूरला वेढा देण्यासाठी आणि सोलापूर बरोबरचे ५॥ जिल्हे ताब्यात घेण्यासाठी कूच केले.

(५७) या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी इस्माईल आदिलशहाने १० हजार परदेशी घोडेस्वारांचे सैन्य घेऊन चाल केली. दोन्ही सैन्ये जवळजवळ ४० दिवस सोलापूर आणि नळदुर्ग या दोन किल्ल्यांमधील मैदानात छावणी देऊन राहिली. या किल्ल्यांमधील अंतर ४ मैलांएवढेच होते. या ४० दिवसांत दोन्ही फौजांत कोणताच संघर्ष झाला नाही. इस्माईल आदिलशहा दररोज आपल्या फौजेतील ३ हजार परदेशी तिरंदाजांना शत्रूच्या छावणीभोवती घिरट्या घालण्यासाठी आणि शत्रूची रसद तोडून टाकण्यासाठी पाठवीत असे. आपली कामगिरी बजावण्यात या तिरंदाजांना अपेक्षेबाहेर यश आले. त्यावेळी बुरहाण निजामशहाच्या छावणीत परंड्याचा सुभेदार ख्वाजाजहान दख्खनी हा होता. निजामशहाकडून [ ३ ] (५३) कोणत्याच तऱ्हेची हालचाल होत नाही हे दिसून आल्यानंतर तो अतिशय त्रासून गेला. त्याने विजापूरच्या तिरंदाजांवर अचानक हल्ला करण्याचा निश्चय करून आपल्याबरोबर ४ हजार निवडक दक्षिणी घोडेस्वार घेऊन छावणी सोडली. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी विजापूरच्या सैन्यातील परदेशी सैनिकांनी नेहमीप्रमाणे नदीच्या किनाऱ्यावर रात्रीच्या पहाऱ्यासाठी आपापल्या जागा घेतल्या. त्यांनी आपल्या घोड्यांना खुंट्यांना बांधले आणि आपल्या अंगावरील शस्त्रे उतरविली आणि त्यांचे नोकर त्यांच्यासाठी जो उपहार आणणार होते त्याची ते वाट पहात बसले. अशा वेळी जेव्हा रात्रीचा काळोख नुकताच पडू लागला होता तेव्हा ख्वाजाजहान दख्खनी याने देखभाल करणाऱ्या एका तुकडीला बरोबर घेऊन त्यांच्यावर हल्ला केला. परंतु टेहळणीच्या जागेवर असणाऱ्या एका शिपायाने ख्वाजाजहान याला तो विजापूरच्या छावणीपासून नजीक आल्यावर ओळखले, आणि तावडतोब धोक्याची सूचना दिली. विजापुरी सैन्यातील तिरंदाज तावडतोब आपल्या घोड्यावर स्वार होऊ लागले. परंतु ते स्वार होऊन त्यांच्यावर चालून येण्याच्या आतच ख्वाजाजहानने त्यांच्यावर हल्ला केला, आणि त्यांच्यापैकी ३०० जणांना ठार मारले. उरलेल्यांनी आपापल्या घोड्यांना टाच देऊन जलद गतीने पळ काढल्यामुळे त्यांचा जीव ते बचावू शकले. पळणाऱ्या विजापुरी सैनिकांचा पाठलाग करून परतल्यावर ख्वाजाजहानचे दक्षिणी शिपाई विजापूरच्या तिरंदाजांनी ज्या ठिकाणी छावणी दिली होती त्या जागेपाशी आले. तिथे ते घोड्यावरून उतरले आणि त्यांनी छावणीची लुटालूट करण्यास व विस्तवावर भांड्यात जे अन्न शिजत राहिले होते ते खाण्यास सुरुवात केली. अशा तऱ्हेच्या नामुष्कीचा पराभव झाल्यामुळे विजापुरी सैनिकांना आपली अतिशय मानहानी झाल्याचे वाटत होते. त्यांनी या परिस्थितीचा फायदा घेऊन शत्रूवर बाजू उलटविण्याचे ठरविले. शत्रूच्या छावणीवर आपणही अशाच तऱ्हेचा अचानक छापा घालावा असा त्यांनी निश्चय केला. असा हल्ला बुरहाण निजामशहाच्या छावणीवर करण्याचे त्यांनी ठरविले. या निश्चयाप्रमाणे त्यांनी

तावडतोब निजामशहाच्या तळाकडे कूच केले. पहाऱ्यावरील सैनिकांना असे वाटले की, ख्वाजाजहानच्या सैन्याची तुकडीच छावणीकडे परत येत आहे. असा विचार करून त्यांनी या सैनिकांना पुढे जाण्यास परवानगी दिली. तळाच्या मध्यभागी आल्यावर विजापुरी तिरंदाजांनी बाणांचा वर्षाव करून एकच हलकल्लोळ उठवून दिला, आणि ते बुरहाण निजामशहाच्या तंबूच्या दिशेने चाल करून जाऊ लागले. छावणीच्या प्रत्येक भागात यामुळे एकच गोंधळ माजला. मित्र कोण आणि शत्रू कोण [ ३ ] ( ५४ ) यांचीही ओळख पटणे कठिण झाले. विजापूरच्या तिरंदाजांनी अशा परिस्थितीत मनसोक्त कत्तल आणि लुटालूट केली व स्वतःचे फारसे नुकसान होऊ न देता ते माघारी परतले. दुसऱ्या दिवशी सकाळी शत्रूबरोबर सामना देण्यासाठी इस्माईल आदिलशहा चाल करून आला. आदल्या रात्री त्याच्यावर शत्रूचा जो अचानक हल्ला झाला होता त्यामुळे त्याला जी दहशत बसली होती त्याचे परिणाम अजूनही नष्ट झालेले नव्हते. त्याला तोंड देण्यासाठी बुरहाण निजामशहा आणि इमादशहा यांनी आपले सैन्य खडे केले. परंतु ते इतके बेशिस्त होते आणि त्यांच्यामध्ये इतक्या गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली होती की विजापुरी सैन्याने केलेल्या हल्ल्याला तोंड देणे त्यांना अशक्य झाले. इमादशहावर आसदखानाने हल्ला केला. यत्किंचितही प्रतिकार न करता त्याने रणांगणातून पळ काढला. रात्रीची वेळ सोडून दिली तर वऱ्हाडातील त्याच्या ताब्यातील किल्ला गावील येथे पोहोचेपर्यंत त्याने कोठेही मुक्काम केला नाही. बुरहाण निजामशहाही पराभव पावण्याच्या अगदी बेतात होता. परंतु अमीर बरीद याने आयत्या वेळी सहा हजार घोडेस्वारांची ताजी कुमक दिल्यामुळे त्याने आपला प्रतिकार काही काळपर्यंत चालू ठेवला. सरतेशेवटी विजापूरच्या सैन्यातील दोन अधिकारी खूष गेल्डी आगा आणि इस्माईल आगा यांनी दोन हजार घोडेस्वार घेऊन शत्रूची पिछाडी गाठली. त्याच वेळी आसदखानाने शत्रूच्या उजव्या फळीवर हल्ला चढविला. या हल्ल्यामुळे शत्रूच्या आघाडीवर एकच गोंधळ उडून गेला. बुरहाण निजामशहाच्या अंगावरील चिलखताचे ओझे त्याला असह्य झाले. त्याला मूर्च्छा येऊन तो घोड्यावरून पडतो की काय असे वाटू लागले. युद्धाला अशा तऱ्हेची कलाटणी मिळाली तेव्हा काही तुर्की गुलामांनी अहमदनगरचा सुलतान अशा तऱ्हेच्या भयंकर परिस्थितीत सापडल्याचे बघितले. त्यांनी त्याचा घोडा युद्धाच्या मैदानातून बाहेर काढला. यानंतर त्याच्या सैन्याचा पूर्ण विध्वंस होण्यासाठी फारसा अवधी लागला नाही. त्याचे सैन्य रणातून पळ काढू लागले. विजापूरच्या सैन्याने त्याचा पाठलाग सुरू केला. पाठलागात अहमदनगरच्या सैन्यापैकी ३ हजार सैनिक मारले गेले. निजामशहाची राजचिन्हे आसदखानाच्या हाती पडली. त्याशिवाय ४० हत्ती, अनेक तोफा आणि शत्रूच्या सैन्यातील सर्व तंबू आणि सामानसुमान [ ३ ] ( ५५ ) इतकी लूट विजयी सैन्याच्या हाती पडली ती वेगळीच. युद्धातील विजयानंतर इस्माईल आदिलशहाने मोठ्या विजयोन्मादाने विजापूरकडे परत कूच केले. तेथे त्याने एक

महिनाभर आनंदोत्सव साजरा केला. लढाईमध्ये ज्या अधिकाऱ्यांनी अद्वितीय कामगिरी बजावली होती त्यांच्यावर त्याने बक्षिशी आणि मानसन्मान यांची खैरखैरात केली. आसदखानाला त्याने ५ मोठे आणि ६ लहान हत्ती बक्षीस दिले. याच वेळी त्याने आपल्या सैन्यातील प्रत्येक शिपायाच्या पगारात वाढ केली. हा खर्च भागविण्यासाठी म्हणून त्याने त्याच्या सैन्यातील शिपायांच्या जनान्याच्या तनख्याकरता म्हणून लावून दिलेल्या सर्व जमिनी सरकारजमा केल्या. त्याच उद्देशाने त्याने प्रत्येक किल्ल्यापाशी जमा करण्यात येणाऱ्या जकातीपासूनचे निम्मे उत्पन्न लावून दिले एक दिवस त्याला असे सांगण्यात आले की काही अधिकाऱ्यांची अजून सोय लागलेली नाही आणि त्यावर आदिलशहाच्या वजिराने जेव्हा असे सांगितले की इतक्या मोठ्या सैन्याला त्यांचा हल्लीचा पगार देणे हे खजिन्याला झेपण्यासारखे नाही. तेव्हा आदिलशहाने विचारले की माझा जामदारखाना आणि मुदपाकखाना यांचा खर्च चालविण्यासाठी लावून देण्यात आलेल्या जिल्ह्यांची संख्या किती आहे? त्यासाठी एकंदर २४ जिल्हे लावून दिले आहेत याची त्याने शहानिशा केली आणि त्यापैकी निम्मे सैन्याच्या पगारासाठी लावून देण्यात यावे असा हुकूम त्याने दिला. त्याने यावेळी असे उद्गार काढले की माझ्या सैनिकांना तक्रार करण्याला जागा देण्याऐवजी मला जर काही गैरसोयी सोसाव्या लागल्या तर मी ते फार बरे आहे असेच म्हणेन.

(५८) हिजरी ९३५ इ. स. १५२८ } हिजरी ९३५ या वर्षी अमीर बरीदशहाबरोबर संगनमत करून बुरहाण निजामशहाने पुन्हा एकदा इस्माईल आदिलशहाच्या प्रदेशावर आक्रमण केले. परंतु विजापूरपासून २० कोस अंतरावर आसदखानाने त्यांचा पूर्णपणे पराभव केला. या लढाईच्या प्रसंगी परंड्याचा ख्वाजाजहान आणि इतर अनेक मातबर अधिकाऱ्यांना कैद करण्यात आले. आसदखानाने पराभूत सैन्याचा परंड्यापर्यंत पाठलाग केला आणि शत्रूचे बरेचसे सामानसुमान आणि २० हत्ती काबीज केले. या हत्तींमध्ये बुरहाण [३] (५६) निजामशहाची अंबारी [२९१०] वाहून नेणारा हत्ती होता. इस्माईल आदिलशहाने अल्लाबक्ष नावाचा हत्ती वगळून इतर सर्व हत्ती आसदखानाला बक्षिसादाखल दिले आणि आपल्या सेनानीला जी फर्माने त्याने पाठविली त्या सर्व फर्मानांत आसदखानाला फरजंद ही पदवी बहाल करून त्याचा सन्मान केला. याच वर्षी आसदखानाच्या सल्ल्यावरून इस्माईल आदिलशहाने आपली बहीण खुदिजा हिला वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमादशहा याला विवाहादाखल दिले. हा विवाहसमारंभ साजरा करण्यासाठी दोन्ही सुलतानांनी उरसुंगी येथे परस्परांची गाठभेट घेतली. विवाहसमारंभ साजरा झाल्यावर दोन्ही सुलतानांनी आहेरांची देवाणघेवाण केली आणि पुन्हा एकदा आपले संबंध दृढतर झाल्याची परस्परांस ग्वाही देऊन दोघांनी एकमेकांचा निरोप घेतला.

(५९) याच वर्षी गुजरातच्या बहादूरशहाने बुरहाण निजामशहाच्या मुलखावर

स्वारी केली. आपला दोस्त निजामशहा याला मदत म्हणून इस्माईल आदिलशहाने १० लाख होन आणि ६००० घोडेस्वार मदतीदाखल पाठविले. बहादूरशहा आपल्या देशाकडे परत गेल्यावर वरील सैन्य विजापूरकडे परतले. त्यानी आपल्या बादशहापाशी तक्रार केली की अमीर बरीद याने आम्हाला फितविण्याचा प्रयत्न केला आणि आम्हाला असे सांगितले की, विजापूरवर हल्ला करण्यात तुम्ही मला येऊन मिळा. बक्षिसादाखल म्हणून विजापूरच्या जिंकलेल्या प्रदेशापैकी काही भाग देण्याचे मी तुम्हाला वचन देतो. अमीर बरीदच्या या विश्वासघातकी वागणुकीचा इस्माईल आदिलशहाला अतिशय संताप आला, आणि त्याने अमीर बरीदला शासन करण्याचा निश्चय केला. हिजरी ९३६ या वर्षी त्याने आपले हुशार वकील बुरहाण निजामशहाकडे पाठवून त्याच्याबरोबर त्याने पुढीलप्रमाणे तक्रारवजा निरोप पाठविला. तो असा–" अमीर बरीद हा नेहमी माझ्या घराण्याविरुद्ध कारस्थाने करण्यात गुंतलेला असतो. अनेक वेळा त्याने माझ्या शत्रूंना माझ्या राज्यावर स्वारी करण्यासाठी उद्युक्त केलेले आहे. आतापर्यंत त्याच्यावर [ ३ ] (५७) हल्ला करण्यापासून मी स्वतःला परावृत्त केले. परंतु आता मात्र त्याच्यावर हल्ला करण्याचे मी ठरविले आहे. याला कारणे धार्मिक आणि राजकीय बाबीतून उद्भवतात. मला तुम्हाला असे सांगावेसे वाटते की लांडग्याबरोबर सभ्यपणाचे वर्तन करणे किंवा सर्पावर दया दाखवणे हे शहाणपणाच्या अगदी विरुद्ध आहे. म्हणून मला तुम्हाला सरते शेवटी अशी विनंती करावयाची आहे की याप्रसंगी तुम्ही तटस्थपणाची भूमिका घ्यावी आमच्या घराण्याचा पूर्वापार वैरी अमीर बरीद याचा पुरेपूर सूड घेण्याचे काम मी लौकरच हाती घेण्याचे ठरविले आहे." बुरहाण निजामशहावर नुकताच जो प्रसंग ओढवला होता त्यात इस्माईल आदिलशहाकडून त्याला भरपूर मदत मिळाल्यामुळे तो त्याच्या ऋणात होता. साहजिकच आदिलशहाने प्रगट केलेल्या इच्छेला त्याने आपली अनुकूलता दर्शवली. आदिलशहाचे वकील निजामशहाचे होकारार्थी उत्तर घेऊन परतले. यानंतर इस्माईल आदिलशहाने आपल्या नियोजित मोहिमेच्या तयारीला ताबडतोब सुरुवात केली.

हिजरी ९३६ }
इ. स १५२९ }

(६०) इस्माईल आदिलशहाने या मोहिमेसाठी १० हजार घोडेस्वारांचे सैन्य जमा केले. या सैन्यात अरबी, पर्शियन, तुर्क, उजबेग, कुर्द आणि इतर परदेशी सैनिकांचा भरणा होता. आदिलशहाने त्यांना इतकी उदारपणाची वागणूक दिली होती की, त्याच्या हितसंबंधाशी ते पूर्णपणे एकरूप झाले होते. या सैन्यासहित आदिलशहाने अहमदाबाद बीदरच्या दिशेने कूच केले. अमीर बरीद आता वृद्ध आणि अपंग झाला होता. त्याने आपला ब्राह्मण मंत्री हेमाजी याच्या सल्ल्यावरून बीदर किल्ल्याचा ताबा आपला मोठा मुलगा अली बरीद याजकडे सोपविला आणि त्याने स्वतः उदगीरच्या किल्ल्याकडे माघार घेतली.

(६१) अहमदाबाद बीदर शहरानजीक इस्माईल आदिलशहा येऊन पोहोचला

आणि त्याने शहराची सर्व बाजूंनी नाकेबंदी केली. किल्ल्यावरील शिबंदीने त्याच्यावर वारंवार हल्ले चढविले. शिबंदी आणि वेढा देऊन बसलेले सैन्य जवळजवळ तुल्यबळ असल्याने इस्माईल आदिलशहाच्या किल्ला जिंकून घेण्याच्या बेतात पुष्कळ अडथळे आले आणि त्याची म्हणण्यासारखी प्रगती होईना. सरतेशेवटी अमीर बरीदचे मुलगे ५ हजार घोडेस्वारांना घेऊन शहराबाहेर आले. विजापूरी सैन्यात फक्त तिरंदाजांचाच भरणा असल्यामुळे त्यांनी आपल्या ढालीच्या रक्षणाखाली विजापूरी सैन्यावर हल्ला करण्याचे आणि हातघाईची लढाई करून खड्गयुद्धात विजापूरच्या सैन्याची कत्तल करण्याचे ठरविले. इस्माईल आदिलशहाने शत्रूकडून याप्रमाणे हल्ला केला जाईल अशी अटकळ बांधली होती. त्याने आपल्या तिरंदाजांच्या [ ३ ] (५८) मदतीसाठी ३ हजार घोडेस्वार आणि कुशल तलवार बहाद्दर तयार ठेवले होते. या सर्व घोडेस्वारांच्या आणि त्याचप्रमाणे त्यांच्या मांडीखालील घोड्यांच्या अंगावर चिलखताचे आच्छादन होते. या तुकडीचा सेनानी सय्यद हुसेन या नावाचा अतिशय नावाजलेला अरब अधिकारी होता. बरीदच्या सैन्याने विजापूरच्या सैन्यावर जो हल्ला केला त्यामध्ये किल्ल्याच्या बहमनपुरा दरवाजासमोरील मैदानात दोन्ही बाजूत युद्धाची प्रचंड रणधुमाळी उडाली. या युद्धात दक्षिणी आणि परदेशी सैनिकांनी अतिशय शौर्य दाखविले. आसदखान विरोध करत असताना देखील इस्माईल आदिलशहा हा स्वतः युद्धामध्ये उतरला, आणि त्याने अमीर बरीदच्या दोन मुलांना आपल्या हाताने ठार मारले. या दोघांनी त्याच्यावर त्या दिवशी लागोपाठ हल्ले चढविले होते दोन्ही सैन्यांतील सैनिकांनी सुलतानाच्या पराक्रमाबद्दल त्याची भरपूर प्रशंसा केली. खुद्द त्याचे अधिकारी घोड्यावरून उतरले आणि त्याच्या घोड्याच्या रिकिबीचे त्यांनी चुंबन घेतले. दोन्ही सैन्यातील लढाई जेमतेम संपली न संपली तोच उजव्या बाजूला सैनिकांच्या ४ तुकड्या नजरेस आल्या. या तुकड्यात अंदाजे ४ हजार सैनिक होते असे दिसून आले. आसदखानाने ताबडतोब आपला गुदरूज नावाचा एक अनुचर, बरोबर ४० घोडेस्वार देऊन हे सैनिक कोण आहेत ते जाणून घेण्यासाठी पाठविला. त्यांना असे कळून आले की, हे ४ हजार घोडेस्वार म्हणजे गोवळकोंड्याच्या सुलतान कुलीकुतुबशहाने अमीर बरीद यांच्या मदतीसाठी पाठविलेले स्वार आहेत. हे बघितल्यानंतर इस्माईल आदिलशहाने आसदखानाला त्यांचा प्रतिकार करण्याचा हुकूम केला, आणि त्याने स्वतः अमीर बरीद याच्या सैन्यावर पुन्हा हल्ला करण्याची तयारी केली. यावेळी सय्यद हुसेन अरब याने ही कामगिरी आपल्यावर सोपविण्यात यावी अशी सुलतानाजवळ अतिशय कळकळीची विनंती केली, आणि आपण निष्कारण शत्रूवर हल्ला करून आपला जीव धोक्यात आणू नये असे त्याला विनविले. सय्यद हुसेन याने अशा तऱ्हेने सुलतानाच्या बेताला आपला विरोध दाखविल्यामुळे सुलतानाने आपला बेत बदलला आणि मी केवळ लढाईचे निरीक्षण करीन असे वचन त्याला दिले. त्याच वेळी त्याने सय्यद हुसेन याला शत्रूचे रक्त

जिच्या धारेतून अजून ठिबकत आहे अशी आपली तलवार बक्षीस दिली. विजापूरच्या दोन्ही सेनापतींना विजय मिळाला. अमीर बरीद आणि कुतुबशहा यांनी प्रत्येकी ५०० माणसे गमावली. त्यांचे सैन्य विस्कळीत झालेले होते. अशा [ ३ ] (५९) परिस्थितीत त्यांनी रणांगणाचा ताबा इस्माईल आदिलशहाकडे देऊन पळ काढला. या लढाईत आसदखानाने नामी कामगिरी करून श्रेय मिळविले. कारण त्याने कुतुबशहाच्या ४ हजार तेलंगी शिपायांना प्रथम पळवून लावले आणि मग तो सय्यद हुसेन याला मदत करण्यासाठी धावून आला. या विजयानंतर आदिलशहा घोड्यावरून उतरला आणि लढाईच्या मैदानापासून जवळच असलेल्या एका उंचवट्यावर बसला. त्याने आपल्या सर्व अधिकाऱ्यांचे आभार मानले. विशेषतः आसदखानाला त्याने दृढ आलिंगन देऊन इतरांपेक्षा त्याचा अधिक सन्मान केला. सय्यद हुसेन याला त्याने लढाईत तो स्वतः ज्या घोड्यावर स्वार झाला होता तो घोडा बक्षीस म्हणून दिला. शत्रूकडील अमीर बरीद याचे दोन मुलगे आणि कुतुबशहाने पाठविलेल्या घोडेस्वारांचा सेनापती रुस्तुम बेग असे तिघेजण ठार झाले.

(६२) आता इस्माईल आदिलशहाने बीदर शहराला पूर्वीपेक्षा अधिक जाराने वेढा दिला. त्यामुळे अमीर बरीद याची परिस्थिती अतिशय केविलवाणी झाली. त्याने अल्लाउद्दीन इमादशहा याला पत्र लिहून तातडतोब निघून येण्याची आणि तहासाठी मध्यस्थी करण्याची अतिशय कळकळीची विनंती केली. अमीर बरीद याने उद्गीरकडे माघार घेतली होती. त्याचे पत्र पोहोचल्यानंतर अल्लाउद्दीन इमादशहाने उद्गीरकडे न जाता बीदरकडे कूच केले, आणि बीदरला वेढा घालून बसलेल्या सैन्यापासून जेमतेम एक मैल अंतरावर तो उतरला. वऱ्हाडच्या सुलतानाच्या भेटीला आपल्या मुख्य अधिकाऱ्यांना घेऊन इस्माईल आदिलशहा गेला. या प्रसंगी इमादशहाने आदिलशहाचे त्याला नुकत्याच मिळालेल्या विजयाबद्दल अभिनंदन केले, आणि तो असे म्हणाला की, इथे कूच करून येण्यामध्ये माझा हेतू फक्त आपल्या विजयामध्ये सहभागी होण्याचा होता. परंतु इथे आल्यानंतर माझ्या मनात अशी आशा निर्माण झाली की मला आपल्यात आणि अमीर बरीदमध्ये मध्यस्थी करणे शक्य होईल. आदिलशहाने यावर उत्तर दिले की अमीर बरीदकडून माझ्या घराण्यावर इतके अन्याय झाले आहेत की ते सांगता येणे सुद्धा कठीण आहे. या लढाईमध्ये माझे [ ३ ] ( ६० ) अनेक शूर अधिकारी पतन पावले आहेत. आता माझी मागणी एकच आहे आणि ती म्हणजे अमीर बरीद याने मला सपशेल शरणागती द्यावी. त्याशिवाय काहीच ऐकण्याची माझी तयारी नाही. इमादशहाने इस्माईल आदिलशहाचा निश्चय पाहिला आणि याबाबतीत त्याने अधिक दडपण त्याच्यावर आणले नाही. इमादशहा आणि आदिलशहा यांनी त्यानंतर एक आठवडा एकत्रपणे अगदी मजेत घालविला, आणि ते परस्परां-पासून दूर झाले. या घटनेची हकीकत अमीर बरीद याच्या कानावर गेली. तेव्हा त्याने उद्गीर सोडले आणि तो इमादशहाच्या छावणीत येऊन दाखल झाला. शांतता प्रस्थापित

करण्यासंबंधी त्याने पुन्हा एकदा इमादशहाची मनधरणी केली. परंतु इमादशहाने त्याला सांगितले की बीदर शहर प्रत्यक्ष आपल्याला शरण आले पाहिजे, याखेरीज दुसरी कोणतीही गोष्ट आपण ऐकण्यास तयार नाही असे इस्माईल आदिलशहाचे म्हणणे आहे. इमादशहाच्या जवळच असलेल्या छावणीत बरीदशहा उद्विग्न मनःस्थितीत परतला. त्याच्या मनाला काळज्यांनी ग्रस्त केले होते. त्यामुळे त्याच्या मनाला होणाऱ्या यातना कमी करण्यासाठी तो चैनबाजीच्या विलासात दंग झाला. अमीर बरीदच्या फौजेला विजापुरी सैन्याने अतिशय तंग केले. रात्र पडल्यावर घ्यावयास पाहिजे तेवढी काळजी त्याने घेतली नाही. छावणीच्या बाहेर शत्रूवर टेहळणी करण्याकरता जे शिपाई ठेवण्यात आले होते ते झोपी गेले आणि सैन्यातील अनेकांनी आपल्या सुलतानाचेच अनुकरण करून दारूच्या बेहोषीत स्वतःला धुंद करून घेतले.

(६३) अमीर बरीदचे आगमन झाल्याची बातमी जेव्हा इस्माईल आदिलशहाला कळली तेव्हा त्याने आसदखानाला २ हजार निवडक घोडेस्वार घेऊन त्याच्या छावणीवर अचानक हल्ला करण्यास सांगितले. आसदखानाने नेहमीप्रमाणे खंदकात जे शिपाई होते त्यांची पाळी बदलण्याची आज्ञा आपण देत आहोत या मिषाखाली आपल्या फौजेला आपापल्या जागेवर हजर होण्यासाठी ताकीद दिली. परंतु जेव्हा छावणीचा तळ ओलांडून ते सर्वजण पलीकडे गेले तेव्हा त्याने त्यांना आपल्या खऱ्या उद्देश्याची जाणीव करून दिली, आणि शत्रूच्या राहुट्यांकडे शक्य तेवढे दबकत दबकत कूच केले. शत्रूच्या छावणीबाहेर असलेल्या टेहेळ्यांच्या जागेजवळ विजापुरी सैनिक येऊन पोहोचले. कोणतीही बारीक हालचाल अथवा आवाज त्यांच्या कानावर पडला नाही. तेव्हा आसदखानाने आपल्या सैनिकांना एकदम शांत रहाण्याची आज्ञा दिली, आणि एकंदर परिस्थिती काय आहे आणि शत्रूची तयारी कितपत आहे हे जाणून घेण्यासाठी त्याने हेरांची रवानगी केली. हेरांनी परत आल्यावर आसदखानाला सांगितले की आम्ही कोणत्याही तऱ्हेचा अडथळा न होता अमीर बरीदच्या छावणीपर्यंत चाल करून गेलो. तेथे रक्षक म्हणून असलेले काही सैनिक झोपी गेले होते. आपल्या सांगण्याच्या पुष्ट्यर्थ त्यांनी त्या सैनिकांपासून चोरून आणलेली पागोटी आणि तलवारी आसदखानापुढे काढून ठेवली. आसदखानाने आपल्या सैनिकांना कोणत्याही [३] (६१) प्रकारचा आवाज न करता आपण परत येईतोपर्यंत त्याचठिकाणी राहण्यास सांगितले आणि तो स्वतः २५ घोडेस्वार आणि काही पायदळी फौज घेऊन शत्रूच्या छावणीतून मार्ग काढीत अमीर बरीदच्या छावणीकडे निघाला. याठिकाणी त्याने तंबूच्या रखवालदारांना दारूच्या धुंदीत बेशुद्ध असल्यागत इतस्ततः अस्ताव्यस्त पसरलेले पाहिले. त्यांच्या अवतीभोवती तुकडे तुकडे झालेली दारूची भांडी विखुरलेली होती. त्यांच्या अशा अगतिक परिस्थितीत त्यांच्यावर हात टाकून त्यांना ठार मारणे आसदखानाला प्रशस्त वाटले नाही. तेव्हा त्याने आपल्या काही सैनिकांना नग्न तलवारी हातात घेऊन त्यांच्यापैकी कोणी शुद्धीवर येऊन इतरांना सावध करण्याचा

प्रयत्न केल्यास त्यांना प्रतिरोध करण्याकरता पहारा देण्यास सांगितले. यानंतर आसदखान घोड्यावरून खाली उतरला आणि अमीर बरीदच्या तंबूत काही शिपायांना घेऊन शिरला. त्याने अमीर बरीदला जिवंत पकडून नेण्याचे ठरविले परंतु त्याला सोडवून नेण्याचा प्रयत्न झाल्यास त्याला ठार मारावयाचे आणि त्याचे डोके तोडून आदिलशहाकडे नेण्याचा त्याने निश्चय केला. अमीर बरीदशहा आपल्या बिछान्यावर बेशुद्धावस्थेत पडला होता. त्याच्या अवतीभोवती दारूच्या भांड्यांचे तुकडे इतस्ततः पसरले होते. दारूचा शिडकावही त्याचप्रमाणे झाला होता. या गराड्यात त्याच्या चाकरीतील स्त्री-पुरुष नर्तक आणि गायिका वेड्यावाकड्या अवस्थेत आणि स्वतःचे भान नसलेल्या स्थितीत लोळत पडले होते. अमीर बरीदची कीर्ती एक वृद्ध, अनुभवी आणि कावेबाज मुत्सद्दी म्हणून होती. त्या अमीर बरीदचा बिछाना आसदखानाच्या शिपायांनी अलगद वर उचलला. अमीर बरीदरूपी जे बक्षीस त्यांना मिळाले होते ते घेऊन ते सर्व छावणीबाहेर गुपचूप पडत होते. तेव्हा दक्षिणेत ज्याला दिवट्या म्हणतात आणि ज्याचे काम सुलतानाला रात्री वाट दाखविण्याचे असते असा एक दिवट्या अचानक जागा झाला आणि तो मोठ्याने आरोळी ठोकण्याच्या बेतात होता तोच आसदखानाने त्या दिवट्याच्या तोंडावर आपला हात दाबून धरला. त्याच्या सैनिकांनी त्या दिवट्याला ताबडतोब धरले आणि जागच्याजागी गळा दाबून त्याचा प्राण घेतला. त्यानंतर कोणत्याही प्रकारचा उपद्रव न होता आसदखान आणि त्याच्या बरोबरचे सैनिक छावणीच्या अगदी टोकाला त्यांची वाट बघत असलेल्या सैन्याच्या तुकडीपर्यंत येऊन पोहोचले. त्या ठिकाणी आसदखान आपल्या सैनिकांना उद्देशून म्हणाला की ज्या हेतूने हे धाडस करण्याचे काम आपण आपल्या अंगावर घेतले होते तो मुख्य हेतू साध्य झाला आहे. तेव्हा आता शत्रूच्या [ ३ ] ( ६२ ) छावणीवर रात्रीचा हल्ला करण्यात आता काही स्वारस्य उरले नाही. कारण रात्रीच्या घनदाट अंधारात हिंदू कोणता आणि मुसलमान कोणता हे शोधून काढणे कठीण जाईल आणि परिणामी अनेक सद्धर्माचे पालन करणारे मुसलमान ठार मारले जाण्याची शक्यता आहे. एवढे बोलून त्याने आदिलशहाच्या छावणीकडे कूच केले. आपल्या कैद्याला जागे करण्याचा कोणताही प्रयत्न न करता त्याने त्याला तसेच निजू देऊन आपल्याबरोबर चालविले. अमीर बरीदशहाला जेव्हा आपला बिछाना हलत आहे असे आढळून आले तेव्हा तो जागा झाला. त्याची अशी कल्पना झाली की भुतेखेते किंवा राक्षस हे आपल्याला हवेतून पळवून नेत आहेत. तेव्हा तो घाबरून मोठ्याने ओरडू लागला आणि या मंत्रजाळातून आपले रक्षण करण्यासाठी त्याने परमेश्वराचा धावा सुरू केला. यावर आसदखानाने त्याला तो कोणत्या परिस्थितीत सापडला आहे याची जाणीव दिली आणि अविचारीपणाने वागल्याबद्दल त्याची निर्भर्त्सना केली. तो अमीर बरीदला म्हणाला की, " तुम्ही एक पूजनीय वृद्ध गृहस्थ आहा. राज्यकारभार चालविण्याच्या कलेचा आपल्याला पूर्ण अनुभव आहे. अशा परिस्थितीत शत्रूच्या छावणी शेजारी

दारूने धुंद होऊन तुम्ही पडलेले असताना शत्रूने तुम्हाला तशा परिस्थितीत पळवून न्यावे हे जितके आपल्या चारित्र्याला लांछनास्पद आहे तितकेच ते आपल्या बुद्धिमत्तेला कालिमा आणणारे आहे." अमीर बरीद हा लाजेने आणि चिडीने काळा ठिक्कर पडला होता. त्याने काहीच उत्तर केले नाही. आसदखानाने त्याचे सांत्वन करून त्याला असे म्हटले की, "सुलतानाजवळ माझे भरपूर वजन आहे. तुम्हाला चांगली वर्तणूक मिळावी यासाठी मी प्रयत्न करीन."

(६४) विजापूरच्या छावणीशी आल्यानंतर आसदखानाने विलंब न लावता जणू काही एखादी महत्त्वाची ठेवच आपण आणली आहे अशा पद्धतीने अमीर बरीदला इस्माईल आदिलशहासमोर हजर केले. आसदखानाच्या धाडशी योजनेला जे यश मिळाले त्यामुळे आदिलशहाला अतिशय आनंद झाला. त्याने अमीर बरीदशहाला बोलावून असे विचारले की, "तुम्ही आपल्या संबंध आयुष्यात इतके चातुर्य आणि कावेबाजपणा आपल्या अंगात बाणवून वागला असताना अशा तऱ्हेने कसे फसवले गेलात ही मोठी आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे, असे तुम्हाला वाटत नाही काय?" यावर तो बंदिस्त सुलतान उद्गारला की, "माझे नशीब आणि परमेश्वराची इच्छाच अशी होती की माझ्यावर हा प्रसंग ओढवावा." यावर सुलतानाने त्याला आसदखानाच्या स्वाधीन केले आणि दुसऱ्या दिवशी दरबारात कैद्याला घेऊन येण्याची त्याने आज्ञा दिली.

(६५) दुसऱ्या दिवशी सकाळी दरबारात इस्माईल आदिलशहा [३] (६३) सिंहासनावर बसलेला असताना त्याच्यासमोर अमीर बरीद याला उभे करण्यात आले. बरीदच्या मस्तकावर काहीही नव्हते. त्याचे हात पाठीशी घट्ट बांधण्यात आलेले होते. अमीर बरीद याला तळपत्या उन्हात उभे करण्यात आलेले होते. अशा परिस्थितीत दोन तास गेल्यानंतर इस्माईल आदिलशहाने त्याला ठार मारण्याची आज्ञा दिली. या हुकुमाचे पालन करण्यासाठी मांग हातामध्ये नग्न तलवार घेऊन पुढे सरसावला. अमीर बरीदने आपली परिस्थिती अतिशय अगतिक आणि केविलवाणी झाली आहे हे जाणले आणि आपल्या प्राणाची भीक मागण्यासाठी त्याने आदिलशहापुढे आपले गुडघे टेकले. तो म्हणाला की, "तुम्ही आणि ज्यांची स्मृती मनाला आनंद देते असे तुमचे वडील युसुफ आदिलशहा यांचा अनेक वेळा अपमान केल्याचा अपराध माझ्या माथी आहे, याबद्दल काहीच शंका नाही. त्यासाठी आपण माझ्यावर सूड घेतल्यास त्यात वावगे काहीच नाही, याचीही मला पूर्णपणे जाणीव आहे. परंतु उदार मनाने आपण माझे अपराध विसराल आणि मला प्राणदान करून पश्चात्तापदग्ध होण्याची संधी द्याल तर मी आपल्याला अहमदाबाद शहराचा बीदर किल्ल्यासहित ताबा देईन. मी आपणास असे सांगू इच्छितो की, शत्रूच्या सैनिकांना या किल्ल्याच्या तटबंदीवर शिड्या लावून चढून जाण्यात आतापर्यंत कधीही यश मिळाले नाही. याशिवाय मी आपणाला असे वचन देतो की, बहमनी घराण्याची जी संपत्ती माझ्याकडे आहे तिचाही ताबा मी आपणाला देईन."

( ६६ ) वर सांगितलेल्या अटींवर इस्माईल आदिलशहाने अमीर बरीदचे प्राण न घेण्याला आपली अनुमती दिली. तेव्हा अमीर बरीद याने आपल्या एका मुलाकडे निरोप पाठविला आणि आपल्यावर ओढवलेल्या परिस्थितीची व आदिलशहाबरोबर त्याने केलेल्या तडजोडीची हकीकत त्याला कळविली. अमीर बरीदच्या मुलाने पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले : " आपण आता वृद्ध झाला आहात. या पृथ्वीवरील आपले अस्तित्व संपुष्टात येण्याचा काळ आता जवळ आलेला आहे. तेव्हा तुमच्या आयुष्याचे जे थोडे दिवस राहिले आहेत त्यासाठी बीदरसारखा किल्ला शत्रूच्या स्वाधीन करण्याइतका मूर्खपणा दुसरा होणार नाही. " अशा तऱ्हेने पाठविलेल्या निरोपाचा उद्देश अमीर बरीदशहाच्या मित्रांपासून मदत मिळण्याच्या आशेने जितका वेळ काढता येईल तितका काढण्याचा होता. कारण बरीदशहाच्या मुलांनी आपल्या विश्वासातील काही माणसांना जर का बरीदशहाचे प्राण खरोखरच धोक्यात असतील तर इस्माईल आदिलशहाच्या अटी मान्य कराव्यात अशा गुप्त सूचना देऊन रवाना केलेले होते. अमीर बरीदने आपल्या मुलांच्या निर्दयपणाबद्दल तक्रार करून आपल्याला अतिशय दुःख झाले आहे असे दाखविले परंतु इस्माईल आदिलशहाला वरील कारस्थानाचा संशय आला आणि त्याने बरीदशहाला पिसाळलेल्या हत्तीसमोर फेकून देण्याचा हुकूम केला. त्याने उद्गार काढले की शहरावर [ ३ ] (६४) हल्ला करून माझ्या सैन्याच्या मदतीने शहराचा मी पाडाव करीन याची मला पूर्ण खात्री आहे. अमीर बरीद याने पुन्हा एकदा इस्माईल आदिलशहाची विनवणी करण्याचा मार्ग स्वीकारला आणि त्याची याचना करून त्याला सांगितले की तुम्ही मला किल्ल्याच्या विशिष्ट बुरुजासमोर घेऊन चला, म्हणजे माझी काय विकलावस्था झाली आहे हे त्यांना ( माझ्या मुलांना ) दिसेल आणि माझे प्राण वाचविण्याच्या दृष्टीने ते धावपळ करतील. याप्रमाणे बरीदशहाला बुरुजासमोर नेण्यात आले. आपल्या बापाचा प्राण वाचविण्यासाठी संपूर्ण शरणागती दिल्याशिवाय दुसरा मार्ग नाही हे त्यांनी बघितले आणि त्यांनी असे कळविले की आम्ही आणि आमची मुले माणसे अशांना तुम्ही आमच्या सर्वांच्या अंगावरील कपड्यांसह आमची कोणतीही तपासणी केल्याशिवाय जाऊन देत असाल तर आम्ही शहर आणि किल्ला तुमच्या हवाली करू. आदिलशहाने या अटीला मान्यता दिल्यावर अमीर बरीदच्या मुलांनी आपल्या स्वतःच्या आणि आपल्या बायकांच्या अंगावर बहमनी राजघराण्याचे जितके मौल्यवान अलंकार आणि कपडेलत्ते लपवता येतील तितके लपवले. यानंतर ती सर्व मंडळी आपल्या अनुयायांसह कोणत्याही तऱ्हेचा उपद्रव न होता उद्गीरच्या किल्ल्याकडे चालती झाली.

( ६७ ) आसदखानाने काही निवडक सैनिक घेऊन लुटालूट होऊ नये म्हणून शहरात प्रवेश केला. त्यानंतर त्याने पराभूत अमीर बरीदशहाची संपत्ती आणि त्याच्या मालकीच्या इतर वस्तू यांची यादी करण्यास सुरुवात केली. इस्माईल आदिलशहाने एक शुभ वेळ मुक्रर केली आणि आपले सर्व अधिकारी आणि अमीर-

उमराव यांना बरोबर घेऊन तो पायी शहराच्या दरवाजापासून राजवाड्यापर्यंत चालत गेला. राजवाड्यातील दरबाराच्या भव्य दिवाणखान्यात त्याने प्रवेश केला आणि बहमनी सुलतानाच्या सिंहासनावर तो आसनस्थ झाला. याप्रसंगी त्याने आपल्याला मिळालेल्या विजयाबद्दल परमेश्वराचे आभार मानले आणि आपला मुलगा राजपुत्र मल्लुखान याच्याबरोबर आसदखान आणि इतर अधिकारी बरोबर देऊन अल्लाउद्दीन इमादशहा याला दरबारात येण्यासाठी निमंत्रण देण्याकरता पाठविले. इमादशहाची राजवाड्याच्या पायऱ्यांवर इस्माईल आदिलशहाने भेट घेतली आणि दोघेजण एकाच सिंहासनावर आसनस्थ झाले. [३] (६५)

(६८) यानंतर दोन्ही सुलतानांसमोर खजिना ठेवण्यात आला. या खजिन्यात १०००००० होन एवढी रोख रक्कम, अनेक मौल्यवान हिरे, मोठ्या प्रमाणावर सोने आणि चांदीचे पत्रे, उत्तमोत्तम चिनी मातीची भांडी आणि बहुमोल वस्त्रे अशी सामग्री होती. इस्माईल आदिलशहाने अल्लाउद्दीन इमादशहाला सांगितले की यापैकी तुम्हाला पाहिजे असेल ते तुम्ही घ्या. बहमनी घराण्याच्या संपत्तीचा अपहार करण्यासाठी आपण युद्ध केले असा आरोप आपल्यावर येऊ नये म्हणून त्याने आपल्या हाती आलेल्या संपत्तीची विभागणी केली आणि त्यातील काही त्याने शेजारील राज्यांकडे नजराण्यादाखल पाठविली आणि काही आपल्या सैन्यामध्ये वाटून टाकली. त्याने स्वतः-साठी एक दमडी देखील राखून ठेवली नाही. त्याने ५०००० होन विद्वत्ता आणि प्रामाणिकपणा यासाठी प्रसिद्ध असलेल्या सय्यद अली अखील याजकडे दिले आणि हे द्रव्य नजफ, करबला आणि मुशीद येथील गरीबगुरिबांमध्ये दान म्हणून वाटून टाकण्याबद्दल त्याला आदेश दिला. त्याचप्रमाणे ५०००० होनांची रक्कम त्याने सय्यद अहमद हिरवी याला देऊन विजापूर राज्यामधील विद्वान मंडळींना दान देण्यासाठी त्या रकमेचा उपयोग करण्यास त्याला सांगितले. नंतर त्याने कुमचा कवी मौलाना सय्यद याला खजिन्याकडे जाण्यास सांगितले आणि नेता येईल तेवढे सोने उचलून नेण्याची त्याला आज्ञा केली. परंतु मौलाना सय्यद हा आजारीपणामुळे अपंग झाला होता तेव्हा तो असे उद्‌गारला की, "मी पहिल्या प्रथम जेव्हा आपल्या दरबारात आलो तेव्हा माझ्या ताकदीबद्दल म्हणाल तर आजच्या इतकाच बलवान मी तेव्हा देखील होतो." यावर इस्माईल आदिलशहा हसून म्हणाला की, "तू दोनदा प्रयत्न करून तुला नेता येईल तेवढे सोने तू नेलेस तरी माझी त्याला काहीच हरकत नाही." यावर मौलाना सय्यद त्याला म्हणाला की, "ते काहीही असले तरी असा प्रयत्न करण्याचे अगोदर ह्या आजारातून मी बरा होईपर्यंत थांबण्याची माझी इच्छा आहे." यावर इस्माईल आदिलशहाने पुढीलप्रमाणे कवितेची ओळ म्हणून दाखविली: "उशीर करण्यात धोका साठवलेला असतो आणि आर्जी करणाऱ्याच्या हितसंबंधाला त्यामुळे बाध येतो". यावर मौलाना सय्यद याने दोन वेळा खजिन्यातून द्रव्याच्या थैल्या वाहून नेल्या. दोन्ही मिळून त्याने नेलेल्या द्रव्याची एकूण रक्कम २५००० होनएवढी भरली. एवढी रक्कम

मौलाना सय्यद याने नेल्याचे जेव्हा खजिनदाराने इस्माईल आदिलशहाला सांगितले तेव्हा तो म्हणाला की आपल्या अशक्तपणाबद्दल मौलाना सय्यद याने जी तक्रार केली त्यात त्याने सत्य तेच सांगितले यात काहीच शंका नाही. यानंतर [ ३ ] ( ६६ ) त्याने असे जाहीर केले की या सर्व लुटीची विल्हेवाट लावल्याखेरीज मी आता उठणार नाही. यानुसार त्याने आसदखानाला बोलावू पाठवून सैन्यामध्ये लुटीची रक्कम वाटून टाकण्याबद्दल त्याला आज्ञा केली. ही वाटणी इतक्या योग्य प्रकारे करण्यात आली की प्रत्येकजण त्याच्या वाटणीला संपत्तीचा जो भाग आला त्यावर खूष झाला.

( ६९ ) यानंतर पुन्हा एकदा इमादशहाने अमीर बरीदच्या वतीने मध्यस्थी केली. इस्माईल आदिलशहाने सरते शेवटी अमीर बरीदला आपल्या अधिकाऱ्यांमध्ये दाखल करून घेण्याला जर का आसदखान त्याच्या विश्वासूपणाबद्दल खात्री देण्यास कबूल असला तर संमती दिली. कल्याणी, उद्गिर आणि इतर जिल्हे आणि शिवाय बीदर-शहरालगतच्या जमिनी पासून येणारे उत्पन्न हे सर्व अमीर बरीदच्या उपजीविकेसाठी म्हणून लावून देण्यात आले. इस्माईल आदिलशहाने अमीर बरीदवर एक अट लादली आणि ती म्हणजे त्याने ३००० घोडेस्वार घेऊन इस्माईल आदिलशहाच्या सैन्याबरोबर रहावे. ही घटना झाल्यानंतर एका आठवड्याने इस्माईल आदिलशहाने आपल्या सैन्या-सह वर्तमान दक्षिणेच्या बाजूने कूच केले. त्याच्याबरोबर अल्लाउद्दीन इमादशहा आणि अमीर बरीद यांच्या फौजा होत्या. या दरम्यान विजयनगरमधील राज्यकारभारामध्ये अतिशय गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली होती याला कारण म्हणजे हेमराजाचा मृत्यू. हेमराजानंतर त्याचा मुलगा रामराजा हा गादीवर आला होता. रामराजाविरुद्ध अनेक राजांनी बंडखोरीला चिथावणी दिली आणि त्यामुळे मुसलमानांनी विजयनगरच्या प्रदेशात जी आगेकूच चालविली होती तिला कोणताच प्रतिकार अथवा अडथळा झाला नाही. रायचूर आणि मुद्गल ही ठिकाणे एकंदर तीन महिन्यांच्या वेढ्यानंतर मुसलमानी फौजांना शरण जाऊन त्यांच्या ताब्यात आली. ही ठिकाणे जवळजवळ १७ वर्षे या क्षणापर्यंत काफरांच्या ताब्यात होती.

(७०) हे दोन्ही किल्ले जिंकून घेईपर्यंत आपण दारूला स्पर्श करणार नाही अशी इस्माईल आदिलशहाने प्रतिज्ञा केली होती. त्याच्या मनाने आता आपण मोठ्या प्रमाणावर आनंदोत्सव साजरा करावा असे घेतले. प्रसंगी त्याने दारूचे भरपूर सेवन केले आणि मनःपूतं समाचरेत या न्यायाप्रमाणे आपल्या नैसर्गिक प्रवृत्तीवरील बंधनाचे लगाम त्याने ढिले केले. या मेजवानीत अल्लाउद्दीन इमादशहा आणि अमीर बरीद या दोघांनी भाग घेतला. आसदखानाला देखील त्यांच्या समवेत [ ३ ] (६७) बसण्याची परवानगी देण्यात आली. इतकेच नव्हेतर इस्माईल आदिलशहाने वापरलेल्या मद्यचषकातून त्याने दारूचा आस्वाद घेतला. हा चषक आदिलशहाने आपल्या हातांनी भरला. त्याच्या बदली आसदखानाने मद्याचा दुसरा पेला भरून तो आदिलशहाच्या हाती दिला. ह्या प्रसंगी आसदखानाने विनंती केली म्हणून

१५०० युद्ध कैद्यांना मुक्त करण्यात आले. या युद्ध कैद्यांना शेंदरी रंगाची शिरस्त्राणे आणि जाकिटे बक्षीस म्हणून देण्यात आली. यापैकी अनेक कैद्यांनी आसदखानाच्या चाकरीत राहण्याची आपली इच्छा प्रकट केली. या गोष्टीला इस्माईल आदिलशहाने आपली परवानगी दिली. हा उत्सवसमारंभ चालू असताना इस्माईल आदिलशहाने अमीर बरीदला असे वचन दिले की विजापूरला पोहोचताच मी अहमदाबाद बीदरचे सरकार तुमच्या स्वाधीन करीन. हा उत्सवसमारंभ जवळजवळ एक महिनाभर चालू होता. या समारंभाच्या स्मृतीप्रित्यर्थ मुल्ला इब्राहीम इस्पहानी याने त्या समारंभाचे वर्णन करणारी एक कविता लिहिली. या कवितेत एक हजार कडवी होती. या सुमारास अशी बातमी आली की गुजराथच्या बहादुरशहाने दक्षिणेवर पुन्हा आक्रमण करण्याची तयारी चालविली आहे. यावर इस्माईल आदिलशहाने अल्लाउद्दीन इमादशहाला राजधानीकडे जाण्यासाठी निरोप दिला. तो स्वतः विजापूरकडे परतला. तिथे गेल्यावर त्याने अमीर बरीदला सहा महिन्याच्या आत अहमदाबाद बीदर शहर परत देण्याचे कबूल केले. त्याने फक्त एकच अट घातली की, या अवधीत अमीर बरीदने कल्याणी आणि कंदहार हे किल्ले इस्माईल आदिलशहाच्या स्वाधीन करावे. त्याने हे कबूल केल्यावर या कारणासाठी त्याला विजापूर सोडून जाण्याची परवानगी देण्यात आली. कोणी इतिहासकार असे सांगतात की विजयनगरवरील स्वारीच्या वेळी एकदा अल्लाउद्दीन इमादशहाने इस्माईल आदिलशहाचा सत्कार केला आणि मौल्यवान हिऱ्यांनी भरलेली ताटे त्याने सुलतानाला अर्पण केली आणि ती त्याने स्वीकारावी असा त्याला खास आग्रह केला. यानंतर काही दिवसांनी इस्माईल आदिलशहाने एका मेजवानीला अल्लाउद्दीन इमादशहाला बोलाविले आणि आपले १२००० परदेशी घोडेस्वार त्याच्यासमोर कवाईतीसाठी उभे करून त्याला म्हटले की माझ्या कारकिर्दीत तुम्हाला समोर दिसत आहेत तीच हिरे माणके मी गोळा केली आहेत. यामधील तुमच्या उपयोगासाठी तुम्हाला आवडतील ते घोडे तुम्ही निवडून घ्या. अल्लाउद्दीन [३](६८) इमादशहाने इस्माईल आदिलशहाच्या शहाणपणाची तारीफ केली आणि एक निःश्वास टाकून असे उद्गार काढले की मी जर अशीच तयारी केली असती तर माहूरचा किल्ला गमाविण्याचा प्रसंग माझ्यावर आला नसता.

(७१) दिलेल्या वचनाप्रमाणे अमीर बरीद याने कल्याणी आणि कन्धार या किल्ल्यांच्या किल्ल्या पाठविण्यामध्ये टाळाटाळ केली तेव्हा ते किल्ले जबरदस्तीने (हिजरी ९३८ / इ. स. १५३१) जिंकून घेण्याचे इस्माईल आदिलशहाने हिजरी ९३८ या वर्षी ठरविले आणि आपल्या छावणीचे सामान आपल्या एका मुलाबरोबर कूच करून जाण्याची तयारी करण्यासाठी विजापूर शहराबाहेर पाठविले. दरम्यान अमीर बरीद याने बुरहाण निजामशहाकडे मदतीची याचना केली. निजामशहाने विजापूर दरबारकडे वकील पाठविले आणि इस्माईल आदिलशहाने अमीर बरीद विरुद्ध कारवाई करण्याच्या बेतापासून परावृत्त व्हावे असा निरोप

त्याला पाठविला. उत्तरादाखल इस्माईल आदिलशहाने कळविले की तुम्ही जेव्हा माहूरवर हल्ला केला तेव्हा मी कोणत्याही तऱ्हेचा हस्तक्षेप केला नाही. इतकेच नव्हे तर तुमची बाजू संभाळून धरण्याच्या हेतूने पोर्तुगीजांपासून गोवा परत मिळविण्याचे प्रयत्न करण्यापासून मी अलिप्त राहिलो. इस्माईल आदिलशहाने आपल्या खलित्यात पुढे कळविले की आता हिवाळ्याचा मोसम सुरू झाला आहे आणि या सुमारास राजधानीमध्ये बसून स्वस्थपणे वेळ घालविण्याची माझी इच्छा नाही. माझ्या राज्याच्या प्रदेशातून दौरा काढण्याचा माझा हेतू आहे आणि तो हेतू मनात धरून मी सोलापूर आणि नळदुर्ग या स्थळांना भेटी देणार आहे. अशा परिस्थितीत माझे तुम्हाला असे सांगणे आहे की तुम्ही आपल्या सरहद्दीवरील अधिकाऱ्यांना ताकीद करावी की यामुळे तुम्ही घाबरून जाण्याचे अथवा माझ्या या हालचालीमुळे मनात कसला तरी विपरीत किंतू आणण्याचे कारण नाही. बुरहाण निजामशहाला जेव्हा हे पत्र मिळाले तेव्हा गुजरात अथवा वऱ्हाड यांजकडून त्याच्यावर आक्रमण होण्याची भीती आता पूर्णपणे नाहीशी झाली होती. त्यामुळे त्याने इस्माईल आदिलशहाला बजाविले की मी तुम्हाला जी विनंती केली आहे, ती नाकारल्यास त्याचे जे काही परिणाम होतील ते ध्यानात घ्या आणि राजधानीमध्ये राहणेच सद्यःपरिस्थितीत तुमच्या हिताचे आहे ही जाणीव मनात धरून राजधानी सोडून कुठे बाहेर पडण्याचे धाडस करू नका.

(७२) इस्माईल आदिलशहा हा यापूर्वीच कूच करून विजापूरहून निघून गेल्यामुळे त्याला हा खलिता बहमनहळ्ळी येथे तो संध्याकाळचे नमाज पढत असताना [३] (६९) मिळाला. तो वाचून आदिलशहाला इतका क्रोध आला की तो फक्त ४०० स्वार आणि ४० सैनिक घेऊन छावणीबाहेर पडला आणि दुसऱ्या दिवशी संध्याकाळचे नमाज पढण्याची वेळ होईपर्यंत नळदुर्गच्या खालून वाहणाऱ्या नदीपर्यंत येऊन पोहोचला. तेथून त्याने निजामशहाच्या वकिलांना निरोप दिला आणि त्यांना असे सांगितले की लढाई टाळण्यासाठी माझ्याकडून जेवढे करता येणे शक्य होते तेवढे सर्व मी केले आहे. आता मी मला बंधुवत वाटणारे तुमचे बादशहा यांची यापूर्वी अनेक वेळा जशी रणांगणात गाठ घेण्यासाठी वाट बघितली आहे त्याप्रमाणे आताही वाट बघत राहीन. लढाईरूपी सागरामध्ये आता घनघोर रणधुमाळी उठणारच आहे त्यावर दृष्टी ठेवून तो निकराचा क्षण येईपर्यंत मी माझे मनरंजन तरी करून घेईन.

(७३) इस्माईल आदिलशहाने दिलेले आव्हान बुरहाण निजामशहाने स्वीकारण्याचे नाकारले नाही तर अमीर बरीदला बरोबर घेऊन २५००० घोडेस्वार आणि तोफांचा मोठ्या प्रमाणावर तांडा बरोबर घेऊन त्याने विजापूरच्या सरहद्दीच्या दिशेने कूच केले. इस्माईल आदिलशहाने लढाईसाठी सैन्याची रचना करण्याचे काम आसदखानावर सोपविले. त्याने सैन्याची पुढीलप्रमाणे रचना केली—सैन्यातील सर्व तरुण शिपाई, परदेशी सैनिकांचे मुलगे आणि रजपूत सैनिक यांना एकत्र

केले आणि त्यांची त्याने एक तुकडी बनविली. या तुकडीचे अधिपत्य त्याने मिर्जा जहांगीर कुमीचा मुलगा संजारखान याजकडे दिले. या सर्वांचे बाप वयाने वृद्ध होते त्यांना त्याने छावणीतच पाठीमागे ठेवले. या तऱ्हेने रचना केल्यावर आसदखान म्हणाला की आजचा दिवस तरुण सैनिकांनी आपल्या अंगातील शौर्य दाखविण्याचा आहे. आसदखानाने स्वतः सैन्याच्या उजव्या फळीचे नेतृत्व आपल्याकडे घेतले आणि डाव्या फळीचे अधिपत्य मुस्तफा आगा, सिकंदर आगा आणि खुषगेल्डी आगा इत्यादी नावाजलेल्या तुर्की अधिकाऱ्यांच्याकडे सोपविले. सैन्याच्या मध्य भागाचे खुद्द सुलतानाने अधिपत्य स्वीकारले. युद्धाची फळी लढाईसाठी तयार झाल्याबरोबर इस्माईल आदिलशहा सैन्याला येऊन मिळाला. तिथे आल्यावर त्याला असे दिसून आले की बुरहाण निजामशहाच्या छत्राचा, त्याच्या ध्वजचिन्हांचा आणि निशाणाचा रंग पूर्वी पांढरा होता तो आता बदलून हिरवा करण्यात आला आहे. या बदलाचे कारण इस्माईल आदिलशहाने विचारले. त्याला असे सांगण्यात आले की ही राजचिन्हे गुजराथच्या बहादुरशहाने बुरहाण निजामशहाला अर्पण केलेली आहेत. याप्रमाणे तो बोलत असताना वर उल्लेख केलेल्या तुकडीची शत्रूच्या सैन्याबरोबर गाठ [३] (७०) पडली. इस्माईल आदिलशहाने त्याबरोबर ताबडतोब आपल्या हाताखालील मधल्या फळीला घेऊन आगेकूच केले. त्याचा परिणाम असा झाला की, दोन्ही बाजूच्या सैनिकांत युद्धाला तोंड लागले. दोन्ही बाजूंनी युद्धाची गती इतक्या कसोशीने सांभाळली की युद्धामध्ये विजय कोणाला मिळेल याबद्दल बराच काळपर्यंत संशय येण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली. सरतेशेवटी निजामशाही सैन्याचा सेनापती खुर्शिदखान हा ठार मारला गेला आणि त्याच्या सैनिकांनी बेशिस्तपणे रणांगणातून पळ काढला. यानंतर थोड्याच वेळाने विजापूरच्या मोगल घोडेस्वारांनी बुरहाण निजामशहाला घेरले. तो कैदी होण्याचा धोका निर्माण झाला. तोच त्याच्या शरीररक्षकांनी मोठ्या शर्तीचा प्रयत्न करून त्याची सुटका केली, आणि त्याला सुरक्षितपणे रणांगणाच्या बाहेर नेले. आपले विस्कळीत झालेले सैन्य एकत्रित करण्याच्या भानगडीत न पडता बुरहाण निजामशहाने घाईघाईने अहमदनगरकडे पळ काढला. विजापूरच्या विजयी सैन्याच्या हाती खूप लूट पडली. सर्व दक्षिणेमध्ये यामुळे इस्माईल आदिलशहाचे श्रेष्ठत्व प्रस्थापित झाले. या लढाईला परदेशी तरुणांचा विजय असे नाव दिले गेले. कारण त्यांनी गाजविलेल्या शौर्यामुळेच प्रामुख्याने ही लढाई जिंकणे आदिलशहाला शक्य झाले. दिवसेंदिवस ह्या तुकडीवरील सुलतानाची मर्जी वाढतच गेली. त्यातील अनेकांना त्याने आपल्या वडिलांच्या हयातीत जी कामगिरी बजावली त्याची बक्षिसी म्हणून उमरावपदाचे मानकरी केले. इस्माईल आदिलशहा आणि बुरहाण निजामशहा यामध्ये झालेला हा शेवटचा युद्धप्रसंग होता. या घटनेनंतर दोघांमध्ये मित्रत्वाचा तह करण्यात आला. दोन्ही सुलतानांची गाठ त्यांच्या राज्याच्या सरहद्दीवर पडली. त्यामध्ये असे ठरले की इस्माईल आदिलशहाला कुतुबशहाचे राज्य जिंकून घेण्याचे

स्वातंत्र्य मिळावे आणि निजामशहाला वऱ्हाड आपल्या राज्याला जोडण्याची मुभा मिळावी. यामध्ये त्याला कोणत्याही प्रकारचा उपद्रव देण्यात येऊ नये.

(७४) हिजरी ९४० इ. स. १५३३ वरील करारात ठरल्याप्रमाणे इस्माईल आदिलशहाचा अमीर बरीदबरोबर समझोता झाला. आदिलशहाने त्याला आपल्याबरोबर तेलंगणावरील आपल्या स्वारीत येऊन मिळण्याविषयी उद्युक्त केले. या बेताप्रमाणे दोघांनी कूच केले आणि कोविलकोंड्याला वेढा [३] (७१) दिला. कोविलकोंडा हा तेलंगणाच्या सरहद्दीवरील प्रमुख किल्ल्यांपैकी एक होता. हा किल्ला जवळजवळ पाडाव होण्याच्या बेतात होता तोच इस्माईल आदिलशहाला अतिशय भयंकर अशा तापाने घेरले. त्यामुळे त्याला बिछान्यावर पडून राहणे भाग पडले. आपले आजारपण वाढतच चालले आहे असे इस्माईल आदिलशहाला जेव्हा आढळून आले तेव्हा त्याने आसदखान लारी आणि अमीर बरीद या दोघांना बोलावू पाठविले. दोघेही शत्रूचा प्रदेश उद्ध्वस्त करण्यात गुंतलेले असल्यामुळे छावणीत हजर नव्हते. ते दोघेजण परत आल्यानंतर इस्माईल आदिलशहाने अशी इच्छा प्रकट केली की तुम्ही दोघेजण वेढ्याचे काम चालू ठेवा. मी हवापालट म्हणून कुलबर्गा येथे जातो. मला बरे वाटल्याबरोबर मी तावडतोब सैन्याला येऊन मिळेन. यानुसार असे ठरले की दुसऱ्या दिवशी सकाळी सुलतानाने पालखीत बसून आपल्या प्रवासासाठी निघावे. परंतु झुंजुमुंजू होत आहे न होत आहे तोच आदिल-शहाच्या तापाने एकाएकी पलट खाल्ली आणि त्याचे प्राण त्याच्या नश्वर देहाला सोडून गेले. ही घटना बुधवार तारीख १६ सफर हिजरी या वर्षी घडली. इस्माईल आदिलशहाची यशस्वी कारकीर्द एकंदर २५ वर्षे इतकी झाली.

सफर १६
हिजरी ९४१
सप्टेंबर ६
इ. स. १५३४

(७५) आसदखानाने सुलतानाचे शव कुजू नये म्हणून त्यात रासायनिक मसाले भरून ठेवले आणि एका बंद पालखीत घालून त्याची रवानगी गोगी या गावाकडे केली. त्याने सुलतानाच्या मृत्यूची बातमी दोन दिवसपर्यंत गुप्त ठेवली. दोन दिवसा-नंतर या दुर्दैवी घटनेची खबर त्याने अमीर बरीद आणि इतर सर्व अमीरउमराव यांना दिली. त्यांना त्याने असा सल्ला दिला की आपण शत्रूच्या प्रदेशात आहोत. त्या ठिकाणी दोन्ही राजपुत्रांमध्ये कलह होण्याचे टाळण्यासाठी म्हणून तुम्ही ही घटना गुप्त ठेवा. या बैठकीत असा निर्णय घेण्यात आला की कोविलकोंड्याचा वेढा उठवावा आणि गादीवर कोणी यावयाचे त्या संबंधीची व्यवस्था कुलबर्ग्याला पोहोचेपर्यंत पुढे ढकलण्यात यावी. तेथे गेल्यावर त्या शहरात दफन करण्यात आलेल्या त्या पवित्र सय्यद महमद गिसू दराज या अवलियाच्या कबरस्थानापाशी जाऊन गादीवर कोणाला बसवावयाचे त्यासंबंधीच्या निवडीच्या निर्णयासंबंधी स्फूर्ती घेऊन त्याप्रमाणे करावे. आसदखानाने दिलेल्या या सल्ल्याला इतर सर्व अमीरांनी आपली अनुमती दिली.

त्यानंतर आसदखानाने सबंध सेनेचे नेतृत्व आपल्याकडे घेतले आणि [३](७२) दोन्ही राजपुत्रांना बरोबर घेऊन त्याने कोविलकोंड्याहून कूच केले.

(७६) सय्यद अहमद हिरवीने असे कथन केले की इस्माईल आदिलशहा हा न्यायी, शहाणा, संयमी आणि उदार वृत्तीचा होता. त्याच्या अंगातील दिलदारपणा इतका विपुल होता की आपल्या खजिन्याची परिस्थिती काय आहे याची काटेकोरपणे तपासणी न करता देखील तो बक्षिसांची खैरात करी. त्याच्या अंगी अतिशय औदार्य होते आणि त्यामुळे तो राज्यातल्या गुन्हेगारांना वारंवार अपराधांची क्षमा करी. दुसऱ्याची निंदा, कुचाळकी ऐकण्यामध्ये त्याला अतिशय तिटकारा वाटत असे. तो बोलताना भावनोत्कटतेने भरलेली भाषा कधीच वापरत नसे. त्याच्या अंगी अतिशय हजरजबाबीपणा होता आणि त्याला त्याने भारदस्त आणि कुशाग्र अशा विचार-शक्तीची जोड दिलेली होती. चित्रे रंगविणे, रोगण देणे, बाण तयार करणे आणि खोगिराच्या कापडावर भरतकाम करणे या कलांत तो अतिशय पारंगत होता. वाद्य आणि काव्य या बाबतीत त्याचा हात धरणारा त्याच्या काळात तरी दुसरा कोणीही नव्हता. त्याला विद्वान आणि कवी मंडळींच्या सहवासाची अतिशय आवड होती. अशा अनेक मंडळींना त्याने मोठ्या दानशूरपणे आपल्या दरबारात आश्रय दिला होता. संभाषणात खोचकपणे उत्तरे-प्रत्युत्तरे करण्यात त्याला अतिशय आनंद होई. त्याच्यापाशी विनोदप्रचुर चुटक्यांचा मोठा साठा होता आणि आपल्या दरबारातील मंडळींबरोबर होणाऱ्या वादविवादात तो वारंवार त्यांचा उपयोग करीत असे. दक्षिणेतील इतर कोणताही सुलतान या बाबतीत त्याची बरोबरी करू शकत नसे. त्याला दक्षिणीपेक्षा तुर्की आणि पर्शियन चालिरीती, संगीत आणि भाषा यांची अधिक आवड होती. दक्षिणी भाषेचा तो बोलण्यात फारच क्वचित उपयोग करीत असे. त्याने असा पक्षपात दाखविण्याचे कारण म्हणजे त्याचे सर्व शिक्षण त्याची आत्या दिलशद आगा[२९२□] हिच्या मार्गदर्शनाखाली झालेले होते हे होय. इस्माईल आदिलशहाचा बाप युसुफ आदिलशहा याने प्रकट केलेल्या इच्छेनुसार तिने शक्यतोपरी सुलतानाला दक्षिणी लोकांच्या संगतीपासून अलिप्त ठेवले. साहजिकच त्या लोकांबद्दल सुलतानाच्या मनात फारच थोडी आपुलकी होती. इस्माईल आदिलशहाला गोगी येथे त्याचा बाप युसुफ आदिलशहा याच्या कबरीशेजारीच पुरण्यात आले.

## [२९३□] मल्लू आदिलशहा

(७७) इस्माईल आदिलशहा मृत्यूवश व्हावयाच्या अगोदर काही काळ[३](७३) त्याने आसदखानाला बोलावून असे सांगितले की माझा मोठा मुलगा मल्लूखान याच्या अंगी राज्य करण्याची कुवत आहे किंवा नाही याबद्दल मी अतिशय साशंक आहे. परंतु पितृप्रेमामुळे मला असे वाटते की वयाने तो वडिलकीच्या अधिकाराचा

असल्यामुळे माझ्या पाठीमागून त्याने गादीवर यावे. इतके सांगून इस्माईल आदिल-शहाने आसदखानाची राज्याच्या संरक्षणाच्या कामगिरीवर नेमणूक केली आणि राजपुत्र मल्लू याला सिंहासनावर बसविण्यासंबंधीचे सर्वाधिकार त्याच्याकडे सोपविले. तू मल्लूखानाशी एकनिष्ठ राहण्यामध्ये बिलकुल कसूर करू नयेस असेही त्याने आसदखानाला बजाविले. अखेर इस्माईल आदिलशहा त्याला म्हणाला की तुझ्या कर्तृत्वशक्तीवर माझा संपूर्णपणे भरवसा आहे आणि माझ्या मुलाच्या हातून अभावितपणे अथवा मूर्खपणाने ज्या काही गोष्टी होतील त्यामुळे होणाऱ्या वाईट परिणामांची अगर नुकसानीची तुझ्या कर्तृत्वामुळे तू पूर्णपणे भरपाई [३] (७४) करशील याबद्दल मला खात्री आहे.

(७८) इस्माईल आदिलशहाचा सर्वांत धाकटा मुलगा राजपुत्र इब्राहीम याच्या मनामध्ये बऱ्याच काळापासून सिंहासनावर सुलतानपदी विराजमान होण्याची महत्त्वाकांक्षा बळावली होती. त्याने या विचारसरणीला दरबारातील अनेक उमरावांना आपल्या बाजूने अनुकूल करून घेतले होते. इस्माईल आदिलशहाच्या झालेल्या मृत्यूची हकीकत त्याच्यापासून आता लपवून ठेवणे जेव्हा अशक्य झाले तेव्हा प्रत्यक्ष शत्रूच्या प्रदेशांत असताना आणि कोविलकोंड्याच्या वेढ्याचे काम चालू असताना देखील दोन्ही भावांमध्ये युद्धाच्या आगीचा डोंब उसळतो की काय असा प्रसंग निर्माण झाला होता. आदिलशाही छावणीमध्ये घडलेल्या एकंदर प्रकारांची खबर जेव्हा गोवळकोंड्याच्या सुलतान कुली कुतुबशहा याला मिळाली तेव्हा ही संधी आपल्याला अतिशय फायदेशीर आहे असा त्याने विचार केला आणि आपल्या सैन्याला त्याने आदिलशाही छावणीभोवती घिरट्या घालून त्यांना सताविण्यास आणि त्यांना मिळणाऱ्या रसदीच्या पुरवठ्यावर धाड घालून ती बंद करण्याची आज्ञा दिली. शत्रूच्या पकडलेल्या सैनिकांचे कान आणि नाक तोडून टाकण्याविषयी त्याने आपल्या अधिकाऱ्यांना हुकूम पाठविले आणि हे दोन्ही अवयव तोडलेल्या अशा स्थितीत त्यांची सुटका करून त्यांना आदिलशाही छावणीकडे हाकलून देण्याचा सपाटा त्याने सुरू केला.[२९४□] सैन्यातील अधिकाऱ्यांनी एकमेकांच्या विरुद्ध बाजूस आपल्या मताचा कौल टाकल्यामुळे शत्रूविरुद्ध आपल्या तुकड्या घेऊन लढण्याकरता जाण्यास साफ नकार दिला. कारण त्यांना असे वाटले की आपण जर छावणीमधून या कामगिरीवर गेल्यामुळे गैरहजर राहिलो तर आपल्या अनुपस्थितीचा फायदा आपले प्रतिस्पर्धी उठवतील. तेलंगी सैनिकांच्या हल्ल्यांमुळे विजापुरी छावणीतील बाजार करणाऱ्यांचे अतोनात नुकसान होऊ लागले. खुद्द आदिलशाही सैन्याकडूनच त्यांना संरक्षण मिळेनासे झाल्यामुळे त्यांनी रसद अथवा दाणागोटा आणण्याच्या कामात टाळाटाळ करण्यास सुरुवात केली. त्यामुळे सैन्यामध्ये भयंकर दुष्काळी परिस्थिती निर्माण झाली आणि फौजेमध्ये असंतोष आणि त्रेधातिरपीट यांनी सर्वांना घेरले. छावणीतील सर्वजण आसदखानाला मानीत असत. त्याने जेव्हा असे बघितले की

फौजेतील विस्कळीतपणा दिवसेंदिवस वाढत चालला आहे तेव्हा त्याने आपल्या हातातील सत्तेचा उपयोग करून परिस्थिती काबूत आणण्याचा छातीठोकपणे निर्णय घेतला. पहिल्या प्रथम त्याने दोघा राजपुत्रांना परस्परांविरुद्ध लावून देणाऱ्या दुष्ट प्रवृत्तीच्या माणसांना पकडले आणि त्यांना मृत्यूची शिक्षा ठोठावली. नंतर त्याने सर्व अमीरउमरावांना एकत्र बोलावू पाठविले आणि दोघाही राजपुत्रांच्या भेटीला जाण्याची त्यांना मनाई केली. त्याने त्यांना असा आदेश दिला की [ ३ ] ( ७५ ) सद्यःपरिस्थितीत तुम्ही नेहमीप्रमाणे दरबार भरविला जातो त्या शामियान्यात माझ्या समवेत हजर रहात जावे. आपण असे केल्याने दोघा राजपुत्रांपैकी कोणा एखाद्याला सिंहासनावर बसविण्याची योग्य संधी प्राप्त होईपर्यंत आपल्याला राज्यकारभाराच्या बाबी व्यवस्थितपणे पार पाडता येतील. दोन्ही पक्षांनी आसदखानाने सुचविलेल्या योजनेला मान्यता दिली. आदिलशाही सैन्याने देखील आसदखानाने केलेल्या कृतीला आपला पूर्ण पाठिंबा दाखविला आणि त्याच्या इच्छेप्रमाणे कारवाई करण्याचे वचन फौजेने त्याला दिले. यानंतर आसदखानाने राज्यरक्षक हा किताब धारण केला आणि आपल्या सैन्याची एक तुकडी छावणीच्या नजीक विरट्या घालणाऱ्या तेलंगी सैनिकांना हुसकावून लावण्यासाठी रवाना केली. त्याप्रमाणे आपल्या आश्रितांपैकीच काही सैनिकांचा सख्त पहारा त्याने राजपुत्रांवर ठेवला. त्याने त्यांना असे कळविले की सिंहासनावर बसण्यासाठी जी शुभ वेळ असणे जरूर आहे त्यासाठी १० दिवसांचा काळ लोटला पाहिजे असे ज्योतिष्यांनी सांगितले आहे. त्याचप्रमाणे माझ्या मते शत्रूच्या प्रदेशात आणखी अधिक काळ राहणे हे अतिशय धोक्याचे आहे त्यामुळे मी सैन्याला ताबडतोब कुलबर्ग्याकडे कूच करून जाण्याची आज्ञा केली आहे. तिथे गेल्यावर सिंहासनावर कोणी यावयाचे यासंबंधात आपल्याला सय्यद महमद गिसू दराज याच्या शुभ आत्म्याला आवाहन करून त्याप्रमाणे निर्णय घेता येईल.

( ७६ ) राजपुत्रांनी आसदखानाने सुचविलेल्या या योजनेला आपली अनुमती दिली आणि कोविलकोंड्याचा वेढा उठविला. त्यानंतर आदिलशाही सैन्याने गुलबर्ग्याकडे कूच केले. तेथे आसदखानाने इस्माईल आदिलशहाच्या जनान्यातील प्रमुख स्त्रिया आणि अमीरउमराव यांजबरोबर सुलतानपदासाठी कोणाची निवड करावयाची याबाबत चर्चा केली. सर्वांनी असे मत दर्शविले की मृत सुलतानाने आपल्या अखेरीला जी इच्छा प्रकट केली तिचे अगदी काटेकोरपणे पालन होणे जरूर आहे. तेव्हा आसदखान हा देखील त्यांच्याशी सहमत झाला. त्याने राजपुत्र इब्राहीम याला बंदिवासात ठेवले आणि मल्लू आदिलशहा याला सिंहासनावर बसविले. अमीरउमराव आणि आदिलशाही फौजेने ताबडतोब त्याजपाशी आपली निष्ठा व्यक्त केली. विजापूर येथे परतल्यावर नव्या सुलतानाच्या वर्तनाबद्दल आसदखानाच्या मनात घृणा उत्पन्न झाली. त्याने इब्राहीमच्या पालनपोषणाची जबाबदारी त्याची आजी बुबूजी खानम हिच्यावर सोपविली. त्याने दरबारातील आपल्या अधिकारपदाचा त्याग केला आणि आपल्या

कुटुंबातील सर्व मुलामाणसांना घेऊन तो आपले जहागिरीचे गाव बेळगाव [३] (७६) येथे निघून गेला. त्याच्या जागी मुख्य वजिराच्या अधिकारपदावर इस्माईल दक्खनी याची नेमणूक करण्यात आली. २९५□

( ८० ) मल्लू आदिलशहावरील बंधन अशा तऱ्हेने दूर झाल्यावर त्याने व्यसनांचा अतिरेक करण्यास सुरुवात केली. स्त्रिया, दारू पिणे, संगीत, नाच आणि इतर दुर्गुणांच्या तो पूर्णपणे आधीन झाला. ह्या व्यसनाच्या नादात त्याने आपला सर्व वेळ घालविण्यास सुरुवात केली. राज्यकारभाराची व्यवस्था बघण्याचे काम त्याने आपल्या मर्जीतील हलकट प्रवृत्तीच्या सहकाऱ्यांवर सोपविले. राज्यांतल्या सत्प्रवृत्तीच्या प्रजाजनांबरोबर त्याची वागणूक अतिशय उद्धटपणाची झाली. त्यांच्या मुलाबाळांवर त्याची मर्जी बसली तर त्यांच्याबरोबर बेशरमपणाचे व्यवहार करण्यासाठी तो त्यांना जबरदस्तीने पकडून राजवाड्यात नेऊ लागला. सरते शेवटी युसुफखान नावाच्या एका उच्च पदस्थ तुर्की सरदाराच्या एका मुलाला आपल्याकडे पाठविण्यात यावे असा त्याने हट्ट धरला. ही गोष्ट पुरी करण्यास युसुफखानाने नकार दिला. यावर मल्लू आदिलशहाला इतका संताप आला की त्याने आपल्या काही रक्षकांची रवानगी केली आणि त्यांना अशी आज्ञा केली की युसुफखानाने आपल्या नकाराचा हट्ट कायम धरला तर त्याचे मुंडके तोडून आणा. युसुफखानाने प्रतिकाराची तयारी केली आणि सुलतानाच्या शिपायांना उधळून लावले. त्याच दिवशी त्याला झालेल्या प्रतिकाराला न जुमानता तो आपली कुटुंबीय मंडळी आणि अनुयायी या समवेत आपले जहागिरीचे गाव किसुर येथे निघून गेला. राज्यातील इतर मान्यवर व्यक्तींनी त्याच्याच उदाहरणाचे अनुकरण करून दरबार सोडला आणि ते आपापल्या जहागिरींकडे निघून गेले. परंतु आपल्याविरुद्ध होणाऱ्या बंडाची ही निशाणी आहे याची यत्किंचितही दखल सुलतानाने घेतली नाही किंवा त्याने आपल्या वागणुकीतही बदल घडवून आणला नाही.

( ८१ ) इस्माईल आदिलशहाची आई राजमाता बुबूजी खानम हिला देखील सुलतानाच्या बेताल दुर्गुणांची झळ लागली आणि तिने त्याला सिंहासनावरून खाली ओढण्याचे ठरविले. तिने युसुफखानाला पत्र लिहून कळविले की मल्लू आदिलशहा हा राज्य करण्याचे कामी नालायक आहे तेव्हा तुम्ही मला त्याला सिंहासनावरून [३] (७७) काढण्यासाठी आणि त्याचा धाकटा भाऊ इब्राहीम याला मसनदीवर बसविण्यासाठी मदत करावी. युसुफखानाने आपल्या एका स्नेह्याची रवानगी बेळगाव येथे आसद-खानाकडे करून त्याला असे कळविले की मल्लू आदिलशहाच्या जुलमाला कंटाळून मी विजापूराहून पलायन केले आहे. आता मला राजमाता बुबूजी खानम हिच्याकडून मल्लू आदिलशहाला काढून त्याच्या जागी इब्राहीमला बसविण्यासंबंधी मदत करण्या-बद्दल पत्र आले आहे. आसदखानाने त्याला उत्तरादाखल असे कळविले की राज्या-मधील सर्व प्रजाजनांना सुलतानाच्या वागणुकीचा तिटकारा आला आहे. राज्याचा

आब राखावयाचा असेल आणि ते सुरक्षित ठेवावयाचे असेल तर माझ्या मते आपण क्षणाचाही विलंब न लावता बुबूजी खानम हिने सुचविलेल्या मार्गानेच जाणे हे जरुरीचे आहे. यावर युसुफखानाने राजमातेच्या हलकाऱ्यांना परत पाठवून त्यांच्याबरोबर असा निरोप दिला की तुमच्याकडून जे काही हुकूम माझ्याकडे येतील त्यांचे अगदी काटेकोरपणे पालन करण्याची हमी मी तुम्हाला देतो. यानंतर काही काळाने दोघांमध्ये ठरवून दिलेल्या दिवशी युसुफखान हा झपाट्याने कूच करून विजापूर येथे येऊन पोहोचला आणि २०० स्वार व शिपायांना घेऊन तो अचानक किल्ल्यात शिरला. किल्ल्यातील शिबंदीचा अधिकारी नूरखान याच्याकडून त्याला फारच थोडा प्रतिकार झाला. मल्लू आदिलशहाला पकडून त्याच्या आजीच्या हुकुमावरून त्याला आणि त्याजबरोबर त्याचा धाकटा भाऊ अल्लखान ह्याला आंधळे करण्यात आले. मल्लखानाची अपेशी कारकीर्द जेमतेम ६ महिने एवढीच झाली. यानंतर लगेच राजपुत्र इब्राहीम याला अमीर-उमराव आणि प्रजाजन यांच्या जयघोषांच्या नादात सिंहासनावर बसविण्यात आले. २९६□

## २९७ □ इब्राहीम आदिलशहा पहिला

(८२) इब्राहीम आदिलशहाने गादीवर आल्यानंतर खुत्‍ब्यातून [३] (७८) इमामांची नावे काढून टाकली. त्याने राज्यामध्ये सुन्नी पंथाचे पुनरुत्थापन केले. त्याने असाही वटहुकूम काढला की राज्यामध्ये यापुढे कोणत्याही व्यक्तीने बारा कोन असलेली शेंदरी रंगाची टोपी वापरू नये. अशा तऱ्हेची टोपी वापरण्याची प्रथा पर्शियन लोकांचे अनुकरण करून त्याच्या बापाच्या फौजेतील सर्व सैनिकांनी अमलात आणली होती. त्याने परदेशी सैनिकांच्या ऐवजी आपल्या चाकरीत दक्षिणी लोकांचा भरणा केला. त्याने आपल्या शरीररक्षक दलातील परदेशी सैनिकांची संख्या फक्त ४०० वर आणून ठेवली. आसदखान लारी, खुष गेल्डी आगा, रुमीखान आणि शुजातखान कुर्द हे अधिकारी सोडून त्याने इतर सर्व परदेशी अधिकाऱ्यांचा दर्जा कमी केला. त्यांच्या जागी त्याने दक्षिणी आणि हबशी अधिकाऱ्यांना बढत्या [३] (७९) दिल्या. अशा तऱ्हेने विजापूरच्या चाकरीतून बडतर्फ करण्यात आलेले परदेशी सैनिक निरनिराळ्या सुलतानांच्या चाकरीत शिरले. विजयनगरचा हिंदू राजा रामराजा याने त्यापैकी ३००० सैनिकांना आपल्या पदरी ठेवून घेतले. त्याला मान तुकवून मुजरा करण्याची सवय त्यांना जडावी म्हणून जेव्हा जेव्हा ते त्याच्या भेटीला जात तेव्हा तेव्हा आपल्यासमोर रामराजा नेहमी कुराणाची प्रत ठेवू लागला. त्यामुळे धर्माने दिलेल्या आज्ञापालनाच्या व्रताचा भंग न करता त्यांना रामराजाने घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणे वागणे शक्य झाले.

(८३) इब्राहीम आदिलशहाने केलेल्या या नवीन कानुनाबरहुकूम त्याच्या जवळ ३०००० घोडेस्वारांचे दल निर्माण झाले. हे सर्व स्वार सुलतानाच्या खास

घोड्यांवर स्वार होणारे असत. इस्माईल आदिलशहाच्या कारकिर्दीत[२९८□] राज्यामध्ये ज्या काही रूढी प्रचलित होत्या त्यांची इब्राहीम आदिलशहाने पूर्णपणे हकालपट्टी केली. पूर्वीच्या काळात राज्याच्या जमाखर्चाच्या बाबी पर्शियन भाषेत लिहून ठेवल्या जात असत त्या आता हिंदी भाषेत लिहिल्या जाऊ लागल्या. [ ३ ] ( ८० ) राजाच्या जमाखर्चाचे खाते ब्राह्मणांच्या देखरेखीखाली सोपविण्यात आले. थोड्याच अवकाशात ब्राह्मणांनी राज्याच्या कारभारात आपल्याला असामान्य महत्त्व प्राप्त करून घेतले. आपल्या चाकरीत दक्षिणी लोकांची भरती करण्याची आणि सुन्नी पंथाचा स्वीकार करण्याची आज्ञा आसदखानाला देण्यात आली. आसदखानाने आपल्या चाकरीतील १००० परदेशी सैनिकांपैकी ६०० सैनिकांना नोकरीतून काढले. परंतु आपला धर्मपंथ बदलण्यास मात्र त्याने सपशेल नकार दिला. आपल्या छावणीमध्ये आणि आपल्या जहागिरीवर देखील तो शिया पंथाच्या आचारविचाराप्रमाणे वर्तन करीत असे. गादीवर आल्याला एक वर्ष झाल्यानंतर सुलतानाने विजयनगरच्या राजाने मागणी केल्यामुळे आपल्या सैन्यासह तिकडे चाल केली. परंतु या मोहिमेची सविस्तर हकीकत सांगण्याचे अगोदर ती मोहीम आदिलशहाने अंगावर घेण्याची कारणमीमांसा आणि विजयनगरच्या दरबारात जी राज्यक्रांती झाली तिची थोडी हकीकत देणे हे जरूर आहे. [२९९□]

( ८४ ) विजयनगरचे राज्यपद जवळजवळ ७०० वर्षे एका घराण्यात अबाधित वारसाहक्काने राहिले होते. विजयनगरचा राजा शिवराय हा मरण पावल्यानंतर त्याचा अल्पवयी मुलगा गादीवर आला. पण थोड्याच कालावधीत तो मरण पावला आणि त्याच्यामागून गादीचा वारसा त्याच्या धाकट्या भावाकडे गेला. परंतु फार काळ लोटला नाही तोच तोही मरण पावला. त्याच्या पाठीमागे त्याचा ३ महिने वयाचा अल्पवयी मुलगा हयात होता. विजयनगरच्या घराण्याचा तीमराज हा प्रमुख मंत्री होता. चातुर्य आणि अनुभव याबद्दल त्याची प्रसिद्धी होती. तो एकमेव राजप्रतिनिधी झाला. जवळजवळ चाळीस वर्षेपर्यंत राज्यातील सरदार आणि मांडलिक यांनी मोठ्या खुशीने त्याचे आज्ञापालन केले. जेव्हा हा राजपुत्र मोठा होऊन [ ३ ] ( ८१ ) राज्यकारभार करण्यायोग्य झाला तेव्हा तीमराजने त्याला विषप्रयोग केला आणि आपल्या हातात राजप्रतिनिधी पदाचा अधिकार कायम राहावा हा हेतू मनात धरून राजघराण्यातील एका अल्पवयी मुलाला राज्यावर बसविले. अखेरीला तीमराजचा मृत्यू झाल्यानंतर त्याचे अधिकार त्याचा मुलगा रामराज याच्याकडे आले. त्याने शिवरायाच्या मुलीबरोबर लग्न केले. साहजिकच या नवीन सोयरिकीमुळे त्याचे वजन आणि सत्ता यामध्ये अमर्याद वाढ झाली. त्याने हळूहळू आपल्या घराण्याला राज्यामधील अतिशय श्रेष्ठ अशा पदावर नेऊन पोहोचविले आणि राज्यातील जुन्या सरदार घराण्यांचा त्याने नाश केला. राज्यपद आपल्या स्वतःच्या नावे मिळविण्याची महत्त्वाकांक्षा त्याच्या मनात निर्माण झाली आणि त्यासाठी त्याने शिवरायाचे सारे घराणेच नामशेष

करण्याचा चंग बांधला. परंतु राज्यामधील पुष्कळ सरदारांनी त्याच्या या बेताला विरोध केल्यामुळे त्यांच्या इच्छेला त्याने मान तुकविली आणि राजघराण्यातील एका स्त्रीच्या अल्पवयी मुलाला त्याने सिंहासनावर बसविले. या मुलाची काळजी घेण्याचे काम त्याने मुलाचा चुलता भोज तिरमलराय याच्यावर सोपविले. भोज तिरमलची गणना जवळजवळ वेड्यातच होत होती. त्यामुळे ह्याच्यापासून आपल्याला कोणताच धोका नाही असा विचार रामराजाने केला. पाचसहा वर्षांच्या कालावधीत रामराजाने विश्वासघाताने ज्या ज्या सरदारांनी त्याच्या सिंहासनावर आरूढ होण्याच्या महत्त्वाकांक्षेला विरोध केला होता त्या त्या सर्वांचा त्याने नायनाट केला. त्यानंतर त्यानेच उच्चाधिकाराप्रत नेलेल्या एका गुलामाच्या ताब्यात त्याने विजयनगर शहर सोपविले आणि त्याने स्वतः मलबार देशाच्या ज्या काही राजांनी विजयनगरच्या राजाकडे खंडणी देणे तहकूब केले होते त्यांच्याविरुद्ध सैन्य घेऊन चाल केली. लवकरच त्याने या सर्व राजांना शरण येण्यास लावले आणि त्यांचे किल्ले त्याने हिसकावून घेतले. यानंतर तो विजयनगरच्या दक्षिणेस असलेल्या एका बलाढ्य जमिनदाराविरुद्ध चाल करून गेला. तेथे रामराजा जवळजवळ सहा महिने अडकून पडला. दोन्ही पक्षांत अनेकवेळा युद्धाची धुमश्चक्री उडाली पण त्या जमीनदाराविरुद्ध [३] (८२) रामराजाला निर्णायक असे काहीही करता आले नाही.

(८५) आपल्या लष्कराच्या तरतुदीसाठी नेलेला खजिना रामराजाने या युद्धात खर्च करून संपविला आणि त्यानंतर त्याने आपल्या दुय्यमाला युद्ध पुढे चालविता येणे त्याला शक्य व्हावे म्हणून विजयनगरमधून द्रव्याचा पुरवठा करण्यासाठी लिहिले. परंतु जेव्हा त्याच्या दुय्यमाने खजिन्याची तिजोरी उघडली तेव्हा त्यामधील अफाट संपत्ती त्याच्या नजरेस पडली. त्याचे डोके फिरले आणि आपल्या हितकर्त्याविरुद्ध बंडाची निशाणी उभारण्याचा त्याने तिथल्या तिथे निश्चय केला. त्याने राजाला कैदेतून मुक्त केले. हे करण्याचे अगोदर त्याने भोज तिरमलराय याला आपल्या पक्षाकडे वळवून घेतले. रामराजाच्या जुल्मी राजवटीमुळे अनेक मांडलिक राजे संतप्त झाले होते. आपल्या कायदेशीर राजाला पाठिंबा देण्याकरता म्हणून त्यांनी झपाट्याने विजयनगरकडे कूच केले. थोड्याच काळात राजाच्या निशाणाखाली ३० हजार घोडेस्वार आणि असंख्यात पायदळी फौज इतकी सेना जमा झाली. रामराजाने ज्या गुलामाला विजयनगरचा कारभार बघण्यासाठी मंत्री म्हणून ठेवले होते त्याला हे बंड केल्याबद्दल पश्चात्ताप होईल आणि सरतेशेवटी ह्या सर्व गोष्टींची चहाडीक तो रामराजाजवळ करील असे भोज तिरमलराय याला वाटले. म्हणून त्याने आपल्या उपकारकर्त्याला ठार मारले आणि विजयनगरच्या राज्यकारभाराची व्यवस्था आपल्या हाती घेतली.

(८६) या बंडाची हकीकत रामराजाला कळताच रामराजाने घाईघाईने शत्रूबरोबर तह केला आणि तो स्वतः विजयनगरकडे परतला. परंतु विजयनगरकडे

येताना वाटेत त्याचे अनेक अधिकारी आपल्या कायदेशीर राजाला मिळण्यासाठी म्हणून त्याला सोडून निघून गेले. तेव्हा रामराजाने सद्यःपरिस्थितीत युद्धाच्या भानगडीत न पडणे आणि स्वतःच्या ताब्यातील मोठ्या जहागिरीवर समाधान मानून राहाणे श्रेयस्कर आहे असा विचार केला. यानुसार रामराजा आणि विजयनगरचा तरुण राजा या दोघांमध्ये तह झाला. या तहानुसार रामराजाने आपल्या ताब्यातील प्रदेशाचा स्वतःसिद्धपणे उपभोग घ्यावा असे ठरले. याप्रमाणे आता शांतता प्रस्थापित झाल्यावर राजधानीमध्ये जी राज्यक्रांती झाली तिला पाठिंबा देण्यासाठी आलेली सरदार मंडळी राज्यातील आपापल्या निरनिराळ्या जिल्ह्यांकडे निघून गेली. त्यांनी आपल्या तरुण राजाच्या रक्षणाची जबाबदारी त्याचा [३] (८३) चुलता भोज तिरमलराय याच्याकडे सोपविली. ही घटना घडल्यानंतर काही काळाने भोज तिरमल यास राज्य करण्याची महत्त्वाकांक्षा निर्माण झाली. त्याने आपल्या पुतण्याला गळा दाबून ठार मारले आणि विजयनगरचे सिंहासन बळकाविले. भोज तिरमल हा राजघराण्यातील एक असल्यामुळे रामराजाच्या सत्तेऐवजी भोज तिरमल याची सत्ता राज्यातील सरदारांनी ग्राह्य ठरविली. परंतु थोड्याच कालावधीत भोज तिरमल याने जुलूम, जबरदस्ती आणि दडपशाही त्यांचा इतका कहर केला की ती सहन करणे त्यांच्या आवाक्याबाहेर गेले. भोज तिरमल याच्याबद्दल त्यांच्या मनात संताप निर्माण झाला. त्यांनी रामराजाला बोलाविणे पाठविले आणि राज्याचा कारभार हाती घेण्याबद्दल त्याला विनंती केली.

(८७) त्यांच्या या कारस्थानाची बातमी भोज तिरमलराय याला मिळाली. त्याने विजापूरच्या इब्राहीम आदिलशहाकडे सहा लक्ष होन इतकी रक्कम आणि अनेक मौल्यवान नजराणे देऊन आपल्या वकिलांची रवानगी केली. आपल्याला मदत करण्यासाठी कूच करून येण्याबद्दल त्याने इब्राहीम आदिलशहाची याचना केली. या मदतीच्या बदली मी तुमचा मांडलिक म्हणून कायम राहीन आणि तुमचे सैन्य कूच करून येत असताना प्रत्येक दिवसाच्या खर्चासाठी २ लाख होन तुम्हाला मी देईन असे वचन त्याने इब्राहीम आदिलशहाला दिले. भोज तिरमलने जी मोठी आमिषे दाखविली त्याचा इब्राहीम आदिलशहाला मोह पडला आणि आसदखानाच्या सल्ल्यानुसार हिजरी ९४२ या वर्षी त्याने आपल्या राजधानीतून कूच केले. कुठलाही प्रतिकार
हिजरी ९४२ / इ. स. १५३५ न होता तो विजयनगरला येऊन पोहोचला. भोज तिरमलराय याने स्वतः त्याला शहरात नेले, आणि विजयनगरच्या सिंहासनावर त्याला बसविले. जवळजवळ ७ दिवस या प्रसंगानिमित्त उत्सव समारंभ चालू राहिले होते. याच सुमारास रामराजा आणि त्याच्याशी संगनमत केलेले सरदार यांनी विजयनगरच्या रायाला (भोज तिरमलराय) पत्र पाठवून बंड केल्याबद्दल आपल्याला पश्चात्ताप झाल्याचे कळविले. यापुढे राजनिष्ठेमध्ये कोणत्याही प्रकारे कसूर केली जाणार नाही असे आश्वासन असलेला मजकूरही त्यांनी त्यामध्ये लिहिला. त्याचप्रमाणे त्यांनी

आपल्या देशाच्या राजकारणात मुसलमानांना आत घुसवण्याचे जे भयंकर परिणाम होतील त्याचे भयानक चित्रही त्यांनी राजासमोर उभे केले. त्यांनी असेही [ ३ ] (८४) लिहिले की तुम्ही असे केल्यास आपली देवळे आणि मूर्ती ही यवनांकडून अपवित्र होतील आणि त्यांचा विध्वंस केला जाईल आणि बहमनी सुलतानांच्या कारकिर्दीत घडलेल्या इतिहासाची पुनरावृत्ती होऊन राज्यातल्या सर्व थरांतील प्रजाजनांची मुलेबाळे बंदिवासामध्ये घालून मुसलमानांकडून अपहरण केली जातील. रामराजाने या पत्रात आपल्या राजाला असे प्रतिज्ञापूर्वक आश्वासन दिले की जर तुम्ही विजापूरचा सुलतान आपल्या राज्यामध्ये परत माघार घेईल अशी कारवाई कराल तर तुमच्या बरोबरच्या निष्ठेपासून मी कधीही च्युत होणार नाही. भोज तिरमल याला असे वाटले की आता आपल्याला विजापूरच्या सुलतानाच्या मदतीची काहीच गरज नाही. त्यामुळे त्याने मुसलमानी सैन्याला माघारी फिरण्याची विनंती केली. इब्राहीम आदिलशहाबरोबर झालेल्या करारानुसार त्याने सैन्याच्या खर्चादाखल रोख रक्कम म्हणून ५० लक्ष होन दिले. त्याशिवाय अतिशय भारी किमतीचे नजराणेही त्याने इब्राहीम आदिलशहाकडे भेट म्हणून रवाना केले. यामध्ये १२ उत्तमोत्तम हत्ती आणि काही अलबख घोडेही होते.

( ८८ ) इब्राहीम आदिलशहा अजूनपावेतो कृष्णा नदी देखील ओलांडून गेला नव्हता तोच रामराजा आणि त्याचे साथीदार यांनी दिलेले वचन मोडले आणि त्यांनी झपाट्याने विजयनगरकडे कूच केले. शहरातील पुष्कळशा शिबंदीला त्यांनी अगोदर लाच देऊन फितविले होते. भोज तिरमलने आपल्या पुतण्याचा म्हणजे विजयनगरच्या राजाचा खून केला त्याबद्दल सूड घेण्यासाठी म्हणून भोज तिरमलला ठार मारण्याचा निश्चय केला आहे आणि म्हणून आम्ही विजयनगरवर चाल करून जात आहो असा आव त्यांनी आणला. आपला विश्वासघात करण्यात आला आहे असे जेव्हा भोज तिरमल याला कळून चुकले तेव्हा त्याने विजयनगरच्या किल्ल्यात आपल्याला कोंडून घेतले. निराशेने तो अगदी वेडापिसा झाला आणि त्याने शाही हत्ती आणि घोडे यांचा आपल्या शत्रूला उपयोग होऊ नये म्हणून त्यांना आंधळे केले आणि त्यांच्या शेपट्या कापून काढल्या. अनेक शतके विजयनगरच्या राजघराण्याने जमा केलेले हिरे, माणके, रत्ने, जडावाच्या वस्तू, इतर मौल्यवान धातू आणि मोती यांचा त्याने भारी वजनाच्या जात्यात घालून चुराडा केला आणि त्यांची भुकटी त्याने जमिनीवर फिसकारून टाकली. नंतर त्याने आपल्या दिवाणखान्यातील एका खांबाला एक तलवारीचे पाते घट्ट अडकविले आणि त्यावर तो आपल्या छातीचा भाग पुढे करून इतक्या जोराने जाऊन आदळला की ते पाते त्याच्या छातीत आरपार घुसून पाठीमागून बाहेर आले. अशा तऱ्हेने त्याने आपल्या जीविताचा शेवट करून घेतला. अगदी [३] (८५) त्याच वेळी त्याच्या शत्रूला प्रवेश देण्यासाठी म्हणून राजवाड्याचे दरवाजे उघडले जात होते. रामराजा आता विजयनगरचा राजा बनला आणि त्याला कोणीही प्रतिस्पर्धी उरला नाही.

(८९) रायचूर येथे पोहोचल्यावर इब्राहीम आदिलशहाच्या कानावर या राज्यक्रांतीची बातमी गेली तेव्हा त्याने आसदखानाला आपल्या फौजेपैकी जवळजवळ सर्व फौज देऊन अधोनीच्या महत्त्वाच्या किल्ल्याचा पाडाव करण्यासाठी म्हणून रवाना केले. किल्ला अगदी पडण्याच्या बेतात होता तोच विजयनगरहून रामराजाचा धाकटा भाऊ वेंकटाद्री अधोनीला कुमक करण्यासाठी म्हणून मोठे सैन्य घेऊन चाल करून आला. तो नजीक चालून आला आहे हे पाहिल्यानंतर आसदखानाने वेढा उठविला आणि त्याच्या रोखाने त्याने चाल केली. दोन्ही फौजांत भयंकर धुमश्चक्री उडाली. शत्रूच्या प्रचंड सैन्यबळापुढे या लढाईत आपली वाताहात होऊन आपल्याला हार खावी लागेल हे आसदखानाने ओळखले. त्याने अतिशय [300] शिस्तीत माघार घेतली. वेंकटाद्रीच्या विजयी सैन्याने जवळजवळ सात फर्सख एवढ्या अंतरापर्यंत त्याचा पाठलाग केला. त्यानंतर आसदखानाने आपल्या सैन्याची छावणी दिली. दुसऱ्या दिवशी शत्रूच्या माघारीत त्याला विघ्ने निर्माण करण्याच्या उद्देशाने तयार असावे [301] या हेतूने वेंकटाद्रीने आसदखानाच्या छावणीपासून ६ फर्सख अंतरावर मोठ्या समाधानतेने मुक्काम केला. आसदखानाची मनोमन इच्छा वेंकटाद्रीने असेच काहीतरी करावे अशी होती. दुसऱ्या दिवशी उजाडावयाच्या आत आसदखानाने वेंकटाद्रीच्या छावणीवर अचानक हल्ला चढविला. आसदखानाकडून अशी काहीतरी कारवाई होईल याची वेंकटाद्रीला मुळीच जाणीव नव्हती. त्याला इतका आत्मविश्वास वाटत होता की त्याने बेसावधपणे संरक्षणाची काहीच तरतूद केली नाही. शत्रू आल्याची धोक्याची सूचना दिली जाईतोपर्यंत आसदखान वेंकटाद्रीच्या तंबूपर्यंत जाऊन पोहोचला. वेंकटाद्रीला पळून जाण्यासाठी जेमतेम अवधी मिळाला. त्याने आपली सर्व संपत्ती, जनाना आणि हत्ती पाठीमागे ठेवले. ते सर्व आसदखानाच्या विजयी सैन्याच्या हाती पडले. दिवस उजाडल्यावर आपले विस्कळीत झालेले सैन्य गोळा करून त्याने जणू काही आपण शत्रूबरोबर सामना देणार असा आभास निर्माण करण्यासाठी त्या सैन्याची उभारणी केली. परंतु आपल्यावर मात करण्याच्या निर्णायक तयारीने [ ३ ] ( ८६ ) आसदखान उभा ठाकला आहे या जाणिवेने आणि आपण युद्ध केल्यास आपली पत्नी आणि मुले यांच्यावर कोणता प्रसंग गुदरेल या भीतीने त्याने सामना देण्याचे टाळले. त्याने काही मैल पाठीमागे माघार घेतली आणि तेथे आपली छावणी दिली. तेथून त्याने आपल्यावर कोसळलेल्या भयंकर दुर्घटनेची हकीकत रामराजाला लिहून कळविली आणि त्याच्याकडे कुमक पाठविण्याबद्दल विनंती केली. रामराजाने ताबडतोब द्रव्य आणि माणसे यांची भरपूर कुमक पाठविली आणि युद्ध चालू ठेवण्याचा आपला निर्धार प्रकट केला. परंतु त्याने खाजगीरित्या आपल्या भावाला असे कळविले की इब्राहीम आदिलशहा हा अधोनीला वेढा देण्यास जो उद्युक्त झाला तो आपणहून झाला नाही असे मानण्यास भरपूर जागा आहे. त्याचप्रमाणे त्या प्रांतातील जमीन-दारांनी त्याला लढाई करण्यासाठी या म्हणून बोलावू पाठविल्याचा मला दाट संशय

येत आहे. त्याचप्रमाणे तुझ्या सैन्यातील काही अधिकारी शत्रूला सामील झाले असावेत असेही मला वाटते. म्हणून यासमयी मुसलमानांबरोबर तह करण्याचे तुझ्या दृष्टीने शहाणपणाचे ठरेल अशी माझी धारणा आहे. यासाठी तू त्याप्रमाणे कारवाई करून आसदखानाकडून तुझी बायकामुले आणि इतर कुटुंबीय मंडळी यांची सुटका करून घे. रामराजाने दिलेल्या या सल्ल्यानुसार वेंकटाद्रीने आसदखानाच्या मध्यस्तीने आणि वजनाने इब्राहीम आदिलशहाकडे तह घडवून आणण्यासाठी बोलणी लावली. ही मागणी मान्य करण्यात आली आणि दोन्ही पक्षांना समाधानकारक अशा अटीवर तह झाला. त्यानंतर इब्राहीम आदिलशहा आसदखान आणि आपले इतर उमराव आणि फौज यांना बरोबर घेऊन विजापूरला परतला.

( ९० ) या मोहिमेत एका दुष्ट प्रवृत्तीच्या माणसाने सुलतानाला असे सांगितले की तहासाठी मध्यस्थी घडवून आणण्याकरता आणि युद्ध-कैद्यांची सुटका व्हावी म्हणून आसदखानाला रामराजाकडून भरपूर द्रव्य आणि त्याशिवाय हिरे आणि सोने व चांदीच्या चिपा लाच म्हणून मिळाल्या आहेत. ह्या गोष्टीने राग येण्याऐवजी किंवा आसदखानाला ज्या मोठ्या रकमा मिळाल्या होत्या त्याबद्दल अभिलाषा निर्माण होण्याच्या ऐवजी इब्राहीम आदिलशहाने ही माहिती देणाऱ्याची निर्भर्त्सना केली आणि तो असे म्हणाला की, " माझ्या पदरी आसदखानासारखा चाकर आहे. त्याला खंडणी देण्यासाठी मोठमोठे राजे मनाशी इच्छा बाळगून असतात, [ ३ ] ( ८७ ) आणि आपल्या मानेवर शरणागतीचे ( आधीनतेचे ) जोकड ठेवून त्याच्या समोर येतात. असा चाकर दिल्याबद्दल मी परमेश्वराला धन्यवाद देतो. " यानंतर त्याने ही बातमी देणाऱ्याच्या समक्ष आसदखानाला बोलावू पाठविले. तो आल्यानंतर आपला खास पोशाख देऊन त्याने आसदखानाचा सन्मान केला, आणि त्याच्यावर आपली मेहरबानगी झाली आहे हे दाखविण्यासाठी त्याच्यावर त्याने खास मानमरातबांची खैरखैरात केली. इब्राहीम आदिलशहाच्या या कृतीने आसदखानाच्या शत्रूंना गोंधळात टाकले आणि काही काळ त्याच्याविरुद्ध कारस्थाने करण्याच्या कामी त्यांना प्रतिबंध केला.

(९१) विजापूर येथे परतल्यानंतर सुलतानाने आसदखानाची मुख्य वजिराच्या अधिकारावर आणि त्याचप्रमाणे फौजेच्या सेनापतिपदावर नियुक्ती केली. आसदखानाला अशा तऱ्हेने बढती मिळाल्यामुळे त्याच्या शत्रूचा त्याच्याविषयीचा मत्सर दिवसेंदिवस अधिकाधिकच होत गेला. आसदखानाचे राज्यातील महत्त्व एकंदर परिस्थितीला धोका निर्माण करण्या इतपत वाढले आहे असे सूचित करण्याची एकही संधी त्याचे शत्रू वाया दवडीत नसत. बऱ्याच काळपर्यंत आसदखानाविरुद्ध करण्यात आलेल्या आरोपांकडे कोणीही फारसे लक्ष दिले नाही तरी देखील सरतेशेवटी सुलतानाच्या मनावर या आरोपांचा थोडाफार परिणाम झालाच आणि खाजगीरित्या सुलतान आपल्या वजिराचा नक्षा उतरविण्याची माझी मनापासून इच्छा आहे असे उद्गार काढू

लागला. युसुफ तुर्क म्हणून सुलतानाचा एक खाजगी कारभारी होता. त्याने सुलतानाला आसदखानाबद्दल इषारा देण्याची ही योग्य संधी आहे असा विचार केला आणि तो सुलतानाजवळ बोलला की आसदखान आणि बुरहाण निजामशहा हे दोघेजण एकाच धर्मपंथाचे अनुकरण करणारे आहेत. त्यामुळे आसदखानाचा बुरहाण निजामशहा-बरोबर गुप्तपणे पत्रव्यवहार चालू असतो. आसदखानाचा बेत बुरहाण निजामशहाकडे बेळगावचा किल्ला स्वाधीन करण्याचा आणि त्याच्या चाकरीत रुजू होण्याचा आहे. या हकीकतीने इब्राहीम आदिलशहाच्या मनातील संशयाला अधिकच बळकटी आली. त्याने आपल्या विश्वासातील मंत्र्याला म्हणजे युसुफ तुर्कला विचारले की आसदखानाला पकडावयाचे म्हटल्यास अतिशय खात्रीलायक अशा कोणत्या मार्गाची तू शिफारस करशील. युसुफ तुर्क याने सल्ला दिला की बेळगावहून त्याला दरबारात हजर राहण्या-साठी बोलवावे. या बोलविण्यासाठी त्याला असे कारण द्यावे की राजपुत्र अली याची सुंता करण्याच्या समारंभासाठी तुझे येणे अवश्य आहे. यासाठी तो आल्यानंतर त्याला सहज बंदिस्त करता येईल किंवा त्याच्या अधिकारामध्ये काटछाट करता येईल. सुलतानाच्या चाकरीतील पाणी थंड करण्याच्या कामावर असलेल्या [ ३ ] ( ८८ ) नोकराने दोघांमधील हे संभाषण ऐकले. त्याने आपल्या कुटुंबातील मंडळींना गुप्तपणे ती बातमी सांगितली आणि त्यांनी ती बातमी आपल्या मित्रमंडळीमध्ये फैलाविली. त्याचा परिणाम असा झाला की थोड्याच कालावधीत सुलतानाची आसदखानावर गैरमर्जी झाली आहे ही गोष्ट झाडून साऱ्या लोकांच्या चर्चेचा विषय होऊन बसली. ही गोष्ट आसदखानाला कळली आणि तो त्यामुळे सावध झाला. त्यामुळे जेव्हा त्याला दरबारात हजर राहण्यासंबंधी सुलतानाकडून खलिता गेला तेव्हा आपण आजारी आहोत या सबबीखाली त्याने दरबारात हजर राहण्याचे टाळले. यानंतर त्याच्या नोकरांना लाच देऊन आसदखानाला विषप्रयोग करण्याचे प्रयत्न करण्यात आले. परंतु त्यांचा काहीही उपयोग झाला नाही. त्याच्या विरुद्ध सुलतानाने जे उपाय अंमलात आणले त्याचा परिणाम असा झाला की आपल्या विरुद्ध विश्वासघात होईल या भीतीने तो अधिक जागरूक राहू लागला. सरतेशेवटी असे ठरले की सुलतानाने युसुफ तुर्क याला बेळगांवच्या जवळपास जहागिरी दाखल जमीनजुमला द्यावा. त्या जहागिरीवर युसुफ तुर्क याने आपल्या आश्रितांसह जावे असेही सुलतानाने त्याला सांगितले. असे करण्यात त्याचा असा उद्देश होता की एखादी योग्य संधी चालून आल्यास तिचा फायदा घेऊन आसदखानाला घेरण्यासाठी युसुफ तुर्क हा जवळपास असावा.

(९२) आसदखान हा कसलेला आणि अतिशय सावधगिरी बाळगणारा मुत्सद्दी होता. अशा तऱ्हेची कारस्थाने केल्यामुळे तो सहजासहजी फसेल अशी सुलतानाची अपेक्षा असली तर ती खोटी होती. एक दिवस बेळगावपासून काही अंतरावर असलेल्या एका बागेतील राजवाड्याला भेट देण्यासाठी आसदखान आपल्या-

बरोबर फक्त थोडेसेच नोकर-चाकर घेऊन निघाला परंतु आपल्या पाठोपाठ ४०० घोडेस्वारांना येण्याची त्याने आज्ञा देऊन ठेविली. युसुफ तुर्कच्या एका हेराला आसदखानाच्या ह्या हालचालींची बातमी लागली. तो घाईघाईने आपल्या धन्याकडे गेला आणि त्याने त्याला सांगितले की बरोबर एकही चाकर न घेता आसदखान हा एकटाच बाहेर पडला आहे. त्याच्यावर अचानक हल्ला करून त्याला कैद करण्याची ही उत्कृष्ट संधी चालून आली आहे. याप्रमाणे युसुफ तुर्क याने बागेच्या दिशेने कूच केले. परंतु बागेला शिपायांनी दिलेला वेढा बघितल्यानंतर त्याला आश्चर्याचा धक्का बसला. त्याला जेव्हा असे आढळून आले की आपल्या सैनिकांची संख्या शत्रुसैन्यापेक्षा वरचढ आहे तेव्हा त्याने जबरदस्तीने आपला उद्देश साध्य करण्यासाठी प्रयत्न करण्याचे ठरविले. परंतु आसदखानाने त्याचा हल्ला परतवून लावला आणि त्याचे [३] (८९) अनेक सैनिक कैद करून मोठ्या विजयोत्साहाने तो बेळगावला परतला.

(९३) आपल्या संमतीने हा हल्ला करण्यात आल्याचे इब्राहीम आदिलशहाने नाकबूल केले. आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ त्याने युसुफला दरबारात हजर होण्याचा हुकूम दिला आणि त्याला कैदेत टाकले. त्याचवेळेला त्याने आसदखानाला लिहून कळविले की युसुफच्या वर्तनाने माझा अपमान झाल्यासारखे मला वाटत आहे आणि तुमची इच्छा असेल त्याप्रमाणे त्याला कसलीही शिक्षा लावण्याची माझी तयारी आहे. या घटनेच्या सत्य परिस्थितीची आसदखानाला पूर्णपणे जाणीव असल्यामुळे त्याने या पत्राला उत्तर पाठविले आणि मोठ्या नम्रपणे लिहिले की या सर्व प्रकरणात मीच एकटा दोषी आहे आणि आपली क्षमायाचना करण्यासाठी मोठ्या खुषीने मी दरबारात हजर झालो असतो. परंतु माझ्या वर्तनाकडे आपणहून बादशहानी दुर्लक्ष करण्याची कृपा केल्यामुळे माझ्या मनात असलेल्या उतराईपणाची भावना मी कोणत्या शब्दांनी व्यक्त करावी याबद्दल माझा गोंधळ उडून गेला आहे. या पत्राबरोबर त्याने आपल्याकडील सर्व कैदी पाठविले. प्रत्येकाला त्याने मानाचा पोषाख नजर केला आणि सुलतानाला देण्यासाठी मौल्यवान भेटी त्यांच्या ताब्यात सोपविल्या.

(९४) सुलतान आणि त्याचा वजीर आसदखान यांच्यामध्ये निर्माण झालेली तेढ दक्षिणेत सर्वमुखी झाली. त्याचा फायदा घेऊन बुरहाण निजामशहा आणि अमिर बरीद यानी असे खोटेनाटे आणि लबाड वर्तमान पसरविले की आम्ही जर बेळगाववर चाल करून गेलो तर ते शहर आमच्या हवाली करण्याचे वचन आसदखानाने आम्हाला दिले आहे आणि यानुसार त्यांनी हिजरी ९४९ या वर्षी इब्राहीम आदिलशहाच्या
हिजरी ९४९ } प्रदेशावर आक्रमण केले. त्यांनी त्याच्या अधिकाऱ्यांपासून सोलापूर-
इ. स. १५४२ } सह पाच जिल्ह्यांचा मुलख हिसकावून घेतला आणि त्यांचा ताबा ख्वाजा जहान दकनी याच्या अधिकाऱ्यांकडे सोपवून त्यानंतर त्यांनी बेळगावच्या दिशेने कूच केले. पहिल्याप्रथम आसदखानाचे या मोहिमेत कोणत्याही प्रकारचे अंग नव्हते. परंतु शत्रू तेव्हा ६००० घोडेस्वार घेऊन चाल करून आला तेव्हा [३] (९०)

आपल्या जहागिरीचा लूटमारीपासून बचाव व्हावा या हेतूने त्याने शत्रुबरोबर हातमिळवणी करणे शहाणपणाचे ठरेल असा विचार केला. यामुळे वरील दोस्तांच्या सामर्थ्यांत वाढ होऊन त्यांना अधिक चेतावणी मिळाल्यासारखे झाले आणि त्यांनी विजापूरच्या आवती-भोवती पर्यंतच्या प्रदेशांत लूटमारीचा उच्छाद करून सोडला. त्यांना रणांगणात तोंड देणे आपल्याच्याने शक्य होणार नाही असा इब्राहीम आदिलशहाने विचार केला आणि तो आपल्या कुटुंबियांसमवेत कुलबर्ग्याकडे निघून गेला.

(९५) जरी आसदखानाचा त्याच्या सार्वभौमाने त्याग केला होता तरी आसदखान मात्र आपल्या सार्वभौमाच्या हितसंबंधाचे रक्षण करण्याबाबत एकनिष्ठ होता. त्याने आपला एक अतिशय विश्वासू सेवक अली महमद बदक्षी याला गुप्तपणे वऱ्हाडचे राजधानीचे शहर एलिचपूर येथे पाठविले. तेथे सुलतान अल्लाउद्दीन इमादशहा[३०२□] याजपाशी त्याने आसदखानाचा पुढीलप्रमाणे निरोप कळविला तो असा : 'दैवाच्या विचित्र आणि अस्थिर अशा फेरबदलामुळे अशी एक घटना घडून आली आहे की त्यामुळे गोंधळरूपी चक्रव्युहात मी अडकून गेलो आहे. अशा परिस्थितीत तुम्ही इब्राहीम आदिलशहाच्या मदतीसाठी कूच करून यावे अशी माझी तुम्हाला विनंती आहे. तुम्ही सरहद्दीपाशी येऊन पोहोचल्यावर शक्य तितक्या लवकर मी तुम्हाला येऊन मिळेन.' इमादशहाने आसदखानाकडून आलेल्या या कळकळीच्या विनंतीला मान देऊन विलंब न लावता कुलबर्ग्याच्या दिशेने कूच केले. त्यावेळी बुरहाण निजामशहा आणि अमिर बरीद हे दोघेजण विजापूरच्या किल्ल्याला वेढा देऊन बसले होते. त्यांनी वेढा उठविला आणि शहराच्या उपविभागाची नासधूस करीत वऱ्हाडच्या सैन्याचा इब्राहीम आदिलशहाबरोबर मिलाफ होण्यास प्रतिबंध करण्यासाठी म्हणून त्यांनी कूच केले. यापूर्वीच ठरल्याप्रमाणे आता आसदखानाने दोस्तांचा पक्ष सोडून दिला आणि आपल्या सर्व अनुचरांसहित तो इमादशहाला येऊन मिळाला. त्याच्यापाशी त्याने निवेदन केले की देशद्रोही युसुफ याने माझ्या निष्ठेबद्दल सुलतानाच्या मनात संशय निर्माण केला. माझी बेअदबी करणाऱ्या प्रत्येक फालतू गोष्टीला [ ३ ] (९१) इब्राहीम आदिलशहाने ध्वन्यर्थाने आपला कान दिला. परिणामी सुलतानाची माझ्यावर जी अवकृपा झाली होती तिचा फायदा बुरहाण निजामशहाच्या वजिरांनी घेतला. आपला स्वार्थ सिद्धीस जावा या हेतूने त्यांनी उघडपणे जाहीर केले की अहमदनगरचा सुलतान जर विजापूरच्या मुलखावर आक्रमण करील तर आसदखानाने त्याला येऊन मिळण्याचे कबूल केले आहे. या दुष्ट गोष्टीवर इब्राहीम आदिलशहाचा विश्वास बसला आणि तो माझ्यावर अधिकच संतापला. त्याने मला माझ्या अधिकारावरून काढून टाकले इतकेच नव्हे तर तऱ्हतऱ्हेचे प्रयत्न करून माझा प्राण घेण्याची कोशीस केली. आसदखानाने पुढे असे सांगितले की आपल्या हिकमती अशा तऱ्हेने यशस्वी झाल्याचे जेव्हा शत्रूला आढळून आले तेव्हा आपल्या बाजूला मुलामा देण्यासाठी त्यांनी माझ्या जहागिरीत प्रवेश केला. मला जेव्हा असे आढळून आले की माझ्या सार्व-

भौमाचा मला कसल्याही प्रकारचा आधार नाही तेव्हा केवळ माझ्या कातडीचा बचाव व्हावा या हेतूने त्या वेळेपुरते तरी शत्रूला जाऊन मिळणे मला भाग पडले. आता आपण माझ्या मदतीसाठी आला आहात तरी शत्रूने केलेल्या निराधार आरोपांमुळे आदिलशहाच्या मनावर जे परिणाम झाले आहेत त्याचे निराकरण करण्याचे बाबतीत मी तुमच्यावर विसंबून आहे. परंतु तसे करता येणे अशक्य झाल्यास माझ्या सुलतानाच्या मनात जी शिक्षा मला द्यावी असे वाटेल ती शिक्षा मोठ्या खुषीने भोगण्याची माझी तयारी आहे.

(९६) आसदखानाच्या निष्ठेबद्दल इमादशहाची पूर्णपणे खात्री पटली तेव्हा त्याने मनापासून त्याची बाजू उचलून धरली. त्याने त्याला त्याच दिवशी इब्राहीम आदिलशहाकडे नेले आणि त्याने इब्राहीम आदिलशहाची निष्कारण जी गैरसमजूत झाली होती त्याबद्दल सर्व परिस्थिती त्याने उघड करून सांगितली. इब्राहीम आदिलशहाने आसदखानाला घट्ट आलिंगन दिले आणि त्याला त्याने जी वाईट वागणूक दिली होती त्याबद्दल पश्चात्तापाची भावना व्यक्त केली. आपल्या मनात आता कसलाही किंतू राहिला नाही हे आसदखानाच्या मनावर बिंबविण्यासाठी त्याने आपल्या विश्वासाचा गैरफायदा घेणाऱ्या युसुफ आणि त्याच्या हस्तकांना कैद केले. इतकेच नव्हे तर युसुफची जहागिरी त्याने, ऐनउल्मुल्क गिलानी याला बहाल केली. ऐनउल्मुल्क हा नामवंत अधिकारी पूर्वी अमिर बरीदच्या चाकरीत [ ३ ] (९२) होता. त्याची नोकरी सोडून आदिलशहाच्या नोकरीत शिरण्याविषयी त्याचे मन आसदखानानेच वळवले होते. आदिलशहा आणि त्याचा वजीर यांच्यामध्ये झालेल्या समेटामुळे एकंदर परिस्थिती साफ बदलून गेली. इब्राहीम आदिलशहा आणि इमादशहा हे शत्रूबरोबर लढाई करण्यासाठी कूच करून गेले. परंतु शत्रूने मोठ्या घाईने दौलताबादकडे माघार घेतली. त्यांचा विजापुरी आणि इमादशाही फौजांनी सक्त पाठलाग केला आणि विजापूरच्या मुलखांत शत्रूने जो उच्छेद केला होता त्याची भरपूर भरपाई करून घेतली. परंतु एक अशी घटना घडून आली की ज्यामुळे दोन्ही पक्षांत तह झाला. अमिर बरीद एकाएकी मरण पावला आणि बुरहाण निजामशहाची परिस्थिती इतकी अगतिक झाली की त्याला तहाची याचना करणे भाग पडले. तहाची बोलणी करण्याबाबत त्याने त्या धर्मनिष्ठ शहा ताहिरला आपला वकील म्हणून आदिलशहाकडे रवाना केले. या बोलण्यातून दोन्ही पक्षांमध्ये तह झाला आणि असे ठरले की निजामशहा आणि बरीदशहा यांनी जिंकून घेतलेले सोलापूरचे पाच जिल्हे इब्राहीम आदिलशहाकडे सुपूर्द करण्यात यावे. त्यावर आपण आपला कधीही अधिकार सांगणार नाही असे बुरहाण निजामशहाने कबूल केले. या तहावर दोन्ही पक्षांच्या सह्या झाल्या आणि कागदपत्रांची एकमेकांकडे देवाणघेवाण करण्यात आली. यानंतर दोन्हीही सुलतान आपापल्या राजधान्यांकडे परत फिरले.

(९७) हिजरी ९५० इ. स. १५४३ पुढील वर्षी म्हणजे हिजरी ९५० मध्ये इब्राहीम आदिलशहाने अल्लाउद्दीन इमादशहाची मुलगी रुबिया सुलतानाबरोबर [३०३०] लग्न लावले. लग्नाचा समारंभ मोठ्या थाटामाटाने साजरा करण्यात आला. बुरहाण निजामशहाला आदिलशहाच्या लष्करी सामर्थ्याचे वैमनस्य वाटले. नुकत्याच झालेल्या लढाईचा जो शेवट झाला होता त्यामुळे देखील त्याची मनःस्थिती उद्विग्न झाली. त्याने असे जाहीर केले की मागील युद्धानंतर विजापूरकडे पाच जिल्हे मला सक्तीने देण्यास भाग पाडले गेले ते परत मिळविल्याखेरीज माझ्या मनाला स्वस्थता लाभणार नाही. त्याप्रमाणे काही काळानंतर इब्राहीम आदिलशहा आणि इमादशहा यांच्यामध्ये काही मतभेद निर्माण झाले होते त्याचा फायदा घेऊन बुरहाण निजामशहाने विजापूरच्या मुलखाच्या दक्षिणेला आणि पूर्वेला युद्ध [३] (९३) पेटविण्यासाठी विजयनगरचा राजा रामराजा आणि गोवळकोंड्याचा सुलतान जमशिद कुतुबशहा यांजबरोबर मैत्रीचे गुप्त करार केले आणि त्याने स्वतः आपली फौज आणि अमिर बरीद आणि ख्वाजा जहान यांची सैन्ये घेऊन विजापूरच्या प्रदेशावर ईशान्येच्या बाजूने चढाई केली. या फौजेने विजापूर राज्याचे अनेक जिल्हे उद्ध्वस्त केले आणि त्यांना प्रतिकार करण्यासाठी पाठविण्यात आलेल्या विजापुरी सैन्याचा अनेकवार पराभव केला. जमशिद कुतुबशहाने पूर्वेच्या बाजूने विजापूरच्या मुलखात प्रवेश करून काकनीचा जिल्हा बळकाविला आणि त्या प्रदेशात एक मजबूत किल्ला बांधून त्याने कुलबर्ग्याच्या वेशीपर्यंतचा अगदी सर्व मुलख व्यापून टाकला. त्यानंतर त्यान सागरच्या नजीक असलेल्या एटगिरच्या किल्ल्याला वेढा दिला. इकडे दक्षिणेच्या बाजूने रामराजाने आपला भाऊ वेंकटाद्री याला रायचूरच्या किल्ल्याचा पाडाव करण्यासाठी रवाना केले. साहजिकच विजापूरच्या राज्यावर एकाच वेळी वेगवेगळ्या दिशांनी तीन राष्ट्रांच्या सुसज्ज सेनाविभागांनी हल्ला केल्यामुळे विजापूरच्या राज्याचा आता नाश होणार की काय असे वाटण्यासारखी परिस्थिती निर्माण झाली.

(९८) आता आपण कसे वागावे याबद्दल इब्राहीम आदिलशहाच्या मनात संशय निर्माण झाला. आपल्या सल्लागारांनी प्रकट केलेल्या मतावरचा देखील त्याचा विश्वास उडाला. अशा परिस्थितीत त्याने आसदखानाला बेळगावहून बोलावू पाठविले आणि आता काय करावे याबद्दल त्याचा सल्ला विचारला. त्यावर आसदखानाने आपले मत दिले की आपला खरोखर जर कोणी शत्रू असेल तर बुरहाण निजामशहा. त्यानेच इतरांना आपल्याबरोबर शत्रुत्वाचे धोरण स्वीकारण्यास उद्युक्त केलेले आहे. त्याचा जर बंदोबस्त करता आला तर इतरांची व्यवस्था अगदी सहजगत्या लावता येईल. तेव्हा माझा आपल्याला असा सल्ला आहे की सोलापूरच्या पाच जिल्ह्यांचा मुलख त्याला तोडून द्यावा आणि त्याच्याशी तह करावा. आसदखानाने अशीही शिफारस केली की रामराजाकडे देखील स्वतंत्ररित्या तह करण्यासाठी बोलणी लावावी आणि त्याच्याबरोबर मैत्रीची भावना निर्माण करण्यासाठी त्याच्याकडे भेटीदाखल

वस्तू पाठवाव्या. कारण माझ्या मते त्याच्यादाखल काही थोड्या फार सवलती केल्यास त्याला आपल्याला सहज आवर घालता येईल. कारण रामराजाच्या स्वतःच्याच कर्नाटकच्या राज्यात आता पूर्णपणे स्थिरस्थावर आहे असे कोणत्याच [ ३ ] (९४) अर्थाने म्हणता यावयाचे नाही. त्याचे अंकित असे अनेक राय यांच्या बंडाचा अजून उपशम झालेला नाही. म्हणून माझ्या म्हणण्याचा उद्देश असा की या दोन राज्यांकडून आपल्यावर होणाऱ्या हल्ल्यातून आपली सुटका झाली की कुतुबशहाला वठणीवर आणण्याची कामगिरी मी माझ्या स्वतःकडे घेईन. अगदी थोड्या कालावधीत त्याने विजापूरकडून आपल्या ताब्यात घेतलेली सर्व स्थळे मी पुन्हा जिंकून घेईन असे वचन मी आपल्याला देतो.

( ९९ ) आसदखानाच्या या सल्ल्याप्रमाणे इब्राहीम आदिलशहाने कारवाई केली. त्यानुसार बुरहाण निजामशहा आणि रामराजा याजबरोबर तह करण्यात आला. यानंतर आसदखानाने जमशिद कुतुबशहाविरुद्ध चाल केली आणि त्याने नुकत्याच बांधलेल्या काकनीच्या किल्ल्याचा तीन महिन्यांच्या वेढ्यानंतर पाडाव केला. तो किल्ला त्याने जमीनदोस्त केला. नंतर त्याने एटगिरच्या दिशेने कूच केले तो चाल करून येत आहे हे पाहिल्यावर शत्रूने एटगिरचा वेढा उठविला. त्याच्याबरोबर लढाई देण्याचा धोका पत्करणे शहाणपणाचे ठरणार नाही असा शत्रूने विचार केला आणि त्याने आपल्या राज्याकडे माघार घेतली. आसदखानाने अगदी सख्तपणे गोवळकोंड्याच्या वेशीपर्यंत त्याचा पाठलाग केला. तिथे ठाण मांडून जमशिद कुतुबशहाने आसदखानाबरोबर युद्ध केले. याप्रसंगी युद्धाची मोठी धुमश्चक्री उडून गोवळकोंड्याच्या सुलतानाचा पराभव झाला. आसदखानाचे आणि त्याचे द्वंद्व युद्ध झाले आणि त्यामध्ये आसदखानाच्या तलवारीचा वार लागून कुतुबशहाच्या गालाला जखम झाली. आयुष्यभर त्यामुळे त्याच्यामध्ये व्यंग राहिले. याप्रमाणे मोठ्या यशस्वी रीतीने आपली मोहीम संपवून विजयीहोत्साता आसदखान विजापूरला परतला. तेथे इब्राहीम आदिलशहाने सन्मानपूर्वक त्याचा सत्कार केला. याप्रमाणे आपण जे जे करू असे आसदखानाने सुलतानाला वचन दिले त्याप्रमाणे बव्हंशी कृती करून ते त्याने पुरे केले.

(१००) या मोहिमेला काही कालावधी लोटल्यावर रामराजाने बुरहाण निजामशहाला चिथावून कुलबर्ग्याचा पाडाव करण्यासाठी चाल करून जाण्यास उद्युक्त केले. त्याला प्रतिकार करण्यासाठी म्हणून इब्राहीम आदिलशहाने विजापूरहून कूच केले. तो हूरचीन गावानजीक आल्यावर विजापुरी सैनिकांना असे आढळून आले की भीमा नदीच्या पलिकडील किनाऱ्यावर बुरहाण निजामशहा मजबूतपणे ठाण मांडून बसला आहे. त्या ठिकाणावरून नदी पार करून जाणे अशक्य आहे हे जेव्हा दिसून आले [३] (९५) तेव्हा इब्राहीम आदिलशहाने नदीच्या उजव्या बाजूच्या काठावर आपली छावणी दिली. जवळजवळ तीन महिने पावसाळा चालू असताना दोन्ही सैन्ये समोरा समोर ठाण मांडून बसली होती. त्यांच्यात एकदाही संघर्ष उडाला नाही आणि एक

नदी काय ती त्यांच्यामध्ये होती. सरतेशेवटी इब्राहीम आदिलशहाला या अडवणुकीचा कंटाळा आला. त्याला नदी पार करून जाण्यासाठी योग्य अशी जागा मिळाली आणि त्याप्रमाणे तो नदीपार झाला. यानंतर दोन्ही फौजा परस्परांपाशी भिडल्या. झालेल्या लढाईत बुरहाण निजामशहाच्या फौजांचा पूर्णपणे पराभव झाला. त्यांचे अतिशय नुकसान झाले. रणभूमीवर २५० हत्ती, १७० तोफा, दारूसामान, पेटारे आणि त्याशिवाय राजचिन्हे आणि छावणीचे सर्व सामान त्यांनी गमावले. या लढाईत इब्राहीम आदिलशहा व्यक्तिशः अतिशय शौर्याने लढला आणि त्याने आपल्या हातातील खड्गाने आपल्या तीन प्रतिस्पर्ध्यांना कंठस्थान घातले. परंतु ह्या विजयाचे संपूर्ण श्रेय त्याने आसदखानाच्या कर्तृत्वाला देऊन आपल्या मनाचा मोठेपणा दाखविला. त्याने आसदखानाला त्याच्या जहागिरीव्यतिरिक्त इतर अनेक जिल्हे बहाल केले.

(१०१) लढाईत मिळालेल्या या उज्ज्वल यशाचा गर्व चढून इब्राहीम आदिलशहाने बुरहाण निजामशहाकडून तहासाठी बोलणी करण्यास आलेल्या वकिलांना अतिशय तिरस्कारपूर्ण अशी वागणूक दिली. यानंतर आपल्या प्रजाजनांबरोबरचे त्याचे वर्तनही अतिशय क्रूरपणाचे होऊ लागले. त्याने आपल्या काही सर्वोत्कृष्ट अधिकाऱ्यांना ठार मारले आणि अनेकांना बारीकसारीक कारणावरून अतिशय कठोर अशा शिक्षा केल्या. त्याच्या अशा या वागणुकीचा परिणाम त्याच्या सरकारात भयंकर असंतोषाची भावना निर्माण होण्यात झाला. या असंतोषाचा फायदा बुरहाण निजामशहाने घेतला आणि पुन्हा एकदा विजापूरच्या सुलतानाविरुद्ध युद्ध पुकारले. सहा महिन्याच्या अवधित त्याने दोनवेळा झालेल्या लढायांत विजापूरकरांचा पराभव केला. या प्रसंगी त्याने विजापूरचे अनेक हत्ती पाडाव केले. निजामशाही फौजेने विजापूरच्या मुलखात इतका हाहाःकार उडविला की खुद्द इब्राहीम आदिलशहाच्या सत्तेच्या अस्तित्वालाच धोका निर्माण झाला. विजापूरच्या सुलतानाने आपली अशी समजूत करून घेतली की आपले हे जे नुकसान झालेले आहे त्याला कारणीभूत त्याच्या अधिकाऱ्यांमधील असंतोष आणि त्याच्या मुलकी बाबींचा व्यवहार बघणारे मुख्याधिकारी ब्राह्मण [ २ ] (९६) यांची कारस्थाने ह्या गोष्टी आहेत. परिणामी कारण नसताना देखील त्याच्या मनात उद्भवलेल्या संशयामुळे त्याने दोन महिन्याच्या थोड्याशा कालावधित उच्चाधिकारावर असलेल्या ४० हिंदू आणि ७० मुसलमान अधिकाऱ्यांचा वध करविला. सरते शेवटी निराश होऊन काहीही मार्ग न उरल्यामुळे त्याच्या अमिरांपैकी अनेकांनी सुलतानाला सिंहासनावरून काढून टाकण्याच्या आणि त्याचा भाऊ अबदुल्ला याला गादीवर बसविण्याचा गुप्त कट रचला. इतक्या थराला गोष्टी पोहोचल्या तेव्हा कटवाल्यांपैकी एकाने आपल्याला भरपूर बक्षिशी मिळेल या आशेने इब्राहीम आदिलशहापाशी वरील कटाची उघडीक केली. इब्राहीम आदिलशहाने त्याला आणि त्याने कटात सामील असलेल्या ज्या ज्या सरदारांविरुद्ध माहिती दिली होती त्यापैकी बहुतेकांना प्राणदंडाची शिक्षा दिली. इब्राहीम आदिलशहाचा भाऊ अबदुल्ला ह्याने अतिशय कष्टाने गोव्याकडे पळून

जाण्यात यश मिळविले. तेथे पोर्तुगीजांनी मोठ्या सन्मानपूर्वक त्याचा सत्कार केला आणि त्याला संरक्षण देऊ केले. [३०४] इब्राहीम आदिलशहा हा त्याच्या पलायनामुळे अतिशय चवताळला आणि पोलिस अधिकाऱ्यांवर देखरेख करण्याचे ज्यांचे काम होते त्या ब्राह्मणांना त्याने विजापूरच्या मोठ्या चौकात हालहाल करून ठार मारण्याची शिक्षा दिली. तेथे अतिशय भयानक अशा यातना भोगीत असताना त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. ह्याच सुमारास त्याच्या मनात आसदखानाच्या निष्ठेबद्दलच्या त्याच्या जुन्या संशयाने पुन्हा डोके वर काढले आणि त्याने आसदखानापाशी अशी काही वागणूक ठेवली की आता वृद्ध झालेल्या त्या वजिराला बेळगाव येथील त्याच्या जहागिरीकडे स्वसंरक्षणार्थ माघार घेऊन राहणे भाग पाडले. तेथून त्याने आपल्या एका विश्वासातील मित्राला बरोबर ९ हत्ती, ९ घोडे आणि पुष्कळ किंमतवान अशा दुर्मिळ वस्तू देऊन एका पत्रासहित सुलतानाकडे रवाना केले. हे पत्र पुढीलप्रमाणे होते : " खुदावंत तुमच्यामध्ये आणि माझ्यामध्ये अशा तऱ्हेची फारकत निर्माण व्हावी असे काय बरे घडले ? [३] (९७) मी असे काय केले किंवा आपण माझ्याबद्दल असे काय ऐकले किंवा माझ्या वर्तणुकीत आपण गैर असे काय पाहिले ?

" जर का माझ्या हातून काही गुन्हा घडला असेल तर माझी गर्दन खड्गाच्या प्रहाराबरोबर धडा वेगळी होऊन जाऊ दे. परंतु कारणाशिवाय असा क्षोभ होऊ देणे म्हणजे ते औदार्याचे लक्षण नाही किंवा न्यायीपणाचे देखील नाही.

" आपल्या ह्या अवकृपेचे कारण काय आहे हे मला समजत नाही किंवा आपल्या माझ्याबरोबरच्या उदासीन वागणुकीला काय प्रसंग घडला हेही मला कळू शकत नाही.

" माझ्या हितशत्रूंनी मी जे जे काही गुन्हे केल्याचा माझ्यावर आरोप केला आहे ते कदाचित् माझ्या हातून शेकडो वेळा घडून आले असतील परंतु त्यांना मला कोणत्या आरोपांखाली निश्चितपणे दोषी धरावयाचे आहे हेच मला समजत नाही. युसुफचा नाश केल्याचा आरोप ज्या लांडग्यावर करण्यात आला त्याच्याप्रमाणे मी निर्दोष आहे. मी गुन्हा केलेला कोणी पाहिला नसताना किंवा माझ्याबद्दल तसे काही ऐकिवात आले नसताना मला शिक्षा फर्माविण्यात आलेली आहे. जे शब्द मी बोलल्याचा आरोप ते माझ्यावर करतात ते माझ्या तोंडून कधीच गेले नाहीत किंवा माझ्या मनात दुष्ट कारस्थानाच्या विचारांची व्युत्पत्ती कधीच झाली नाही.

" ह्या किल्ल्यात मला विलंब लागला आहे आणि मी दरबारात गैरहजर आहे याचे कारण माझ्या शत्रूंची माझ्या विरुद्ध जो कारस्थाने चालली आहेत त्याला बळी न पडणे हे आहे. कारण ते दररोज आपल्या कानावर माझ्या हेतूंच्या शुचितेविषयी आणि माझी आपल्या ठायी जी भक्ती आहे तिच्या खरेखोटेपणाबद्दल भलतेसलते घालतात. अगोदरच त्यांनी माझ्या चारित्र्यावर मी माझ्या निष्ठेपासून ढळल्याचा डाग लावून शिंतोडे उडविले आहेत इतकेच काय तर आपल्या हृदयरूपी शांतिरूपाला

त्यानी औदासिन्याची गुहा–छे तिला दुःखाचीच गुहा असे म्हणावे लागेल–आणि ज्वलंत पेटणाऱ्या अग्नीचे निवासस्थान बनवून टाकले आहे. माझ्यावर विश्वासघातकीपणाचा आरोप करून त्यांनी आपल्या मनातील आनंदाच्या तेवत्या ज्योतीचा प्रकाश कमी करून टाकला आहे. माझ्या एकनिष्ठेच्या शुद्ध सोन्यात त्यांनी संशयरूपी धातू मिसळून ते गढूळ बनविले आहे आणि सदा पीडा देणाऱ्या मत्सराच्या मुशीत आपल्या हृदयाला त्यांनी वितळवून टाकले आहे. [३](९८)

"परंतु आपण सुलतानांचे सुलतान आहात. जर का आपण आपल्या दयाळू स्वभावातून माझ्या परिस्थितीबद्दल अनुभूती प्रकट करून माझ्या शत्रूंना लाजेने माना खाली घालावयास लावल्या आणि मला आपल्या समक्ष हजर होण्याची आज्ञा दिली तर मी पावसाळा संपत आल्यावर आपल्या सिंहासनाच्या पायाशी सपशेल लोटांगण घालण्याकरता येण्यासाठी येथून कूच करीन. एका महिन्यात आपल्याला नजर करण्यासाठी मनाला तोषविणाऱ्या भेटी आणि देणग्या बरोबर घेऊन दरबारात त्वरित मी हजर होईन."

(१०२) हे पत्र वाचल्यानंतर इब्राहीम आदिलशहाचे हृदय हेलावून गेले. त्यावेळी आसदखानाची कुटुंबीय मंडळी विजापूरला होती. त्यांच्यावर त्याने आपल्या कृपेची विशेष खैरखैरात केली. आसदखानाकडे बेळगावला जाण्यासाठी तो जवळजवळ त्यांना परवानगी देण्याच्या बेतात होता तोच राजपुत्र अबदुल्ला याच्या बंडाचा एकाएकी प्रादुर्भाव झाला आणि इब्राहीम आदिलशहाच्या मनात त्याच्या वजिराच्याबद्दल असलेल्या संशयाने फिरून उचल खाल्ली आणि त्याच्याबद्दल सुलतानाच्या मनात जी अनुकूल प्रवृत्ती होती तिचा लोप झाला.

(१०३) आपल्या भावाच्या क्रूर वागणुकीतून राजपुत्र अबदुल्ला याने आपली सुटका करून घेऊन गोव्याला पलायन केले. तेथे त्याच्याबरोबर विजापूरचे जे अमीर गेले होते त्यांनी त्याला अहमदनगरचा बुरहाण निजामशहा आणि गोवळकोंड्याचा जमशिद कुतुबशहा यांच्याबरोबर त्यांची मदत मिळविण्याच्या आशेने पत्रव्यवहार करण्यास उद्युक्त केले. विजापूरमधील कारभाराची अंदाधुंदीची परिस्थिती निजामशहा आणि कुतुबशहा यांच्या अवलोकनात आली होती आणि आसदखानाच्या मनात उत्पन्न झालेल्या घृणेची त्यांना पूर्णपणे कल्पना होती. तेव्हा त्यांनी अबदुल्ला याला सिंहासनावर बसविण्यासाठी मदत देण्याचे वचन दिले. त्याचवेळी त्यांनी गोव्याच्या पोर्तुगीजांना लिहून कळविले की इब्राहीम आदिलशहाचे क्रौर्य आणि जुलूम हे बघितल्यानंतर आम्हाला तर असे दिसत आहे की त्याच्या राज्यकारभारात इतक्या काही त्रासदायक घटना घडून येतील की कोणत्याही उपायांचा अवलंब केला तरी त्या दडपून टाकता येणे त्याला शक्य होणार नाही. तेव्हा आमची अशी इच्छा आहे की राजपुत्र अबदुल्ला याला आमच्याकडे पाठविण्यात यावे कारण त्याच्या भावाच्या जागी सिंहासनावर त्याला बसविण्याचा आमचा बेत आहे. पोर्तुगीजांनी या योजनेला पाठिंबा देण्याचे कबूल केले परंतु त्याच

वेळी त्यांनी असे कळविले की जर या कामी आसदखानाचे मनोभावे सहकार्य [२](९९) मिळाले तर यश येण्याची काहीतरी आशा आहे.

(१०४) पोर्तुगीजांकडून वरील उत्तर आल्यावर बुरहाण निजामशहाने आपल्या एका प्रमुख ब्राह्मण वजिराला आसदखानाचे मन वरील कटात सामील होण्याकरता वळविण्यासाठी म्हणून त्याच्याकडे रवाना केले. परंतु आपल्या एकनिष्ठेपासून च्युत होण्याच्या नुसत्या कल्पनेनेच त्या विश्वासू वजिराच्या अंगाचा थरकाप उडाला आणि त्याने क्रुद्ध होऊन त्या ब्राह्मणाला सांगितले की सुसंस्कृत राष्ट्रांचे जे काही कायदेकानू आहेत त्यानुसार वकिलातीच्या माणसांचा आदर राखावा असे आहे. असे कायदेकानू जर नसते तर मी तुला खचित ठार मारले असते. आसदखान त्याला पुढे असेही म्हणाला की तुला जर तुझा जीव प्यारा असेल तर माझ्या क्रोधाने माझ्या विवेकबुद्धीवर मात करण्याचे अगोदर आणि मी माझ्या मूळ स्वभावातील चांगुलपणा विसरून माझ्या नैसर्गिक प्रवृत्तिविरुद्ध वागणूक करण्याचे अगोदर माझ्या अधिकारकक्षेच्या बाहेर तू ताबडतोब निघून जा. हा निरोप घेऊन तो ब्राह्मण बुरहाण निजामशहाकडे आला परंतु पोर्तुगीजांची मात्र अशी समजूत झाली की एक आसदखान सोडून दक्षिणेतील इतर सर्व सत्ताधिश राजपुत्र अबदुल्ला याला पाठिंबा देण्यासाठी एकजूट करून उभे आहेत. त्यामुळे त्यांनी अबदुल्लाला बरोबर घेऊन गोव्याहून कूच केले. अबदुल्ला याने त्यानंतर उघडउघड आपल्या नावे सुलतान म्हणून द्वाही फिरविली. राजधानीतील बहुतेक सर्व अमीर इब्राहीम आदिलशहाचा पक्ष सोडून अबदुल्ला याला जाऊन मिळण्याच्या तयारीत होते. तोच एक अशी घटना घडून आली की ज्यामुळे साऱ्या राजकारणाचा रंग पालटला. आसदखान हा अतिशय आजारी झाला. आता तो मरणार अशी मनाची समजूत करून घेऊन बुरहाण निजामशहाने आपली दृष्टी बेळगावच्या किल्ल्याकडे वळविली आणि अबदुल्लाला बरोबर घेऊन सरळ विजापूरकडे कूच करून जाण्याचे ऐवजी आपले स्वतःचे बेत तडीस नेण्याकरता त्याने मिरज येथे मुक्काम केला. तो विजापूरकडे गेला असता तर विजापूरच्या सिंहासनावर राजपुत्र अबदुल्ला याच्या स्थापनेची निश्चिती झाली असती. मिरजेहून त्याने उपरिनिर्दिष्ट बेळगावला पूर्वी गेलेल्या आपल्या ब्राह्मण अधिकाऱ्याला भरपूर द्रव्य देऊन बेळगावकडे जाण्यासाठी नियुक्त केले. त्याने त्याला असा आदेश दिला की आसदखानाच्या मृत्यूचा प्रसंग ओढवल्यास तू किल्ल्यावरील शिबंदीमधील शिपायांना भरपूर लाच चारण्यासाठी त्या रकमेचा उपयोग करून ते तुझ्या हवाली किल्ला करतील अशी तजवीज कर. त्याच्यावर सोपविलेल्या कामगिरीत त्या ब्राह्मणाला जवळजवळ यश प्राप्त झाले, तोच आसदखानाच्या [३](१००) नजरेस वरील कट येऊन कटाची उघडीक झाली. त्याबरोबर आसदखानाने त्या गुप्त हेराला आणि त्याने अगोदरच लाच देऊन आपलेसे केलेल्यांपैकी ७० शिपायांना पकडून ठार मारले. विजापूरच्या सरदारांच्या कानावर जेव्हा ही घटना गेली तेव्हा राजपुत्र अबदुल्ला याच्या बंडामध्ये वृद्ध आसदखानाचा कोणत्याही प्रकारे हात नाही

याबद्दल त्यांची पूर्णपणे खात्री पटली. साहजिकच आदिलशहाजवळील त्यांची निष्ठा दृढ राहिली. इकडे दिवसेदिवस राजपुत्र अबदुल्लाच्या अनुयायांत घट होत राहिली. [३०५०]

(१०५) आसदखानाची प्रकृती दिवसेदिवस ढासळत गेली. वृद्धावस्थेमुळे रोगाशी प्रतिकार करण्याची शक्ती देखील कमी झाली तेव्हा त्याने मृत्यूला तोंड देण्याची तयारी केली आणि इब्राहीम आदिलशहाला पुढीलप्रमाणे काव्यरूप पत्र पाठवून आपल्याला अखेरची भेट देण्याची कृपादृष्टी दाखविण्याची विनंती केली. "हे शहेनशहा सुप्रभातीच्या वायुसारखा मैत्रिरूपी लताकुंजाला भेट देण्यासाठी त्वरा कर. आकर्षक असलेल्या सुरूच्या झाडासारखा मैत्रीच्या उपवनाकडे ताबडतोब ये."

(१०६) मोहर्रम हिजरी ९५६ जानेवारी इ. स. १५४९ आसदखानाच्या विनंतीला मान देणे योग्य आहे असा विचार इब्राहीम आदिलशहाने केला आणि हिजरी ९५६ या वर्षीच्या मोहर्रम महिन्यात त्याने बेळगावकडे कूच केले. हुकेरीच्या पुढे गेल्यावर आसदखानाच्या मृत्यूचा वृत्तान्त त्याला मिळाला. तेथून सुलतानाने झपाट्याने कूच केले. त्याच दिवशी रात्री तो बेळगावला येऊन पोहोचला. तेथे त्याने आसदखानाची कुटुंबीय मंडळी आणि अनुचर यांचे सांत्वन केले आणि माझी तुमच्यावर कृपादृष्टी राहील असे त्याने त्यांना अभिवचन दिले. परंतु दरम्यान त्याने आसदखानाची जहागिरी आणि खजिना सरकारजमा केला. परिस्थिती अशा प्रकारची [ ३ ] ( १०१ ) असताना पोर्तुगीजांनी गोव्याकडे परत कूच केले. त्यांनी आपल्याबरोबर राजपुत्र अबदुल्ला यालाही बरोबर नेले. या कटात सामील असलेल्या इतर दोस्त मंडळींनीही आपापल्या मुलखाकडे माघार घेतली.

(१०७) आसदखानाचा सारासार विचार आणि बुद्धिमत्ता ही अतिशय विलक्षण होती. इस्माईल आदिलशहाच्या कारकिर्दीत त्याने आपल्या जहागिरीचा कारभार इतका व्यवस्थित केला की उत्कृष्ट कारभारी म्हणून त्याचे नाव इतिहासात गाजले. जवळजवळ २० वर्षेपर्यंत दक्षिणेतील धर्मनिष्ठ आणि प्रसिद्ध पुरुषांचा तो आश्रयदाता आणि संरक्षक होता. साऱ्या जगाने त्याची वाहव्वा केली आणि त्याला चाहले. त्याच्या उच्चअधिकारपदाला साजेल अशा तऱ्हेच्या भरवयात आणि झगमगाटात तो राहिला. विजयनगरचा राजा आणि इतर राजेरजवाडे त्याला वारंवार सन्मानपूर्वक अशी पत्रे पाठवून आणि मूल्यवान भेटी पाठवून त्याची मर्जी संपादन करण्याचा प्रयत्न करीत. त्याच्या अंगची थोर कर्तबगारी आणि त्याचे वजन याबद्दल आपल्याला ग्वाही असल्याची जाणीव ते नेहमी देत. त्याच्या जार्जियन, सिरकॉशियन, हिंदू आणि हबशी घरगुती अनुचरांची संख्या जवळजवळ २५० होती. त्याच्या मालकीचे ६० मोठे आणि १५० लहान आकाराचे हत्ती होते. त्याच्या तबेल्यात ४०० एकमेव अशा मिश्र-अवलादीचे अरबी घोडे होते आणि त्यांची पैदास हिंदुस्थानात झाली होती. त्याने आपल्या जहागिरीच्या कारभारात अफाट संपत्ती जमविली होती त्याच्या भटारखान्यात दररोज दक्षिणी वजनाप्रमाणे १०० मण तांदूळ, ५० मेंढ्या आणि १०० कोंबड्या इतक्या सामग्रीचा उपयोग केला जाई. यावरून

इतर वस्तूंवर किती खर्च केला जात असेल याविषयी सहज कल्पना करता येण्यासारखी आहे. त्याने प्रथमतः सोनेरी वर्खाच्या कापडाचा कमरपट्टा आणि खंजीर वापरण्याची प्रथा सुरू केली. त्या वेळेपासून या देशात उच्चपदस्थ व्यक्तींनी ह्या गोष्टी वापरण्याची प्रथा अमलात आली. हत्तींना काबूत ठेवण्यासाठी खुजूक अथवा अंकुश वापरण्याऐवजी लगाम घालून हत्तीवर बसण्याची प्रथा रूढ करण्याचा प्रयत्न त्याने [ ३ ]( १०२ ) केला. परंतु हत्ती ह्या प्राण्याला वारंवार एकाएकी पिसाळण्याची सवय असल्याने हत्तीला अशातऱ्हेने काबूत ठेवण्याच्या पद्धतीला प्रतिसाद मिळाला नाही. आसदखानाने मृत्युसमयी प्रकट केलेल्या इच्छेप्रमाणे इब्राहीम आदिलशहाने त्याची मुलगी महताब बिबी ही अली बरीदशहाला विवाहात दिली. या लग्नानिमित्ताने त्याने अली बरीदशहा याच्याबरोबर मैत्री संपादन केली.

(१०८) आसदखानाच्या मृत्यूनंतर लवकरच बुरहाण निजामशहाने आपले वकील नजराणे बरोबर देऊन रामराजाकडे रवाना केले. दोघा राजपुत्रांमध्ये परस्परांबद्दल आत्मीयतेच्या भावना प्रकट करण्यात आल्या. ह्या परिस्थितीची जाणीव होताच इब्राहीम आदिलशहाने विजापूर दरबारी असलेल्या विजयनगरच्या वकिलांना इतक्या तुच्छतापूर्वक वागणूक दिली की ते भयभीत झाले आणि इब्राहीम आदिलशहाचा निरोपही न घेता एकाएकी विजयनगरला निघून गेले. तेथे गेल्यावर त्यांनी रामराजाला सांगितले की आपण बुरहाण निजामशहाबरोबर जो दोस्तीचा करार केला आहे त्यामुळे संतापून जाऊन इब्राहीम आदिलशहा आम्हाला ठार करण्यास उद्युक्त झाला. आम्ही केवळ पळून गेलो म्हणून त्याच्या हातून बचावलो. हे ऐकल्यानंतर रामराजाला अतिशय संताप आला आणि इब्राहीम आदिलशहाला अहमदनगरच्या सुलतानाबरोबर युद्धात गोवण्यासाठी त्याने बुरहाण निजामशहाला लिहिले की तुम्ही इब्राहीम आदिलशहाचा दोस्त अली बरीद त्याच्या ताब्यातील कल्याणीवर हल्ला करा.

( १०९ ) या पत्रानुसार बुरहाण निजामशहाने फौज बरोबर घेऊन अहमदनगरहून कूच केले. त्याने कल्याणीला वेढा दिला आणि अतिशय परिणामकारकरित्या त्याने कल्याणीची नाकेबंदी केली. अली बरीदच्या विनंतीवरून इब्राहीम आदिलशहाने कल्याणीवरील दडपण कमी करण्यासाठी चाल केली. त्याने शत्रूच्या नजीकच आपली छावणी दिली. सपाटीवर शत्रूबरोबर सामना देण्यात धोका आहे हे त्याने ओळखले अणि म्हणून त्याने आपल्या छावणीभोवती मोर्चे खोदून मजबुती केली. बुरहाण निजामशहालाही वेढा उठवावा अशी मनापासून इच्छा नव्हती. तेव्हा त्यानेही आपल्या [३](१०३) छावणीचा कडेकोट बंदोबस्त केला. अशी परिस्थिती असताना इब्राहीम आदिलशहाने आपल्या सैन्यातील अतिशय कुशल अशा बर्गी अधिकाऱ्यांना छावणीकडे येणारे रस्ते ताब्यात घेण्याचा आणि धान्य आणि रसद यांचा पुरवठा शत्रूकडे होऊ नये म्हणून प्रतिबंधक उपाययोजना करण्याची आज्ञा दिली. हे बर्गी अधिकारी हलक्या शस्त्रांनी लढण्यात तरबेज होते. ह्या हुकुमाची अंमलबजावणी इतक्या काटेकोरपणे करण्यात

आली की बुरहाण निजामशहाच्या छावणीत लवकरच दुष्काळी परिस्थिती निर्माण झाली. परिणामी रमजानच्या महिन्यात सुलतान आणि त्याची फौज या सद्धर्माचे पालन करणाऱ्यांना आणि हिंदूंना अशा दोघांनाही कोणताच दुसरा उपाय न चालल्याने उपवास घडला. ३०३[a] याप्रमाणे बुरहाण निजामशहाची अवस्था मोठी केविलवाणी झाली तेव्हा त्याने आपल्या सेनापतिबरोबर विचारविनिमय केला. काहींनी सल्ला दिला की आपण वेढा उठवावा आणि अहमदनगरकडे माघार घ्यावी. काहींनी असे सांगितले की आपण इब्राहीम आदिलशहाबरोबर समझोता घडवून आणावा. बुरहाण निजामशहाच्या चाकरीतील शहाजाफर आणि कासिम बेग या दोघा परदेशी वजिरांचे मत मात्र या दोन्ही विचारसरणींच्या विरुद्ध पडले आणि त्यांनी शत्रूबरोबर लढाई देण्यात यावी असा खणखणीत सल्ला दिला. त्यांनी मांडलेला प्रस्ताव प्रत्यक्ष कृतीत उतरविण्याचा बुरहाण निजामशहाने निश्चय केला. याप्रमाणे रमजानचा उपवास सोडण्याचे दिवशी सकाळी उजाडता उजाडता सैफउद्दीन ऐनउल्मुल्क याने इतर अधिकाऱ्यांसमवेत इब्राहीम आदिलशहाच्या छावणीवर अचानक हल्ला केला. आदिलशहाचे सैनिक बेसावध होते आणि रमजानच्या उत्सवाची त्यांची तयारी चालली होती. इब्राहिम आदिलशहा हा त्यावेळी गरम पाण्याच्या स्नानगृहात होता. त्याला आपला जीव बचावून पळून जाण्यास जेमतेम अवधी मिळाला. त्याच्या सैनिकांनी इतक्यात गोंधळलेल्या अवस्थेत पळ काढला की विजयी बुरहाण निजामशहाच्या हाती आदिलशहाचे सर्व तंबू, सामानसुमान आणि तोफखाना पडला. मिळालेल्या यशाने फुगून जाऊन त्याच दिवशी कल्याणीच्या किल्ल्यावर हल्ला चढविण्यात यावा असा हुकूम बुरहाण निजामशहाने [ ३ ] ( १०४ ) दिला. आपल्या दोस्ताचा पराभव झाल्यामुळे भयचकित झालेल्या किल्ल्यावरील शिबंदीने आपली शस्त्रे खाली ठेवली आणि कोठल्याही प्रतिकाराशिवाय किल्ल्याची शरणागती दिली.

(११०) या घटनेमुळे इब्राहीम आदिलशहा नाउमेद झाला असे मात्र बिलकुल झाले नाही. आपला प्रदेश शत्रूच्या हातून उद्ध्वस्त होऊ नये म्हणून उलट त्याने शत्रूच्या प्रदेशावर आक्रमण केले. तो एकाएकी परंड्यासमोर येऊन उभा ठाकला. परंड्याचा दरवाजा खुला होता. त्याबरोबर फौजेच्या एका तुकडीला घेऊन तो किल्ल्यात घुसला. किल्ल्यावरील शिबंदीने शरणागती दिली. किल्ला इब्राहीम आदिलशहाने एका दक्षिणी अधिकाऱ्याच्या ताब्यात सोपविला तेथून त्याने आजूबाजूच्या जिल्ह्यांचा मुलूख उद्ध्वस्त करण्यासाठी कूच केले. तेथून त्याने भरपूर खंडणी गोळा केली आणि बुरहाण निजामशहा येतो आहे असे पाहून तो विजापूरकडे परत फिरला. बुरहाण निजामशहाने परंडा पुन्हा जिंकून घेण्यासाठी कूच केले. किल्ल्यापासून बऱ्याच मैल अंतरापर्यंत तो होता तोच किल्ल्याच्या ऱ्याड सुभेदाराने घाबरून जाऊन रातोरात पलायन केले. आपला बेत त्याने आपल्या अनुयायांनादेखील कळविला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांनीदेखील आपल्या अधिकाऱ्याचे अनुकरण करून किल्ल्यावरून पळ काढला. यानंतर तिसऱ्या

दिवशी रिकामा झालेला किल्ला किल्ल्याच्या पूर्वीच्या किल्लेदाराने गाजावाजा न करता आपल्या ताब्यात घेतला.

( १११ ) विजापूर येथे पोहोचल्यानंतर उपरिनिर्दिष्ट दक्षिणी अधिकाऱ्याला इब्राहीम आदिलशहाने ठार मारले आणि त्याने कल्याणीचा किल्ला परत जिंकून घेण्यासाठी तयारी करण्यास सुरुवात केली. या बेताची खबर जेव्हा बुरहाण निजामशहाला लागली तेव्हा त्याने आपले वकील रामराजाकडे रवाना केले. रामराजाने पुढील वर्षी लढाईची कारवाई करण्यासाठी कोणती योजना आखावी याबद्दल विचार करण्यासाठी रायचूरनजीक बुरहाण निजामशहाला भेटण्याचे कबूल केले. त्यानुसार हिजरी ९५९ हिजरी ९५९ } या वर्षी रामराजाने बरीच मोठी फौज घेऊन रायचूरकडे कूच केले. इ. स. १५५१ } तेथे असा ठराव झाला की बुरहाण निजामशहाने मुद्गल आणि रायचूरचे किल्ले रामराजासाठी जिंकून घेण्यास मदत करावी आणि रामराजाने सोलापूर शहर आणि आवतीभोवतीचा मुलूख जिंकण्यास बुरहाण निजामशहाला मदत [ ३ ] (१०५) करावी. या बेताप्रमाणे दोस्तांनी रायचूर जिंकून घेतले. त्यांच्या हाती रायचूर पडल्यावर मुद्गल येथील शिबंदीने कोणताच प्रतिकार न करता शरणागती दिली. यानंतर रामराजाने आपला धाकटा भाऊ वेंकटाद्री याला बुरहाण निजामशहाला मदत करण्यासाठी बरेच सैन्य देऊन पाठीमागे ठेवले आणि तो विजयनगरला परतला. थोड्याच कालावधीत बुरहाण निजामशहाने सोलापूर हस्तगत केले. सोलापूरची त्याने मजबुती केली आणि तो अहमदनगरला परतला.

( ११२ ) काही कालानंतर बुरहाण निजामशहा कालवश झाला. त्याच्या पाठीमागून गादीवर आलेला त्याचा वारस हुसेन निजामशहा आणि इब्राहीम आदिलशहा यांच्यामध्ये समझोता घडून आला. दोन्ही सुलतानांची त्यांच्या राज्यांच्या सरहद्दीवर मित्रपूर्ण वातावरणात मुलाखत झाली आणि परस्परांच्या मनातील किल्मिष पूर्ण नाहीसे होऊन त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला. परंतु हे चांगुलपणाचे वातावरण फार काळपर्यंत टिकले नाही. ख्वाजाजहान १०७० दकनी हा आपला सार्वभौम जो हुसेन निजामशहा याची गैरमर्जी टाळण्यासाठी पळून गेला होता. तो विजापूर येथे आला. त्याने इब्राहीम आदिलशहाच्या मनात सोलापूर परत घेता येईल या आशेचा अंकुर रुजविला. हे कार्य सिद्धीस जावे म्हणून इब्राहीम आदिलशहाने रामराजाबरोबर तह केला आणि मरहूम बुरहाण निजामशहाचा सरसेनानी सैफ ऐनउल्मुल्क याला आपल्या चाकरीत येण्याचे आवाहन केले. ऐनउल्मुल्क याने हुसेन निजामशहाच्या त्रासाला कंटाळून वऱ्हाडात आश्रय घेतला होता. इब्राहीम आदिलशहाने आपल्याला येऊन मिळण्यासाठी केलेल्या आवाहनाचा सैफ ऐनउल्मुल्क याने स्वीकार केला. इब्राहीम आदिलशहाने त्याला मोठी जहागिरी बहाल करून त्याच्यावर पदव्यांची खैरात केली आणि ताबडतोब रोख रकम बक्षिसीदाखल दिली. त्याच्या सल्ल्यावरून इब्राहीम आदिलशहाने आपल्या दरबारात आश्रयासाठी आलेला बुरहाण निजामशहाचा मुलगा

राजपुत्र अली याचा पक्ष उचलून धरला. त्या दोघांमध्ये असा करार ठरला की अहमदनगरच्या सिंहासनावर अली निजामशहाची स्थापना झाल्यावर त्याने [३](१०६) कल्याणी आणि सोलापूर हे दोन किल्ले इब्राहीम आदिलशहाच्या स्वाधीन करावे. हे उद्देश साध्य होण्यासाठी म्हणून राजपुत्र अली ह्याने त्याच्याबरोबर अहमदनगरहून आलेल्या २००० घोडेस्वारांच्या पलटणीला घेऊन अहमदनगरच्या सरहद्दीकडे त्या राज्याच्या अमिरांनी आपला पक्ष उचलून धरावा म्हणून त्यांना फितविण्यासाठी कूच केले. परंतु त्याच्या या प्रयत्नात त्याला फारच थोडे यश आले. इकडे हुसेन निजामशहाने आपल्या फौजेला कूच करण्याचा हुकूम दिला. इब्राहीम आदिलशहानेदेखील राजपुत्र अली याला पाठिंबा देण्यासाठी विजापूरहून कूच केले. कूच करण्याचे अगोदर त्याने आपल्या फौजेत मोठ्या रकमा बक्षिसीदाखल वाटल्या.

(१६३) दोन्ही फौजांची गाठ सोलापूरच्या मैदानावर पडली आणि दोन्ही फौजा युद्धासाठी खड्या झाल्या. इब्राहीम आदिलशहाने आपल्या सैन्याच्या उजव्या फळीचे नेतृत्व सैफ एनउल्मुल्क आणि अंकुसखान यांजकडे दिले तर डाव्या फळीचे नूरखान आणि इमादउल्मुल्क यांजकडे दिले. तो स्वतः सैन्याच्या मध्यभागी आपल्या खाजगीकडील सैन्याची तुकडी घेऊन उभा राहिला. हिरावल अथवा आघाडीच्या तुकडीचे नेतृत्व सैफ ऐनउल्मुल्क याजकडे होते. त्याने सैन्याच्या फळीपासून पुढे कूच केले आणि मोठ्या आवेशाने रणधुमाळीला सुरुवात केली. मुख्य सैन्यापासून त्याची अशातऱ्हेने झालेली फारकत पाहून इब्राहीम आदिलशहाने नापसंती दर्शविली. त्याने असा हुकूम केला की जरूर पडल्यास ताबडतोब परत येणे सोपे जावे म्हणून सैफ ऐनउल्मुल्क याच्या हाताखालील तुकडीने सैन्याच्या मुख्य फळीच्या नजीकच राहावे. उत्तरादाखल सैफ ऐनउल्मुल्क याने कळविले की बादशहानी केलेले अनुमान हे अतिशय योग्य आहे, यात काहीच शंका नाही. परंतु मी कूच करीत इतक्या दूर अंतरावर जाऊन पोहोचलो आहे की मी परत माघारी फिरल्यास शत्रूला त्यामुळे अधिकच चेव येईल. अशा तऱ्हेचा निरोप पाठवून त्याने आणखी चढाई केली आणि शत्रूचा तोफखाना आपल्या ताब्यात घेऊन तोफांत खिळे ठोकले. त्याचप्रमाणे शत्रूच्या आघाडीच्या पथकांना [ ३ ] ( १०७ ) त्याने त्यांच्या मुख्य सैन्यापर्यंत मागे रेटले. या ठिकाणी मात्र हुसेन निजामशहाने त्याला कडवा प्रतिकार केला. हुसेन निजामशहाने स्वतः शस्त्र धारण केले होते तरी देखील निजामशाही सैन्याची फळी मोडण्यास सुरुवात झाली. जर का सैफ ऐनउल्मुल्क याने बजाविलेल्या अद्वितीय शौर्याचा योग्य तऱ्हेने पाठपुरावा झाला असता तर परिणामी निजामशाही सैन्याला हार देखील खावी लागली असती. अशा आणीबाणीच्या प्रसंगी उजव्या फळीकडे लढण्यात गुंतलेले अनेक निजामशाही अधिकारी आपल्या बादशहाच्या मदतीला येण्यासाठी पुढे सरसावले. त्यांनी सैफ ऐनउल्मुल्क यास जवळजवळ घेरले. त्याच्या तुकडीची तात्पुरती का होईना दाणादाण उडाली. दूरवर का होईना त्याला इब्राहीम आदिलशहाचा ध्वज अजून फडकताना दिसत होता. आणीबाणीचा प्रसंग

ओढवल्यास नेहमी तो या मार्गाचा अवलंब करीत असे. त्यानुसार तो आपल्या घोड्यावरून खाली उतरला आणि जिंकण्याची किंवा धारातिर्थी देह ठेवण्याची त्याने प्रतिज्ञा केली. सैन्यातील काही शिपायांनी त्याला जेव्हा घोड्यावरून उतरताना पाहिले तेव्हा त्यांनी आदिलशहाला सांगितले की सैफ ऐनउल्मुल्क हा शत्रूला जाऊन मिळाला आहे आणि हुसेन निजामशहाला कुर्निसात करण्यासाठी म्हणून तो आताच घोड्यावरून खाली उतरला आहे. इब्राहीम आदिलशहाच्या मनात प्रथमपासूनच ऐनउल्मुल्क याच्या निष्ठेबद्दल संशय वास करून होता. या संशयाला आता बळकटी आली. त्याने रणांगणातून पळ काढला. विजापूरला पोहोचेपर्यंत तो वाटेत कुठेच थांबला नाही. सुलतान पळून गेला आहे हे जेव्हा ऐनउल्मुल्क याला समजले तेव्हा त्याने शौर्याने लढत आणि भयंकर नुकसान सोसून देखील शत्रूची फळी फोडून निसटण्यात यश मिळविले. राजधानीला येऊन पोहोचल्यानंतर त्याने अतिशय आदबशीरपणे सुलतानाला निरोप कळविला की, "माझे सर्व सामानसुमान गमावले आहे इतकेच नव्हे तर माझ्या स्वतःसाठी अथवा माझ्या दुर्दैवी सैनिकांसाठी तंबू अगर दुसरे काहीही निवारा घेण्यासाठी उरले नाही. तेव्हा माझी आपले चरणी अशी विनंती आहे की माझी झालेली नुकसानी भरून काढण्यासाठी आणि माझा हुद्दा आणि इतमाम याला साजेलशा रितीने दरबारात हजर होणे सुकर व्हावे म्हणून आपण मला रोकड द्रव्य पाठवावे" इब्राहीम आदिलशहाने आपल्या मनाचा असा ग्रह करून घेतला होता की ऐनउल्मुल्क याच्या पराभवाचे कारण आपण त्याच्या आघाडीच्या पथकांना मागे निघून येण्याचा जो हुकूम दिला होता त्याची त्याने अवज्ञा केली हेच आहे. म्हणून त्याने ऐनउल्मुल्क याला उत्तर पाठविले की, "आज्ञेचे उल्लंघन करणाऱ्या आणि आपलेच खरे करणाऱ्या हट्टी नोकरांची मला जरुरी नाही. तुला पाहिजे असेल तेथे तू निघून जा आणि स्वतःची वाटेल ती सोय कर." आपल्या हातून एखादा अपराध झाला आहे असे मानण्याची ऐनउल्मुल्क याची तयारी नव्हती. त्यामुळे वरील निरोप [३] (१०८) पोहोचल्यावर आश्चर्यातिशयाने तो थक्क झाला. त्याने सुलतानाकडे आपली बाजू पुन्हा एकदा मांडण्यासाठी कळविले की वेळी माझा जीव धोक्यात घालून आणि आपल्या जवळील एकनिष्ठा पणाला लावून मी आपली चाकरी केली आहे. रणांगणावर माझ्या ५०० शूर संबंधितांचा आणि स्नेह्यांचा मी आपल्यासाठी बळी दिला आहे. माझ्यावर हा जो दुःखकारक प्रसंग गुदरला आहे त्या परिस्थितीत येथून हलणे मला अशक्यप्राय आहे. मला जो काही आसरा आता उरला आहे तो आपल्याच दरबारात आपल्या पायापाशी. आपण बोलाविल्यामुळे मी माझ्या पूर्वीच्या धन्याची चाकरी सोडून आपल्याकडे आल्यामुळे दुसऱ्या कोणत्याही दरबारी चाकरीसाठी जाणे हे मला आता तरी शक्य नाही ऐनउल्मुल्क याजकडून आलेल्या निरोपाचा पुढचा भाग म्हणजे आपल्यावर अप्रत्यक्षरित्या चढविलेला शाब्दिक हल्ला आहे अशी इब्राहीम आदिलशहाने आपल्या मनाची समजूत करून घेतली. त्याने हा निरोप घेऊन येणाऱ्या सेवकाला

बदलून काढण्याची आणि आपल्यासमोरून हाकलून काढण्याची आज्ञा दिली.

( ११४ ) आपल्या गाऱ्हाण्याची दाद लागेल याबद्दल सैफ ऐनउल्मुल्क निराश झाला. आता यापुढे कसे पाऊल टाकावे याबाबत त्याने आपल्या स्नेहीमंडळींची सल्लामसलत घेण्याचे ठरविले. त्यांनी त्याला असा सल्ला दिला की, " तू आपल्या जहागिरीकडे निघून जा आणि नुकत्याच तयार झालेल्या हिवाळी पिकातून तू वसुलाची उभारणी कर. यानंतर जर सुलतानाने तुला काढून लावण्यासाठी सैन्याची पाठवणी केली तर तुला जिकडे जाणे सयुक्तिक वाटेल त्याठिकाणाचा तू आसरा घे. " याप्रमाणे त्याच्या स्नेहीमंडळीनी सांगितलेली योजना सैफ ऐनउल्मुल्य याने स्वीकारली. त्याने विजापूरहून माणदेशाकडे ३०८० कूच केले. तेथे त्याने सारावसुली केली आणि वसूल झालेले द्रव्य त्याने आपल्या सैनिकांत वाटून टाकले. माणदेशातून ऐनउल्मुल्क याला काढून लावण्यासाठी इब्राहीम आदिलशहाने आपल्या एका अधिकाऱ्याला ५००० घोडेस्वार देऊन रवाना केले. परंतु सुलतानाच्या फौजेला हार खावी लागली. ऐनउल्मुल्क याला यामुळे बंडखोरीला प्रोत्साहन मिळाले. मिळालेल्या यशामुळे त्याचा धाडसीपणा वाढतच गेला आणि त्याने वाळवा, मिरज आणि इतर बऱ्याच जिल्ह्यांतील सारावसुली केली. आता सुलतानाने ऐनउल्मुल्कविरुद्ध निजाम कुलीबेग आणि दिलावरखान हबशी या दोघांच्या आधिपत्याखाली १०००० घोडेस्वार आणि पायदळ यांची नियुक्ती केली. त्याही फौजेचा ऐनउल्मुल्काकडून पराजय झाला आणि अनेक हत्ती आणि घोडे व अतिशय मौल्यवान असे प्रचंड सामानसुमान ऐनउल्मुल्काच्या हाती पडले. इतके यश प्राप्त झाल्यावर त्या प्रदेशात आपण एक स्वतंत्र अधिपती म्हणून [३](१०९) राज्याची स्थापना करावी या विचाराची ऐनउल्मुल्काने गंभीरपणे दखल घेण्यास सुरवात केली. हा हेतू मनात ठेवून त्याने अधिकाधिक सैन्यभरती करण्यास सुरवात केली.

( ११५ ) सरतेशेवटी इब्राहीम आदिलशहाने ऐनउल्मुल्काविरुद्ध रणांगणात खुद्द उभे ठाकण्याचा विचार केला आणि ५००० निवडक घोडेस्वार, २००० पायदळ आणि तोफखान्याचे पथक बरोबर घेऊन त्याने कूच केले. ऐनउल्मुल्काने माण नदीवर छावणी दिली. सुलतानही तेथे येऊन पोहोचला आणि ऐनउल्मुल्कावर हल्ला न करता त्याने त्याच्या छावणीच्या विरुद्ध किनाऱ्यावर आपला मुक्काम केला. आपण माघार घ्यावी किंवा नाही याबाबत ऐनउल्मुल्क याला ठाम असा निर्णय घेता आला नाही आणि त्याने आदिलशहाबरोबर सामना दिल्याशिवाय माणदेश सोडून जावयाचे नाही असा दृढनिश्चय केला. लागोपाठ तीन दिवस जणूकाही लढाई देण्यासाठी म्हणून त्याने सुलतानाच्या छावणीच्या दिशेने कूच केले आणि प्रत्येक वेळी आपल्या छावणीकडे लढाई न देता तो परत फिरला. सुलतानाचे सैन्य आपल्यावर शत्रूकडून हल्ला होईल अशी अपेक्षा करीत सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत प्रत्येक वेळी शस्त्रसज्ज राहिले. चौथ्या दिवशी ऐनउल्मुल्क याने पुन्हा एकदा आपल्या फौजेला कूच करण्याची आज्ञा दिली. सुलतानाला असे वाटले की मागील तीन दिवसांप्रमाणेच आताही त्याचा उद्देश

नुसती हुलकावणी देण्याचा आहे. या समजुतीखाली त्याच्या सैन्याच्या तोंड देण्याची तयारी करण्याकडे सुलतानाने दुर्लक्ष केले. फक्त छावणीमध्ये नेहमी पहारा करणारे सैनिक तेवढे मात्र शस्त्रसज्ज झाले. सरते शेवटी जेव्हा शत्रूच्या सैन्यातील ध्वज आणि पटका दृष्टोत्पत्तीस आला तेव्हा इब्राहीम आदिलशहाने मोठ्या घाईघाईने आपली फौज एकत्र जमविली आणि ऐनउल्मुल्काबरोबर सामना देण्यासाठी तो छावणीतून बाहेर पडला. खुद्द सुलतानाबरोबर लढाईत उभे राहण्याची कल्पना ऐनउल्मुल्क याला पटली नाही आणि त्याने त्याबाबत आपल्या स्नेहीमंडळीशी सल्लामसलत केली. तो असे म्हणाला की, " शाही ध्वज समोर असताना युद्धाला उभे ठाकणे म्हणजे देशद्रोह करण्यासारखे आहे. " त्याचा हा विचार मुर्तजाखान अंजू खेरीज सोडून इतर सर्वांना पटला. मुर्तजाखान अंजू म्हणाला की, " सुलतानाची ध्वजचिन्हे काही लढाईत [३] (११०) भाग घेत नाहीत आणि युद्ध झालेच तर शाही रक्त रणभूमीवर सांडण्याचा काहीच धोका नाही. " या युक्तिवादाने ऐनउल्मुल्काचे समाधान झाले. आता हल्ला करावा किंवा न करावा याबद्दल विचार करण्याची वेळ निघून गेली आहे असे त्याला दिसून आले. तेव्हा त्याने इब्राहीम आदिलशहाच्या सैन्यावर चाल केली आणि इब्राहीम आदिलशहा सैन्याच्या मध्यभागी ठाण मांडून उभा होता त्याच्यावर त्याने हल्ला चढविला. त्याने आदिलशाही सैन्यावर इतक्या निकराने मारा केला की सैन्याची मधली फळी मोडून एकच गोंधळ झाला आणि सुलतानाने पळ काढला. सुलतानाने पळ काढल्याचे दिसताच संबंध आदिलशाही सैन्याची फळी मोडली. विजयश्रीने ऐनउल्मुल्काच्या गळ्यात माळ घातली. ऐनउल्मुल्काने सुलतानाचे छत्रचामर, हत्ती आणि तोफखाना व त्याशिवाय सर्व तंबू आणि इतर सामानसुमान यावर आपला कबजा केला. सुलतानाने आपल्याला विजापूरच्या किल्ल्यात कोंडून घेतले. शहरातल्या प्रजाजनांमध्ये इतका भयंकर घबराट पसरला की आदिलशाही घराण्याच्या नाश आता सरळ आहे अशी भविष्यवाणी वर्तविण्यात आली. आपल्याला मिळालेल्या विजयाचा पाठपुरावा करत ऐनउल्मुल्क विजापुरासमोर येऊन दाखल झाला. तेथे त्याने अनेक दिवसपर्यंत शहराच्या निरनिराळ्या भागांवर हल्ले चढविले आणि शहराची रसद तोडण्याचे शर्थीने प्रयत्न केले.

(११६) अशा आणीबाणीच्या परिस्थितीत इब्राहीम आदिलशहाने विजयनगरचा हिंदू राजा रामराजा याच्याकडे १२ लक्ष होन एवढी रकम भेटीदाखल पाठवून त्याच्याकडे मदतीची याचना केली. यावर रामराजाने आपला भाऊ वेंकटाद्री याच्या बरोबर मोठे सैन्य देऊन शत्रूला घालवून लावण्यासाठी म्हणून रवानगी केली. सैफ ऐनउल्मुल्क याने आसदखानाचे अनुकरण करण्याच्या हेतूने काफरांच्या छावणीवर अचानक हल्ला करण्याचा विचार केला. परंतु वेंकटाद्रीला त्याच्या बेताचा अगोदरच सुगावा लागल्याने त्याने आपल्या फौजेला तयार राहण्याचा हुकूम दिला. त्याने लाकडांचे मोठमोठे ओंडके जमा केले आणि त्यांच्या एका टोकाला तेलात भिजविलेले

कपड्यांचे बोळे बांधून आपल्या सैनिकांना अशी आज्ञा केली की, "धोक्याची सूचना मिळताच तुम्ही हे ओंडके पेटवा आणि शक्य होईल तेवढ्या उंचीवर ते धरून शत्रूची हालचाल पूर्णपणे आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल असे करा." सैफ ऐनउल्मुल्क याने आपल्या बेताची अंमलबजावणी करण्यासाठी एका रात्री २००० सैनिकांची निवड [३] (१११) केली आणि सलाबतखानासमवेत त्याने शत्रूच्या छावणीकडे कूच केले. कोणत्याही तऱ्हेचा प्रतिकार केला न जाता त्याला छावणीत प्रवेश करून देण्यात आला. परंतु पूर्वी ठरल्याप्रमाणे धोक्याची सूचना देण्यात आल्यावर सर्व कोलिते ताबडतोब पेटविण्यात आली. वेंकटाद्री हा पूर्ण तयारीनिशी सिद्धच होता. त्याने इतक्या यशस्वीरित्या शत्रूवर हल्ला चढविला की छावणीतून बाहेर निसटून जाईपर्यंत ऐनउल्मुल्काच्या फौजेतील ५०० सैनिक ठार मारले गेले. मोठ्या मुष्किलीने ऐनउल्मुल्क आणि सलाबतखान हे छावणीतून पळून जाण्यात यशस्वी झाले. भयाण काळोख्या रात्रीत त्यांची वाट चुकली. पळून गेलेले काही सैनिक परतल्यावर त्याच्या छावणीत अशी बातमी पसरली की ऐनउल्मुल्क हा ठार मारला गेला आहे. अशा परिस्थितीत सापडल्यामुळे ऐनउल्मुल्काचे सैन्यात अतिशय घबराट पसरली. रात्रीच्या अवधीत ऐनउल्मुल्काचे सैनिक सर्व दिशांना फैलावले आणि त्यांनी इतस्ततः पलायन केले. दिवसाउजेडी ऐनउल्मुल्क आणि सलाबतखान २०० घोडेस्वारांनिशी आपल्या छावणीच्या जागी येऊन दाखल झाले. सर्व सैनिक पळून गेल्याने ओसाड पडलेली आपली छावणी बघितल्यावर त्या दोघांनी मायदेशाच्या मार्गाने हुसेन निजामशहाच्या राज्याकडे पळ काढला. तेथे त्यानी निजामशहापाशी संरक्षणाची याचना केली परंतु त्याने विश्वासघात करून नीचपणाने त्यांचा वध केला. यासंबंधीची सविस्तर हकीकत योग्य जागी निजामशाही घराण्याच्या इतिहासात कथन करण्यात येईलच.

(१९७) यानंतर आपल्या राज्याचा कारभार पूर्ववत स्थितीवर आल्यानंतर इब्राहीम आदिलशहाने दारूच्या अतिरिक्त सेवनात आपल्याला झोकून दिले. वाईट वर्तनाच्या स्त्रियांबरोबर त्याने अनिर्बंध स्वैराचार केला. परिणामी अनेक दुराग्रस्त आणि बिकट रोगांनी त्याच्या शरीराला ग्रासले. त्याच्या आजारीपणात त्याला जे जे हकीम बरे करण्यात अयशस्वी झाले त्यांना त्याने गर्दन छाटून अथवा हत्तीच्या पायाखाली तुडविण्याची शिक्षा देऊन ठार मारले. परिणामी या सत्रातून सुटून जिवत [३] (११२) राहिलेल्या हकिमांची घाबरगुंडी उडून त्यांनी इब्राहीम आदिलशहाच्या राज्यातून पळ काढला. सरते शेवटी हकिमांनीच त्याचा त्याग केल्यामुळे तो या नश्वर जगाला सोडून परलोकवासी झाला. ते वर्ष हिजरी ९६५ हे होते. गोगी येथे त्याचा बाप आणि आजा यांच्या शेजारीच त्याचे दफन करण्यात आले. त्याची कारकीर्द २४ वर्षे आणि काही महिने झाली. त्याच्या पाठीमागे त्याचे दोन मुलगे आणि दोन मुली एवढी हयात होती.

हिजरी ९६५
इ. स. १५५७

## अली आदिलशहा [३](११३)

(११८) आपल्या लहानपणापासूनच अली आदिलशहा याची हजरजबाबीपणा आणि विविध क्षेत्रांतील प्रावीण्याबद्दल ख्याती होती. अली आदिलशहा हा तरुण असताना एकदा त्याचा बाप इब्राहीम याने त्याच्या समक्ष परमेश्वराची स्तुती करून म्हटले की, " धन्य त्या परमेश्वराची की त्याने मला माझा बाप आणि आजा यांनी स्वीकारलेल्या पाखंडी धर्मतत्त्वांचा त्याग करण्याची आणि पैगंबरप्रणीत खऱ्या धर्माचा स्वीकार करण्याची बुद्धी दिली." यावर राजपुत्र अली आदिलशहा हा विनोदाने उत्तरला "आपण आपल्या वाडवडिलांनी स्वीकारलेल्या धर्मापासून च्युत होणे योग्य आहे असा विचार केला तेव्हा साहजिकच इतक्या उत्कृष्ट उदाहरणाचे अनुकरण करण्याची जबाबदारी सर्व आज्ञाधारक मुलांवर बुद्ध्या येऊन पडते यात काहीच प्रत्यवाय नाही." अली आदिलशहाच्या या व्याजोक्तीपूर्ण बोलण्याचा राग येऊन इब्राहीम आदिलशहाने त्याला विचारले की, " कोणता पंथ तुला अनुकरण करावासा वाटतो ?" त्यावर [३](११४) अली आदिलशहा उत्तरला की, "या वेळेपुरते विचाराल तर मी आपल्या मताशीच सहमत आहे परंतु यापुढचे विचाराल तर परमेश्वरच जी काय बुद्धी देईल ते खरे." या उत्तरावरून इब्राहीम आदिलशहाने असे अनुमान काढले की याचा कल शिया पंथाकडे झुकणार आहे आणि उपायादाखल म्हणून त्याने अली आदिलचा गुरु ख्वाजा इनायतउल्ला शिराजी याची मानखंडाना केली. यानंतर थोड्याच दिवसांच्या अवधीनंतर त्याने विजापूरच्या सुन्नी धर्मपंडितांनी त्याला जी शिक्षा ठोठावली त्यानुसार इनायतउल्ला याला ठार मारले. इनायतउल्लाच्या ऐवजी मुल्ला फतेउल्ला शिराजी याची अली आदिलचा धर्मगुरू म्हणून नियुक्ती करण्यात आली. या विद्वानाचा कलही गुप्तपणे शियापंथाकडेच झुकत होता. अर्थात आपली कातडी बचावण्यासाठी का होईना तो महमद हनीफच्या सिद्धांताचा वरकरणी पुरस्कार करीत असे. अली आदिलची आपल्या गुरूवर अतिशय भक्ती होती. ही घटना घडल्याला फारसा कालावधी लोटला नाही तोच दरबारातील काही उमराव मंडळींनी बुरहाण निजामशहाने रचलेल्या कारस्थानात हातमिळवणी केली. त्यांनी असे ठरविले की मुदपाकखान्याच्या मुख्य कारकुनाला लाच चारून इब्राहीम आदिलशहाला विषप्रयोग करायचा. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ अबदुल्ला याला सिंहासनावर बसविण्याचा आणि शिया पंथाची जाहीररित्या पुन्हा स्थापना करण्याचा त्यांनी बेत केला होता. मुदपाकखान्याचा मुख्य कारकून या कारस्थानात प्रथम सामील झाला होता. परंतु त्याच्या कानावर जेव्हा कटवाल्यांचा बेत धर्मपंथामध्ये बदल घडवून आणावयाचा असल्याची हकीकत गेली तेव्हा त्याने सुलतानाजवळ वरील कारस्थानाची उघडीक केली. याचे कारण तो स्वतः सुन्नी पंथाचा कट्टर अनुयायी होता. इब्राहीम आदिलशहाने सर्व कटवाल्यांना ठार मारले परंतु राजपुत्र अबदुल्ला मात्र गोव्याच्या बंदराकडे पळून गेला. या घटनेपासून इब्राहीम आदिलशहाच्या मनात आपल्या मुलाविषयीचा संशय बळावला. त्याने त्याची रवानगी त्याच्या शिक्षकासमवेत मिरजेच्या किल्ल्याकडे

केली. त्याने किल्ल्याचा सुभेदार शिकंदरखान याला सक्त हुकूम पाठविला की अली आदिलवर बारीक नजर ठेवावी आणि शिया पंथाच्या कोणाही अनुयायाला त्याच्या-जवळ जाऊ देऊ नये. अथवा त्याच्या समक्ष शिया पंथाच्या सिद्धान्ताचा उच्चार देखील होऊ देऊ नये. परंतु वस्तुस्थिती अशी होती की किल्ल्याचा सुभेदार [ ३ ](११५) आणि त्याचा जावई कामिलखान दक्कनी यांचा ओढा खाजगीरित्या शिया पंथाकडे होता. त्यामुळे सुलतानाच्या आज्ञेचे पालन करण्याचेऐवजी ते दोघेजण राजपुत्र अलीच्या भजनी लागले आणि त्याची मर्जी संपादन करण्यासाठी त्यांनी अलीची कोणतीही इच्छा पुरविण्याचे कामी मुक्तहस्ताने मदत केली. जेव्हा इब्राहीम आदिलशहा आजारी पडला आणि त्याचा शेवट होणार अशी चिन्हे दिसू लागली तेव्हा राजपुत्र अलीने मशिदीत जाऊन व्यासपीठावर चढून जाण्याचा आणि शियापंथियांच्या रिवाजाप्रमाणे प्रार्थना म्हणण्याचा उपक्रम सुरू केला. पुष्कळदा खुद्द कामिलखान ही कामगिरी स्वतःचे अंगावर घेऊन पार पाडीत असे. अलीची अशा तऱ्हेची वागणूक जेव्हा इब्राहीम आदिल-शहाचे कानावर गेली तेव्हा त्याने आपला धाकटा मुलगा तहमास्प याची आपला वारस म्हणून नियुक्ती करण्याचे ठरविले. परंतु जेव्हा त्याला कळून चुकले की तहमास्प हा आपल्या भावाशी तुलना करता अधिक कट्टरपणे शिया पंथाचे अनुकरण करणारा आहे तेव्हा इब्राहीम आदिलशहा हा त्याच्यावर संतापून उठला आणि त्याने तहमास्पची बेळगावच्या किल्ल्यात बंदिवासात ठेवण्यासाठी म्हणून रवानगी केली. त्याने असे उद्गार काढले की माझ्या पाठीमागून गादीवर कोणी यावयाचे हे ठरविण्याचे काम मी एक परमेश्वरावर आणि माझ्या राज्याच्या मंत्र्यांवर सोपवितो. माझ्या मृत्यूनंतर दोन्ही राजपुत्रांपैकी कोणाचीही त्यांनी आपला सार्वभौम म्हणून निवड करावी.

( १२९ ) जेव्हा इब्राहीम आदिलशहाच्या जीविताची आशा सर्वांनी सोडली त्यावेळी हुकेरी, बेळगाव आणि रायबाग ह्या जिल्ह्यांचा सुभेदार महमद किश्वरखान याने मिरजेच्या किल्ल्याकडे चाल केली. किश्वरखान हा संपत्तीमान असून राज्यात त्याचे अतिशय वजन होते. मिरजेच्या किल्ल्याचा अधिकारी शिकंदरखान याजजवळ त्याने असे बोलणे सुरू केले की, " सुलतानाचा शेवट आता जवळ आला आहे. तेव्हा असे होण्याची शक्यता आहे की दरबारातील अनेक अमीर-उमराव आणि जहागिरदार हे राजपुत्र तहमास्पची बाजू उचलून धरतील आणि राज्यामध्ये तंटेबखेडे निर्माण करतील. तेव्हा आपण जर ताबडतोब राजपुत्र अलीसाठी छत्रचामरादी राजचिन्हांची तयारी केली आणि लगोलग मिरजेच्या किल्ल्याच्या तटबंदीलगतच तळ दिला तर एका दृष्टीने[ ३ ](११६) असे करणे बरोबरच ठरेल. कारण त्यामुळे सुलतानाचा मृत्यू झाल्यावर राजपुत्र अलीच्या निशाणाखाली येऊन मिळणे प्रजाजनांना सहज शक्य होईल आणि यत्किंचितही वेळ न दवडता आपण विजापूरकडे चाल करून जाऊ शकू. " या गोष्टीला शिकंदरखानाने मान्यता दिली आणि त्याप्रमाणे त्याने राजपुत्र अली याला छत्रचामरादी राजचिन्हांनी युक्त केले आणि आपला जावई कामिलखान याला राजपुत्र अली याजबरोबर किल्ल्या-

बाहेर जाण्यासाठी सोबत म्हणून रवाना केले. अली याला ताबोडतोब किश्वरखान येऊन मिळाला. त्याने त्याला बरीच मोठी रक्कम नजराणा म्हणून अर्पण केली. अलीने परतफेड म्हणून पोषाख देऊन किश्वरखानाचा सन्मान केला आणि त्याला आपला सेनापती म्हणून नियुक्त केले. कामिलखान दक्कनी याची उमरावपदावर बढती करण्यात आली. राजपुत्र अली याजकडून केल्या जाणाऱ्या कारवाईची हकीकत सर्वदूर पसरली आणि राज्याच्या निरनिराळ्या भागांतून सुलतानाची फौज त्याच्या निशाणाखाली सामील होण्यासाठी म्हणून जमा होऊ लागली. इब्राहीम आदिलशहाच्या दरबारातील अनेक अधिकारी आपापली शरीररक्षक सैनिकांची दले घेऊन विजापूर सोडून निघाले आणि घाईघाईने अली आदिलशहाकडे बंदगी अर्पण करण्यासाठी दाखल झाले. इब्राहीम आदिलशहाचा मृत्यू झाल्यानंतर याकिंचितही वेळ न घालविता अली राजधानीच्या रोखाने निघाला. रस्त्यात त्याला सर्व दरबारी मंडळी जाऊन भेटली. त्यांनी आपल्याबरोबर मरहूम इब्राहीम आदिलशहा धारण करीत असलेली सर्व राजचिन्हे आणली होती. ती त्यानी आपल्या नूतन बादशहाच्या चरणापाशी रुजू केली. विजापूर शहरापासून २ मैल अंतरावर आल्यानंतर किश्वरखानाच्या बागेत अली आदिलशहाने सिंहासनावर आरोहण केले. त्याच्या राज्याची भरभराट व्हावी म्हणून सर्व सय्यद आणि विद्वान मंडळींनी ईश्वराची प्रार्थना केली. अमीर-उमराव आणि राज्याचे इतर अधिकारी यांनी जयघोषाचे आवाज उंचावून सुलतानाचे अभिनंदन केले आणि आपापले नजराणे त्याला अर्पण केले. आपल्या राज्यारोहणाची स्मृती राहावी म्हणून त्या जागेनजीकच एक शहर वसविण्याचा हुकूम त्याने दिला. लवकरच शहराची बांधणी पूर्ण झाली. या शहराला शहापूर असे नाव दिले गेले. सुलतानाचा कल शिया पंथाकडे होता. त्याचा त्याच्या वर्तनामध्ये ताबडतोब पडताळा दिसून आला. कारण त्याने आपल्या आजाच्या कारकिर्दीतल्याप्रमाणे इमामांच्या नावे आपल्या सर्व राज्यभर खुत्ब्याचे वाचन केले जावे अशा तऱ्हेचा हुकूम फर्मावला. त्याचप्रमाणे त्याने शियापंथीय ज्या पद्धतीचे [ ३ ] ( ११७ ) अनुकरण करतात त्याबर हुकूम साहिबांना शिव्या घालण्यासाठी आपल्या खास पथकांत ४० इसमांची बांग घालण्याचे कामासाठी भरती केली. परिणामी मशिदीमध्ये, जाहीर सभांमध्ये आणि सुलतान जेव्हा जेव्हा बाहेर पडत असे तेव्हा तेव्हा त्याच्या समक्ष साहिबांच्या नावे शिव्या घातल्या जाऊ लागल्या. न्याय हा एक असा खजिना आहे की अधिक खर्चाने त्याची वृद्धी होते. त्याचप्रमाणे न्यायाची तुलना एकाद्या भव्य प्रासादाबरोबर करता येईल की अग्नी जो जाळू शकत नाही आणि कालरथाच्या संक्रमणाची चक्रे ज्याचा नाश करू शकत नाहीत. सुलतानाने या गुणाची जोपासना करण्याकडे इतक्या काटेकोरपणे लक्ष पुरविले की अतिशय प्रामाणिक म्हणून नावाजलेल्या सुलतानांमध्ये त्याची गणना होऊ लागली. आपल्या प्रजेच्या हितसंबंधाकडे तो इतक्या आस्थेवाईकपणे लक्ष देत असे की राज्याच्या वसुली उत्पन्नात भर पडली आणि राज्याच्या सीमा अतिशय विस्तार पावल्या.

( १२० ) कल्याणी आणि सोलापूर हे किल्ले हुसेन निजामशहाच्या हाती पडले होते. राज्यकारभाराच्या पहिल्याच वर्षी हे किल्ले आपण जिंकून घ्यावेत अशी इच्छा अली आदिलशहाच्या मनात निर्माण झाली. त्याकाळी राज्यावर नवीन आलेल्या सुलतानाचे अभिनंदन करण्याची पद्धती होती. त्यानुसार शेजारील राज्यांच्या वतीने त्याचे रूढीनुसार अभिनंदन करण्यासाठी पाठविलेल्या वकिलांची भेट घेण्या· ६०९□ साठीदेखील न थांबता त्याने विजयनगरचा राजा रामराजा याजबरोबर मैत्रीचा तह करण्यासाठी म्हणून किश्वरखान आणि शहा अबुतुराब यांची रवानगी केली. त्याच-वेळी याच कामासाठी म्हणून त्याने महमद हुसेन सादिकी याला अहमदनगरला पाठविले. रामराजाने अली आदिलशहाकडून आलेल्या वकिलांचे सन्मानपूर्वक स्वागत केले. त्याने आपल्या खाजगीकडला एक अधिकारी किश्वरखानाबरोबर सुलतानाचे [ ३ ] ( ११८) सिंहासनावर आरूढ झाल्याबद्दल अभिनंदन करण्यासाठी रवाना केला. हुसेन निजाम-शहाने मात्र अली आदिलशहा सोलापूर जिंकून घेण्यासाठी जे कारस्थान रचीत होता त्याबद्दलच्या विद्वेषाने त्याच्याकडून आलेल्या वकिलांचा योग्य तो सन्मान करण्यात कुचराई दाखविली. एवढेच नव्हे तर अली आदिलशहाकडे आपला वकील देखील त्याने रवाना केला नाही. आपले अली आदिलशहाबरोबरचे संबंध निश्चितपणे शत्रुत्वाचे आहेत याची उघड उघड जाणीव मात्र त्याने आपल्या वर्तनाने दिली. अली आदिलशहाने मात्र आपल्या राज्यात भर घालण्याच्या आणि आपल्या बापाच्या कारकिर्दीत गमावलेला मुलख परत मिळविण्याच्या हेतूने रामराजाबरोबर दृढ मैत्रीचा तह केला. रामराजाच्या एका मुलाचा जेव्हा मृत्यू झाला तेव्हा त्याने केवळ १०० घोडेस्वार बरोबर घेऊन विजयनगरला जाण्याचे आणि रामराजावर ओढवलेल्या दुःखकारक प्रसंगात त्याचे व्यक्तीशः सांत्वन करण्याचे धाडस दाखविले. रामराजाने अतिशय सन्मानपूर्वक अली आदिलशहाचे स्वागत केले. सुलतानाने देखिल मोठ्या हळूवारपणे आपल्या मुलाच्या मृत्यूचे दुःख बाजूला ठेवण्याबद्दल रामराजाचे मन वळविले. रामराजाच्या पत्नीने या प्रसंगी अली आदिलशहाला आपला मानसपुत्र म्हणून मानले. यानंतर तीन दिवसपर्यंत रामराजा आणि अली आदिलशहा यांनी परस्परांच्या मैत्रीचे निदर्शक असे व्यवहार करण्यात आणि एकमेकांना भेटी देण्यात घालविले. शेवटी अली आदिलशहाने रामराजाचा निरोपघेतला. परंतु रामराजा त्याला शहराबाहेर घालविण्यास न आल्यामुळे त्याला आपला अपमान झाला आहे असे वाटले. ह्या अपमानास्पद वागणुकीची त्याने मनात दखल घेऊन ठेवली. परंतु काळाला ओळखून वागण्याचे शहाणपण त्याचे अंगी असल्याने त्याने त्यावेळी कोणत्याही तऱ्हेने आपली नाखुषी उघडपणे दाखविली नाही ६१०□ [३] (११९)

(१२१) दिवसेंदिवस मात्र अली आदिलशहाच्या मनात हुसेन निजामशहाबद्दल वाटणारी शत्रुत्वाची भावना वाढतच गेली तेव्हा त्याने शहा हुसेन अंजूयाच्यातर्फे त्याला निरोप पाठवून असे कळविले की, "साऱ्या जगाला हे उघडपणे माहीत आहे की कल्याणी

आणि सोलापूर हे किल्ले पूर्वापार चालत आलेल्या हक्कानुसार माझ्या घराण्याच्या मालकीचे आहेत. माझ्या वडलांच्या कमनशिबामुळे हे किल्ले निजामशाही सरकारच्या ताब्यात गेले परंतु आता मला आशा आहे की हे दोन्ही किल्ले किंवा त्यातल्या त्यात कल्याणीचा किल्ला तरी आपल्याकडे परत सोपविला जाईल." शहा हुसेन अंजूने आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करून दोहोंपैकी एक तरी किल्ला देण्याबाबत हुसेन निजामशहाचे मन वळविण्याचा प्रयत्न केला, पण त्यात त्याला अपयश आले. तेव्हा अली आदिलशहाने आपल्यातर्फे दुसरा वकील अहमदनगरकडे रवाना केला आणि त्याच्याकडून असे निवेदन केले की, "इतक्या महत्त्वाच्या राजकीय प्रश्नाबाबत चर्चा करताना भावनावशता आणि हटवादीपणा हा थोर पदावर अधिष्ठित असलेल्या सम्राटांना शोभत नाही. यातून होणारे दुष्परिणाम टळावेत म्हणून आपण हे किल्ले सोडून देणे ह्यातच खरा न्याय आहे या गोष्टींची दखल घ्याल. तसे झाले म्हणजे आपल्या दोन राज्यांमधील मैत्री वृद्धिंगत होईल. तसे न झाल्यास आपल्या राज्यात आमचे सैन्य चाल करून येईल आणि दयामाया न दाखविता आपल्या प्रदेशाची धुळदाण उडवील याबद्दल खात्री बाळगून असा".

(१२२) हा निरोप मिळाल्यावर हुसेन निजामशहा भयंकर संतापला. त्याने त्यावर इतके हलकटपणाचे उत्तर पाठविले की ते सांगणे देखील सयुक्तिक ठरणार नाही. या उत्तरामुळे अली आदिलशहाचा संताप इतका पराकोटीला पोहोचला की त्याने आपले छत्र आणि निशाण यांचा रंग पिवळ्याचा हिरवा केला. हुसेन निजामशहाच्या छत्र आणि निशाणाचा रंगही हिरवाच होता. असे करण्याने त्याने हुसेन निजामशहाला तुच्छ लेखून (दक्षिणेतील प्रचलित पद्धतिनुसार) आपल्यावर चाल करून येण्याचे आणि स्वतःचा अशा तऱ्हेने हिरावला गेलेला मान परत मिळविण्याचे जणूकाही [ ३ ] ( १२० ) आव्हानच दिले.

(१२३) हिजरी ९६६ / इ. स. १५५८ — हिजरी ९६६ यावर्षी अली आदिलशहाने रामराजाला आपल्याला येऊन मिळण्याबद्दल बोलावणे पाठविले. दोन्ही राजांनी हुसेन निजामशहाच्या प्रदेशावर आक्रमण केले आणि त्या प्रदेशाची इतक्या प्रमाणावर नासधुस केली की परंड्यापासून जुन्नरपर्यंत आणि अहमदनगरपासून दौलताबादपर्यंत लोकसंख्येची नावानिशाणी देखील शिल्लक राहिली नाही. अशा तऱ्हेची संधी मिळावी अशी विजयनगरच्या काफरांची फार वर्षांपासूनची इच्छा होती. त्यांनी कोणतेही क्रौर्य करण्याची बाकी ठेवली नाही. त्यांनी मुसलमान स्त्रियांचा विनयभंग केला, मशिदींचा विध्वंस केला आणि पवित्र कुराणाचा देखील त्यांनी मान ठेवला नाही. हुसेन निजामशहाने कासिम बेग हकीम, शहा जाफर आणि इतर वजिरांच्या सल्ल्यानुसार रणांगणामध्ये शत्रूला विरोध करण्याचे टाळून पैठणकडे माघार घेतली आणि अली आदिलशहाकडे कल्याणीचा किल्ला सुपूर्द करून काही काळानंतर कसाबसा तह केला. परंतु शत्रूची पाठ फिरते न फिरते तोच त्याने इब्राहीम कुतुबशहाबरोबर मैत्रीचा

तह केला आणि त्याच्याबरोबर हातमिळवणी करून नुकताच आदिलशहाच्या स्वाधीन केलेला किल्ला परत घेण्यासाठी चाल केली. या युतीची बातमी जेव्हा अली आदिलशहाला मिळाली तेव्हा त्याने पुन्हा एकदा रामराजाकडून मदत मिळविण्यासाठी किश्वरखान आणि अबुतुराब यांची रवानगी केली. त्याने या जुटीत सामील होण्यासाठी अली बरीदशहाला देखील आवाहन केले. सुलतान अली आदिलशहाला रामराजा पूर्णपणे ओळखून होता. त्याने असा विचार केला की जर का यावेळी आपण मदत देण्याचे नाकारले तर आदिलशहा मुसलमान सत्ताधिशांबरोबर समझोता घडवून आणील आणि त्यांच्या साहाय्याने रायचूर आणि मुद्गल परत जिंकून घेण्याचा प्रयत्न करील, आणि म्हणून त्याने ५०००० घोडेस्वार आणि असंख्य पायदळी फौज बरोबर घेऊन आदिलशहाला मिळण्यासाठी कूच केले. दोघा दोस्तांची भेट कृष्णा [ ३ ] ( १२१ ) नदीच्या तीरावर झाली. तेथून त्यांनी तावडतोब कल्याणीच्या दिशेने कूच केले तेव्हा निजामशाही आणि कुतुबशाही फौजांनी कल्याणीला वेढा दिलेला होता.

( १२४ ) इब्राहीम कुतुबशहाचा नेहमीचा परिपाठ असा होता की ज्याची बाजू अधिक मजबूत त्याला जाऊन मिळावयाचे. त्यानुसार त्याने निजामशहाचा पक्ष सोडला आणि अचानक तो अली आदिलशहाला येऊन मिळाला. परिणामी हुसेन निजामशहाने यत्किंचितही वेळ न दवडता अहमदनगरकडे माघार घेतली. दोस्तांनी अहमदनगर शहरापर्यंत अतिशय जलद गतीने हुसेन निजामशहाचा पाठलाग केला. अहमदनगरांत राहणे तशा परिस्थितीत त्याला शहाणपणाचे वाटले नाही. तेव्हा त्याने किल्ल्यात भरपूर कुमक आणि दाणागोटा पोहोचविण्याची तजवीज केली आणि त्याने स्वतः जुन्नर शहराकडे माघार घेतली. यावर तिघा सार्वभौमांनी अहमदनगरला वेढा दिला आणि आजूबाजूचा प्रदेश उद्ध्वस्त करण्यासाठी सैन्याच्या तुकड्यांची रवानगी केली. विजय-नगरच्या हिंदूंनी भयानक अशी लूटमार केली. त्यांनी इमारती जाळल्या आणि जमीनदोस्त केल्या. आपले घोडे त्यांनी मशिदीत घातले आणि मशिदीसारख्या पवित्र ठिकाणी त्यांच्या तिरस्करणीय पद्धतीनुसार मूर्तिपूजेचे सोहाळे पार पाडले. अहमदनगरच्या वेढ्याचे काम त्यांनी अतिशय जारीने चालू ठेवले परंतु किल्ल्यावरील शिबंदीने पावसाळा नजीक आल्यावर शत्रूला वेढा उठवून जाणे भाग पडेल या आशेवर अतिशय नेटाने प्रतिकार चालू ठेवला त्यांनी मनाशी ही जी आशा बाळगली होती त्याबाबत त्यांची निराशा झाली नाही. कारण ज्यावेळी पावसाळ्याला सुरुवात झाली त्यावेळी पूर, हवेतला दमटपणा आणि दाण्यागोट्याचा तुटवडा यामुळे दोस्तांच्या छावणीत अतिशय हालाखीची परिस्थिती निर्माण झाली. याच वेळी इब्राहीम कुतुबशहाने किल्ल्यामधील शिबंदीबरोबर गुप्तपणे पत्रव्यवहार चालू ठेवला आणि खाजगीरित्या त्यांना दाणागोट्याचा पुरवठा केला. किल्ल्यातील शिबंदी इतक्या हटवादीपणे प्रतिकार का करीत आहेत याबद्दलच्या कारणाबद्दल अली आदिलशहाच्या मनात संदेह निर्माण झाल्यामुळे आणि आपल्या हिंदू दोस्तांच्या वर्तनामुळे बेअब्रू झाल्यामुळे आदिलशहाने वेढा उठविण्याबद्दल आणि

सोलापूरकडे कूच करून जाण्याबद्दल रामराजाचे मन वळविले. त्या किल्ल्यापासून काही मैलांचे अंतरावर आल्यानंतर किश्वरखानाच्या मनात रामराजाच्या चढाऊखोर धोरणामध्ये कोणता भयंकर धोका सामवलेला आहे याबद्दल विचार आला आणि [३] (१२२) त्याने अली आदिलशहापाशी निवेदन केले की, "जर का सोलापूरच्या किल्ल्याचा पाडाव झाला तर कदाचित रामराजा तो किल्ला स्वतःच्या ताब्यात ठेवून घेईल आणि शेजारील देशात आपल्या दृष्टिकोनाचा प्रभाव पाडील. तेव्हा मला असे वाटते की पहिल्याप्रथम नळदुर्गाचा पाडाव करण्याच्या प्रयत्नाला लागावे आणि सोलापूरच्या किल्ल्याच्या मालकी हक्कासंबंधी स्पर्धा निर्माण होण्याची धास्ती नाहीशी होईल अशा एखाद्या सोयीस्कर वेळी त्या किल्ल्याच्या पाडावाचे काम हाती घ्यावे. हाच मार्ग माझ्या दृष्टीने सर्वथैव योग्य आहे." आदिलशहाला हा सल्ला पटला. त्याने रामराजाचे मन आपला बेत बदलण्यासंबंधी वळविले. सोलापूरहून राजा नळाने पूर्वी बांधलेल्या बळकट किल्ल्याकडे कूच करून जाण्याला रामराजा अली आदिलशहाने सांगितल्यावरून तयार झाला. या ठिकाणी आल्यावर दोस्तांनी येथे दगडाच्या मोठ्या कामाची उभारणी केली आणि परस्परांचा निरोप घेऊन ते आपापल्या राज्यांकडे निघून गेले.

(१२५) पहिल्या मोहिमेत जेव्हा अली आदिलशहाने रामराजाला आपल्या मदतीसाठी बोलाविले तेव्हा हिंदूंनी अहमदनगर येथे भयंकर अत्याचार केले. सद्धर्मपालकांच्या धर्मासंबंधी अनादर दाखविण्याची एकही संधी त्यांनी सोडली नाही. इतकेच काय तर खुद्द मशिदीत देखील त्यांनी नाचगाणे आणि आपले तिरस्करणीय आणि खुळचट समजुतींनी भरलेले पूजादिक प्रकार पार पाडले. या गोष्टीने आपला अतिशय अपमान झाला आहे असे सुलतानांना वाटले. परंतु या गोष्टींना प्रतिबंध करण्याचे साधन त्यांच्याजवळ नसल्यामुळे या गोष्टी त्यांनी आपल्या ध्यानात आल्या न आल्यासारखे दाखविले. मोहीम जेव्हा संपत आली तेव्हा रामराजाने मुसलमान सुलतानांची तुच्छतापूर्वक अवहेलना केली. त्याचप्रमाणे ते अगदीच क्षुल्लक आणि निरुपद्रवी आहेत असे मानून त्याच्याबरोबर बोलणी करण्यासाठी पाठविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना योग्य ती सन्मानाची वागणूक जाणूनबुजून दिली नाही. रामराजाने जेव्हा त्या अधिकाऱ्यांना आपल्या समक्ष बोलावू पाठविले तेव्हा त्याने आसनस्थ होण्यास देखील परवानगी दिली नाही आणि इतकेच नव्हे तर त्यांना त्याने अतिशय तिरस्काराने आणि उद्धटपणाने वागविले. जाहीर कार्यक्रमात रामराजाने त्यांना आपल्या लवाजम्याबरोबर पायी चालणे भाग पाडले आणि स्वतःचा हुकूम होईपर्यंत त्याने त्यांना घोड्यावर स्वार होण्यास परवानगी दिली नाही. नळदुर्गावरील शेवटच्या मोहिमेवरून परत फिरताना त्याच्या [३] (१२३) सैन्यातील अधिकाऱ्यांनी आणि शिपायांनी मुसलमानांना उघड उघड बेमुर्वतखोरपणाची वागणूक दिली आणि त्यांच्याशी बोलताना निंद्यपूर्ण भाषेचा उपयोग केला. त्यांचा निरोप घेतल्यावर रामराजाची पापी दृष्टी कुतुबशहा आणि आदिलशहा यांच्या प्रदेशावर पडली आणि त्याने त्या दोघांच्या सरहद्दीवर सैन्याची रवानगी केली. रामराजाने

आपल्याबाबत उदारपणाचे धोरण स्वीकारावे यासाठी अली आदिलशहाला त्याच्याकडे एटगिर आणि बागलकोट हे जिल्हे सोपविणे भाग पडले, तर रामराजाने अशाच प्रकारचा दृष्टिकोन आपल्याबाबत ठेवावा यासाठी कोविलकोंडा, पानगळ आणि गुंतूर या जिल्ह्यांवर कुतुबशहाने पाणी सोडले.

(१२६) रामराजाने दिवसेंदिवस मुसलमानी राज्यांवर आक्रमण करणे चालूच ठेवले तेव्हा आदिलशहाने त्याच्या उन्मत्तपणाला आळा घालण्याचा आणि मुसलमानी सुलतानांची एकजूट करून त्याची सत्ता काबीज करण्याचा निश्चय केला. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी त्याने आपले स्नेही आणि विश्वासू सल्लागार यांची बैठक बोलाविली. यामध्ये किश्वरखान लारी आणि शहा अबुतुराब शिराजी यांच्या अंगातील कर्तृत्वाचा या अगोदरच प्रत्यय आलेला होता. त्यांनी अशी बाजू मांडली की, "विजयनगरच्या राजाच्या गर्वाचे हरण करण्याची आपली इच्छा ही अतिशय कौतुकास्पद आणि निश्चितच मोठ्या मुत्सद्देगिरीची आहे. परंतु दक्षिणेमधील सर्व मुसलमान सुलतानांची एकजूट घडवून आणल्याखेरीज या इच्छेला मूर्त स्वरूप देता येणे शक्य नाही. याचे कारण असे आहे की रामराजाच्या ताब्यातील [३११८] ६० बंदरे आणि अनेक भरभराटलेली शहरे यामधून त्याला मिळणाऱ्या वसुलाची रक्कम प्रचंड आहे. साहजिकच मोठी फौज ठेवणे त्याला सहज शक्य होते. त्याच्या विरुद्ध एकट्या- [३] (१२४) दुकट्या मुसलमान सुलतानाने युद्धासाठी उभे राहण्याचा प्रयत्न केल्यास यशाची यत्किंचितही आशा नाही." यावर अली आदिलशहाने अशा तऱ्हेची सार्वजनिक एकजूट घडवून आणण्याचा उद्देश साध्य करण्यासाठी उपाययोजना करण्याची किश्वरखानाला आज्ञा दिली. यानंतर ताबडतोब इब्राहीम कुतुबशहा याच्या मनाचा अंदाज घेण्यासाठी त्याच्याकडे एका वकिलाला पाठविण्यात आले. इतकेच नव्हे तर त्याच्याजवळील चर्चेतून काही निष्पन्न होईल असे वाटल्यास त्याच्याजवळ या सर्व बेताची उघडीक करावी असेही त्या वकीलाला सांगण्यात आले.

(१२७) इब्राहीम कुतुबशहा हा रामराजाच्या उद्धट मग्रुरीमुळे आणि त्याच्या दडपादडपीच्या वर्तनामुळे मनातल्या मनात रागाने नुसता धुमसत होता. वरील दोस्तीच्या योजनेला त्याने अतिशय आतुरतेने आपला पाठिंबा दिला. त्याने अली आदिलशहा आणि हुसेन निजामशहा या दोघांमध्ये मध्यस्थी करण्यास आपली तयारी दाखविली. या दोघांमध्ये भांडणाच्या कारणाचे मूळ सोलापूरचा किल्ला हे होते. तो किल्ला आपण आदिलशहाला मिळवून देऊ असेही अभिवचन त्याने दिले. इब्राहीम कुतुबशहाच्या दरबारात मुस्तफाखान आर्दिस्तानी हा अतिशय बुद्धिमान असा सरदार होता. त्याने वर सांगितलेले अभिवचन पुरे करण्याच्या उद्देशाने त्याला अली आदिलशहाकडे पाठविले. त्याने मुस्तफाखानाला असा हुकूम दिला की, "मुसलमान सुलतानांची एकी करण्याचा हा जो प्रयत्न आहे त्याला अली आदिलशहाचा मनापासून पाठिंबा आहे असे तुला आढळून आल्यास तू तेथून तसाच पुढे अहमदनगरला जा आणि दोस्तीच्या तहा-

बाबतची कारवाई पुरी कर." मुस्तफाखान त्याप्रमाणे विजापूरला येऊन पोहोचला तेव्हा त्याला असे दिसून आले की या दोस्तीचा एकमेव उद्देश काफरांविरुद्ध लढाई करण्याचा आहे. यावर त्याने तसेच अहमदनगरकडे कूच केले आणि हुसेन निजामशहा-पुढे दोस्तीच्या तहाची कल्पना विशद करून मांडली. त्याने त्याला या गोष्टीची आठवण करून दिली की, "बहमनी घराण्याच्या कारकिर्दीत मुसलमानांची सत्ता एकछत्री अमलाखाली एकवटली होती. त्यामुळे विजयनगरच्या राजाच्या सत्तेविरुद्ध समतोलपणा राखणे त्यांना शक्य झाले होते. आता जरी मुसलमानी साम्राज्य विभागलेले होते तरी आपल्या सर्वांचा शत्रू असलेला जो विजयनगरचा राजा रामराजा त्याच्या वाढत्या सत्तेला पायबंद घालण्यासाठी सर्व मुसलमान सुलतानांनी एकजूट करणे हेच शहाणपणाचे धोरण ठरेल." तो पुढे असेही म्हणाला की, "विजयनगरच्या राजाने आपल्या सामर्थ्याच्या जोरावर कर्नाटकच्या सर्व राजांना एका जोकडाखाली बांधून निस्तेज [३] (१२५) केलेले आहे. त्याला पायबंद घालणे हे अतिशय जरुरीचे आहे. त्याचप्रमाणे इस्लामच्या ताब्यातील देशात त्याचा जो दबदबा आहे तो नाहीसा करण्याचीही आवश्यकता आहे. असे झाले म्हणजे आपल्या सर्वांच्या राज्यातील प्रजाजन-ज्यांची देखभाल करण्याची कामगिरी परमेश्वराने आपल्यावरच सोपविली आहे असे आपण समजले पाहिजे– काफरांच्या अत्याचारापासून सुरक्षितपणे राहून जीवन जगू शकतील आणि त्यांच्या मशिदी आणि इतर पवित्र धर्मस्थाने ही काफरांच्या भ्रष्टाचारापासून अलिप्त राहून त्याला बळी पडण्यापासून वाचतील."

(१२८) मुस्तफाखानाच्या या उद्गारांचा हुसेन निजामशहाच्या मनावर फार खोलवर परिणाम झाला. त्याने इब्राहीम कुतुबशहाकडून जो निरोप आणला त्यावर तो अतिशय खूष झाला. त्याने मुस्तफाखानाला आपल्या विश्वासातला एक म्हणून वागणूक दिली. साहजिकच जी कामगिरी पार पाडण्याच्या उद्देशाने तो आला होता त्याबाबत त्याच्या इच्छेप्रमाणे पाहिजे तशी संधी त्याला मिळत गेली. काही दिवसानंतर असे ठरले की हुसेन निजामशहाने आपली मुलगी चांदबिबी हिचा अली आदिलशहा-बरोबर विवाह करावा आणि हुंडा म्हणून सोलापूरचा किल्ला द्यावा. त्याचप्रमाणे असेही ठरले की अली आदिलशहाची मुलगी हदिया सुलताना ही हुसेन निजामशहाने आपला मोठा मुलगा मुर्तजा याच्यासाठी वधू म्हणून नेमस्त करून घ्यावी. त्याचप्रमाणे दोन्ही राज्यांमध्ये कायम मैत्रीचा तह करण्यात यावा आणि दोन्ही राज्यांनी रामराजाची सत्ता नेस्तनाबूत करण्याच्या हेतूने प्रामाणिकपणे एकत्र यावे. हा उद्देश सिद्धीस जावा म्हणून शक्य तितक्या लवकर रामराजाविरुद्ध चाल करून जावे असाही निर्णय घेण्यात आला. या मुद्यावर एकमत याप्रमाणे झाल्यावर मुस्तफाखानाबरोबर विजापूरकडे अहमदनगर-तर्फे मुल्ला इनायतउल्ला हा वकील म्हणून गेला. याप्रसंगी राजकीय करारमदार आणि लग्नासंबंधी झालेली बोलणी पक्की करण्यात आली आणि दोन्ही [३] (१२६) पक्षांनी शपथा घेऊन त्यांना मान्यता दिली. याच वेळी असेही ठरले की लग्न ठरल्याप्रित्यर्थ

समारंभ आणि मेजवान्या विजापूर आणि अहमदनगर येथे साजऱ्या करण्यात याव्या आणि दोन्ही राजकन्यांना वर झालेल्या करारात ठरल्याप्रमाणे अहमदनगर आणि विजापूर दरबारी रवाना करण्यात यावे. यानंतर हुसेन निजामशहा, अली आदिलशहा, इब्राहीम कुतुबशहा आणि अली बरीदशहा यांनी रामराजाविरुद्धच्या मोहिमेची मोठ्या जारीने तयारी करण्यास सुरुवात केली.

( १२९ ) रामराजाविरुद्ध लढाई पुकारण्याचे तयारीने आणि रामराजाबरोबर संबंध तोडून टाकण्यासाठी काहीतरी निमित्त मिळावे म्हणून अली आदिलशहाने त्याच्या दरबारात एका वकिलाची रवानगी केली. रामराजाने आदिलशहाकडून वेळोवेळी एटगीर, वाग्राकोट, रायचूर आणि मुद्गल ही ठिकाणे हिसकावून घेतली होती. त्याची त्याने या वकिलातर्फे मागणी केली. आदिलशहाने अपेक्षिल्याप्रमाणे रामराजाने त्या वकिलाला दरबारातून त्याची बेअदबी करून हाकलून दिले. दक्षिणेतील सुलतानांनी इस्लामचा एकमेव शत्रू असलेला जो रामराजा त्याचा नाश करण्यासाठी ह्या घटनेचे निमित्त करून जलदीने त्याच्याविरुद्ध तयारी करण्यास सुरुवात केली. हिजरी ९७२ या वर्षी चारही सुलतान आपापल्या सैन्यासहित विजापूरच्या मैदानात येऊन मिळाले आणि त्याच वर्षीच्या जमादिल अव्वाल महिन्याच्या २० तारखेला तेथील आसमंतातून त्यांनी कूच केले. काही दिवसानंतर ते तालिकोट [३१२८] येथे येऊन पोहोचले. कृष्णेच्या तीरावर मुसलमान सुलतानांच्या सैन्याने आपली छावणी दिली. कृष्णेच्या या तीराच्या उत्तरेकडचा मुलूख आदिलशाही प्रदेशात मोडत होता. अली आदिलशहाने आपल्या सर्व दोस्तांची मोठ्या थाटामाटाने सरबराई केली. त्याने आपल्या राज्याच्या सुभेदारांना सक्त हुकूम सोडले की तुम्ही आपापल्या जिल्ह्यांतून छावणीवर नियमितपणे रसदीचा पुरवठा करण्यात कुचराई करू नये [ ३ ] ( १२७ )

(जमादिल अव्वाल २० हिजरी ९७२ डिसेंबर २६ इ. स. १५६४)

( १३० ) आपल्याविरुद्ध झालेली मुसलमानी सुलतानांची ही प्रचंड एकजूट जरी रामराजाच्या दृष्टोत्पत्तीस आली तरी देखील त्याच्या दर्पोक्तिपूर्ण भाषेत काडी-मात्रही बदल झाला नाही. त्याने मुसलमानी सुलतानांच्या शत्रुत्वाला अतिशय क्षुल्लक लेखले आणि त्यांच्या वकिलांना अतिशय अपमानास्पद अशी वागणूक दिली. त्याने पहिल्याप्रथम आपला सर्वांत धाकटा भाऊ एल्तमराज याला २०००० घोडेस्वार, ५०० हत्ती आणि १००००० पायदळ एवढी फौज देऊन कृष्णेच्या उजव्या किनाऱ्याचा ताबा घेण्यासाठी आणि नदीपार करून जाण्याच्या सर्व मार्गांवर कबजा करण्यासाठी पाठविले. आपला दुसरा भाऊ वेंकटाद्री यालाही त्याने इतकेच मोठे सैन्य देऊन रवाना केले आणि तो स्वतः आपल्या राज्याच्या सर्व सामर्थ्यानिशी मजल–दरमजल करीत त्याच्या पाठोपाठ निघाला. मुसलमानी सुलतानांना जेव्हा दिसून आले की शत्रूने माहीत असलेल्या तरी आणि उतार यांचा अगोदरच ताबा घेतलेला आहे तेव्हा त्यांनी आपल्या सैन्याला नदी ओलांडून जाण्यासाठी एखादी जागा सापडेल या आशेवर नदीकाठी धुंडण्यासाठी

गुप्तचरांची रवानगी केली. शेवटी शहानिशा झाल्यावर असे दिसून आले की सैन्याला नदी पार करून जाण्याचा एकच सुरक्षित उतार आहे आणि तो शत्रूच्या छावणीच्या अगदी समोर आहे. हाही उतार अर्थात शत्रूच्याच ताब्यात होता आणि शत्रूने उताराच्या विरुद्ध बाजूच्या किनाऱ्यावर तटबंदी बांधली होती आणि तोफा रोखून आणि दारूची यंत्रे बसवून तिला मजबुती आणली होती. ही माहिती मिळाल्यावर मुसलमानी सुलतानांनी विचारविनिमयासाठी बैठक भरविली. या बैठकीत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला. तो असा : आपण सर्वांनी मिळून नदीच्या दुसऱ्या भागाकडे जणूकाही नदी उतारा होऊन जाण्याच्या उद्देशाने कूच करून जावे. आपण असे केल्यास शत्रूला त्याची जागा सोडण्याची आणि आपला पाठलाग करण्याची बुद्धी होईल. असे झाल्यास आपण अचानक मागे फिरावे आणि शत्रूकडून कोणताही अडथळा होण्याच्या आत पूर्वी पाहून ठेवलेल्या उतारावरून आपल्या सैन्याचा काही भाग नदीच्या पलिकडल्या तीरावर न्यावा. या बेताबरहुकूम दुसऱ्या दिवशी सकाळी मुसलमानांच्या सैन्याने आपला तळ हलविला आणि तीन दिवसांपर्यंत त्यांनी सतत कूच चालू ठेवली. यामुळे शत्रूची पूर्णपणे दिशाभूल झाली. त्याने सर्व मोक्याच्या ठिकाणावरून आपले [३](१२८) सैन्य काढून घेतले आणि नदीच्या पलिकडच्या तीरावर आपल्या सैन्याच्या व्यूह-रचनेला सुरुवात केली. इकडे मुसलमानी सुलतानांनी तिसऱ्या दिवशी रात्री एकाएकी आपली छावणी मोडली आणि इतक्या जलद गतीने त्यांनी कूच केले की दुसऱ्या दिवशी शत्रूने सोडून दिलेल्या उतारावर त्यांनी कबजा केला आणि कसलाही प्रतिकार न होता त्यांनी नदी पार केली. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांनी आगेकूच करण्यास सुरुवात केली आणि रामराजाच्या छावणीपासून दहा मैल अंतरावर ते येऊन पोहोचले. शत्रूच्या या अचानक हालचालीमुळे रामराजा आश्चर्यचकित झाला. परंतु यामुळे त्याचे धैर्य मात्र बिलकूल खचले नाही. त्याने आपल्या भावांना माघार घेण्याची आणि आपल्याला येऊन मिळण्याची आज्ञा दिली. मुसलमान सुलतानांनी रामराजाबरोबर युद्ध खेळण्यासाठी म्हणून आपल्या फौजेची आता व्यूहरचना केली. सैन्याच्या उजव्या फळीचे नेतृत्व अली आदिलशहा याजकडे सोपविण्यात आले तर डावी फळी संभाळण्याची जबाबदारी अली बरीदशहा आणि इब्राहीम कुतुबशहा याजवर टाकण्यात आली. सैन्याच्या मध्यभागी हुसेन निजामशहा ठाण मांडून उभा राहिला. सैन्यातील तोफखाना मजबूत साखळदंड आणि दोर यांनी घट्ट बांधून आघाडीसमोर उभा करण्यात आला. त्या काळच्या पद्धतीनुसार युद्धासाठी तयार केलेल्या हत्तींना निरनिराळ्या जागी ठेवण्यात आले. प्रत्येक सुलतानाने आपापल्या फौजेच्या मध्यभागी स्वतःचा विशिष्ट असा ध्वज उभा केला आणि त्यानंतर मुसलमान सुलतानांच्या फौजांनी एकवटून शत्रूच्या विरुद्ध चाल केली.

(१३१) रामराजाने आपला भाऊ एल्तमराज याच्याकडे आपल्या उजव्या फळीचे नेतृत्व सोपविले आणि कुतुबशहाला प्रतिकार करण्याचा त्याला हुकूम दिला.

सैन्याची डावी फळी आपला दुसरा भाऊ वेंकटाद्री याजकडे त्याने सोपवून अली आदिल-शहाला विरोध करण्याची त्याला आज्ञा दिली. त्याने स्वतः सैन्याच्या मध्यभागाचा ताबा आपल्याकडे घेतला. २००० युद्धसज्ज हत्ती आणि १००० तोफा त्याने आपल्या फौजेच्या वेगवेगळ्या भागांत विभागून ठेवल्या. साधारण दुपारच्या वेळी रामराजा हा एका अंबारीत आरूढ झाला. त्याच्या अधिकाऱ्यांनी त्याने घोड्यावर बसणे अधिक सुरक्षित आहे असे सांगून वरील गोष्टीला आपला विरोध दाखविला परंतु यावर रामराजा म्हणाला की पोराटोरांविरुद्ध ( शत्रुविरुद्ध ) इतकी खबरदारी घेण्यासारखी काही ही वेळ नाही. पहिल्या हल्ल्याच्या सपाट्यासरशी शत्रूला पळून जाणे भाग पडेल. दोन्ही [३](१२९) सैन्यांनी आता परस्परांविरुद्ध कूच करण्यास सुरुवात केली होती. ती आता एकमेकां-विरुद्ध युद्धासाठी सज्ज झाली. काफरांनी अग्निबाणांच्या[३१३D] प्रचंड वर्षावाने आणि तोफखान्याच्या जलद फैरी झाडून हल्ल्याला सुरुवात केली. या हल्ल्यामुळे मुसलमान सुलतानांचा धीर मात्र खचला नाही. यावर युद्धाची एकच धुमश्चक्री उडाली आणि दोन्ही पक्षांकडील अनेक माणसे ठार झाली. रामराजाने अपेक्षा केली होती एक पण प्रत्यक्षात त्याला आलेला अनुभव वेगळा होता. या परिस्थितीत तो आपल्या अंबारी-वरून खाली उतरला आणि हिऱ्यांनी मढविलेल्या एका भपकेबाज सिंहासनावर आरूढ झाला. हे सिंहासन किरमिजी रंगाच्या मखमली छत्राखाली मांडले होते आणि त्याला सोन्याची वेलबुट्टी करण्यात आलेली असून मोत्यांच्या झालरीने ते सुशोभित केलेले होते. रामराजाने आपल्या खजिनदाराला आपल्या सभोवार पैशाचे ढीग रचावयास सांगितले; अशा उद्देशाने की जे शिपाई सन्मानाला पात्र आहेत त्यांच्यावर बक्षिसांची खैरखैरात करावी. याच कारणासाठी त्याने आपल्यासमोर सोने आणि हिरे यांचे उंचीउंची अलंकार ठेवण्याचाही आपल्या खजिनदाराला हुकूम केला. आपल्या राजाच्या या दातृत्वामुळे काफर सैनिकांना जोष आला आणि त्यांनी मुसलमानी सैन्याच्या उजव्या आणि डाव्या फळीवर इतके जोरदार हल्ले चढविले की त्या दोन्ही आघाड्यांवर तात्पुरती का होईना गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली. अली आदिलशहा आणि इब्राहीम कुतुबशहा हे दोघेजण विजयासंबंधी निराश झाले आणि त्यांनी माघार घेण्याची तयारी करण्यास देखील सुरुवात केली. हुसेन निजामशहा मात्र आघाडीच्या मध्यभागी ठामपणे पाय देऊन उभा राहिला आणि त्याने इतक्या जोरदारपणे मुसंडी मारली की रामराजाच्या हाताखालील सेनाविभागात एकच गोंधळ माजला. यावर रामराजाचे वय जरी ७० वर्षांचे होते तरी तो परत आपल्या अंबारीत पुन्हा चढून बसला. परंतु हुसेन निजामशहाच्या सैन्यातील एक बेफाम हत्ती चाल करून येत आहे हे पाहिल्यावर अंबारी वाहून नेणाऱ्या भोई लोकांनी अंबारी लगोलग टाकून देऊन पळ [३] (१३०) काढला. यामधून सावध होऊन आणि घोड्यावर तो स्वार होण्याचे अगोदर मुसल-मानांच्या एका तुकडीने त्याला कैद केले आणि तोफखान्याचा प्रमुख छलबी रुमीखान याच्यापुढे त्याला नेले. रुमीखानाने रामराजाला हुसेन निजामशहासमोर हजर केले.

हुसेन निजामशहाने ताबडतोब त्याची गर्दन छाटण्याची आणि तो मेला आहे याची शत्रूला जाणीव व्हावी यासाठी त्याचे मुंडके एका लांब भाल्याच्या टोकावर ठेवून तो भाला उभा करण्याची आज्ञा केली. आपला प्रमुख रामराजा याचा अशा तऱ्हेने नाश झाल्याचे जेव्हा हिंदूंनी बघितले तेव्हा त्यांनी रणांगणातून अतिशय विकलावस्थेत पलायन केले. पुढारी गेल्यावर [३१४] पळून जाण्याची नाही तरी त्यांच्यात पद्धतच होती! मुसलमान सैनिकांनी त्यांचा सक्तपणे पाठलाग करून त्यांच्यापैकी इतक्या-जणांना कंठस्नान घातले की त्यांच्या रक्ताने नदीचा रंग तांबडा झाला. तज्ज्ञ इतिहास-कारांच्या अंदाजाप्रमाणे वर झालेल्या लढाईत आणि नंतरच्या पाठलागात जवळजवळ एक लाखाच्यावर काफर ठार मारले गेले. लढाईतील लूट इतकी प्रचंड होती की फौजेतील प्रत्येक सैनिकाला सोने, हिरे, तंबू, शस्त्रे, घोडे आणि गुलाम वगैरे मुबलक प्रमाणात प्राप्त झाली. मुसलमान सुलतानांनी आपल्या स्वतःसाठी फक्त हत्ती राखून ठेवले आणि इतरांना त्यांच्या हाती जे जे पडले ते ते ठेवण्याची परवानगी दिली. [३१५] लढाईत मिळालेल्या या अतिशय महत्त्वाच्या विजयाचे वृत्तान्त सुलतानांनी [२](१३१) आपल्या राज्यातील निरनिराळ्या प्रांतांकडे आणि शेजारील राज्यांकडे पत्राने लिहून कळविले. सुलतानांनी स्वतः लढाईनंतर काही काळाने रामराजाच्या मुलुखात अनागोंदी पर्यंत [३१६] चाल केली. आघाडीच्या सैनिकांनी विजयनगरापर्यंत शिरकाव केला. ते शहर त्यांनी लुटले. तेथील मुख्य इमारती त्यांनी भुईसपाट केल्या, आणि कल्पनातीत असे अत्याचार केले. याप्रमाणे सभोवतालचा मुलूख मुसलमान सुलतानांनी पूर्णपणे उद्ध्वस्त केला. रामराजाचा भाऊ वेंकटाद्री लढाईतून जीव बचावून दूरच्या किल्ल्यात पळून गेला होता. त्याने मुसलमान सुलतानांच्याकडे विनवणी करणारी याचना-पत्रे पाठविली, आणि आपला भाऊ रामराजा याने त्यांच्याकडून हिसकावून घेतलेली सर्व ठिकाणे त्यांना परत देण्याचे कबूल केले. विजयी सुलतानांचे यामुळे समाधान झाले. त्यांनी रायचूर येथे परस्परांचा निरोप घेतला आणि ते आपापल्या राज्यांकडे परतले. या लढाईनंतर विजयनगरच्या राज्याला त्याचे प्राचीन वैभव कधीच हस्तगत करता आले नाही. विजयनगर शहराचा इतका नाश करण्यात आला की आता ते पूर्णपणे बेचिराख आणि लोकवस्ती-विरहीत आहे. विजयनगर राज्याचा मुलूख त्याच्या मांडलिक प्रमुखांनी बळकावला असून प्रत्येकाने आपापल्या जिल्ह्यात स्वतंत्र सत्तेचे निशाण उभारले आहे

(१३२) या घटनेनंतर काही काळ लोटला आणि हुसेन निजामशहा मरण पावला. त्याच्या पाठीमागून त्याचा अल्पवयी मुलगा मुर्तजा हा गादीवर आला. आपल्या राज्याचा दक्षिणेच्या दिशेने विस्तार करावयाला ही योग्य अशी संधी आहे असा अली आदिलशहाने विचार केला. त्याने मोठे सैन्य घेऊन अनागोंदीकडे कूच केले. त्याचा उद्देश वेंकटाद्रीला काढून त्याच्या जागी रामराजाचा मुलगा तिमराज याला पेण-कोंड्याच्या गादीवर बसविण्याचा होता. असे केल्याने हळूहळू आपल्याला विजय-

नगरच्या मुलुखाचा काही भाग मिळवता येईल अशी त्याला आशा वाटली. आदिलशहाच्या या कारस्थानाची जेव्हा वेंकटाद्रीला खबर मिळाली तेव्हा त्याने मुर्तजा निजामशहा आणि त्याच्या वतीने राज्यकारभार चालविणारी त्याची आई खुनजा सुलताना या दोघांच्याकडे मदतीची याचना केली. विजापूरच्या सुलतानाचे [३] (१३२) चढाईखोर वर्तन खुनजा सुलताना हिला मानवले नाही. तिने मुल्ला इनायतउल्ला याच्या सल्ल्यानुसार आपल्या मुलाला बरोबर घेतले आणि मोठे सैन्य बरोबर घेऊन तिने विजापूरकडे कूच केले. परिणामी अली आदिलशहाला अनागोंदीमधून घाईघाईने माघार घेणे आणि आपल्या राजधानीच्या संरक्षणासाठी परतणे भाग पडले. तेथे त्याला राजधानीसमोर अहमदनगरच्या सैन्याने छावणी दिल्याचे आढळून आले. दोन्ही फौजांत अनेकवेळा चकमकी उडाल्या. सरतेशेवटी खुनजा सुलताना हिला असे दिसून आले की निष्कारण दोन्ही राज्यांत शत्रुत्व आणखी वाढवावे हे काही बरे नाही तर आपण आपल्या राज्याकडे मुलाला घेऊन परतावे हेच श्रेयस्कर आहे.

(१३३) पुढील वर्षी अहमदनगरच्या राजमातेच्या विनंतीवरून अली आदिलशहा हा अहमदनगरच्या सैन्याबरोबर वऱ्हाडात चाल करून गेला. त्यांनी वऱ्हाडचा प्रांत उद्ध्वस्त केला आणि पावसाळा सुरू होण्याच्या आत ते आपापल्या राजधान्यांकडे परत फिरले. त्या वर्षी विजापूर सभोवतालच्या दगडी भिंतीचे काम पूर्ण करण्यात आले. खुनजा सुलताना हिच्या नातेवाईकांनी केलेल्या गैरकारभारामुळे मुर्तजा निजामशहाच्या राज्यात एकच अस्वस्थता माजली होती! त्याचा फायदा घेऊन अली आदिलशहाने त्या राज्याचा काही प्रदेश आपल्या राज्याला जोडण्याची योजना आखली. हा आपला बेत सिद्धीस जाण्यास सुलभ जावे म्हणून त्याने कमाल किश्वरखान याला आसदखानाचे ध्वजचिन्ह दिले. त्यावर एका क्रोधाविष्ट सिंहाचे चित्र कोरण्यात आले होते. ९७५ हिजरी या वर्षाच्या सुरुवातीला त्याने किश्वरखानाला वीस हजार घोडेस्वार देऊन निजामशाही प्रदेशावर आक्रमण करण्यासाठी रवाना केले. किश्वरखानाने काही जिल्हे आपल्या ताब्यात घेतले. त्याला फारच थोडा प्रतिकार झाला. थोड्याच कालावधित वरील प्रदेशाच्या रक्षणार्थ त्याने एक किल्ला बांधला आणि त्याचे नाव धारूर असे ठेवले. या सुमारास मुर्तजा निजामशहा याने तारुण्यात पदार्पण केले होते. त्याने आपल्या आईकडून [३] (१३३) राज्याची सूत्रे हिसकावून घेतली आणि आपला गेलेला प्रदेश मिळविण्यासाठी कूच केले. यावर किश्वरखानाने किल्ल्यात आपल्याला कोंडून घेतले. किल्ल्यामध्ये त्याने सामानसुमान आणि रसद यांचा भरपूर पुरवठा करून ठेवला होता आणि प्रसंग आल्यास बराच काळपर्यंत वेढा सहन करण्याची तयारी त्याने केली होती. किश्वरखानाबद्दल अली आदिलशहाच्या मनात द्वेष असावा अथवा त्याचा विश्वासघात करण्याचे त्याच्या मनात असावे, किंवा मूर्खपणामुळे त्याने किश्वरखानाच्या मदतीसाठी अंकुसखान आणि इतर सरदार पाठविले होते. त्यांनी 'आपण अहमदनगरभोवतालचा मुलुख उद्ध्वस्त

हिजरी ९७५ )
इ. स. १५६७ )

करतो आणि तेथे जाळपोळ करतो म्हणजे शत्रूची मनःस्थिती द्विधा होऊन वेढ्यावरील त्याचे लक्ष उडेल ' असे सांगून ते किश्वरखानाला सोडून निघून गेले. त्यांच्या या डावपेचाचा मुर्तजा निजामशहावर यत्किंचितही परिणाम झाला नाही. त्याने किल्ल्याचा पाडाव केल्याखेरीज परत फिरावयाचे नाही अशी प्रतिज्ञा केली. धारूरला पोहोचल्यावर त्याने किल्ल्यावर योजना करून चाल करून जाण्याऐवजी किल्ल्यावर अचानक हल्ला चढविला. या हल्ल्यामध्ये आपल्याला जय मिळेल अशी त्याच्या सैनिकांना देखील खात्री नसताना विजयश्रीने त्याला माळ घातली. कारण किल्ल्याच्या संरक्षणाचे काम बघत असताना अचानक दैवयोगाने किश्वरखान हा बाण लागून ठार मारला गेला. आपल्या प्रमुखाचा अशारितीने मृत्यू झाल्याचे पाहून त्याचे सर्व सैनिक किल्ल्याच्या एका छोट्याशा दरवाजातून पळून गेले. किल्ला आणि अली आदिलशहाच्या सैन्याने त्याच्या ताब्यातून हिसकावून घेतलेले सर्व जिल्हे मुर्तजा निजामशहाच्या हाती पडले. यानंतर मुर्तजा निजामशहाने ताबडतोब आपले दोन अधिकारी ख्वाजा मिरख आणि पीरखान इस्फहानी यांना मोठे सैन्य देऊन अहमदनगरच्या दिशेने लुटालूट करण्याच्या उद्देशाने निघालेल्या विजापूरच्या ऐनउल्मुल्क या एका अधिकाऱ्याच्या पाठलागावर रवाना केले. निजामशहाच्या अधिकाऱ्यांनी त्याला गाठले. दोन्ही पक्षांत तुंबळ रणकंदन झाले. त्यामध्ये ऐनउल्मुल्क हा मारला गेला. त्याचा दुय्यम नूरखान याला कैद करण्यात आले. अली आदिलशहाचे उरलेले सैन्य मोठ्या मुष्कीलीने विजापूरकडे परतले. [३] (१३४)

(१३४) हिजरी ९७६ / इ. स. १५६८ — पुढील वर्षी युरोपियन लोकांच्या ताब्यातून गोवा परत मिळविण्यासाठी अली आदिलशहाने गोव्याकडे कूच केले. परंतु त्याचा उद्देश साध्य झाला नाही. त्याच्या सैनिकांची प्रचंड हानी झाली आणि अपयश पदरी घेऊन त्याला परत फिरावे लागले. [३१७०] त्यानंतर त्याने आदोनीच्या किल्ल्याविरुद्ध चाल केली. आतापर्यंत झालेल्या मुसलमानांच्या हल्ल्यांना या किल्ल्याने दाद दिली नव्हती. हा किल्ला आता मृत रामराजाच्या एका प्रमुख अधिकाऱ्याच्या ताब्यात होता. रामराजाचा मृत्यू झाल्यानंतर त्याने स्वातंत्र्य पुकारले होते अंकूसखानाबरोबर आठ हजार घोडेस्वार, पायदळांची एक तुकडी आणि मोठा तोफखाना देऊन हा किल्ला घेण्याच्या कामगिरीवर त्याची रवानगी करण्यात आली. किल्ल्यासमोरील उघड्या मैदानात दोन्ही पक्षांत अनेक चकमकी झाल्या. परंतु त्या निर्णायक झाल्या नाहीत. सरतेशेवटी वरील प्रमुखाने किल्ल्यामध्ये आपल्याला कोंडून घेतले. किल्ल्यामध्ये दाणागोटा आणि इतर सामुग्री यांचा भरपूर साठा होता. तरीदेखील अंकूसखानाने किल्ल्याला इतक्या नेटाने वेढा दिला की किल्लेदाराने त्याला शरणागती दिली. आदोनीचा किल्ला हा एका उंच डोंगराच्या माथ्यावर बांधलेला आहे. किल्ल्यावर अनेक तळी आणि स्फटिकासमान स्वच्छ आणि गोड पाण्याची कारंजी आहेत. त्याचप्रमाणे तेथे अनेक प्रासादतुल्य इमारती बांधलेल्या आहेत.

विजयनगरचे राजे ह्या किल्ल्याला अभेद्य मानीत, आणि आपल्या कुटुंबीय मंडळींना राहण्यासाठी एक सुरक्षित स्थान म्हणून त्यांनी तो किल्ला मजबूत करण्याचे मोठ्या कसोशीने प्रयत्न केले होते. या किल्ल्याला एकाच्या आत एक अशा अकरा भिंती बांधून मजबुती करण्यात आली होती. साहजिकच बळाच्या जोरावर हा किल्ला जिंकून घेणे अशक्य आहे असे वाटत असे. अंकूसखानाने अतिशय सक्त आणि बराच काळपर्यंत दिलेला वेढा हेच त्या किल्ल्याचे पाडावाचे एकमेव कारण [३] (१३५) असे म्हणावे लागेल.

(१३५) या किल्ल्याच्या पाडावामुळे अली आदिलशहाच्या लष्करी सामर्थ्या-बद्दल अधिकच दबदबा निर्माण झाला. त्याने आता अधिक प्रदेश जिंकून घेण्याचा निश्चय केला. ही योजना प्रत्यक्षात उतरविण्याचे अगोदर मुर्तजा निजामशहाबरोबर एकदा गाठभेट होणे जरुरीचे आहे असा त्याने विचार केला. अली आदिलशहाच्या विनंतीवरून मुर्तजा निजामशहा हा त्याला भेटण्यासाठी विजापूरच्या सरहद्दीवर येऊन दाखल झाला. या प्रसंगी असे ठरले की निजामशहाला वऱ्हाड जिंकून घेण्याची मुभा मिळावी आणि अली आदिलशहाला विजयनगरच्या राज्याचा मनचाहेल तितका मुलख जिंकून घेण्याची परवानगी असावी. या कामामध्ये मुर्तजा निजामशहाकडून कोणत्याही प्रकारचा हस्तक्षेप होऊ नये असाही निर्णय घेतला गेला. ३१८□ ३१९*

(१३६) हिजरी ९८१ } वरील योजनेनुसार हिजरी ९८१ या वर्षी अली इ. स. १५७३ } आदिलशहाने तुर्कुल या किल्ल्याविरुद्ध चाल केली. रामराजाने केलेल्या आक्रमणाचेवेळी हा किल्ला अली आदिलशहाचे हातातून गेला होता. रामराजाच्या मृत्यूनंतर हा किल्ला वेंकटी येसूराय या विजापूर सरकारच्या अधिकाऱ्याच्या हातात पडला होता. त्याने तो किल्ला स्वतःसाठी जबरदस्तीने बळकाविला होता. किल्ल्याचा वेढा सात महिने चालला होता. त्यानंतर कैदी म्हणून तो आदिलशहाच्या स्वाधीन झाला. अतिशय हालहाल करून येसूराय याला ठार करण्यात आले. यानंतर अली आदिलशहाने धारवाड जिंकण्याच्या उद्देशाने कूच केले. धारवाडचा किल्ला त्या काळी कर्नाटकात अतिशय मजबूत म्हणून समजला जाई. त्यावेळी हा किल्ला रामराजाच्या एका अधिकाऱ्याच्या ताब्यात होता. हा अधिकारी दर वर्षी जरी थोडीशी खंडणी येल्तमराज याला देत असे तरी तो अतिशय प्रबळ झाला होता. आदिलशहाने मुस्तफाखान अर्दिस्तानी याची आपला मुख्य वजीर म्हणून नेमणूक केली होती. त्याच्याच कर्तृत्वामुळे सहा महिन्याच्या वेढ्यानंतर किल्ल्याचा पाडाव झाला. किल्ल्याच्या सभोवतालच्या मुलुखात आपला अंमल पूर्णपणे बसविल्यानंतर अली आदिलशहाने आपल्या मुख्य वजिराच्या सांगण्यावरून बंकापूरवर आपल्या [३](१३६) सैन्यासहित चाल केली. बंकापूर हे ठिकाण वेलपाराय याचे मुख्य निवासस्थान होते. वेलपाराय हा मूळचा रामराजाच्या प्रमुख सेवकगणांपैकी होता. रामराजाच्या मृत्यू-नंतर त्याने आपले स्वातंत्र्य जाहीर केले व जेई, ३२०□ चंदरगुटी आणि कारूर येथील

रायांना आपले मांडलिकत्व स्वीकारण्यास नुकतेच भाग पाडले होते. विजापूरचे सैन्य चाल करून येत आहे हे पाहिल्यानंतर त्याने आपल्याला किल्ल्यात कोंडून घेतले.

त्यानंतर त्याने संधी मिळेल त्याप्रमाणे शत्रूला त्रास देण्यासाठी आणि शत्रूची रसद तोडण्याचा प्रयत्न करण्यासाठी आपल्या मुलाला एक हजार घोडेस्वार आणि दहा हजार पायदळ इतकी फौज देऊन आजूबाजूचे रान आणि खिंडीतील मार्ग यांचा ताबा घेण्यासाठी रवाना केले. त्याचवेळी त्याने रामराजाचा भाऊ वेंकटाद्री याला पत्र पाठवून असे कळविले की, " मी तुमचा पक्ष सोडून गेल्याबद्दल मला अतिशय पश्चात्ताप होत आहे. मुसलमानांविरुद्ध तुम्ही मला मदत करावी अशी माझी तुम्हाला विनंती आहे आपण मला मदत दिल्यास मी दरवर्षी आपल्याला खंडणी देईन आणि निष्ठेच्या मार्गापासून कधीही च्युत होणार नाही. " वेंकटाद्रीने उत्तरादाखल त्याला लिहिले की, " तुझ्या हलकटपणामुळे आणि तुझ्या दगाबाज वर्तनाची री ओढून आमच्या घराण्याच्या सर्व आश्रितांनी बंडखोरीचा मार्ग स्वीकारला आणि आपल्या कर्तव्य-निष्ठेपासून ते ढळले. तालिकोटच्या लढाईनंतर मुसलमान सुलतानांनी माझ्या ताब्यात पेणकोंडा आणि चंद्रगिरी ही दोनच ठिकाणे ठेवली. तुमच्या या अशा वर्तनामुळे जेमतेम मला माझे संरक्षण त्या ठिकाणाहून करणे जमत आहे. तेव्हा माझा तुला असा सल्ला आहे की द्रव्य अथवा हिरे देऊन मुसलमानांशी समझोता करणे जर शक्य असेल तर कोणत्याही अटीवर तू त्यांच्याबरोबर तह घडवून आणावास. हे करणे जर तुला अशक्य असेल तर माझा तुला असा सल्ला आहे की तू सर्व प्रयत्न करून आजूबाजूच्या राजेरजवाड्यांची मने तुझा पाठपुरावा करण्यासाठी वळव. [३] (१३७) मुसलमानांची रसद तोडून आणि रात्रीच्या वेळी त्यांच्यावर वारंवार हल्ले करून त्यांना सतविण्यासाठी, ' सैन्यासहित माझ्या मुलाला तुम्ही जाऊन मिळा,' असेही त्यांना लिही. ते याप्रमाणे वागतील यासाठी तू आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा कर. माझ्या-वतीने मी तुला असे वचन देतो की तुला मदत करण्याबद्दल मी माझ्या सर्व मांडलिकांना हुकूम देईन. अर्थात ते माझी आज्ञा मान्य करतीलच याची खात्री मात्र मी देऊ शकत नाही. "

(१३७) वेंकटाद्रीकडून आलेल्या या उत्तरामुळे वेलपाराय ह्याची मनःस्थिती अत्यंत उद्विग्न झाली. तरीदेखील वेंकटाद्रीने दिलेल्या सल्ल्याप्रमाणे त्याने अनेक प्रमुखांची मने आपल्या मुलाला जाऊन मिळण्याविषयी वळविली. त्याने शत्रुविरुद्ध इतकी जोरदार कारवाई केली की अली आदिलशहाच्या छावणीत धान्याचा तुटवडा पडला. दररोज रात्री दरोडेखोर आणि मारेकऱ्यांच्या टोळ्या सुलतानाच्या छावणीवर हल्ला करीत. या हल्ल्यांत त्याचे अनेक सैनिक बळी पडत. शत्रूकडील कर्नाटकी पाय-दळातील सैनिक हे आपल्या जीवाची यत्किंचितही पर्वा करीत नसत. [३२१८] त्यांच्या अंगावर जवळजवळ काहीच आच्छादन नसे आणि शत्रूकडून सहजगत्या आपण पकडले जाऊ नये म्हणून ते आपले शरीर तेलाने माखून घेत. अशी तयारी करून ते

रात्रीच्या वेळी तंबूमध्ये घुसत, आणि दयामाया न दाखविता निजलेल्या सैनिकांना भोसकून ठार मारीत. अशा तऱ्हेच्या घातकी मार्गाचा अवलंब करून प्रत्येक रात्री ते अनेकजणांना ठार मारीत. परिणामी सैनिकांत इतकी जरब बसली आणि इतका असंतोष पसरला की वेढा उठवून सुलतानाला परत फिरण्यास भाग पाडण्याच्या बेतात ते होते. अखेर दुष्काळाचे संकट दूर करण्यासाठी आणि रात्री होणाऱ्या खुनी हल्ल्यांचा प्रतिबंध करण्यासाठी मुस्तफाखानाने उपाययोजना केली. त्याने आपल्या सैन्यातील बर्गी प्रमुखांना सहा हजार घोडेस्वार देऊन रणांगणात शत्रूबरोबर लढा देण्यासाठी नियुक्त केले, आणि प्रत्येक रात्री छावणीच्या भोवती संरक्षणाची साखळी निर्माण करण्याच्या हेतूने आठ हजार पायदळी सैनिकांची योजना केली याप्रमाणे घेतलेल्या खबरदारीमुळे दरोडेखोर रात्रीच्या वेळी छावणीवर हल्ले करीनासे झाले. कारण एकदा त्यांनी छावणीत प्रवेश केल्यावर छावणीतून कसलाही प्रतिकार झाल्याशिवाय बाहेर पडणे त्यांना अशक्य होऊन गेले. बर्गी प्रमुखांनी त्यांच्यावर सोपविलेली कामगिरी इतक्या काटेकोरपणे पार पाडली की आजूबाजूच्या प्रदेशाबरोबर दळणवळण पुन्हा [३](१३८) खुले झाले आणि छावणीमध्ये पुन्हा सुबत्ता नांदू लागली. तरीदेखील वेढा एक वर्ष आणि तीन महिने चालू राहिला. अखेर किल्ल्यामधील शिबंदीचा धान्यपुरवठा कमी पडू लागला त्यातच वेलपारायचा मुलगा मरण पावला आणि त्याच्या मदतीला आलेले सर्व सरंजामदार हे आपापल्या जहागिरीकडे निघून गेले. आता वेलपाराय मदत मिळण्याबाबत पूर्ण निराश झाला आणि त्याने सुलतानाकडे असे कळविले की, "माझी बायकामाणसे आणि सामानसुमान यासहित तुम्ही मला जाऊ देत असाल तर किल्ला तुमच्या स्वाधीन करण्याची माझी तयारी आहे." ही विनंती योग्य आहे असे अली आदिलशहाला वाटून त्याने ती मान्य केली आणि अशा तऱ्हेने किल्ला खाली करण्यात आला. किल्ल्यावर असलेले एक अत्युत्कृष्ट देवालय उद्ध्वस्त करून टाकावे असा हुकूम सुलतानाने दिला. देवळाच्या पायावर एक मशीद बांधण्यात आली. मशिदीच्या बांधकामाचा पहिला दगड सुलतानाने स्वतः बसविला आणि मिळालेल्या विजयाबद्दल परमेश्वराची प्रार्थना केली. मुस्तफाखानाने दाखविलेल्या कर्तृत्वाबद्दल सुलतानाने त्याला खूप धन्यवाद दिले. एक उत्तम पोषाख देऊन सुलतानाने त्याचा सन्मान केला आणि जिंकलेल्या प्रदेशातील अनेक शहरे आणि जिल्हे त्याला जहागिरीदाखल दिले. अली आदिलशहाची वृत्ती सुखोपभोगात दंग होण्याची होती. त्याने राज्याच्या कारभाराची सर्व मुखत्यारी मुस्तफाखानाकडे सोपविली. त्याने आपला शिक्कादेखील त्याच्या स्वाधीन केला आणि त्याला अशी आज्ञा दिली की, "कोठलेही वैयक्तिक हुकूम घेण्याच्या भानगडीत न पडता तुझ्या मनाला येईल त्याप्रमाणे तू माझ्या शिक्क्याचा उपयोग कर."

(१३८) बंकापूरचा पाडाव झाल्याला चार महिने झाले. सुलतानाच्या अधिकाऱ्यांनी देशात शांतता प्रस्थापित केली. त्याचप्रमाणे निरनिराळ्या प्रमुखांनी

खंडणी देण्याचे कबूल केले. या घटनांनंतर आदिलशहाने आपले निवासस्थान किल्ल्यामध्ये नेले. तेथे तो आपला वेळ तऱ्हतऱ्हेच्या षोकात घालवू लागला. त्याने मुस्तफाखान याला जेर्ह आणि चंदरगुटी या किल्ल्यांचा पाडाव करण्यासाठी वीस हजार घोडेस्वार, खुपसे पायदळ आणि तोफखाना देऊन रवाना केले. मुस्तफाखान [३] (१३९) हा जेर्हच्या किल्ल्याजवळ येऊन पोहोचला. तेथील रायाने शरणागती दिली, आणि खंडणी देण्याचे कबूल केले. रायाच्या शरणागतीचा स्वीकार करण्यात आला. त्याला कोणत्याही तऱ्हेचे शासन न करता सैन्याने चंदरगुटीकडे कूच केले. तेथील रायाने प्रतिकाराची सिद्धता केली होती. मुस्तफाखानाने किल्ल्याला वेढा दिला आणि रायाच्या मदतीसाठी आलेल्या इतर राजेरजवाड्यांना प्रतिकार करण्यासाठी आपल्या बर्गी प्रमुखांना नियुक्त केले. वेढा चौदा महिने चालला. त्यानंतर हिजरी ९८३ या वर्षी किल्ल्यावर अचानक हल्ला करून त्याचा पाडाव करण्यात आला. किल्ल्याला भेट देण्यासाठी अली आदिलशहा बंकापूरहून आला. तेथे तीन महिने वास्तव्य केल्यानंतर विजयाच्या उन्मादात तो विजापूरला परतला. जवळजवळ तीन वर्षांपेक्षाही जास्त काळ अली आदिलशहा हा आपल्या राजधानीबाहेर होता. मुलखामध्ये स्थिरस्थावर करण्यासाठी मुस्तफाखान हा चंदरगुटी येथे राहिला. बादशाही सही-शिक्का त्याच्या ताब्यात ठेवण्यात आला. त्याचप्रमाणे सर्व खाते-प्रमुखांना असा आदेश देण्यात आला की, "विजापूरहून जे काही हुकूम तुम्हाला आणावयाचे असतील ते संमतीसाठी तुम्ही मुस्तफाखानाकडे सादर करावेत."

हिजरी ९८३ | इ. स. १५७५

(१३९) पुढील वर्षी मुस्तफाखानाने सुलतानाकडे एक अर्जी दाखल केली. त्यात त्याने असे कळविले होते की, "चंदरगुटीचा प्राचीन किल्ला हा एका उंच टेकडीवर बांधण्यात आला होता. हल्लीच्या मैदानावरील किल्ल्याशी तुलना करता प्राचीन किल्ल्याची संरक्षणक्षमता अधिक होती. माझी अशी इच्छा आहे की आपण यावे आणि जुन्या किल्ल्याची पाहणी करावी. जर का आपण मान्यता दिलीत तर जुन्या किल्ल्याला परत तटबंदी उभारता येईल." आपल्या वजिराच्या विनंतीनुसार अली आदिलशहा थोडी माणसे बरोबर घेऊन त्या ठिकाणी गेला. किल्ल्याच्या बांधकामाच्या ज्या योजना त्याच्यापुढे ठेवण्यात आल्या होत्या, त्यांना त्याने मान्यता दिली आणि किल्ला बांधण्याचा त्याने हुकूम दिला. एका वर्षाचे अवधित किल्ल्याचे बांधकाम पूर्ण झाले. किल्ल्याची पाहणी करण्यासाठी सुलतान विजापूराहून पुन्हा तेथे गेला. तेथे त्याला भेटण्यासाठी शंकर नाईक आला. त्याने त्याच्या देशात सुलतानाने दौरा करण्याबद्दल आमंत्रण दिले. अली आदिलशहाने या आमंत्रणाचा स्वीकार केला. त्याने आपले मुख्य सैन्य चंदरगुटी येथे ठेवले आणि मुस्तफाखान व चार ते [३] (१४०) पाच हजार सैनिक घेऊन त्याने कारूरच्या किल्ल्याच्या दिशेने कूच केले. हा किल्ला डोंगराळ भागात बांधलेला असून तेथे वनदाट जंगल आहे. तेथे जाण्याचा मार्ग इतका कठीण आहे की तेथील बहुतेक वाटांतून एका वेळी एकच घोडेस्वार जाऊ

शकत असे. अशा प्रदेशातून हिंडणे सुलतानाला न मानवल्यामुळे त्याने शंकर नाईकाच्या त्या देशावरील सत्तेला मान्यता दिली आणि तो चंदरगुटीला परत आला. परंतु सुलतानाच्या तथाकथित औदार्याला गुणवत्तेचा मुलामा देण्याच्या हेतूने मुस्तफाखानाने शंकर नाईकाला असे सांगितले की, "हा प्रदेश जिंकून घेण्याच्या उद्देशापासून मी मोठ्या मिनतवारीने सुलतानाला परावृत्त केले आहे. जर का तुला तुझ्या सुरक्षिततेची पर्वा असेल तर तू स्वतः खंडणी देण्यास कबूल हो आणि आजूबाजूच्या राजेरजवाड्यांचे मन तसेच करण्याबद्दल वळव." शंकर नाईकाने जेर्हेचा किल्लेदार शिवा नाईक, बार्सीलोरची महाराणी आणि इतर अनेक प्रमुख यांची मने सुलतानाची भेट घेण्याबाबत वळविली. त्याप्रमाणे त्यांनी सुलतानाला मोठमोठ्या रकमेचे नजराणे भेटीदाखल दिले आणि वार्षिक खंडणी देण्याचे कबूल केले. ज्या दिवशी या प्रमुखांना सुलतानाकडून मानाचे पोषाख मिळाले त्याच दिवशी हरदेवी, बार्सीलोरची राणी भारदेवी आणि दुसरी एक राणी यांच्यासाठी स्त्रियांना साजेलसा सरंजाम बनविण्यात आला. त्यांनी तो स्वीकारण्याचे नाकारून असे कळविले की, "जरी आम्ही स्त्रिया असलो [३२२a] तरी आम्ही आमची राज्ये आमच्या कणखर मनोवृत्तीच्या जोरावरच टिकविली आहेत." त्यावर सुलतानाने त्यांना पुरुषांचे पोषाख पाठविले आणि त्यांनी दाखविलेल्या उत्कृष्ट मनोधैर्याबद्दल त्यांची वाखाणणी केली. ह्या देशांवर बराच काळपर्यंत बायकांनी राज्य केले. राज्यांवर नेहमीच मुली अधिकारग्रहण करीत असत आणि त्यांच्या हाताखाली पुरुष अधिकारी म्हणून नोकऱ्या करीत. राण्यांच्या नवऱ्यांना राज्यात कोणतीही सत्ता नाही. [३] (१४१)

(१४०) नवीन जिंकून घेतलेल्या प्रदेशात अली आदिलशहाने स्थिरस्थावर केल्यानंतर वसुलावर देखरेख करण्यासाठी त्याने एका ब्राह्मणाची नेमणूक केली. त्या सर्व प्रदेशाचा सेनाप्रमुख म्हणून त्याने मुस्तफाखान यास ठेवले. वकिलाच्या जागेवर त्याने अफझलखान सिराजी याची नेमणूक केली. यानंतर तो विजापूरला परतला. मुस्तफाखान हा सुलतानाचा एकनिष्ठ सेवक होता. आपल्या सुलतानाची सत्ता वाढविण्याविषयी तो उत्सुक असे. काही काळानंतरच त्याने आपल्या एका विश्वासू मित्राला दरबाराकडे पाठविले आणि पेणकोंड्याविरुद्ध चाल करून जाण्याची योजना त्याच्याकरवी सुलतानापुढे सादर केली. अली आदिलशहाने या सूचनेचा स्वीकार केला. त्याने आपल्या सैन्याला एकत्र येण्याचा हुकूम दिला आणि आदोनीकडे त्याने कूच केले. तेथून मुस्तफाखानाच्या सैन्याचा कर्नाटकच्या फौजेशी मिलाफ झाल्यावर तो पेणकोंड्यांच्या दिशेने चाल करून गेला. आदिलशहा कूच करून आल्याचे पाहताच वेंकटाद्रीने पेणकोंड्याचे रक्षण करण्याचे काम आपल्या एका सरदाराकडे सोपविले आणि आपला खजिना व इतर सामानसुमान घेऊन त्याने चंदरगुटी किल्ल्याचा आश्रय घेतला. सुलतानाने शहराला वेढा दिला आणि तीन महिनेपर्यंत शहराची पूर्णपणे नाकेबंदी केली. ह्या वेळेपर्यंत शहरातील शिबंदी रसदीच्या अभावी शरण जाण्याचा अगदी बेतात होती.

तेव्हा वेंकटाद्रीने बर्गीचा प्रमुख हंदीयातम नाईक याला चोवीस लाख रुपये आणि पाच हत्ती लाच म्हणून दिले. " तू आपल्या अनुयायांसहित सुलतानाचा पक्ष सोडून ये आणि त्याच्या छावणीला जेरीस आण " असे त्याने त्याला सांगितले. त्याने ही कामगिरी इतक्या परिणामकारकरित्या पार पाडली की अली आदिलशहाला वेढा उठवून बंकापूरच्या परिसरात माघार घेणे भाग पडले. तेथून काही काळानंतर त्याने विजापूर-कडे कूच केले आणि सरहद्दीचे रक्षण करण्याचे काम मुस्तफाखानावर सोपविले.

( १४१ ) हिजरी ९८६ इ. स. १५७८ } हिजरी ९८६ या वर्षी विजयनगरच्या आजू-बाजूच्या आपल्या जहागिरीमध्ये बर्गी लोकांनी जुलमाचा कहर केला तेव्हा सुलतानाने तीन हजार परदेशी धनुर्धर आणि अनेक दक्षिणी व हबशी सैनिक देऊन मुर्तजाखान अंजू याला त्यांच्याविरुद्ध पाठविले [ २ ] ( १४२ ) बर्गीबरोबर जवळजवळ १ वर्ष त्यांच्या चकमकी झाल्या. परंतु त्यांचा बर्गीच्या सामर्थ्यावर यत्किंचितही परिणाम झाला नाही. यावर मुस्तफाखानाने सुलतानाला असे सांगितले की, " बर्गीच्यावर सैन्य पाठविण्यात काहीही अर्थ नाही. अशीच एखादी युक्ती योजून विजापूरला येण्याविषयी त्यांचे मन वळवावे. तेथे त्यांनी केलेल्या विश्वासघातकी वर्तणुकीला साजेल असे शासन मी त्यांना देऊ शकेन." अली आदिलशहाला हा सल्ला पटला आणि त्याने येसू पंडित आणि बर्गी लोकांचे दरबारातील इतर स्नेही यांची बर्गी लोकांना विजापूरला येण्याचे आमंत्रण देण्यासाठी रवानगी केली. हंदीयातम नाईक याने बर्गी लोकांना असे सांगितले की, " आपण केलेल्या विश्वास-घातामुळे पेणकोंडा जिंकून घेण्याचे कामी आलेली निराशा अली आदिलशहा विसरेल हे मला तरी शक्य वाटत नाही. " त्याने असेही सांगितले की, " तुम्हाला दरबारात येण्याचे आलेले आमंत्रण हे तुमचा नाश करण्यासाठी योजलेली एक क्लृप्ती आहे. " त्याच्या या सांगण्याचा बर्गीच्यावर काहीही परिणाम झाला नाही. बहुतेक बर्गी प्रमुख आणि त्यांचे अनुयायी हे विजापूरला परत गेले. हंदीयातम नाईक हा पेणकोंड्याला गेला आणि तेथे त्याने वेंकटाद्रीची चाकरी पत्करली. काही काळपर्यंत सुलतानाने बर्गीच्यावर कृपादृष्टी ठेवली. परंतु सरतेशेवटी त्याने त्या सर्वांना ठार मारले.

( १४१ अ ) हिजरी ९८७ इ. स. १५७९ } अली आदिलशहाला मुलगा नव्हता. त्यामुळे हिजरी ९८७ यावर्षी आपला भाऊ शहा तहमास्प याचा मुलगा म्हणजे त्याचा स्वतःचा पुतण्या इब्राहीम याला आपला वारस म्हणून नेमले. त्याच्या पुढल्याच वर्षी अली आदिलशहाच्या एका खोजाने त्याचा खून केला. या खोजाला आदिलशहाने त्याच्या मनाविरुद्ध अहमदाबाद बिदर येथून विजापूरच्या दरबारात येण्यास भाग पाडले होते. ३२३०

( १४२ ) अली आदिलशहाचे विजापूर शहरात दफन करण्यात [ ३ ] (१४३) आले. त्याच्या कबरीला रोजा अली असे नाव असून अजूनही ती अस्तित्वात आहे. त्याच्या कारकिर्दीत दिल्लीच्या अकबर बादशहाकडून दोन वेळा त्याच्या दरबारात

वकील आले. अली आदिलशहाचा खून झाला तेव्हा दुसरा वकील हा विजापूर शहरातच होता. अली आदिलशहाच्या हुकुमावरून जुम्मा मशीद, हौज-इ-शापूर, विजापूर शहराभोवतालची भिंत आणि विजापूर शहरात रस्तोरस्ती पाणी वाहून नेणारे कालवे बांधण्यात आले.[३२४]

## इब्राहीम आदिलशहा दुसरा [३](१४४)

(१४३) इब्राहीम आदिलशहा जेव्हा तक्तावर आला तेव्हा त्याचे वय ९ वर्षांचे होते. त्यामुळे राज्याचा सर्व कारभार कामीलखान दक्कनी हा पाहू लागला. अली आदिलशहाची पत्नी महाराणी चांदबिबी हिच्यावर राजपुत्राच्या शिक्षणाचे काम सोपविण्यात आले. बुधवार आणि शुक्रवार सोडून इतर प्रत्येक दिवशी इब्राहीम याला दरबारातील सिंहासनावर बसविण्यात येत असे, आणि त्याच्या समक्ष राज्यकारभाराच्या बाबी निकालात काढल्या जात. काही काळपर्यंत आपल्या उच्चाधिकार पदाला स्मरून कामीलखान हा संयमाने वागला. परंतु कालान्तराने सत्तेच्या मदाने धुंद होऊन त्याने चांदबिबीच्या संबंधात अपमानकारक वागणूक करण्याचा अपराध [३] (१४५) केला. चांदबिबीने त्याचा नाश कसा करता येईल याचा विचार सुरू केला. तिने त्यासाठी हाजी किश्वरखान नावाच्या उच्चपदस्थ अधिकाऱ्याकडे गुप्तपणे पुढीलप्रमाणे निरोप पाठविला. "कामीलखान हा राजप्रतिनिधीचे काम करण्यास नालायक आहे. त्याला दूर करण्याची आणि ती जागा तुमच्यावर सोपविण्याची माझी इच्छा आहे." आपल्याला अशा तऱ्हेने एकदम बढती मिळणार या आशेने मोहीत होऊन हाजी किश्वरखानाने इतर अनेक सरदारांच्या साहाय्याने कामीलखानाला पकडण्याचा कट रचला. एके दिवशी संध्याकाळी कामीलखान हिरव्या राजवाड्यात दरबारी हजेरी घेत असताना किश्वरखानाने अचानक चारशे सशस्त्र माणसांनिशी किल्ल्यात प्रवेश केला, किल्ल्याचे दरवाजे बंद केले, शिबंदीच्या अधिकाऱ्यांना बंदिस्त केले आणि कामीलखानाला पकडण्यासाठी त्याने पुढे चाल केली. त्यामुळे भयभीत होऊन कामीलखानाने चांदबिबीकडून आपल्याला संरक्षण मिळेल या आशेने जनानखान्याकडे पळ काढण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याच्याबद्दल सदिच्छा बाळगून असलेल्या काही खोज्यांनी ह्या कटाची सूत्रधार चांदबिबीच आहे असे त्याला सांगितले. या बातमीने गोंधळून जाऊन त्याने राजवाड्याबाहेर पळ काढला, आणि पळून जाण्याचा एकमेव मार्ग म्हणून त्याने किल्ल्याच्या भिंतीवरून पलीकडील पाण्याने भरलेल्या अशा खंदकात उडी टाकली. तो खंदक तो पोहून गेला आणि शहराच्या इमाम दरवाजापाशी कोणाच्याही दृष्टीस न पडता पोहोचला. हा दरवाजा बंद होता. परंतु आपल्या फेट्याचा पट्टा आणि इतर कपडे यांच्या सहाय्याने त्याने एक दोरी तयार केली आणि शहराच्या भिंतीच्या एका बुरुजाला बांधली. तेथून तो खाली उतरला आणि नजिकच असलेल्या आपल्या घराकडे झपाट्याने गेला. तेथे त्याने आपल्या मित्रांसह पळून जाण्याची

तयारी केली. कामीलखान हा सापडत नाही असे पाहून हाजी किश्वरखान याला असे वाटले की तो अजून किल्ल्यातच आहे आणि म्हणून त्याने जवळजवळ एक तासभर तेथील इमारती आणि लपता येतील अशा जागा शोधण्यात घालविला. त्यानंतर त्याने तो किल्ल्याबाहेर गेला असेल या समजुतीने, त्याला धरून आणण्यासाठी सैनिकांची एक तुकडी पाठविली. कामीलखानाने त्याला जो थोडा अवधी मिळाला त्या दरम्यान घेता येतील तितके हिरे आणि द्रव्य आपल्याबरोबर घेतले आणि सात-आठ अनुचर बरोबर घेऊन अहमदनगरकडे पलायन केले. परंतु तो चारपाच मैल दूर गेला [ ३ ] ( १४६ ) असेल नसेल तोच किश्वरखानाच्या माणसांनी त्याला गाठून पकडले, आणि त्याचे मस्तक धडावेगळे करून ते किश्वरखानापाशी आणले. परंतु त्याच्यापासून हिसकावून घेतलेले हिरे आणि इतर संपत्ती ही मात्र त्यांनी दडपली.

( १४४ ) हाजी किश्वरखान याने कामीलखानाचेच अनुकरण केले. चांदबिबीचा जो आधार त्याला मिळाला होता त्याच्या सहाय्याने त्याने राज्याची सर्व सत्ता बळकावली आणि अनियंत्रित पद्धतीने राज्यकारभार करण्यास सुरुवात केली. ह्यावेळी मुर्तजा निजामशहाचा **मीर नोबत** बेहजाद उल्मुल्क तुर्क याने अहमदनगरहून पंधरा हजार घोडेस्वार विजापूरच्या काही जिल्ह्यांचा पाडाव करण्याच्या हेतूने कूच केले. यावर आपल्या सरहद्दीपाशी आलेल्या शत्रूची हकालपट्टी करण्यासाठी किश्वरखानाने ऐनउल्मुल्क गिलानी याला सैन्य देऊन रवाना केले. बेहजादउल्मुल्क याचा शहादुर्गजवळ पूर्णपणे पराभव झाला आणि त्याचे छावणीचे सामान, तंबू, हत्ती, आणि तोफखाना ही विजापूरच्या सैन्याच्या हातात पडली. विजयाच्या घोषणा करीत विजापूरचे सैन्य राजधानीला पोहोचले. चांदबिबीच्या सल्ल्यावरून किश्वरखानाने तीन दिवसपर्यंत मिळालेल्या विजयानिमित्त आनंदोत्सव करण्याचा हुकूम दिला आणि वरील मोहिमेत ज्या अधिकाऱ्यांनी शौर्याची कामगिरी बजावली होती त्यांना भारी भारी नजराणे आणि मानाचे किताब बहाल केले. परंतु काही काळ गेल्यानंतर वरील लढाईत पाडाव करण्यात आलेले हत्ती सुलतानाकडे देण्यात यावे असा हुकूम आपण काढला तर तो योग्य आहे असा विचार त्याने केला. त्यामुळे अनेक अमीर-उमरावांना आपला अपमान झाला आहे असे वाटले. त्यांनी वरील हुकुमाची तामिली करण्याचे नाकबूल केले. एवढेच नव्हे तर प्रतिनिधी पदावरून किश्वरखानाला काढून टाकण्यासाठी गुप्तपणे ते संघटित झाले. काहींनी असा विचार मांडला की आपण चांदबिबीला एक पत्र पाठवावे आणि, "आपण राज्याच्या कारभाराची धुरा अंगावर घेण्यासाठी बंकापूर येथून मुस्तफाखानाला बोलावून घ्यावे," अशी शिफारस तिला करावी, [३] (१४७) तर काहींनी असे मत प्रदर्शित केले की तूर्त कोणतीही उपाययोजना करण्याचे काम पुढे ढकलावे. कारण बेहजादउल्मुल्क याच्या पराभवाचा सूड घेण्यासाठी वऱ्हाडचा सुभेदार सय्यद मुर्तजा हा अहमदनगरहून चाल करून निघाला आहे. त्यामुळे शत्रूला सरहद्दीपासून हाकलून दिल्याखेरीज मंत्रिमंडळामध्ये कोणत्याही तऱ्हेचा बदल करणे हे शहाण-

पणाचे ठरणार नाही. परंतु तो उद्देश साध्य झाल्यावर आपण सर्वांनी जणूकाही सर्व गोष्टींचा तिटकारा आला आहे असे दाखवून विजयनगरकडे निघून जावे आणि तेथून चांदबिबीशी संगनमत करून आपला उद्देश सफल होण्यासाठी उपाययोजना करावी.

( १४५ ) किश्वरखानाला या बेताची बातमी लागली तेव्हा त्याने त्याचा प्रतिकार करण्यासाठी उपाययोजना केली. त्याने शाही शिक्क्याचा एक हुकूम बंकापूर-नजिकचा एक जहागिरदार मीर नुरुद्दीन ह्याला पाठवून त्याला कळविले की, "तू मुस्तफाखानाचा खून कर. तसे केल्यास मुस्तफाखानाची जहागीर आणि त्याला असलेले मानाचे किताब हे तुला देण्याचे मी वचन देतो." नुरुद्दीन हा जरी मुस्तफाखानाचा आश्रित होता आणि त्याला त्याच्या सद्यःस्थितिप्रत आणण्यात मुस्तफाखानच कारणीभूत होता तरी ही नीच कामगिरी पार पाडण्याचे काम त्याने अंगावर घेतले. त्याने शाही हुकूम घेऊन आलेल्या दूताला किल्ल्यामध्ये पाठविले, आणि त्याचवेळी महमद अमीन नावाच्या इसमाबरोबर शिबंदीच्या मुख्य अधिकाऱ्यांकडे गुप्तपणे निरोप पाठविला की, "तुम्हा सर्वांना ठार मारण्याचा आणि किल्ला कर्नाटकच्या राजाच्या स्वाधीन करण्याचा मुस्तफाखानाचा विचार आहे. आपल्या सुलतानाची सत्ता झुगारून लावण्यासाठी त्याने कर्नाटकच्या राजाबरोबर एक कारस्थान केले आहे म्हणून हा निरोप घेऊन येणारा महमद अमीन याच्याबरोबर दिलेल्या खलित्यातील हुकुमाची अंमलबजावणी करून आणि तुमचा विश्वासघातकी सुभेदार मुस्तफाखान याला ठार मारून तुम्ही तुमचे कर्तव्य पार पाडावे. या कामगिरीबद्दल तुम्हाला सुलतानाकडून भरपूर बक्षिशी दिली जाईल." बंकापूरच्या वेशीपाशी येऊन पोहोचल्यावर, "मी [३] (१४८) सुलतानाकडून एक खलिता घेऊन आलो आहे," असा निरोप महमद अमीन याने मुस्तफाखानाकडे पाठविला. यावर मोठ्या मानमरातबाने त्याला शहरात घेण्यात आले, आणि त्याच्या राहण्याची सोय करण्याचा मुस्तफाखानाने हुकूम दिला. आता रात्र बरीच झाली आहे तेव्हा सुलतानाकडून मी आणलेला हुकूम उद्या सकाळी दाखविण्याची मला परवानगी देण्यात यावी अशी इच्छा महमद अमीन याने प्रकट केली. यात काही दगा असेल असा मुस्ताफाखानाला यत्किंचितही संशय आला नाही आणि त्यामुळे त्याने सुलतानाचा हुकूम पाळण्यास जो विलंब होणार होता त्याची दखल घेतली नाही. त्या रात्री महमद अमीन याने शिबंदीच्या अधिकाऱ्यांना वरील खलिता दाखविला. मुस्ताफाखानाला ठार मारण्यात यावे, अशा तऱ्हेचा सुलतानाचा हुकूम पाहिल्यावर त्यांनी त्या हुकमाची अंमलबजावणी करण्याचे कबूल केले. त्यानुसार दुसऱ्या दिवशी सकाळी मुस्तफाखान हा नमाज पढत असताना शिबंदीचे अनेक अधिकारी त्याच्यावर धावून गेले आणि धनुष्याच्या दोरीचा गळफास लावून त्यांनी त्याला ठार मारले.

( १४६ ) ह्या घडामोडींची बातमी जेव्हा विजापूर येथे पोहोचली तेव्हा चांदबिबी ही अतिशय संतप्त झाली आणि तिने अतिशय कडक शब्दात किश्वरखानाच्या

वर्तनाबद्दल आपली नापसंती व्यक्त केली. किश्वरखानाने आपल्या मनात चांदबिबी-बद्दल वाटत असलेला तिरस्कार त्यावेळी प्रकट केला नाही. परंतु थोड्याच अवधित त्याने तिच्यावर तिचा भाऊ मुर्तजा निजामशहा याला विजापूरवर स्वारी करण्यासाठी गुप्तपणे उद्युक्त केल्याचा आरोप केला. त्याने काही काळपर्यंत साताऱ्याच्या किल्ल्यात तिला बंदिस्त ठेवण्याबद्दलचा हुकूम सुलतानाकडून मिळविला. वरील हुकुमाप्रमाणे जनानखान्यातून तिला जबरीने बाहेर काढण्यात आले. तिची अनेक प्रकारे बेइज्जत करण्यात आली आणि कैदी म्हणून तिला साताऱ्याकडे रवाना करण्यात आले. याप्रमाणे कारवाई केल्यानंतर किश्वरखान हा निश्चिंत झाला, आणि त्याने कोणत्याही तऱ्हेचा संयम न बाळगता राज्याचा कारभार करण्यास सुरुवात केली. मिया बुद्दू दक्कनी या अधिकाऱ्याच्या एकनिष्ठेबद्दल त्याला अतिशय विश्वास होता. त्याला त्याने सीमेवरील सेनेचे अधिकार दिले आणि सैन्यातील बहुतेक हबशी अधिकाऱ्यांना दगाबाजी करून पकडण्याचा आणि शहादुर्गच्या किल्ल्यात बंदिस्त करण्याचा हुकूम दिला. हा बेत वरील हबशी अधिकाऱ्यांच्या नजरेस आला. तेव्हा त्यांनी प्रथम [ ३ ] ( १४९ ) मिया बुद्दू याला पकडण्याचा आणि नंतर किश्वरखानाला काढून टाकण्याचा निश्चय केला. या हेतूने हबशी सरदारांचा प्रमुख इखलासखान याने विजापूरहून राजपुत्राचा जन्म झाल्याची बातमी आपल्याला कळली आहे असे भासवून एका मोठ्या समारंभाचा थाट उडवून दिला. या समारंभाला त्याने मिया बुद्दू याला आमंत्रण दिले. इखलासखानाच्या बेताविषयी संशय न आल्याने काही थोड्या मित्रमंडळींना घेऊन मिया बुद्दू हा इखलासखानाच्या तंबूत गेला. त्याने ज्या युक्तीचा अवलंब करून इखलासखानाला पकडण्याचे ठरविले होते तशाच युक्तीने इखलासखानाने मिया बुद्दू याला कैद केले. त्याच दिवशी इखलासखानाने इतर सर्व अधिकारी आणि सैन्य यासहित विजापूरच्या दिशेने कूच केले. वाटेवर ऐनउल्मुल्क आणि अंकुसखान हे सरदार आणि सैन्यात असलेली किश्वरखानाची स्नेही मंडळी ही सैन्याला सोडून आपापल्या जहागिरीकडे निघून गेली.

( १४७ ) आपल्या विरुद्ध झालेल्या या युतीची बातमी किश्वरखानाच्या कानावर आली तेव्हा त्याने प्रतिकार करण्याचा सर्व विचार सोडून दिला. परंतु आपली इज्जत टिकून राहावी आणि शहराच्या रहिवाशांनी आपल्याला बंदिस्त करू नये यासाठी त्याने सुलतानाला आपल्या स्वतःच्या घरी मेजवानीला येण्याचे आमंत्रण दिले. परंतु रस्त्यातून तो सुलतानाबरोबर जात असताना सर्वसामान्य नागरिकांनी आणि स्त्रियांनी देखील त्याला मोठमोठ्याने शिविगाळ केली आणि सय्यदांचा ३२५८ खुनी आणि चांदबिबीला कैद करणारा वगैरे शब्दांनी त्याला संबोधले. आपल्याविरुद्ध लोकांची मने खवळलेली आहेत हे जेव्हा किश्वरखानाला दिसून आले तेव्हा आता आपण पळून जाण्याची तयारी करणे योग्य असा त्याने विचार केला. विजापूरचे सैन्य जेव्हा शहरापासून एक दिवसाच्या टप्प्यावर आले असल्याची बातमी

त्याला कळली तेव्हा कुलबाग नावाच्या एका शाही बागेत शिकारीच्या मिषाने आपल्याबरोबर येण्यासाठी त्याने सुलतानाचे मन वळविले. तेथे गेल्यावर [३] (१५०) सुलतानाच्या तब्येतीवर उष्ण हवेचा दुष्परिणाम होईल अशी त्याने भीती प्रकट केली आणि सुलतानाने राजवाड्याकडे निघून जावे याबद्दल त्याची याचना केली. "शहापूर येथील बागांचे निरीक्षण केल्याबरोबर मी आपल्या पाठोपाठ येतो," असे त्याने सुलतानाला वचन दिले. त्याच्या विनंतीनुसार सुलतान राजवाड्याकडे परतला. किश्वरखानाबरोबर चारशे घोडेस्वारांची तुकडी होती. त्यांच्यामध्ये त्याने आपल्याजवळील हिरे आणि द्रव्य वाटून टाकले होते. त्याच्या बायका आणि मुले शहरात पाठीमागे राहिली होती. अशा परिस्थितीत त्याने अहमदनगरचा रस्ता धरला. तेथे गेल्यावर त्याला असे आढळून आले की अहमदनगरचा दरबार त्याला संरक्षण देऊ इच्छित नाही. यावर तो कुतुबशहाची राजधानी गोवळकोंडा इकडे गेला. तेथे गेल्यावर काही काळाने मुस्तफाखानाच्या एका नातेवाइकाने मुस्तफाखानाबरोबर दगाबाजी केल्याचा सूड म्हणून त्याचा खून केला.

(१४८) इकडे हबशी सरदारांनी कोणताही प्रतिकार न होता विजापूरात प्रवेश केला. तेथे त्यांचा सुलतानाने मानाचा पोषाख आणि इतर प्रशंसात्मक मानचिन्हे देऊन सत्कार केला. इखलासखानाने राज्यप्रतिनिधीपद आपल्याकडे घेतले. चांदबिबीला सातान्याच्या कैदेतून मुक्त करून राजधानीला आणण्यात आले, आणि तरुण सुलतानाची देखभाल करण्याची कामगिरी पुन्हा तिच्यावर सोपविण्यात आली. तिच्या विनंतीवरून अफजलखान शिराजी याची **पेशवा**[३२६ब] म्हणून आणि येसू पंडीत याची **मुस्तफी** म्हणून नेमणूक करण्यात आली. परंतु नवीन राजप्रतिनिधीने हे दोघेजण आपल्या हितसंबंधाविरुद्ध चांदबिबीशी संगनमत करून कट करण्याच्या बेतात आहेत अशा संशयावरून काही काळानंतर त्यांना ठार मारले. त्याने अनेक [३] (१५१) उच्च पदस्थ अधिकाऱ्यांना विजापूरमधून हाकलून दिले आणि हमीदखान आणि दिलावरखान यांच्याशी संगनमत करून मन चाहेल त्याप्रमाणे राज्यकारभार करण्यास त्याने सुरुवात केली. त्याने ऐनउल्मुल्क याला त्याच्या जहागिरीवरून दरबारात येण्याचे आमंत्रण दिले. तो शहराजवळ येऊन पोहोचल्यावर त्याच्याबद्दल आदर दाखविण्यासाठी आपल्या दोन सहकाऱ्यांसमवेत तो त्याला भेटावयास गेला. आपल्याबरोबर अगदी थोडे सेवक घेऊन ते तिघेजण आपल्याला भेटण्यास येत आहेत हे जेव्हा ऐनउल्मुल्क याने पाहिले तेव्हा त्याने विश्वासघाताने त्यांना पकडले आणि त्यांच्या अंगावर जडजड साखळदंड चढविले. दुसऱ्या दिवशी सकाळी राज्याची सूत्रे ताब्यात घेण्यासाठी आपल्या कैद्यांना हत्तीवर घालून शहरात प्रवेश करण्याची त्याने तयारी केली. त्याने जेव्हा शहरात प्रवेश केला तेव्हा त्याला असे आढळून आले की शिबंदीने किल्ल्याचे दरवाजे बंद केले आहेत आणि त्याला प्रतिकार करण्याच्या तयारीत ते आहेत. यावर त्याने आपल्या ताब्यातील कैद्यांना बरोबर न घेताच

झपास्याने माघार घेतली आणि तो आपल्या जहागिरीकडे चालता झाला. इखलासखान आणि त्याचे सहकारी यांची अशा तऱ्हेने अनपेक्षितरित्या सुटका झाली. त्यांनी राज्याची सूत्रे परत आपल्याकडे घेतली परंतु दरबारातील काही अमीरउमरावांनी त्यांना विरोध केल्यामुळे विजापुरात अतिशय अंदाधुंदीची परिस्थिती माजली. परिणामी राज्याच्या शत्रूंना राज्यावर आक्रमण करण्यास यामुळे चेतावणी दिली गेली.

(१४९) यापूर्वी सांगितल्याप्रमाणे अहमदनगरचा सेनापती बेहजाद उल्मुल्क याने आपल्या पराभवानंतर माघार घेतली होती. तो आता वऱ्हाडचा अमीर उलउमरा सय्यद मुर्तजा याच्यासह पुन्हा चाल करून आला. महमद कुली कुतुबशहा याने देखील मुर्तजा निजामशहा याजबरोबर दोस्तीचा करार केला त्याने गोवळकोंड्याहून कूच केले आणि तो त्याच्या सेनापतींना शहादुर्गच्यासमोर येऊन मिळाला. या ठिकाणाला दोस्तांच्या सैन्याने सख्त वेढा दिला. विजापूरमध्ये अंदाधुंदीची परिस्थिती आहे याचा परिणाम आपल्यावर होऊ न देता शहादुर्गच्या सुभेदाराने मोठ्या शौर्याने शत्रूचा प्रतिकार केला आणि बेइमानी करून किल्ला स्वाधीन करण्यासाठी त्याचा फायदा करून देणाऱ्या उत्कृष्ट संधीकडे त्याने पाठ फिरविली. त्याने असे उद्गार काढले की, "माझ्या मानाला मी कधीच वेशीवर टांगणार नाही. माझ्या मानाचा [३] (१५२) परिहार झाल्यास जगातील दुसरी कोणतीही गोष्ट ती भरून काढण्यास असमर्थ ठरेल कारण माझ्या मानाबरोबरच जगामध्ये माझ्या चांगल्या नावाला देखील मला तिलांजली द्यावी लागेल." शहादुर्ग घेण्याचे आपले सर्व प्रयत्न निष्फळ झाल्याचे जेव्हा दोस्तांना दिसून आले तेव्हा त्यांनी वेढा उठवून विजापूरविरुद्ध चाल करून जाण्याचा निश्चय केला. त्यांना असे वाटले की विजापूर येथे मंत्रिमंडळात जी दुफळी आहे त्यामुळे आपले कार्य सिद्धीस जाण्यास मदत होईल. त्यांनी असाही विचार केला की, राजधानी घेण्यात आपल्याला यश मिळाले तर विजापूर राज्याचा इतर मुलूखही लवकर हस्तगत होईल. या विचारानुसार दोस्तांनी शहादुर्ग येथील आपली छावणी मोडली आणि चाळीस हजार घोडेस्वारांनिशी ते विजापूरसमोर दाखल झाले.

(१५०) त्यावेळी विजापुरात दोन-तीन हजारापेक्षा जास्त सैन्य नव्हते. त्यामुळे हबशी सैनिक शहरामध्येच ऐनउल्मुल्क आणि अंकुसखान येईतोपर्यंत दबा धरून बसले. हे दोघेजण त्यानंतर आठ हजार घोडेस्वार घेऊन आले आणि त्यांनी अल्लापूर वेशीपाशी तळ दिला. आपण संख्येने शत्रूपेक्षा कमी आहोत याची तमा न बाळगता त्यांनी शत्रूबरोबर वारंवार चकमकी दिल्या. सरतेशेवटी मुसळधार पावसामुळे शहराची वीस गज भिंत कोसळली. हबशी प्रमुखांच्या वर्तनाचा तिरस्कार वाटून ऐन-उल्मुल्क आणि अंकुसखान हे त्याच रात्री शत्रू पक्षाला जाऊन मिळाले. दोस्तांनी आता शहरावर हल्ला चढविण्याचा निश्चय केला. परंतु बेहजाद उल्मुल्क याला आपल्यावर अग्रस्थान दिल्यामुळे सय्यद मुर्तजा हा नाखूष झाला होता. त्याने या बेताची ताबडतोब अंमलबजावणी होण्यास प्रतिरोध केला. त्यामुळे विजापूरच्या सैनिकांना भिंतीला

पडलेले खिंडार बुजविण्यास अवधी मिळाला. अखेर जेव्हा हबशी प्रमुखांना असे आढळून आले की, आपला हुकूम मानण्यास प्रमुख उमराव आणि अधिकारी तयार नाहीत आणि त्यामुळे सुलतानाच्या मदतीला येण्यास ते कांकू करीत आहेत तेव्हा त्यांनी चांदबिबीकडे असे निवेदन केले की, "आपण ज्या व्यक्तीची नेमणूक कराल त्या व्यक्तीच्या हातात आम्ही आमची सत्ता सोपविण्यास तयार आहोत. कारण आम्ही राजनिष्ठ आहोत आणि राज्याची भरभराट व्हावी अशी आमची इच्छा [३](१५३) आहे. परंतु या गोष्टी आमच्या हातून पार पडू शकत नाहीत याचे कारण दरबारातील इतर अमीरउमरावांना आमच्याबद्दल वाटणारा मत्सर हे आहे."

(१५१) त्यांनी केलेल्या या निवेदनावर विसंबून चांदबिबीने शहा ताहीर याचा मुलगा शहा अबुल हसन याला **अमीर जुमला** या [३२७८] पदाची वस्त्रे दिली. त्याने ताबडतोब कर्नाटकच्या बर्गी प्रमुखांकडे जासूद पाठवून त्यांना आपल्या कामगिरीवर हजर रहाण्यासाठी उत्तेजनपर असे हुकूम दिले. शहा ताहीरच्या घराण्याबद्दल सय्यद मुर्तजा याला अतिशय आदर होता. त्यालाही अबुल हसन याने पत्र लिहून विजापूरचा मुलूख सोडून जाण्याबद्दल दोस्तांचे मन वळविण्यासंबंधी सल्ला दिला. त्याबरोबरच त्याने अशी धमकी दिली की, जर का त्याने याप्रमाणे केले नाही तर लवकरच जेव्हा बर्गी लोक सुलतानाला येऊन मिळतील तेव्हा त्यांच्या माघारीचा मार्ग तोडला जाईल. वऱ्हाडचा सेनापती सय्यद मुर्तजा याला मनापासून असे वाटत होते की कुतुबशहा आणि बेहजाद उलमुल्क यांच्या अधिपत्याखाली दोस्तांनी चालविलेल्या प्रयत्नांना यश येऊ नये. त्यामुळे त्यांना माघार घेण्यास उद्युक्त करण्यासाठी उपाययोजना करण्यास त्याने सुरुवात केली. पहिल्याप्रथम त्याने विजापूरचा पक्ष सोडून दोस्तांना येऊन मिळालेल्या ऐनउल्मुल्क आणि अंकुसखान यांना पत्र लिहून परत विजापूरला जाण्याची शिफारस केली. त्याने असे कळविले की, "इतकी धोक्याची परिस्थिती निर्माण झालेली असताना केवळ सुलतानाचे वजीर आपल्याला आवडत नाहीत या सबबीखाली सुलतानापासून पळून जाणे हे त्यांच्यासारख्यांना शोभत नाही." याप्रमाणे त्याच-दिवशी संध्याकाळी त्यांनी विजापुरात परत प्रवेश केला आणि इब्राहीम आदिलशहा-जवळ आपल्या एकनिष्ठतेची पुन्हा ग्वाही दिली. राज्ययंत्रणेत बदल झाल्याचे जेव्हा अमीरउमराव आणि बर्गी यांना कळले तेव्हा ते बहुतेक सर्व आपापल्या अनुयायां-सहित दरबाराकडे त्वरित निघून आले. अबुल हसन याने प्रामाणिकपणे केलेल्या प्रयत्नामुळे केवळ एक महिन्याच्या आतच वीस हजारापेक्षाही जास्त [३](१५४) सैन्य राजधानीत गोळा झाले. राजधानीतील कारभाराने आता नवीन तऱ्हेचा जोष धारण केला. शत्रूला सताविण्यासाठी आणि त्याची रसद तोडण्यासाठी बर्गी प्रमुखांना नियुक्त करण्यात आले. त्यांनी आपली कामगिरी इतक्या यशस्वीरीत्या पार पाडली की थोड्याच अवकाशात शत्रूच्या छावणीत दुष्काळाची दाट छाया पसरली आणि विजापूरवर स्वारी केल्याबद्दल त्यांना पश्चात्ताप झाला.

(१५२) दिवसेंदिवस वेढा देणाऱ्या सैन्यातील विपन्नावस्था वाढू लागली. तेव्हा यांतून मार्ग काढण्यासाठी कोणत्या उपाययोजना कराव्या हे ठरविण्यासाठी त्यांनी खलबते केली. सरतेशेवटी असे ठरविण्यात आले की प्रत्येकाने आपापल्या फौजा विभागाव्या. कुतुबशहाने कुलबर्ग्याकडे कूच करून जावे आणि बेहजाद उल्मुल्क आणि सय्यद मुर्तजा यांनी शहादुर्गला पुन्हा वेढा द्यावा. याप्रमाणे त्यांनी एकाएकी विजापूर समोरून मुक्काम हलविला. परंतु काही विशिष्ट घटना घडल्यामुळे निजामशहाचे सैन्य वाटेत कऱ्हाड आणि मिरज या जिल्ह्यात लुटालूट करीत अहमदनगरकडे परतले. या घटनांचा उल्लेख या पुढच्या वृत्तान्तात करण्यात येईलच. इकडे महमद कुली कुतुबशहा याने आपला सेनापती मुस्तफाखान याला इब्राहीम आदिलशहाच्या काही जिल्ह्यांचा पाडाव करण्यासाठी सैन्याची एक तुकडी देऊन पाठीमागे ठेवले आणि तो स्वतः गोवळकोंडा येथे परतला. जवळजवळ तीन महिन्यांनंतर दिलावरखानाच्या अधिपत्याखाली विजापूरहून पाठविण्यात आलेल्या सैन्याच्या एका तुकडीने मुस्तफाखानाचा पूर्णपणे पराजय केला. या विजयाबरोबर न थांबता दिलावरखानाने गोवळकोंड्याच्या वेशीपर्यंत शत्रूचा पाठलाग केला आणि वाटेत भरपूर लूट जमा केली.

(१५३) विजापूर शहराला वऱ्हाड, अहमदनगर आणि गोवळकोंडा या राज्यांच्या सुलतानांच्या एकत्र झालेल्या सैन्यांचा जवळजवळ बारा महिने वेढा पडला होता. या कालावधित शहराच्या भिंतीला एक मोठे खिंडार पाडण्यात आलेले होते. शहरातील शिबंदीची बंडाकडे प्रवृत्ती झुकली होती, तर साऱ्या राज्यात अंदाधुंदीने धुमाकूळ घातला होता. अशा परिस्थितीत माझे असे म्हणणे आहे की, केवळ एका माणसाच्या अतीव प्रयत्नामुळे विजापूरच्या राजघराण्याचा बचाव झाला [३] (१५५) यावर कोणाचाही विश्वास बसणार नाही हे मी जाणतो. किंबहुना ही गोष्ट अशक्यप्राय आहे असेच सर्वजण म्हणतील. परंतु प्रत्यक्षात ही वस्तुस्थिती होती आणि तिला कारण असलेली व्यक्ती म्हणजे शहा अबुल हसन ही होय. त्याने दोन-तीन महिन्यांच्या कालावधित वीस हजार घोडेस्वारांचे सैन्य उभारून युद्धासाठी सज्ज केले, आणि त्यानंतर एकच महिन्याने त्याने शत्रूवर हल्ला केला आणि त्याला वेढा उठविण्यास भाग पाडले. एवढेच नव्हे तर दोस्तांपैकी एकाच्या सैन्याचा पाठलाग त्याच्या राजधानीच्या वेशीपर्यंत केला आणि त्याच्यापासून एकशेपन्नास हत्ती आणि इतर भरपूर लूट आपल्या ताब्यात घेतली. कुतुबशाही सैन्याच्याविरुद्ध केलेल्या यशस्वी मोहिमेवरून दिलावरखान माघारी फिरला तेव्हा तो गर्वाने इतका चढून गेला की, वजिराचे पद आपल्याला मिळावे अशी आकांक्षा त्याच्या मनात निर्माण झाली. आपला हेतू सिद्धीस जावा यासाठी त्याने विजापूरच्या किल्ल्याचा किल्लेदार हैदरखान याला आपल्याकडे वळवून घेतले आणि राज्याचा वजीर इखलासखान याला पकडण्याचा मनसुबा रचला. किल्ल्यामध्ये सुलतानाचे वास्तव्य असे. आपला बेत

सिद्धीस नेण्याची जेव्हा पूर्णपणे तयारी झाल्याचे त्याला दिसून आले तेव्हा त्याने झपाट्याने राजधानीकडे कूच केले. त्याने अल्लापूर वेशीजवळ आपली छावणी दिली. इखलासखानाकडे त्याने वारेमाप स्तुती करणारी पत्रे आणि त्याच्याबद्दलच्या एकनिष्ठतेची ग्वाही देणारे इतके खलिते पाठविले की, इखलासखान स्वतःविषयी पूर्णपणे बेसावध राहिला. शहर आणि राजवाडा यांच्या संरक्षणाची योग्य ती तरतूद करण्याचे कामीही त्याच्या हातून कुचराई झाली. एके दिवशी इखलासखान हा किल्ल्यातील आपल्या निवासस्थानी विश्रांती घेत असताना दिलावरखानाने आपले मुलगे आणि बरोबर सातशे घोडेस्वार आणि पंधरा हत्ती घेऊन अचानक शहरात प्रवेश केला. तो सरळ राजवाड्याकडे निघाला. पूर्वी दिलेल्या वचनाप्रमाणे हैदरखानाने त्याला राजवाड्यात प्रवेश दिला. यानंतर त्याने सुलतानाची भेट घेतली आणि सर्व दिशांना आपले रक्षक सैनिक पहाऱ्यावर ठेवले. काही काळानंतर इखलासखानाने चार हजार [३] (१५६) सैनिक घेऊन वेशीकडे चाल केली. परंतु तटावरून झालेल्या तोफांच्या भडिमारामुळे त्याला काही अंतरापर्यंत माघार घ्यावी लागली. आता त्याने किल्ल्याची नाकेबंदी केली, आणि ती चार महिन्यापर्यंत चालविली. परंतु त्याचा प्रमुख अधिकारी बलिलखान हा त्याच्या बहुसंख्य अनुयायांसहित त्याचा पक्ष सोडून निघून गेला. अशा परिस्थितीत पळून जाणे त्याला अपमानास्पद वाटले. त्याच्या राहत्या घरातच दिलावरखानाने त्याला कैद केले. त्याने दाखविलेली मेहेरनजर आणि दयाळूपणा यांचा दिलावरखानाला पूर्ण विसर पडला. त्याने कृतघ्नपणे त्याचे डोळे काढले आणि त्याला बंदिस्त केले. याप्रसंगी दोन्ही बाजूच्या सैनिकांकडून शहरामधील रहिवाशांना खूपच त्रास झाला आणि तोफखान्याच्या भडिमारामुळे शहरातील उत्तमोत्तम इमारतींचा नाश झाला.

(१५४) राजप्रतिनिधी म्हणून नेमणूक झाल्यावर दिलावरखानाने दरबारातील अमीरउमरावांशी संधान बांधून त्यांना आपल्या बाजूकडे वळविण्याचा प्रयत्न केला. त्याचप्रमाणे राज्यातील मोठमोठ्या जागा आपल्या नातेवाईकांना आणि विशेषतः आपल्या मुलांना देऊन आपल्या पक्षाचे बळ वाढविण्याचाही त्याने प्रयत्न केला. सुलतानाच्या खाजगीतल्या सर्व जागा त्याने आपल्या मुलांकडे सोपविल्या. दिलावरखानाला मिळालेल्या यशाचा मोठा वाटा त्याच्याकडे पळून आलेल्या बलिलखानाकडे होता. त्याला त्याने आपला मुलगा म्हणून मानले. त्याने फक्त शंभर परदेशी मुसलमान आणि साठ हबशी चाकरीमध्ये ठेवले, आणि बाकीच्या सर्वांची राज्यामधून हकालपट्टी केली. विजापूर राज्याचा बचाव करण्यात शहा अबुल हसन याचा अतिशय मोठा वाटा होता. इखलासखानाने पूर्वी विजापूरला वेढा दिला होता. त्यानंतर एका डोंगरी किल्ल्यावर अबुल हसन त्याला कैदी म्हणून पाठविण्यात आले होते. दिलावरखानाने त्याला प्रथम आंधळे केले आणि नंतर त्याला ठार मारले. मरहूम अली आदिलशहाच्या मर्जीतील हाजी बशीर याचीही त्याने अशीच वाट लावली. राजप्रतिनिधी चांदबिबी हिची सत्ता देखील त्याने पूर्णपणे नामशेष केली.

परिणामी दरबारातील कोणीही तिच्या आज्ञांना मान देईनासा झाला. दिलावरखानाने आदोनीच्या किल्ल्याचा सुभेदार घालिबखान याला मोठ्या युक्तीने [ ३ ] ( १५७ ) आपल्या ताब्यात आणले. त्याने बंड केले होते. घालिबखानाचे त्याने डोळे काढले. त्याने विजापूरात सुनीधर्मपंथाच्या तत्त्वांची स्थापना केली. आठ वर्षेपर्यंत त्याने राज्य कारभाराच्या प्रत्येक बाबीत अनिर्बंध सत्ता आणि प्रभुत्व गाजविले. या काळामध्ये त्याने सरकारच्या उत्पन्नाच्या बाबीत कल्पनातीत भर घातली.

( १५५ ) आपल्याला सुरक्षितता प्राप्त झाली आहे अशी जेव्हा त्याला खात्री पटली तेव्हा त्याने पहिल्या प्रथम जी गोष्ट केली ती ही : त्याने बलिलखानाला सैन्य देऊन मलबारच्या राजांकडून थकलेली खंडणीची बाकी वसूल करून आणण्यासाठी रवाना केले. बलिलखानाला जेर्हचा राजा अरसपानाईक हा येऊन मिळाल्यानंतर त्याने कारूरचा राया शंकर नाईक याच्याविरुद्ध खंडणी देण्यास त्याने नकार दिल्याबद्दल चाल केली. वेढा चालू असताना एके दिवशी रात्री बलिलखान हा तोफांच्या मोर्चांची पहाणी करण्याकरिता गेला असताना दुर्दैवाने शत्रूच्या सैनिकांच्या एका तुकडीकडून पकडला गेला. त्याला किल्ल्यावर नेण्यात आले आणि जडजड साखळदंड चढवून त्याची बंदिवासात रवानगी करण्यात आली. आपला सेनापती नाहीसा झाल्याचे पाहून त्याच्या सैनिकांनी वेढा उठविला आणि वेगवेगळ्या दिशांना ते पांगले. काही काळा-नंतर बलिलखानाने आपल्या पहारेकऱ्यांना आणि किल्ल्यावर गवत विकणाऱ्याला मोठ्या बक्षिसाची लालूच दाखवून आपली सुटका करण्याचे कामी मदत करण्याबद्दल त्यांची मने वळविली. गवत विकणाराने गवताच्या एका भाऱ्यामध्ये त्याला छपवून आपल्या खांद्यावरून त्याला किल्ल्याबाहेर नेले. सोयीस्कर अशा जागी आल्यानंतर बलिलखान आपल्या अंगावरील साखळदंड तोडून टाकण्यात यशस्वी झाला. त्याने तेथून मोठ्या घाईने विजापूरच्या सरहद्दीकडे कूच केले. तेथे सुरक्षितपणे येऊन पोहो-चल्यानंतर त्याने एक घोडा मिळविला आणि तो बंकापूरकडे निघाला. तेथून त्याने आपल्या सुटकेची हकिकत दिलावरखानाकडे कळविली. शंकर नाईकाचा सूड घेण्यासाठी सैन्याची तुकडी पाठविण्याबद्दलही त्याने त्याला विनंती केली. परंतु त्यावेळी तरी त्या दिशेने आक्रमणाचा कोणत्याही दृष्टीने प्रयत्न करण्यास त्याने सपशेल [ ३ ] ( १५८ ) नकार दिला.

( १५६ ) हिजरी ९९२ / इ. स. १५८४ } त्याचवर्षी मुर्तजा निजामशहाबरोबर मैत्रीचा तह करावा यासाठी दिलावरखानाने अहमदनगरच्या दरबारी आपल्या वकिलांची रवानगी केली. हिजरी ९९२ या वर्षी मुर्तजा निजामशहाने आपला मुलगा राजपुत्र हुसेन याच्यासाठी इब्राहीम आदिलशहाची बहीण खुदिजा सुलताना हिला मागणी घातली. आदिलशहाने आपली सम्मती दिल्यावर कासीमबेग हा राजकन्येचे स्वागत करण्यासाठी आणि तिला अहमदनगरला घेऊन जाण्यासाठी चारशे घोडेस्वारांची एक तुकडी घेऊन विजापुरात येऊन दाखल झाला. चार महिन्यांच्या

कालावधीनंतर राजकन्येने मोठ्या थाटामाटाने विजापूर सोडले. तिची आत्या चांदबिबी हिला आपला भाऊ मुर्तजा निजामशहा याला भेटण्याची इच्छा झाल्यामुळे तिनेही राजकन्येबरोबर अहमदनगरकडे प्रयाण केले.

( १५७ ) हिजरी ९९५ इ. स. १५८६ } हिजरी ९९५ या वर्षी सुलतान इब्राहीम आदिलशहा हा वयात आला. परमेश्वराने घालून दिलेल्या नियमाप्रमाणे परमेश्वराचा प्रेषित महमद पैगंबर याने म्हटलेच होते; 'वंशाची वृद्धी आणि वाढ करा.' म्हणून राज्याच्या प्रमुखांना असे वाटले की, सुलतानाने आता विवाह करावा. ह्या कारणास्तव भागानगर या राजधानीच्या शहरी महमद कुली कुतुबशहाची बहीण राजकन्या मलिका जहान हिला मागणी घालण्यासाठी रवाना करण्यात आले. भागानगरला त्या नंतरच्या काळापासून हैद्राबाद असे म्हणतात. या नाजूक कामगिरीवर ख्वाजा तिल्लाबेग सिराजी याची रवानगी करण्यात आली. वाटेमध्ये प्रत्येक मुक्कामावर सुलतानाच्या हुकुमाने त्याची उत्तम तऱ्हेने बडदास्त ठेवण्यात आली. भागानगर येथे त्याचे मोठ्या सन्मानाने स्वागत करण्यात आले. वरील गोष्ट अहमदनगरचा मुर्तजा निजामशहा याच्या संमतीवाचून करण्यात आल्यामुळे तो इतका संतापला की त्याची संमती घेतल्याशिवाय राजकन्येची आपण रवानगी करू नये हे शहाणपणाचे होईल असा महमद कुली कुतुबशहाने [३] (१५९) विचार केला. असे करण्यास तो विशेषकरून उद्युक्त झाला याचे कारण मरहुम इब्राहीम कुली कुतुबशहा याने आपल्या मृत्युशय्येवर आपल्या मुलाला, मुर्तजा निजामशहा याची संमती घेतल्यावाचून मलिका जहान हिचा विवाह करू नये अशी आज्ञा केली होती. विजापूरचा वजीर आणि राजप्रतिनिधी दिलावरखान यांची अशी समजूत झाली की, राजकन्येची जी अडवणूक झाली आहे तिला मुर्तजा निजामशहा हा कारण आहे आणि म्हणून त्याने विजापूरचे सैन्य घेऊन अहमदनगरच्या सरहद्दीच्या दिशेने चाल केली. मुर्तजा निजामशहा हा बऱ्याच काळापासून राजकारणातून निवृत्त झाला होता. दिलावरखान हा औसाच्या किल्ल्याजवळ येऊन पोहोचला. तेव्हा त्याला असे वाटले की, विजापूरकडून झालेल्या या आक्रमणाला आपल्या वजिरांचे वर्तन कारणीभूत असावे. या समजुतीने त्याने सलाबतखानाला बंदिस्त केले आणि कासीम-बेगची त्याच्या जागेवर नेमणूक केली. कासीमबेग याने अहमदनगरचा प्रदेश सोडून देण्याबद्दल दिलावरखानाचे मन वळविले. विजापूरच्या सैन्याने त्यानंतर महमद कुली कुतुबशहा याच्या राज्याकडे चाल केली. शांतता राखली जावी म्हणून कुतुबशहाने आपल्या बहिणीची रवानगी इब्राहीम आदिलशहाकडे केली.

( १५८ ) हिजरी ९९६ इ. स. १५८७ } मुर्तजा निजामशहाचे डोके फिरले आहे अशी बराच काळपर्यंत समजूत होती. हिजरी ९९६ या वर्षी त्याच्या वर्तनात उघडउघड वेडेपणाची चिन्हे दिसून येऊ लागली. त्याने आपला मुलगा मिरान हुसेन याचा जीव घेण्याचा प्रयत्न केला. यावर अहमदनगरचा

वजीर मिर्झाखान याने मुर्तजा निजामशहाला कैद करण्याचे कामी मिरान हुसेन याला मदत करणे योग्य आहे असा विचार केला. हा बेत सिद्धीस जावा म्हणून त्याने दिलावरखानाला मदतीची विनंती केली. त्याने इब्राहीम आदिलशहाला घेऊन विजापूरहून कूच केले परंतु तो अहमदनगरपर्यंत येऊन पोहोचण्यापूर्वीच मिरान हुसेन याने आपल्या बापाला पदच्युत केले होते. इब्राहीम आदिलशहाने मिरान हुसेनचे [३] (१६०) राज्यावर बसल्याबद्दल अभिनंदन केले. त्याने मिरान हुसेन आणि त्याची बायको म्हणजे आपली बहीण या दोघांबरोबर आपली मुलाखत व्हावी अशी इच्छा प्रकट केली. या कारणास्तव अहमदनगर शहरापासून काही मैल अंतरावर त्याने आपला मुक्काम ठेवला. परंतु त्याला जेव्हा कळले की, हुसेन निजामशहाने आपल्या बापाला प्रथम कैद करून नंतर त्याला हालहाल करून ठार मारले आहे तेव्हा त्याला इतकी दहशत बसली की त्याने हुसेन निजामशहाचे तोंडही न बघण्याचा निश्चय केला. त्याने मिर हुसेन कुर्द याला हुसेन निजामशहाकडे पाठविले. मीर हुसेनची स्पष्ट वक्ता म्हणून प्रसिद्धी होती. आदिलशहाने त्याच्याबरोबर हुसेन निजामशहाला सांगण्यासाठी पुढीलप्रमाणे निरोप दिला: " मी विजापूरहून कूच केले ते निव्वळ तुम्हाला सिंहासनावर बसविण्याच्या हेतूनेच ! त्याचप्रमाणे तुमच्या वडिलांनी एखाद्या किल्ल्यावर निघून जावे आणि आपला काळ धार्मिक चिंतनात व्यतीत करावा म्हणून त्यांना भाग पाडावे असाही माझा हेतू होता. परंतु जेव्हा मला असे कळले तुम्ही आपल्या वडिलांना दुष्ट रितीने ठार मारले आहे तेव्हा मी तुमची भेट घेण्याचा बेत रहित केला. कदाचित मी तेथेच राहिलो असतो तर आक्रमण करण्याचा माझा हेतू आहे अशी लोकांची समजूत झाली असती म्हणून मी मनाशी असा विचार केला की, तुमच्या अपराधाबद्दल सूड घेण्याचे काम त्या परमेश्वरावरच सोपवावे आणि आपण आपल्या राज्याकडे निघून जावे." अशा तऱ्हेचा निरोप पाठविल्यानंतर इब्राहीम आदिलशहा विजापूरला परतला. तेथून त्याने मलबारच्या राजाकडून खंडणीची थकलेली बाकी वसूल करण्यासाठी बलिलखानाची बारा हजार घोडेस्वार देऊन रवानगी केली. त्यांनी खंडणी देण्याचे नाकारल्यास त्यांचे किल्ले जिंकून घेण्याची आज्ञा त्याने बलिलखान यास दिली.

(१५९) वरील गोष्टीला जेमतेम एक वर्ष लोटले असेल नसेल तोच हुसेन निजामशहाचा खून झाला आणि जमालखान नावाच्या एका व्यक्तीकडे राज्याची सर्व सूत्रे आली. अहमदनगरमध्ये माजलेल्या या गोंधळाचा फायदा घेण्यासाठी अहमदनगरवर चाल करून जाण्याचा सल्ला दिलावरखानाने इब्राहीम आदिलशहाला दिला. त्यानुसार बलिलखानाला मलबारहून तावडतोब परतण्याचा [ ३ ] ( १६१ ) हुकूम देण्यात आला. हिजरी ९९७ या वर्षी सुलतानाने विजापूरहून कूच केले.
हिजरी ९९७ इ. स. १५८८ } बलिलखानाच्या बरोबर आपल्या सैन्याचा मिलाफ होईल या आशेने दिलावरखानाने आपल्या फौजेला शहादुर्ग येथे जवळजवळ १ महिना थांबवून धरले. त्या अवधित बलिलखान हा न आल्यामुळे त्या ठिकाणी

अधिक काळ थांबणे धोक्याचे आहे असा दिलावरखानाने विचार केला आणि त्याने अहमदनगरच्या दिशेने कूच केले. दरम्यान जमालखानाने इस्माईल निजामशहाला बरोबर घेऊन पंधरा हजार घोडेस्वार, पुष्कळ पायदळ आणि तोफखाना यासहित दिलावरखानाशी मुकाबला करण्यासाठी चाल केली. दोन्ही फौजा बराच काळपर्यंत चकमक न होता समोरासमोर ठाण मांडून उभ्या होत्या. सरतेशेवटी तहासाठी बोलणी करणे हेच योग्य आहे असा जमालखानाने विचार केला. "जर का इब्राहीम आदिलशहाची बहीण म्हणजेच हुसेन निजामशहाची विधवा स्त्री खुदिजा हिला विजापूर येथे इब्राहीम आदिलशहाकडे पाठविण्यास तयार असाल तर आणि लढाईचा झालेला खर्च अहमदनगर दरबार देण्यास कबूल असेल तर आपण तहाच्या योजनेला मान्यता देऊ," असे दिलावरखानाने कळविले. यावर यत्किंचितही विलंब न लावता जमालखानाने राजकन्येची, तिची सर्व मालमत्ता आणि हिरे आणि त्याशिवाय भरपूर द्रव्य देऊन पाठवणी केली. त्याबरोबर दिलावरखानाने आपल्या फौजा माघारी नेल्या. त्याच दिवशी बलिलखान दिलावरखानाला येऊन मिळाला. त्याच्या उपस्थितीची आता जरुरी नव्हती. त्याने मलबारमधील कटकटी जवळजवळ मिटवत आणलेल्या होत्या. साहजिकच त्याला परतण्याची आपण उगीचच आज्ञा दिली असे दिलावरखानाला वाटले. कारण त्याच्या येण्यामुळे तेथील परिस्थिती परत बिघडली.

(१६०) बलिलखानाला येण्यासाठी जो विलंब लागला होता त्याचा दिलावरखानाला संताप आला. बलिलखानाने हा विलंब हेतुपुरस्सर केला असे दिलावरखानाला वाटले. बलिलखानाने खंडणी म्हणून ज्या वस्तू बरोबर आणल्या होत्या त्यांचे त्याने कमी मूल्यमापन केले, आणि त्याच्याबरोबर सुलतानाला भेटण्यासाठी समक्ष आलेल्या मलबारमधील राजांकडून त्याने उरलेल्या खंडणीच्या बाकीची मागणी केली. बलिलखानाची अधिक मानखंडना करण्यासाठी त्याने सुलतानाच्या समक्ष, [३] (१६२) "तू जाणूनबुजून सुलतानाच्या छावणीत हजर राहण्याची घाई करण्याबद्दलचा हुकूम पाळला नाहीस," असा त्याच्यावर आरोप केला. सुलतानाचे मत आपल्याविषयी चांगले आहे याची बलिलखानाला खात्री होती म्हणून त्याने धिटाईने उत्तर दिले की, "कोणत्याच अपराधाबद्दल मी दोषी नाही, आणि सुलतानासमक्ष हजर होण्यास अपरिहार्य एवढाच विलंब मला लागलेला आहे." तो पुढे असेही म्हणाला की, "खंडणीच्या बाकीदाखल मोठी रकम मला ताबडतोब मिळावयाची होती अशा वेळी मला परत फिरण्याचा हुकूम झाला आहे असे जर मी लगोलग जाहीर केले असते तर तेवढ्या रकमेची भरपाई खजिन्यात झाली नसती. त्याशिवाय फौजेला अधिक अडचणी सहन कराव्या लागल्या असत्या त्या वेगळ्याच! मला तर असे म्हणावयाचे आहे की, शत्रूविरुद्ध अचानक चाल करून जाण्यास तुम्ही सुलतानांना जे भाग पाडलेत त्यासाठी माझ्याऐवजी तुम्हासच दोष दिला पाहिजे. तुम्ही जर आणखी पंधरा दिवस शहादुर्ग येथे मुक्काम करून राहिला असतात तर मलबारचे सैन्य तुम्हाला येऊन मिळाले असते

आणि निजामशहाच्या मुलुखावर आपल्याला यशस्वीपणे स्वारी करता आली असती. असे जरी असले तरी माझ्या हातून घडलेल्या चुकांची कबुली देण्याची माझी तयारी आहे आणि माझ्या हातून जे काही गुन्हे घडले असतील त्यासाठी सुलतानांच्या कृपाळू पायांशी मी लोळण घेईन." बलिलखानाच्या धिटाईच्या बोलण्यामुळे दिलावरखानाला आपल्या प्रतिष्ठेला तडा गेला आहे असे वाटले. परंतु या गोष्टीची आपण आताच दखल घेतली तर त्यामधून निष्कारण कटकटी उद्भवतील असा विचार करून त्याने स्वतःची नाखुषी मनातच ठेवली. परंतु वरवर मात्र त्याने प्रशंसेचा आव आणत सुलतानाला असे म्हटले की, "बलिलखान हा राजनिष्ठ सेवक आहे आणि त्याने मोठी कामगिरी पार पाडलेली आहे. त्याला मुख्य सैन्याला येऊन मिळण्यास जो वेळ झाला त्याबद्दल पट् शकतील अशी कारणे आहेत. म्हणून माझी आपल्याला विनंती आहे की, आपण त्याला क्षमा करावी आणि आपल्या खुषीदाखल म्हणून त्याचा सन्मान करावा." ह्या विनंतीला सुलतानाने त्वरित आपली संमती दिली आणि एक भारी पोषाख देऊन त्याचा सन्मान केला. दरबार बरखास्त झाल्यानंतर दिलावरखानाने बलिलखानाला वेगळे [३](१६३) आपल्या तंबूकडे नेले आणि त्याचे भरपूर आदरातिथ्य करून व्यवस्थित पाहुणचार केला. आपल्या मागील वर्तनाबद्दल दिलावरखानाने बलिलखानाची क्षमा मागून असे म्हटले की, " सर्व लोकांना माहीत आहे की, तुला मी माझ्या मुलासारखे मानले आहे. तेव्हा सरकारी बाबीत जर का मी तुझ्याशी वागताना इतरांइतकाच कडकपणा जर दाखविला नाही तर मी माझ्या बाजूकडील लोकांबाबत पक्षपातीपणाची वागणूक करतो असा माझ्यावर आरोप केला जाईल." यानंतर अरसपा नाईक याचा मुलगा आणि त्याचप्रमाणे सुलतानाला भेटण्यासाठी बलिलखानाबरोबर आलेले मलबारमधील अनेक राजेरजवाडे यांना मानाचा पोषाख बहाल करण्यात आला आणि आपापल्या देशाकडे जाण्यासाठी त्यांची सन्मानपूर्वक रवानगी करण्यात आली. दिलावरखानाने आपल्या ढोंगीपणाच्या वागणुकीने बलिलखानाच्या मनातील आपल्याबद्दल आलेला संशय दूर केला. परिणामी तो शूर सेनापती स्वतःच्या सुरक्षिततेबद्दल बेफिकीर राहिला. विजापूरचे सैन्य परतल्याला आता काही महिन्यांचा अवधी लोटला होता. इखलासखानाच्या काळात बलिलखानाने दिलावरखानाप्रीत्यर्थ जी थोर कामगिरी बजावली होती, तिचा आता दिलावरखानाला पूर्ण विसर पडला. त्याने विश्वासघाताने बलिलखानाला कैद करविले आणि सुलतानाला कळू न देता त्याला आंधळे केले. या गोष्टीमुळे जरी सुलतानाला संताप आला तरी तो दिलावरखानाच्या इतका काबूत होता की, स्वतःला आलेला संताप उघड करून दाखविण्याचे धाडसही त्याला झाले नाही. परंतु या सहनशक्तिपलीकडे गेलेल्या गुलामगिरीच्या परिस्थितीतून स्वतःची सुटका करून घेण्याची संधी लवकरच त्याला मिळाली.

(१६१) हिजरी ९९८ ) इ. स. १५८९ ) हिजरी ९९८ या वर्षी सुलतानाने आपल्या वजिराच्या विनंतीवरून विजापूरहून अहमद-

नगरकडे कूच केले. अहमदनगर येथे जमालखानाने बुरहाण निजामशहाला बाजूला सारून त्याच्या मुलाला राज्यावर बसविले होते. अहमदनगरवर चाल करून जाण्याचा त्याचा उद्देश जमालखानाच्या सत्तेचा नाश करण्याचा होता. जमालखानानेही बरेचसे सैन्य जमविले आणि इस्माईल निजामशहाला घेऊन तो सुलतानाच्या सैन्यापासून १६ मैल अंतरापर्यंत येऊन ठेपला. त्याचा उद्देश मात्र सुलतानाच्या सैन्याबरोबर युद्ध करण्याचा नव्हता. अशा परिस्थितीत, दिलावरखानाने तह करण्यास [३] (१६४) संमती द्यावी या हेतूने त्याने मोठमोठे प्रस्ताव देऊन आपल्यातर्फे वकील दिलावरखानाकडे रवाना केले. परंतु दिलावरखानाने कोणत्याही तऱ्हेची बोलणी करण्यास सपशेल नकार दिला. त्याच वेळी जमालखानाचे अनेक अधिकारी त्याचा पक्ष सोडून निघून गेले. जमालखानाने आपल्यावर अचानक हल्ला झाल्यास आपण सुरक्षित राहावे यासाठी तुटीफुटी जमीन आणि उतार सभोवार असलेल्या परिसराच्या ठिकाणी आपल्या छावणीची मजबुती केली. हा परिसर भीमा नदीच्या काठी सुलतानाच्या छावणीपासून काही अंतरावर होता. आपला शत्रू आता दुर्बळ झाला आहे असे समजून आणि विजयाबद्दल खात्री वाटून जमालखानावर हल्ला करण्यासाठी सुलतानाची इच्छा नसताना देखील त्याने कूच केले. त्याच्याबरोबर तीस हजार घोडेस्वार होते. शत्रूला आपण कैद करू शकू याचा त्याला विश्वास होता. जमालखान ज्या ठिकाणी मजबूतपणे ठाण मांडून बसला होता, तेथे येऊन पोहोचल्यावर त्याला आपल्या उतावळेपणाचा पश्चात्ताप झाला. परंतु माघार घेण्याची त्याला शरम वाटली. आपले सर्व सैन्य लवकरच आपल्याला येऊन मिळेल या आशेने त्याने तेथे मुक्काम केला. या सुमारास इब्राहीम आदिलशहाकडून एक अधिकारी येऊन दाखल झाला आणि त्याने असे सांगितले की, "लढाईसाठी सैन्याची अजून सिद्धता झालेली नाही. तेव्हा सुलतानाचा तुम्हाला असा निरोप आहे की तुम्ही लढाईचा विचार तूर्त पुढे ढकला आणि सैन्याची व्यवस्थित जमवाजमव होईतोपर्यंत तेथेच मुक्काम करून राहा." दिलावरखानाने यावर उत्तर दिले की, "मी लवकरच जमालखानाला बंदिस्त करून आपल्या समक्ष घेऊन येईन." याप्रमाणे निरोप पाठविल्यानंतर त्याने तावडतोब शत्रूच्या दिशेने कूच केले. मोठमोठे खड्ड असलेले दलदलीने भरलेले असे मैदान त्याचे सैन्य मोठ्या कष्टाने पार करून गेले. कूच करून जाताना त्यांच्यामध्ये व्यवस्थितपणा अगर कोणतीही व्यूहरचना नव्हती. ते जेव्हा शत्रूच्या आघाडीशी येऊन पोहोचले तेव्हा दिलावरखानाने शत्रूच्या पिछाडीकडून कोणीही पळून जाऊ नये म्हणून आपल्या बर्गी घोडेस्वारांना शत्रूच्या पिछाडीवर हल्ला करण्यासाठी नियुक्त केले. आपण वेढले गेलो आहोत हे जेव्हा जमालखानाने पाहिले तेव्हा आपल्या तलवारीवरच भिस्त ठेवण्याचा त्याने निश्चय केला. त्याने आपल्या सैनिकांना युद्धासाठी दक्ष राहण्याचा हुकूम केला आणि शत्रूला प्राणपणाने प्रतिकार करण्याची तयारी केली. दोन्ही सैन्यांत युद्धाला जेव्हा तोंड लागले तेव्हा ऐन उल्मुल्क, अंकुसखान आणि आलमखान हे आपापल्या तुकड्या घेऊन [३] (१६५)

आणि दिलावरखानाला नाशाच्या खाईत एकटे सोडून धाराशीव येथील सुलतानाच्या छावणीकडे निघून गेले. सुलतान हा दिलावरखानावर नाराज आहे हे माहीत असल्यामुळे त्यांना असे करण्याचे धाडस झाले. दिलावरखानाला या घटनेची काहीच कल्पना नव्हती. तो आपल्या सैनिकांसह इतक्या मर्दुमकीने लढला की त्याने शत्रू सैनिकांत एकच गोंधळ उडवून दिला. यावर त्याचे सैनिक छावणीची लूट करण्यासाठी ठिकठिकाणी पांगले. त्यामुळे जेमतेम दोनशे घोडेस्वार दिलावरखानापाशी राहिले. विजयाचे थोडेसे चिन्ह दिसताच अशा तऱ्हेचे वर्तन करण्याची हिंदुस्थानातील लोकांची पद्धतच होती. शत्रूच्या सैनिकांच्या एका तुकडीने आपला सुलतान इस्माईल निजामशहा याच्या समवेत व्यवस्थितपणे माघार घेतलेली होती. त्यांनी जेव्हा वरील प्रकार बघितला तेव्हा ते हल्ला करण्यासाठी पुनः चालून आले. दिलावरखानाने लढाईची शर्थ केली. परंतु आपला संपूर्ण नाश होणार असे जेव्हा त्यास दिसून आले तेव्हा आपला जीव बचावून जाणे हे अधिक योग्य होय असा विचार करून बरोबर सात माणसे घेऊन त्याने रणांगणातून पळ काढला. या सात मंडळीत मी म्हणजे प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता होतो. वाटेमध्ये हेरांनी अशी बातमी आणली की, त्याचा पक्ष सोडून गेलेले ऐनउल्मुल्क आदी अधिकारी सुलतानाकडे जाण्यासाठी जलदीने कूच करीत आहेत आणि त्यांचा उद्देश सुलतानापाशी दिलावरखानाचे असलेले वजन नाहीसे करण्याचा आहे. यावर दिलावरखानाने अधिक जलद गतीने कूच करण्यास सुरुवात केली आणि ऐनउल्मुल्क आदी सरदारांच्या अगोदर तो धाराशीव येथे जाऊन पोहोचला. वाटेमध्ये पराजित झालेल्या सैनिकांपैकी तुकड्यातुकड्यांनी त्याला येऊन मिळालेले तीन हजार सैनिक त्याच्याबरोबर होते. विजयी निजामशहाचे सैन्य कदाचित आपला पाठलाग करील म्हणून त्याने सुलतानाला बरोबर घेऊन रातोरात शहादुर्गकडे कूच केले. दुसऱ्या दिवशी सकाळी तो तेथे येऊन पोहोचला. जमालखानाला मिळालेला विजय अनपेक्षित असा होता. या युद्धात त्याला शंभर हत्तींची लूट मिळाली. त्याने धाराशीवच्या दिशेने चाल केली. युद्धामध्ये मला पुष्कळ जखमा झाल्या होत्या आणि अशक्तपणामुळे प्रवास करून जाणे मला शक्य नव्हते. त्यामुळे मी जमालखानाच्या हाती सापडलो. परंतु एका युक्तीचा अवलंब करून मी माझी सुटका करून घेतली. इकडे जमालखानाला कळले की, बुरहाण निजामशहा हा आपले दोस्त खानदेशचा राजा अलिखान आणि वऱ्हाडातील प्रमुख [ ३ ] ( १६६ ) अमीर यांच्या सहवर्तमान चाल करून येत आहे. तेव्हा त्याने धाराशीवहून उत्तरेच्या दिशेने चाल केली. त्याच्या पाठोपाठ विजापूरचे सैन्य निघाले आणि त्यांनी त्यांचा जवळजवळ एकशेसाठ मैलांपर्यंत पाठलाग केला. 'मुख्य सैन्यासहित आपण आता थांबावे,' असा इब्राहीम आदिलशहाने विचार केला. त्याने शत्रूची रसद तोडण्यासाठी आणि त्याच्या मार्गात त्याला संत्रस्त करण्यासाठी आपल्या बर्गी घोडेस्वारांच्या तुकडीला शत्रूच्या पाठलागावर धाडण्याचे ठरविले. सुलतानाने यत्किंचितही विलंब न लावता रोहणखेडा घाटाकडे जावे असा दिलावरखानाने आग्रह धरला. या वेळी

त्याचे वर्तन आणि त्याने वापरलेली भाषा यामुळे सुलतानाला आपला अतिशय उपमर्द झाला आहे असे वाटले. इब्राहीम आदिलशहा आता वयात येऊन स्वतः सिद्ध झालेला होता. दिलावरखानाच्या बंधनात सदा सर्वकाळ राहण्याचा त्याला आता कंटाळा आलेला होता. दिलावरखानाचा नाश करून स्वतःची वरील परिस्थितीतून सुटका करून घेण्याचा त्याने निश्चय केला.

(१६२) राजवाड्याचे सर्व अधिकारी आणि सुलतानाच्या रक्षक दलातील सर्व सैनिक यांची दिलावरखानाच्या ठिकाणी निष्ठा होती. आपण आपल्या मनातील इच्छा त्यांना सांगितल्यास ते आपला विश्वासघात करतील अशी सुलतानाला भिती वाटली. याबाबत अतिशय सावधगिरीची उपाययोजना केल्यानंतर सुलतानाने अतिशय क्षुल्लक असलेल्या दोन हिंदू अनुचरांची या महत्त्वाच्या प्रसंगातून पार पडण्यासाठी आपले विश्वासू सेवक म्हणून निवड केली. दिलावरखानाच्या आपल्या संबंधातील अतिशय गर्हणीय अशा वर्तणुकीबद्दल तक्रार करण्यासाठी या दोघांची त्याने अमीर उल्उमराव ऐनउल्मुल्क याच्याकडे गुप्तपणे रवानगी केली. ऐनउल्मुल्क याने, "माझा तुम्हाला भरपूर पाठिंबा आणि साहाय्य आहे," अशा तऱ्हेचे निश्चित अभिवचन उत्तरादाखल पाठविले. वरील दोन हिंदू अनुचरांमार्फत बऱ्याच वाटाघाटी झाल्यानंतर असे ठरले की, एका विशिष्ट रात्री जेव्हा दिलावरखान निद्रिस्त असेल तेव्हा सुलतानाने अचानकपणे एक मैल अंतरावर असलेल्या ऐनउल्मुल्क याच्या छावणीत येऊन दाखल व्हावे. ऐनउल्मुल्क त्याच्या हुकुमाचे अतिशय काटेकोरपणे पालन करणाऱ्या आलमखान आणि अंकुसखान या दोघांनी तेथे त्याला येऊन मिळावे असेही या वाटाघाटीत ठरले. [३] (१६७)

रज्जब १४ हिजरी ९९८ मे ८ इ. स. १५९० — या वचनावर विसंबून राहून हिजरी ९९८ या वर्षाच्या रज्जब महिन्याच्या १४ तारखेच्या रात्री इब्राहीम आदिलशहा हा आपल्या खाजगी महालातून बाहेर पडला आणि कफषदारखान याला एक घोडा आणण्याचा त्याने हुकूम दिला. दिलावरखानाच्या हुकुमाखेरीज वरील गोष्ट करण्याचे धाडस आपल्याला नाही, असे सांगून मोतद्दाराने वरील आज्ञा मान्य करण्यास नकार दिला. कफषदारखान याला ह्या उद्दाम उत्तराचा संताप येऊन त्याने मोतद्दाराला बरेचसे दणके घातले. यावर घोड्यांचा खरारा करणारे तबेल्यातील अनुचर घाबरले, आणि त्यांनी ताबडतोब घोडे आणले. सुलतानाने घोड्यावर स्वार होऊन तंबूतील आपल्या अनुचरांसहित तेथून कूच केले. वाटेत पाहऱ्यावर असलेला त्याच्या दाईचा मुलगा इलियासखान याने इब्राहीम आदिलशहाला या धामधुमीचे कारण विचारले. ही वेळ स्पष्टीकरण करण्याची नाही, परंतु तू जर आमच्याबरोबर आलास तर तुला कारण समजेल, असे उत्तर त्याला मिळाले. त्याने ताबडतोब बरोबर शंभर अधिकउणे स्वार घेऊन सुलतानाबरोबर कूच केले. ऐनउल्मुल्क याच्या छावणीपासून काही अंतर आल्यावर आलमखान, अंकुस-

खान आणि स्वतः ऐनउल्मुल्क हे त्याला येऊन मिळेपर्यंत त्याने त्या ठिकाणी मुक्काम केला. सुलतान कूच करून बाहेर पडल्याची बातमी जेव्हा सर्वत्र पसरली तेव्हा अनेक अधिकारी जवळजवळ तीन हजार सैनिक बरोबर घेऊन त्याला येऊन मिळण्यासाठी रातोरात जलदीने निघाले. त्यांच्यामध्ये मी स्वतः होतो.

(१६२ अ) दिलावरखानाचे वय आता ८० पेक्षाही अधिक होते. त्या रात्री दक्षिणेतील एका सुंदर कुमारिकेच्या उपभोगाचा आनंद घेण्यात तो रममाण झालेला होता. ही तरुणी आपल्याला मिळावी अशी फार काळपासून त्याची इच्छा होती. साहजिकच जेव्हा अनेक दूतांनी सुलतानाच्या पलायनाची बातमी त्याच्या कानावर घालण्यासाठी अनेकवार प्रयत्न केले तेव्हा त्याच्या सेवकाने दिलावर- [३] (१६८) खानाला ही गोष्ट सांगण्याचे नाकारले. कोठच्याही परिस्थितीत आपल्याला त्रास देण्यात येऊ नये असा सक्त हुकूम दिलावरखानाने त्या सेवकाला दिलेला होता. ह्या परिस्थितीमुळे आपले बेत सिद्धीस नेण्यासाठी इब्राहीम आदिलशहाला भरपूर अवधी मिळाला. सूर्योदय होण्याच्या सुमारास दिलावरखानाला त्याच्या सुखस्वप्नातून जागे करण्यात आले. त्याने आपले मुलगे, सहा हजार घोडेस्वार आणि काही हत्ती घेऊन सुलतानाच्या पाठोपाठ कूच केले. आपण नजीक आल्यावर सुलतानाचे दोस्त त्याला सोडून जातील आणि आपल्या ताब्यात पुन्हा पहिल्यासारखे येणे त्याला भाग पडेल अशी त्याला आशा वाटली. जेव्हा सुलतानाच्या छावणीनजीक तो येऊन पोहोचला तेव्हा त्याला प्रतिकार करण्याचा हुकूम सुलतानाने ऐनउल्मुल्क याला दिला. परंतु ऐनउल्मुल्क याने दिलावरखानाकडे गुप्तपणे निरोप पाठवून कळविले की, "तुम्ही जेव्हा सुलतानाला पळवून नेण्याचा प्रयत्न कराल त्या वेळी मी तटस्थ राहीन." या अभिवचनाने दिलावरखानाला अधिक उमेद आली. त्याने आपल्या अनुयायांना काही अंतरावर थांबवून धरले, आणि आपण स्वतः शंभर घोडे आणि चार हत्ती घेऊन सुलतानापाशी आला आणि त्याला उद्देशून म्हणाला की, "रात्रीच्या वेळी कूच करून जाणे हे अतिशय अयोग्य आहे. परंतु मला अशी आशा आहे की, तुम्ही आता छावणीकडे परत याल." या उद्धटपणाचा इब्राहीमला अतिशय संताप आला आणि तो उद्गारला : "या विश्वासघातक्याला कोणी शिक्षा करणारा नाही का ?" यावर शरीरसंरक्षक दलातल्या अदिनाखान नावाच्या एका अधिकाऱ्याने आपला घोडा टाच मारून दिलावरखानापाशी नेला, आणि त्याने त्याच्यावर तलवारीचा एक प्रहार करून त्याला जखमी केली. त्याच्यावर दुसरा वार करण्याच्या तयारीत अदिनाखान होता. तोच हत्यारांवर उजेड पडून त्याची चमक डोळ्यात गेल्यामुळे दिलावरखानाचा घोडा बिथरला आणि आपल्या मागील पायावर उभा राहिला आणि त्याने दिलावरखानाला आपल्या पाठीवरून फेकून दिले. हे होते आहे नाही तोच दिलावरखानाच्या हत्तीचे माहूत त्याच्या आणि अदिनाखानाच्यामध्ये धावून गेले. त्यामुळे दिलावरखानाला आपल्या स्वतःच्या फौजेकडे जाण्यास अवधी मिळाला. त्याने आपल्या सैनिकांना सुलतानाविरुद्ध चाल

करून जाण्याचा हुकूम दिला. परंतु आपल्या सुलतानावर हल्ला करण्यास ते कांकूं करू लागले. इतकेच नव्हे तर त्यांच्यापैकी काहीजण सुलतानाच्या पक्षाला जाऊन मिळाले. दिलावरखानाची मनःस्थिती गोंधळामुळे अतिशय संत्रस्त झाली आणि तो अहमदनगरच्या दिशेने पळून गेला. परंतु त्याचा मुलगा कमालखान याला [ ३ ] ( १६९ ) मात्र सुलतानाच्या फौजेने धाराशीव येथे गाठले आणि त्याचा वध केला. याप्रमाणे जेव्हा दैववशात् दिलावरखानाच्या सत्तेचा नाश झाला आणि सुलतानासभोवार पसरलेले अंधुकपणाचे वलय नाहीसे झाले तेव्हा त्याने ऐनउल्मुल्क, आलमखान आणि अंकुसखान यांना मानाचे पोषाख बहाल केले. आपल्या वचनाची पूर्तता काटेकोरपणे करण्यात त्यांना अपयश आल्याचे सुलतानाने मनावर घेतले नाही. वरील घटनेनंतर त्या ठिकाणींच सुलतानाने सिंहासनारोहण केले आणि जाहीररित्या दरबार भरविला. त्या रात्री ज्या ज्या व्यक्तींनी आपल्या निष्ठापूर्ण वागणुकीने कर्तबगारी पार पाडली होती, अशा व्यक्तींना सुलतानाने अतिशय उदार हस्ताने त्यांच्या अपेक्षेपलीकडे बक्षिशी दिली. त्याचप्रमाणे अमीर उमराव आणि सैनिक यांना त्याने भरपूर बक्षिशी देऊन संतुष्ट केले. त्यानंतर सुलतान जेव्हा विश्रांती घेण्यासाठी आपल्या खाजगी महालात आला त्यावेळी घडलेली घटना नमूद करण्यासारखी आहे. दिलावरखान हा हनाफी पंथाचा अनुयायी असल्यामुळे त्याने आपल्या कारकीर्दीत सुन्नी चालीरिती प्रस्थापित केल्या होत्या. परंतु अमीर उमरावांमध्ये अनेकजण कट्टर सुन्नी होते. त्यांनी अधीरेपणाने असे अनुमान काढले की, सुलतान आपला बाप आणि चुलता यांच्याच तत्त्वांचा अंगीकार करून शिया पंथी बनेल. या समजुतीखाली त्यांनी शिया पंथियांच्या पद्धतीप्रमाणे संध्याकाळचे नमाज पढण्यास सुरुवात केली. सुलतानाने त्याच्या शिक्षणकालात हनाफी पंथाचे अनुकरण केलेले होते. त्याने जेव्हा नमाज पढण्यासाठी दिलेली **बांग** ऐकली तेव्हा नमाज पडण्याच्या चालीत झालेल्या बदलाचा त्याला संताप आला, आणि त्याने वरीलप्रमाणे **बांग** घालणाऱ्यांना बंदिस्त करण्याचा हुकूम दिला. परंतु ह्या बदलाचे कारण जेव्हा त्याला सागण्यात आले तेव्हा सुन्नी अमीर-उमरावांच्या या अचानक पंथपरिवर्तनाचे त्याला हसू आले. यामुळे तो अनेकवार त्यांचा उपहास करी, आणि त्यांना राजकारणी शिया या नावाने संबोधे. त्याने प्रार्थना कशी करावयाची याबाबत आपापल्या मताप्रमाणे वर्तन करण्याचे प्रत्येकाला स्वातंत्र्य दिले. त्याचा पूर्वज युसूफ आदिलशहा याच्या काळात दोन्ही पंथियांना आपापल्या [ ३ ] (१७०) मताप्रमाणे धार्मिक रीतीरिवाज पाळण्याची जशी मुभा होती, तशीच मुभा त्याने आता शिया आणि सुन्नी पंथियांना दिली.

( ६६३ ) दिलावरखानाची हकालपट्टी केल्यावर काही काळाने जमालखानाचा पराभव झाल्याची आणि बुरहाण निजामशहा गादीवर बसल्याची खबर आली. इब्राहीम आदिलशहाने या प्रसंगाबद्दल त्याचे अभिनंदन करणारी पत्रे पाठविली. आता लढाईच्या मैदानात सज्ज राहण्याचे कारण न उरल्यामुळे सुलतान हा विजापूरला

परतला. तेथे त्याने राज्यकारभाराच्या निरनिराळ्या बाबीत व्यवस्था आणण्याचे कामी स्वतःला वाहून घेतले. त्याने हे कार्य इतक्या न्यायाने, दयाबुद्धीने, आणि शहाणपणाने पार पाडले की, यापूर्वी सहन करावा लागलेला त्रास सर्वसामान्य जनता विसरली. दिलावरखानाच्या बंधनातून आपल्या सुलतानाची अतिशय सुखकाररितीने सुटका झाली याबद्दल परस्परांचे अभिनंदन करण्यासाठी जणूकाही त्यांना संधी मिळाली.

(१६४) दिलावरखान जेव्हा अहमदनगरकडे पळाला तेव्हा बुरहाण निजामशहाने त्याचा आदरपूर्वक सत्कार केला. त्याने दिलावरखानाची आपल्या उमरावात भरती केली आणि सोलापूर व शहादुर्ग ह्या किल्ल्यांचा पाडाव करण्यासाठी त्याला नियुक्त केले. इब्राहीम आदिलशहाच्या नजरेस ही गोष्ट आल्यानंतर त्याने आपले वकील बुरहाण निजामशहाकडे पाठवून अशी विनंती केली की, "बंडखोर दिलावरखान याला आणि जमालखानाने त्याच्यापासून जे हत्ती पाडाव केले होते त्यांना माझ्याकडे आपण लावून द्यावे." इब्राहीम आदिलशहाची मागणी पुरी करण्याचे ऐवजी बुरहाण निजामशहाने इब्राहीम आदिलशहाने पूर्वी केलेले सर्व उपकार विसरून जाऊन युद्धाची तयारी (जमादी उस्सानी हिजरी १००० { मार्च इ. स. १५९२) केली. दिलावरखानाच्या चिथावणीवरून हिजरी १००० वर्षांच्या जमादी उस्सानी महिन्यात त्याने विजापूरच्या सरहद्दीच्या दिशेने चाल केली. सरहद्द ओलांडून त्याने पुढे कूच केले आणि वाटेतील सर्व मुलूख उद्ध्वस्त केला. मंगळवेढा येथे येऊन पोहोचल्यानंतर आपल्याला प्रतिकार करण्यासाठी रणांगणात कोणतेही सैन्य पाठविण्यात आले नाही हे जेव्हा बुरहाण निजामशहाला दिसून आले तेव्हा त्याला असा संशय आला की, विजापूरच्या अंतर्भागात खूप दूरपर्यंत आपण चाल करून जावे, याकरिता इब्राहीम [२] (१७१) आदिलशहाने ही कोणती तरी क्लृप्ती योजलेली असावी. त्यामुळे माघार घेण्याचा विचार त्याच्या मनात आला. परंतु भीमा नदीपर्यंत कूच करून जाण्यासाठी दिलावरखानाने त्याच्यावर दडपण आणले. तेथे त्याने मुक्काम केला आणि तेथे मोडक्यातोडक्या स्थितीत असलेला एक किल्ला बघून त्याची दुरुस्ती करण्याचा त्याने हुकूम दिला. हे होईतोपर्यंत इब्राहीम आदिलशहाने आपल्या अमीर-उमरावांना एकत्र होण्याचा हुकूमही दिलेला नव्हता किंवा आपल्या देशाचे रक्षण करण्याची उपाययोजनाही केलेली नव्हती. वरील हकीकत ऐकल्यानंतर तो म्हणाला की, "मातीच्या भिंती बांधून आपल्याच हातांनी त्यांचा नाश करणाऱ्या एखाद्या लहान मुलाप्रमाणे बुरहाण निजामशहा लवकरच वागू लागल्यास त्यात आश्चर्य नाही." आपल्या प्रदेशात शत्रू जणूकाही घुसलेलाच नाही अशा तऱ्हेने त्याने आपले व्यवहार चालू ठेवले. बुरहाण निजामशहाच्या हालचालींचे निरीक्षण करण्यासाठी काही घोडेस्वार पाठविण्याची केवळ तजवीज त्याने केली, आणि आपण स्वतः सुखोपभोगांत दंग आहोत असाच आभास जणूकाही त्याने निर्माण केला. सर्वांना त्याच्या या वागणुकीचे आश्चर्य वाटले. त्याच्या

राज्यामध्ये आणि शत्रूच्या छावणीतील प्रत्येक इसमाने इब्राहीम आदिलशहाच्या या वागणुकीसंबंधाने स्वतःचे तर्ककुतर्क बांधले परंतु तो असा का वागत आहे याची कारणमीमांसा मात्र कोणालाच करता आली नाही. बुरहाण निजामशहाने आपले अधिकारी आणि त्याचप्रमाणे दिलावरखान यांजबरोबर या विषयासंबंधाने विचारविनिमय केला. काहीजण असे म्हणाले की इब्राहीम आदिलशहा हा तरुण असल्याने सुखोपभोगात गुंग होऊन गेला आहे आणि राज्यकारभाराकडे त्याने दुर्लक्ष केले आहे. तर दुसऱ्याने असे सांगितले की, त्याला आपल्या अधिकाऱ्यांच्या निष्ठेविषयी संशय आहे आणि म्हणून आपल्या अधिकाऱ्यांना एकत्र येण्याचा हुकूम देण्याची त्याला भीती वाटत आहे. एकंदर होणाऱ्या घडामोडींची इत्थंभूत हकीकत सुलतानाचे हेर त्याला आणून देत, आणि त्याचप्रमाणे सुलतानाच्या असामान्य अकार्यक्षमतेमुळे शत्रूचा आत्मविश्वास किती वाढला आहे या संबंधीचे भयानक वृत्तान्त त्याच्या कानावर घालीत असत.

(१६५) अखेर आपले हेतू आता सिद्धीस जातील अशा तऱ्हेची परिस्थिती निर्माण झाली आहे असे जेव्हा इब्राहीम आदिलशहाला वाटले तेव्हा त्याने दिलावरखानाकडे जासूद पाठवून त्याला परत येण्याची आणि आपल्या खात्याचा कारभार हाती घेण्याची विनंती केली. त्याने असेही कळविले की, "तुमच्या- [ ३ ] ( १७२ ) सारख्या लायक सेवकाविरुद्ध कारस्थानी शत्रूंनी मला ज्या काही गोष्टी सांगितल्या त्या ऐकून त्यावर विश्वास ठेवण्यात मी मूर्खपणा केला आहे, याची उशिरा का होईना पण मला जाणीव झाली आहे. तुम्ही जर परत येऊन तुमच्या अधिकाराचा स्वीकार कराल तर तुमच्याबाबत सर्व तऱ्हेचा समजूतदारपणा दाखविला जाईल याबद्दल तुम्ही खात्री बाळगून असा." इब्राहीम आदिलशहाकडून आलेल्या ह्या आमंत्रणामुळे दिलावरखानाला अतिशय आनद वाटला. त्याने उत्तरादाखल असे कळविले की, "जर आपण मला माझे जिवीत आणि मालमत्ता याला कोणताही धोका पोहोचणार नाही याची ग्वाही देत असाल तर आपल्या पायाशी हजर होण्याची मी त्वरा करीन." दिलावरखानाने मागितलेली सर्व आश्वासन आदिलशहाने त्याला दिल्यावर आपल्या हातात आता पूर्ण सत्ता येईल आणि आपण पूर्वीप्रमाणेच सुलतानाला बंदिवासात ठेवू या आशेने त्याने बुरहाण निजामशहापाशी विजापूरला जाण्याकरिता निरोप मागितला. बुरहाण निजामशहाने त्याला खूप सांगितले की, "तू विजापूरकडे जाण्यात आपला सर्वनाश ओढवून घेण्याची त्वरा करीत आहेस. कारण तू तुझ्या सुलतानाबरोबर ज्या तऱ्हेने वागला आहेस त्याला सहजासहजी क्षमा होईल असे मला वाटत नाही." दिलावरखानाने बुरहाण निजामशहाच्या सांगण्याकडे दुर्लक्ष केले. दिलावरखान हा त्यानंतर विजापूरकडे निघाला. संध्याकाळी तो तेथे येऊन पोहोचला. त्या सुमारास बारा इमामांच्या बागेतून इब्राहीम आदिलशहा हा समारंभपूर्वक राजवाड्याकडे चालला होता. दिलावरखानाने सुलतानाची भेट घेऊन त्याला कुर्निसात केला आणि सुलताना-

बरोबर चाललेल्या लवाजम्यात तो पायीच सामील झाला. काही पावले चालून गेल्यानंतर सुलतानाने एलियासखानाला बोलावले. दिलावरखानाची शिक्षा देण्याची आवडती पद्धत – एखाद्या माणसाचे डोळे काढून टाकण्याची होती. ती शिक्षा कशी असते याची चुणूक दिलावरखानाला दाखविण्याची सुलतानाने एलियासखानाला आज्ञा केली. दिलावरखानाने सुलतानाला आणून-भाकून सांगितले की, "तुम्ही दिलेल्या क्षमा आणि सुरक्षितता यांच्या आश्वासनावर मी येथे आलो आहे." दिलावरखानाच्या या सांगण्याचा काही उपयोग झाला नाही. सुलतानाने त्याला सांगितले की, "तुला मी जे आश्वासन दिले होते ते फक्त तुझ्या जीविताला आणि मालमत्तेला धक्का लावणार नाही असे. तुझे डोळे काढल्याने या दोहोंपैकी कशालाच धक्का लागत नाही." सुलतानाच्या आज्ञेनुसार दिलावरखानाला आंधळे [३] (१७३) करण्यात आले. त्याची सातान्याच्या किल्ल्यामध्ये रवानगी करण्यात आली. तेथेच तो मरेपर्यंत कैदी म्हणून राहिला.[३२८ब]

(१६६) याप्रमाणे यशस्वीरित्या आपल्या भयंकर शत्रूचा निकाल लावल्यानंतर सुलतानाने आपल्या सर्व सरदारांना जहागिरीवरून त्वरित निघून येण्याची आणि बुरहाण निजामशहाविरुद्ध चाल करून जाण्यासाठी तयारी करण्याची आज्ञा केली. त्याने प्रथम आपल्या बर्गी प्रमुखांना सहा हजार घोडेस्वार देऊन शत्रूच्या छावणीचे दळणवळण आणि रसद तोडण्यासाठी रवाना केले. यानंतर त्याने शाबान महिन्यात रुमीखान दक्कनी याला आपल्या सैन्याचा सेनापती नेमले आणि दहा हजार घोडेस्वार देऊन त्याची रवानगी केली. त्यानंतर काही काळाने एलियासखानाला आपल्या खाजगीतले तीन हजार सैनिक देऊन रुमीखानाला मदत करण्यासाठी रवाना केले. बर्गी प्रमुखांनी शत्रूला अतिशय सत्रस्त केले आणि त्यांच्यावर पाठविण्यात आलेल्या अनेक तुकड्यांचा पराभव केला. अखेराला बुरहाण निजामशहा स्वतः त्यांच्यावर चाल करून जाण्यासाठी निघाला. खऱ्या फौजेशी मुकाबला करता येणे अशक्य झाल्याने बर्गींनी भीमानदी परत ओलांडली. तेव्हा भीमानदीला उतार होता. परंतु ते पलीकडे पोहोचल्यानंतर डोंगरातून वाहून आलेल्या उसळत्या पाण्याच्या प्रचंड प्रवाहामुळे नदी दुथडी भरून वाहू लागली. बर्गींच्या सुदैवाने आलेल्या या पुरामुळे निजामशाही फौजांना त्यांचा पाठलाग करता आला नाही. यावर बुरहाण निजामशहा आपल्या छावणीकडे परतला. शत्रूच्या छावणीत आता दुष्काळ आणि रोगराई यांनी भयंकर धुमाकूळ घातला. शत्रूची [३] (१७४) अनेक माणसे आणि जनावरे त्यात नष्ट झाली. त्यामुळे थोडीफार रसद मिळविण्याच्या हेतूने आपल्या देशाच्या बाजूने काही मजला एवढी माघार घेणे शत्रूला भाग पडले. बुरहाण निजामशहाला जेव्हा रसदीचा साठा मिळाला आणि त्याच्या छावणीतील रोगराईचे प्रमाण जेव्हा कमी झाले तेव्हा सोलापूरच्या किल्ल्याला वेढा देण्याच्या उद्देशाने त्याने पुन्हा चाल केली. त्याला वाटेत रुमीखान आणि एलियासखान यांनी

शाबान हिजरी १००० }
एप्रिल इ. स. १५९२ }

प्रतिकार केला आणि वऱ्हाडचा अमीर उलूउमराव नूरखान याच्या हाताखाली असलेल्या त्याच्या सैन्याच्या मुख्य भागाचा त्यांनी पराभव केला. निजामशहाच्या सैन्यातील शंभर हत्ती आणि चारशे घोडे त्यांनी हस्तगत केले. या नुकसानीमुळे बुरहाण निजामशहाची परिस्थिती दिवसेंदिवस ढासळत चालली. सतत आणि दमविणाऱ्या मोहिमांना त्याचे सैनिक कंटाळून गेले आणि त्याच्या छावणीतून त्यांनी पळ काढला. त्याच्या अनेक अधिकाऱ्यांनी त्याला ठार मारण्याचा कट केला. त्याला पदच्युत करून त्याचा मुलगा इस्माईल याला सिंहासनावर बसविण्याची त्यांची इच्छा होती. हा कट त्याच्या नजरेस आला. त्याच्या भोवती असलेल्या सर्वांचा त्याला संशय येऊ लागला आणि त्याने अहमदनगरच्या दिशेने माघार घेण्यास सुरुवात केली. परंतु पहिल्याच मजलीत शत्रूने त्याला इतके हैराण केले की इब्राहीम आदिलशहाबरोबर तह घडवून आणण्याखेरीज आणखी माघार घेणे शहाणपणाचे नाही असा त्याने विचार केला. या कारणास्तव त्याने आपले वकील इब्राहीम आदिलशहाकडे रवाना केले, आणि वरील हेतू सिद्धीस जावा म्हणून त्याने करमुल्ला येथे मुक्काम केला. जवळजवळ एक महिन्यापर्यंत इब्राहीम आदिलशहाने कसलेही बोलणे करण्यास साफ नकार दिला. त्याने विजापूरच्या सरहद्दीत भीमा नदीच्या तीरावर बुरहाण निजामशहाने बांधलेला किल्ला उद्ध्वस्त करून टाकण्यास त्याला भाग पाडले. अतिशय नाखुषीने निजामशहाने ही गोष्ट केली, आणि तटबंदीचा पहिला दगड त्याने आपल्या हाताने फेकून दिला. त्यानंतर त्याच्या सैनिकांनी किल्ल्याचे सर्व बांधकाम पाडून टाकले. ह्या किल्ल्याच्या बांधकामासाठी बुरहाण निजामशहाला अतिशय कष्ट पडले होते आणि खूप द्रव्यही खर्च करावे लागले होते. इब्राहीम आदिलशहाच्या मुलखावर कोणतेही कारण नसताना आक्रमण केल्याबद्दल त्याला पूर्णपणे पश्चात्ताप झाला होता. त्याच [ ३ ] ( १७५ ) मनःस्थितीत त्याने अतिशय जलदरीत्या अहमदनगरकडे परत कूच केले.

( १६७ ) हिजरी १००१ इ. स. १५९३ यांप्रमाणे राज्याच्या सर्व कारभाराची घडी पुन्हा सुव्यवस्थित बसविल्यावर सुलतानाने मलबारच्या रायांना वठणीवर आणण्याचे ठरविले. बलिलखानाला तेथून परत बोलाविल्यापासून त्यांनी खंडणी देण्यामध्ये कुचराई केली होती. या कारणास्तव त्याने त्यांच्यावर भरपूर सैन्य देऊन मंजनखानाची रवानगी केली. मंजनखानाने बंकापूर येथे आल्यावर मुक्काम केला आणि तेथे मलबारच्या राजांना आपापली खंडणी घेऊन त्याला भेटण्यासाठी बोलावले. जे आज्ञा मान्य करतील त्यांना संरक्षण देण्याचे त्याने मान्य केले परंतु जे बंडखोरी करतील त्यांचा सूड घेतला जाईल अशी त्याने धमकी दिली. बहुतेक राजांनी त्याच्या मागण्या मान्य करण्याचे आणि एकत्र मिळून येऊन त्याला भेटण्याचे ठरविले मलबारच्या रायांमध्ये गंगा नाईक हा प्रमुख होता. त्याच्याकडे दहा हजार घोडेस्वार आणि पायदळ एवढी फौज होती. तो मंजनखानाला प्रथम भेटण्यासाठी गेला. इतर रायांना त्याच्या सामर्थ्याचा मत्सर वाटला आणि आपल्या-

विरुद्ध कारस्थान करण्यासाठी तो मंजनखानाकडे गेला असावा असा त्यांना संशय आला. त्यामुळे त्यांनी ठरविलेल्या बेताप्रमाणे वागावयाचे नाही असा निर्णय घेतला आणि ते आपल्या डोंगरातील तळांकडे माघारी फिरले. अनोळखी अशा देशात त्यांचा पाठलाग करणे शहाणपणाचे ठरणार नाही असा मंजनखानाने विचार केला आणि गंगा नाईकाला घेऊन अरसपा नाईक याच्या ताब्यातील जेर्ह या ठिकाणाविरुद्ध त्याने चाल केली. अरसपा नाईकाने आपल्या दोस्तांबरोबर संगनमत करून वीस हजार फौज जमा केली आणि मंजनखानाने जेर्हला घातलेला वेढा उठविण्याचा प्रयत्न केला. जवळजवळ तीन दिवसपर्यंत विजापूरच्या सैनिकांबरोबर त्याच्या भीषण चकमकी झाल्या. आजुबाजूच्या उंच-सखल जमिनीमुळे विजापुरी सेनेला आपल्या घोडदळाचा उपयोग करणे शक्य झाले नाही. त्यामुळे त्यांना मिळालेला विजय हा कायम स्वरूपाचा आहे किंवा नाही याविषयी शंका निर्माण झाली. परंतु अखेर सुलतानाच्या दैवयोगाने परिस्थितीवर मात केली. यापुढे आणखी प्रतिकार करणे हे [ ३ ] ( १७६ ) निरर्थक आहे याबद्दल अरसपा नाईक याची खात्री पटली. त्याने खंडणी देण्याचे कबूल केले. मंजनखानाला त्याने दोन उत्कृष्ट हत्ती नजर दिले, आणि सुलतानासाठी अनेक दुर्लभ आणि मौल्यवान चिजा भेटीदाखल दिल्या. तो विजापूरच्या सैन्याला देखील येऊन मिळाला आणि म्हैसूरच्या वेढ्यात त्याने मंजनखानाला मदत दिली. म्हैसूर त्यावेळी वेंकटाद्रीच्या ताब्यात होते. तीन महिन्यांत म्हैसूरचा पाडाव झाला. त्याबरोबरच वीस उत्कृष्ट हत्ती विजापुरी सैनिकांच्या ताब्यात आले. प्रदेश जिंकून घेण्याच्या कामात मंजनखान झपाट्याने प्रगती करीत होता अशावेळी बेळगाव येथे सुलतानाच्या भावाने बंड केल्यामुळे त्याला पुन्हा परत बोलाविण्यात आले. पुन्हा एकदा मलबारमधील वातावरण अस्थिरपणाकडे झुकले.

(१६८) राजपुत्र तहमास्प याला दोन मुलगे होते. एकाचे नाव इब्राहीम आदिलशहा आणि दुसऱ्याचे राजपुत्र इस्माईल. इस्माईलचे लहानपण हे त्याच्या भावाबरोबरच गेले. तो जेव्हा वयात आला तेव्हा येथील राज्यकर्त्यांच्या सर्वसाधारण पद्धतीप्रमाणे दिलावरखानाने त्याला बेळगावच्या किल्ल्यात बंदिवासात ठेवण्यासाठी रवाना केले. दिलावरखानाची हकालपट्टी झाल्यावर इब्राहीम आदिलशहाने आपला एक खाजगी सेवक इस्माईलकडे पाठवून त्याच्याबरोबर असा निरोप दिला की, " आपण दोघांनी एके ठिकाणी राहावे अशी जी तुझी इच्छा आहे ती मला राजकारणाच्या काही नाजूक बाबींमुळे पुरी करता येत नाही याबद्दल मला अतिशय वाईट वाटत आहे. असे जरी असले तरी माझे तुला असे आश्वासन आहे की, तुझ्या दर्जाप्रमाणे तुला कसेही वागण्याची मी मुभा देईन आणि तुझ्याविषयी माझ्या मनात त्या अनुषंगाने प्रेमाची भावना राहील. " त्याचवेळी त्याने बेळगावच्या सुभेदाराला हुकूम पाठविला की, " राजपुत्र इस्माईल याला किल्ल्यामध्ये मुक्त स्वातंत्र्य दिले जावे आणि बंदिवासामुळे त्याला जो त्रास सहन करावा लागत आहे त्याची तीव्रता कमी होण्या-

साठी म्हणून त्याला सर्व तऱ्हेच्या सुखसोयी आणि करमणुकीची साधने उपलब्ध करून देण्यात यावीत." त्याशिवाय इब्राहीम आदिलशहाने त्याच्या खाजगी खर्चासाठी म्हणून दरमहा एक हजार होनांचे उत्पन्न त्याला नेमून दिले. काही काळपर्यंत राजपुत्र इस्माईल हा आपल्या परिस्थितीबद्दल समाधान बाळगून राहिला. परंतु नंतर एकाएकी आपल्या भावाच्या उदार वागणुकीबद्दलची जाणीव त्याच्या मनातून [ ३ ] ( १७७ ) नाहीशी झाली आणि त्याने इब्राहीम आदिलशहाविरुद्ध कारस्थान केले. बेळगावचा रमजान ९ हिजरी १००२ | सुभेदार आणि तेथील शिबंदी यांना त्याने हळूहळू मे १२ इ. स. १५९३ | आपल्या पक्षाकडे वळवून घेतले. त्याने गुप्तपणे दरबारातील काही अधिकारी लाच देऊन आपल्या बाजूकडे वळविण्यात यश संपादन केले. ९ रमजान, हिजरी १००२ या वर्षी त्याने किल्ल्याचा ताबा घेतला, आणि उघडउघड बंडाचे निशाण उभारले.

( १६९ ) आपल्या भावाच्या वागणुकीला आपल्या काही कृतघ्न अमीरांचा विश्वासघातकीपणा कारणीभूत झाला आहे हे इब्राहीम आदिलशहाने ओळखले. आपल्या भावाविरुद्ध कोणत्याही अतिरेकी उपायांची योजना करण्यास तो नाखूष होता. म्हणून त्याने राजपुत्र इस्माईल याला भरपूर तंबी देऊन तिचा त्याच्या मनावर काय परिणाम होतो हे बघण्याचे ठरविले. हा उद्देश सिद्धीस नेण्यासाठी म्हणून त्याने पूजनीय अशा शहानूर आलम याला इस्माईलकडे रवाना केले, आणि त्याच्या करवी इस्माईलला असा निरोप पाठविला की, "तू जर तुझ्या बेताल कारस्थानापासून परावृत्त होशील तर मी तुला क्षमा करीन आणि पूर्वी ज्या आदराच्या आणि आपुलकीच्या भावनेनें तुला वागवीत असे तशीच वागणूक मी तुला पुढे देईन." शहा नूर आलम याने तऱ्हेतऱ्हेने राजपुत्र इस्माईल याचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा हितोपदेश ऐकण्याचे ऐवजी त्याने त्याला कैदेत टाकले. आपल्या भावाविरुद्ध रणांगणात उभे राहण्याची त्याने जारीने तयारी सुरू केली. त्याच वेळेला त्याने आपले वकील बुरहाण निजामशहाकडे पाठवून त्याच्याकडे मदतीची याचना केली. बुरहाण निजामशहाने मोठ्या सैन्यानिशी त्याला मदत करण्याचे आश्वासन दिले. राजपुत्र इस्माईल याने अमीर उल्उमरा, ऐनउल्मुल्क आणि अंकुसखानाचा मानलेला मुलगा यांना आपल्या बाजूकडे वळवून घेतले होते. सिंहासनाबाबत उद्भवलेल्या कटकटी इतक्यातच मिटू नयेत अशी ऐनउल्मुल्क याची इच्छा होती आणि म्हणून त्याने इस्माईलला उघडउघड मदत देण्यास नकार दिला. साहजिकच इस्माईलला दरम्यानच्या काळात बेळगावचा किल्ला आणि आजूबाजूचा प्रदेश यावरच समाधान मानून राहणे भाग पडले. तेथे त्याच्या नावे **खुत्बा** वाचण्यात आला. ऐनउल्मुल्क याने इब्राहीम आदिलशहाला फसविण्यासाठी आपल्या राजनिष्ठेचा देखावा पराकोटीला नेला. त्यात त्याचा उद्देश असा होता की, [३] (१७८) राजपुत्र इस्माईलच्या वतीने केलेले कारस्थान प्रत्यक्षात उतरविण्याइतकी परिस्थिती

निर्माण होईपर्यंत आपल्याला संधी मिळावी. इब्राहीम आदिलशहाला राजपुत्र इस्माईल याने शहा नूर आलम याच्या संबंधात केलेल्या वर्तनाची हकीकत कळताच त्याला अतिशय संताप आला. त्याने **मीर नोबत** एलियासखान याची बंडाचा बिमोड करण्यासाठी आणि बेळगावला वेढा देण्यासाठी सैन्य देऊन रवानगी केली.

( १७० ) लवकरच एलियासखान दहा हजार सैनिक घेऊन बेळगावसमोर दाखल झाला. इस्माईलला त्याचे पाठिराखे अजून येऊन मिळाले नव्हते. तेव्हा त्याने आपल्याला किल्ल्यात कोंडून घेतले. यावर सुलतानाच्या फौजेने किल्ल्याला जारीने वेढा दिला. ऐनउल्मुल्क हाही आपल्या राजनिष्ठेचा आव कायम राखण्यासाठी म्हणून एलियासखानाच्या सैन्याला येऊन मिळाला परंतु खाजगीरित्या त्याचा कल हा राजपुत्र इस्माईलकडे असल्यामुळे त्याने त्याच्याबरोबर सतत पत्रव्यवहार चालू ठेवला, आणि किल्ल्यातील शिबंदीला रात्रीच्या वेळी आपल्या छावणीतून धान्य आणि इतर जरुरीच्या गोष्टी पुरविण्यास सुरुवात केली. या विश्वासघातकी वर्तनाची खबर सुलतानाला मिळाली. तेव्हा ऐनउल्मुल्क याच्या राजनिष्ठेची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने त्याने त्याला दरबारात निघून येण्याचा हुकूम पाठविला. " काही महत्त्वाच्या बाबींवर तुमचा सल्ला घेण्याची माझी इच्छा आहे आणि या बाबी तुमच्याशिवाय इतर दुसऱ्या कोणाजवळही मी सांगू शकत नाही, " असेही सुलतानाने त्याला कळविले. आपल्याविषयी संशय बळावेल या भीतीने आपल्या अनेक मित्र-मंडळीसहित ऐनउल्मुल्क याने विजापूरकडे कूच केले. तेथे तो इतक्या चतुरपणे वागला की, त्याच्यावर केलेल्या आरोपाबाबत खुद्द इब्राहीम आदिलशहाच्या मनातच संभ्रम निर्माण झाला. क्षुल्लक संशयापोटी आपल्या एका जुन्या चाकराचा नाश करणे इब्राहीम आदिलशहाच्या जीवावर आले. त्याला असे वाटले की, प्रत्यक्षात आपल्या मनात आलेल्या संशयाला जरी जागा असली तरी देखील आपल्याकडून ऐनउल्मुल्कवर वेळोवेळी जी मेहेरनजर झाली आहे तिची पाळेमुळे त्याच्या मनात खोलवर रुजून बसलेली असतील. अशा परिस्थितीत त्याने आपल्या मनाशी विश्वासघातकी कटाचा कदाचित बेत रचला असला तरी देखील वरील गोष्ट त्याला या गोष्टीपासून निश्चित दूर राहण्यास भाग पाडेल. हा हेतू मनात धरून आणि त्याचा सन्मान करण्याच्या [३] (१७९) उद्देशाने त्याने भर दरबारात त्याला बोलावून त्याला मोठ्या मानाची वागणूक दिली. तत्कालीन पद्धतीप्रमाणे ऐनउल्मुल्क याने तीन वेळा जमिनीचे चुंबन घेतले आणि तो सिंहासनाकडे चालू लागला. सिंहासनापाशी आल्यावर त्याने सिंहासनाच्या खुरांचेही चुंबन घेतले. परंतु त्याक्षणी त्याच्या मनातल्या सद्सद्विवेकबुध्दीने इतक्या जोराने उचल खाल्ली की, त्याचे शरीर थरथर कापू लागले. ते पाहिल्यावर सुलतानाने त्याला बसावयाची आज्ञा केली, आणि त्याची मनःस्थिती पूर्ववत व्हावी म्हणून आपले तोंड बाजूला फिरविले. त्यानंतर सुलतानाने स्वतःबरोबर भोजन करण्याची त्याला परवानगी दिली. हे झाल्यावर सुलतानाने त्याच्याविषयी हरतऱ्हेने चांगुलपणाची भावना प्रगट

केली, आणि त्याला अतिशय उंची असा पोषाख, रत्नजडित खंजीर, काही अबलख घोडे आणि हिऱ्याचा कमरपट्टा या वस्तू बक्षिशीदाखल दिल्या व तावडतोब त्याला सैन्याला जाऊन मिळण्याची परवानगी दिली. दुसऱ्या दिवशी त्या विश्वासघातकी ऐनउल्मुल्काने राजधानीतून प्रयाण केले, आणि सुलतानाने त्याच्याबाबत दाखविलेली दयाबुद्धी विसरून राजपुत्र इस्माईलबरोबर त्याने पत्रव्यवहार सुरू केला आणि पूर्वीप्रमाणेच त्याला सर्व तऱ्हेने मदत देण्यास सुरुवात केली. बादशहाच्या छावणीत ऐनउल्मुल्कचे वर्तन हा एक सर्वसाधारण चर्चेचा विषय होऊन बसला. यानंतर थोड्याच काळाने विजापूरचा कोतवाल हियातखान हा दारूगोळा आणि रसद पोहोचविण्याच्या कामावरून छावणीकडून परतत असताना ऐनउल्मुल्क याच्या निवासस्थानाजवळून चालला होता. ऐनउल्मुल्कने त्याला चार घटका मौज करण्याकरिता बोलाविले. त्याऱ्याकडून आपल्याला भरपूर पैसा उकळता येईल असे हियातखानाला वाटले. ऐनउल्मुल्क याच्या विश्वासघातकी वर्तनाचा पुरावा त्याला छावणीत मिळाला होता. हियातखानाने त्याबद्दल त्याची भरपूर निर्भर्त्सना केली, आणि त्याचवेळी आपल्याला माहीत असलेली सर्व हकीकत सुलतानाच्या कानावर घालण्याची धमकीही त्याने ऐनउल्मुल्क याला दिली. तेव्हा ऐनउल्मुल्क याला असे वाटले की, आपण केलेले कारस्थान हे आता छपवून ठेवण्याच्या पलीकडे गेलेले आहे. म्हणून त्याने हियातखान याच्या हातापायात बेड्या चढविल्या आणि उघडउघड सुलतानाच्या विरुद्ध [३](१८०) बंड पुकारल्याचे जाहीर केले. त्याने ठिकठिकाणच्या शिबंदीच्या सुभेदारांना पत्रे लिहून राजपुत्र इस्माईल याला तावडतोब येऊन मिळण्याविषयी त्यांना आवाहन केले. त्यापैकी बहुतेकांनी अनुकूल अशी वचने दिली आणि उघडपणे कारवाई करण्याचे अगोदर त्यांनी एकंदरीत परिस्थितीचे वारे कसे वाहतील हे पाहण्याचे ठरविले. परंतु मिरज येथील शिबंदीने आपल्या सुभेदाराला बंदिस्त केले आणि इस्माईलच्या नावे सुलतान म्हणून द्वाही फिरवली. आता ऐनउल्मुल्क याने बुरहाण निजामशहाला तातडीची पत्रे पाठवून असे कळविले की, " राजपुत्र इस्माईल याच्या बाजूने अतिशय अनुकूल अशी परिस्थिती निर्माण झाली आहे, तरी तुम्ही अहमदनगरहून त्वरेने कूच करून या. आपल्या मदतीने सर्वांचा शेवट सुखदायी होईल याबद्दल मला खात्री आहे. आपण ही मदत मला दिल्यास सोलापूर आणि शहादुर्ग हे किल्ले आणि त्यांच्या अंमलाखालील जिल्हे आपल्या हाती सोपविण्याचे वचन मी देतो. " ऐनउल्मुल्क याने किल्ले देण्याबद्दलचे जे वचन दिले त्या वचनाचा बुरहाण निजामशहाला मोह पडला, आणि त्याने अहमदनगरहून कूच केले. ऐनउल्मुल्क याने आपली तुकडी पाठीमागे काढून घेतली आणि एलियासखानाशी संगनमत करून बेळगावसमोरून कूच करण्यास सुरुवात केली. या घटनेमुळे विजापूर राज्याच्या साऱ्या प्रदेशात एकच गोंधळ माजून राहिला. ह्या संधीचा फायदा घेऊन मलबारच्या हिंदूंनी बंकापूरच्या जिल्ह्यांवर आक्रमण केले. एलियासखानाने भीतीने म्हणा किंवा विश्वासघाताने म्हणा

बेळगावचा वेढा उठविला आणि हुकुमाशिवाय तो राजधानीला परतला. त्याच्या तेथील आगमनाने दरबारात एकच घबराट पसरली. सर्वत्र राज्याला धोका देणाऱ्या बंडाचा उद्भव झाला आणि बंडखोर राजपुत्राची मर्जी संपादन करण्याच्या हेतूने अनेक दरबारी मंडळींनी राजवाड्याचा ताबा घेण्याचे मनसुबे रचले. इब्राहीम आदिलशहाची ह्या प्रसंगी परीक्षाच होती. परंतु त्याने यावेळी मनाचा जो कणखरपणा दाखविला त्याने राष्ट्रद्रोहाच्या ज्या ज्या कारवाया केल्या गेल्या होत्या त्यावर मात केली. त्याने एलियासखान, हाजी महमद आणि रुमीखान यांना त्यांच्या पदावरून दूर केले. दरबारातील अनेक मंडळी विश्वासघातकी वर्तनाकडे वळली असावीत अशा दाट संशय इब्राहीम आदिलशहाच्या मनात होता. त्यांना जरब बसावी म्हणून त्याने वरील तिघांना कडक बंदिवासात ठेवले आणि त्याचवेळी त्याने आपल्या [ ३ ] ( १८१ ) सर्व अमिरांना राजधानीकडे निघून येण्यासंबंधीचे हुकूम सोडले.

( १७१ ) आपल्याला प्रतिकार करण्यासाठी रणांगणात फौज नाही हे पाहिल्यावर ऐनउल्मुल्क याने दहा हजार घोडेस्वार आणि वीस हजार पायदळ घेऊन बेळगावकडे कूच केले. तेथे त्याने किल्ला सोडून जाण्याबद्दल इस्माईलचे मन वळविले. या सुमारास बुरहाण निजामशहाने अहमदनगरहून कूच करण्यास सुरुवात केलेली होती. तो येऊन मिळण्याची वाट न पाहताच ऐनउल्मुल्क याने इब्राहीम आदिलशहावर चाल करून जाण्याचे ठरविले. वरील हालचालीची बातमी इब्राहीम आदिलशहाला लागताच त्याने हमीदखानाची आपल्या सैन्याच्या सेनापती पदावर नेमणूक केली आणि त्याला बंडखोरांविरुद्ध पाठविले. तो इसापूर येथे येऊन पोहोचल्यावर बंडखोरांच्या सैन्यातील काही विश्वासू अधिकाऱ्यांनी त्याची भेट घेतली. त्याने आपल्याला येऊन मिळण्याविषयी हमीदखानाचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. इब्राहीम आदिलशहाकडून त्याला मिळालेल्या गुप्त आदेशाप्रमाणे त्याने वरील दूतांचे चांगल्या प्रकारे स्वागत केले. त्याने त्यांना असे आश्वासन दिले की, " प्रतिकार करण्याचा माझा बिलकुल इरादा नाही. उलट राजपुत्राला येऊन मिळण्याचेच माझ्या मनात आहे. राजपुत्राने किल्ला सोडून जर सेनेचे अधिपत्य स्वीकारले तर कोणत्याही परिश्रमाशिवाय किंवा बुरहाण निजामशहाच्या उपकाराच्या ओझ्याखाली राहिल्याशिवाय त्याला सिंहासन सहज मिळविता येईल. " या स्पष्टीकरणामुळे ऐनउल्मुल्क फसला आणि नेहमीसारखी काळजी न घेता मूर्खपणाने त्याने राजपुत्र इस्माईलला घेऊन बेळगावपासून काही अंतरावर असलेल्या एका मोठ्या मैदानाकडे कूच केले. या ठिकाणी आपण अतिशय सुरक्षित आहोत या भावनेने हमीदखान आणि आदिलशहाच्या सैन्यातील इतर अधिकारी यांच्या स्वागताची तयारी करण्याच्या बेतातच तो दंग राहिला. ऐनउल्मुल्क याचा मुलगा घालिबखान याने इब्राहीम आदिलशहाबरोबर कृतघ्नपणाने वागल्याबद्दल आपल्या बापाजवळ नापसंती दाखविली होती. त्याचा काहीच उपयोग झाला नव्हता. घालिबखानाने आता आपल्या बापाला

हमीदखानाविरुद्ध इशारा दिला आणि अचानकपणे घाला पडू नये म्हणून कोणत्याही परिस्थितीत सावधपणा बाळगण्याबद्दल त्याला विनविले. बंडखोरांच्या [ ३ ] (१८२) छावणीच्या दिशेने हमीदखान शिस्तबद्धपणे चाल करून आला. तेथे राजपुत्र आणि ऐनउल्मुल्क आपल्या प्रमुख पाठिराख्यांसह त्याचे स्वागत करण्यासाठी एका भव्य शामियान्यात उभे होते. त्यामुळे कोठलाही प्रतिकार न होता त्यांच्या अगदी नजीक त्याला सहजपणे जाता आले. तेथे येऊन पोहोचल्यावर त्याने आपला बुरखा फेकून दिला आणि बंडखोरांच्या छावणीवर जोराचा हल्ला करून त्यांच्यामध्ये धामधूम उडवून दिली. राजपुत्र आणि ऐनउल्मुल्क यांना जेव्हा आपली फसवणूक झाल्याचे दिसून आले तेव्हा ते घोड्यावर स्वार झाले आणि आपली फौज एकत्र जमविण्याचा अयशस्वी प्रयत्न त्यांनी केला. ऐनउल्मुल्क याला तलवारीचा वार लागून तो घोड्यावरून खाली पडला आणि ताबडतोब सुहेलखानाने त्याचे मस्तक धडावेगळे केले. राजपुत्र इस्माईलचा उद्देश अंकुसखानाकडे पळून जाऊन त्याच्या मदतीने बुरहाण निजामशहाला जाऊन मिळण्याचा होता. त्या प्रयत्नात असताना त्याला पकडण्यात आले. बंडखोरांच्या सैन्याची दाही दिशांना पांगापांग झाली. हमीदखानाने आपल्याला मिळालेल्या विजयाचा वृत्तान्त, ऐनउल्मुल्क याच्या मस्तकाबरोबर विजापूरला पाठवून दिला. 'आपल्या राजवाड्याच्या मुख्य दरवाजाच्या समोर एका मोठ्या खांबावर बंडखोराचे मस्तक ठेवण्यात यावे' असा इब्राहीम आदिलशहाने हुकूम दिला. त्या ठिकाणी जवळजवळ एक आठवडाभर ऐनउल्मुल्क याचे मस्तक टांगून ठेवण्यात आले. त्याचवेळी शुजातखान कुर्द याची रवानगी छावणीकडे करण्यात आली. आणखी नवीन बंडाचा उद्भव होऊ नये म्हणून तेथे त्याने सुलतानाच्या हुकुमावरून राजपुत्र इस्माईल याच्या जीवनाची इतिश्री केली. हमीदखान विजापूरला परत आला. तेथे इतर अनेक अमिरांबरोबर सुलतानाच्या मेहेरबानीने तो उच्च पदावर चढला. ऐनउल्मुल्कच्या मस्तकाचे कोणतेही अवशेष राहू नयेत म्हणून ते एका मोठ्या तोफेत घालून हवेत उडविण्यात आले. मिरजेच्या शिबंदीतील सतरा जणांना विजापूरला बेड्या घालून आणण्यात आले. [ ३ ] (१८३) त्यांनी आपल्या सुभेदाराला कैद करून बंडखोरांची बाजू घेतलेली होती. इतरांना जरब बसावी म्हणून त्या सर्वांना ठार करण्यात आले. बंडखोरांना मदत करण्यासाठी बुरहाण निजामशहा हा परंडा किल्ल्यापर्यंत चाल करून आला होता. त्याला जेव्हा बंडाचा उपशम झाल्याची आणि सरकारचे अधिकार पुन्हा प्रस्थापित झाल्याची बातमी कळली तेव्हा त्याने अतिशय घाईघाईने अहमदनगरच्या दिशेने माघार घेतली.

(१७२) ज्याने आपल्या एका शब्दाने हे विश्व निर्माण केले तो आदि पुरुष आपल्या अतुलनीय सामर्थ्याची चुणूक दाखविण्याकरिता वारंवार मानवी कल्पनाशक्तीला आश्चर्यचकित करणाऱ्या क्रांत्या घडवून आणतो. त्याचे अतिशय मोठे असे प्रात्यक्षिक इब्राहीम आदिलशहाला मिळालेल्या या सर्वांनी अनपेक्षिलेल्या विजयाशिवाय

कोणतेही असू शकत नाही. कारण दरबारातील सर्व अमिरांचा ओढा इस्माईलकडे होता आणि विजापूर राज्यातील सर्व जमीनदारवर्ग हा बंड करण्याच्या तयारीत होता.

( १७३ ) या घटना झाल्याला काही काळ लोटल्यानंतर बुरहाण निजामशहाने पेणकोंड्याच्या रायाबरोबर मैत्रीचा तह केला आणि इब्राहीम आदिलशहाच्या राज्यावर पुन्हा आक्रमण करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे त्याने मुर्तजाखान अंजू याची दहा हजार घोडेस्वार देऊन शहादुर्ग आणि सोलापूर यांचा पाडाव करण्यासाठी रवानगी केली. त्याचवेळी त्याचा दोस्त पेणकोंड्याचा राया याने कर्नाटकच्या सरहद्दीलगतच्या काही किल्ल्यांना वेढा दिला. मुर्तजाखान अंजू हा परंड्यापर्यंत चाल करून आला. तेथे त्याला असे कळले की, पेणकोंड्याच्या रायाने अजून कूच करण्यास सुरुवात केलेली नाही तेव्हा त्याने तेथेच मुक्काम करण्याचा विचार केला. परंड्याहून त्याने आजूबाजूचा प्रदेश उद्ध्वस्त करण्यासाठी आणि लुटण्यासाठी आपल्या सैन्यातील तुकड्यांची रवानगी केली. निजामशाही फौजांना इब्राहीम आदिलशहाच्या सैन्याने जबरदस्त पायबंद घातला. निजामशाही फौजांचा सेनापती उजबेकखान हा एका चकमकीत ठार झाला. या घटनेची इतर सैन्याला अतिशय दहशत बसली आणि त्यांनी आपल्या इतर हालचाली थांबविल्या. रजब महिन्यात बुरहाण निजामशहा हा अतिसाराच्या विकाराने भयंकर आजारी पडला. [ २ ] (१८४) या बातमीने परंडा येथे असलेल्या त्याच्या सैन्यामध्ये भयंकर खळबळ माजली. तेथे असलेल्या सैन्य-प्रमुखांत मतभेद निर्माण झाले. मुर्तजाखानाला अशी भीती वाटली की, बंडखोर अधिकाऱ्यांकडून आपला खून होईल. या भीतीने त्याने आपले अधिकार सोडले आणि आपल्या अनेक मित्रांसहित तो अहमदनगरला निघून गेला. याचवेळी खलिफअराब आणि किजलबाशखान हे दोघेजण इब्राहीम आदिलशहाकडे आश्रयासाठी पळून गेले. आजारामुळे बुरहाण निजामशहाच्या शरीराची दुर्दशा झाली होती, तर अधिकाऱ्यांमधल्या भांडणामुळे त्याचे मन उद्विग्न झाले होते. अशा परिस्थितीत तो मरण पावला. त्याच्यामागे त्याचा मुलगा इब्राहीम हा गादीवर आला. मिया मंजू दक्नी हा राज्याचा प्रतिनिधी झाला. इब्राहीम निजामशहाची आई ही हबशी होती. तिने आपल्या देशातील अमिरांना इतके उत्तेजन दिले की, मिया मंजू दक्नीला आपला अधिकार चालविणे अशक्य झाले. विजापूरच्या वकिलांबरोबर या उपऱ्या हबशी अमिरांनी इतक्या बेअदबीचे वर्तन केले की, त्यांच्या वर्तनाचा तिटकारा येऊन त्यांनी अहमदनगरचा त्याग केला.

रजब १००३ / मार्च १५९५

( १७४ ) आपल्या वकिलांच्या झालेल्या बेअदबीचा इब्राहीम आदिलशहाला इतका संताप आला की, त्याने इब्राहीम निजामशहावर सूड घेण्याचा निश्चय केला. या कारणास्तव त्याने २० शाबान रोजी विजापूरहून कूच केले आणि बहमन हळ्ळी येथे मुक्काम केला. तेथून तो शहादुर्गवर चालून गेला. निष्कारण युद्ध व्हावे अशी त्याची इच्छा नव्हती. त्याने मनाशी असा निश्चय केला होता की, जर का हबशी

शाबान २०, हिजरी १००३ / मे १८, इ. स. १५९५

वजिरांच्या वर्तनाबद्दल माफी मागण्यासाठी आणि तहाची इच्छा प्रकट करण्यासाठी जर अहमदनगरहून वकील पाठविण्यात आले तर या मोहिमेवरून परत फिरावयाचे या आशेने त्याने निश्चयपूर्वक परंतु सावकाशपणे शहादुर्गकडे कूच केले, [३] (१८५) आणि तेथे त्याने आपल्या सैन्याची मुख्य छावणी दिली.

(१७५) इखलासखान आणि अहमदनगरचे हबशी अमीर यांनी या शांततेच्या वाटाघाटी फलद्रूप करण्याऐवजी इब्राहीम निजामशहाला घेऊन तीस हजार सैन्य आणि पुष्कळशा तोफखान्यासहित सरहद्दीकडे कूच केले. ही बातमी कळल्यावर आता विलंब लावणे फलदायी नाही असा विचार करून इब्राहीम आदिलशहाने अहमदनगरच्या सैन्याविरुद्ध हमीदखानाला इतर नावाजलेल्या अधिकाऱ्यांसह रवाना केले. जर का इब्राहीम निजामशहा हा विजापूरच्या राज्यात चाल करून आला नाही तर त्याच्या विरुद्ध युद्धाची कारवाई टाळण्याची सूचना त्याने त्यांना दिली. निजामशाही सैन्याने विजापूरच्या सीमा ओलांडल्या. त्याबरोबर विलंब न लावता हमीदखानाने त्यांच्यावर हल्ला केला. दोन्ही फौजांत रणधुमाळी माजली आणि विजापूरच्या सैन्यावर पराभवाची पाळी येऊन ठेपली. त्यांच्या सैन्याची डावी फळी विस्कळीत होऊन तेथील सैनिक रणांगणातून पळून गेले. त्यांचा शत्रूच्या उजव्या फळीतील सैनिकांनी जारीने पाठलाग केला परंतु हमीदखानाने फौजेच्या मध्य आणि उजव्या आघाडीच्या जोरावर कणखर-पणाने लढाई चालू ठेविली. सुरुवातीला आपल्याला धोका पोहोचू नये म्हणून इब्राहीम निजामशहा हा सैन्याच्या पिछाडीला होता. त्याने जेव्हा शत्रूच्या आघाडीच्या काही भागांतील सैनिक पळताना पाहिले तेव्हा तो आपले खाजगीतील सैनिक घेऊन पुढे सरकला. आदिलशाही सैन्याच्या उजव्या फळीचे नेतृत्व सुहेलखान या खोजाकडे होते. त्याने जेव्हा ही गोष्ट पाहिली तेव्हा त्याने इब्राहीम निजामशहावर हल्ला चढविला. त्यावेळी इब्राहीम निजामशहाच्या रक्षकांनी त्याला पाठीमागे फिरण्याची विनंती केली परंतु त्याने या गोष्टीला संमती दिली नाही. त्याने असे उद्गार काढले की, " माझा भाऊ इस्माईल याने दिलावरखानापासून पळून जाणे अपमानास्पद मानले तेव्हा मी एका खोजासमोरून पळ काढणे हे निश्चितच मला भूषणावह नाही. " इतके बोलून त्याने आपली तलवार उपसली आणि आपल्या हत्तीला सुहेलखानाकडे चलण्याचा इषारा केला परंतु [३] (१८६) थोड्याशाच झटापटीनंतर त्याला बाणाचा वर्मी घाव बसला आणि तो ताबडतोब मरण पावला. त्याच्या सेवकांनी त्याचा देह उचलला आणि ते अहमदनगरकडे पळून गेले. हमीदखानाशी लढत असणाऱ्या सैन्याच्या दुसऱ्या भागाने जेव्हा आपल्या सुलतानाच्या मृत्यूची बातमी ऐकिली तेव्हा ते अतिशय भयचकित झाले आणि विजय हातातोंडाशी आलेला असताना देखील त्यांनी रणांगणातून पळ काढला. अहमदनगरच्या सैन्याने आपले सर्व सामानसुमान आणि तोफखाना व त्याचप्रमाणे सुलतानाचे हत्ती वगैरे सामुग्री रणांगणात तशीच टाकली. विजयाची यत्किंचितही अपेक्षा न करणाऱ्या विजापुरी सैनिकांना अनपेक्षितरित्या विजयश्रीने माळ घातली. वरील सर्व लूट त्यांच्या

हाती पडली. आपल्या विजयाच्या नशेत हमीदखान दंग असताना शहादुर्ग येथे आपल्या सैन्याचा पराभव झाल्याची वार्ता इब्राहीम आदिलशहाला कळली. कारण युद्धाच्या सुरुवातीला आदिलशहाच्या डाव्या फळीतील सैनिकांचा पाडाव होऊन ती विस्कळीत झाली होती. त्यातील अनेक सैनिक सुलतानाच्या छावणीपर्यंत पळून गेले होते. त्यांनी लढाईचा जो भयंकर वृत्तांन्त सांगितला त्यामुळे इब्राहीम आदिलशहाच्या छावणीत एकच घबराट निर्माण झाली. काहीजण म्हणाले की, बहुतेक सर्व अमीर ठार झाले असून एका हत्तीशिवाय इतर सर्व हत्ती शत्रूच्या हाती सापडले आहेत. जवळजवळ तीन दिवसपर्यंत वरील युद्धासंबंधीचे अनिश्चित वृत्तांन्त आणि भीतीदायक हकिकती छावणीत येऊन पोहोचत होत्या. परंतु चवथ्या दिवशी आदिलशाही सैन्याला मिळालेल्या अनपेक्षित विजयाची आणि इब्राहीम निजामशहाच्या मृत्यूची वार्ता देणारे वृत्तान्त काहींनी आणले. परिणामी अनेकांच्या भीतीने स्पंदन पावणाऱ्या हृदयात आनंदाच्या लाटा उसळल्या. या घटनेचा फायदा घेता येईल अशी निश्चित परिस्थिती निर्माण झालेली असताना आणि शत्रूच्या राज्यात गोंधळाचे वातावरण पसरले असताना देखील इब्राहीम आदिलशहाने निजामशाही प्रदेशावर आक्रमण करण्यास संमती दिली नाही. त्याने हमीदखानाला सरहद्दीपासून मागे बोलाविले आणि त्या महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यात तो विजापूरला माघारी फिरला. [३] (१८७)

हिजरी १००४ परंतु त्याने हिजरी १००४ पर्यंत राजधानीत प्रवेश केला नाही.
इ. स. १५९५ त्याने भीमेच्या तीरावर मुक्काम केला. वरील युद्धाचा फायदा घेऊन
इ. स. १५९६ कर्नाटकच्या एका जमीनदाराने आदोनीच्या किल्ल्याला वेढा दिला होता. रसदीच्या अभावी किल्ला पडण्याचे बेतात होता. आदिलशहाने आपल्या
१३ मोहरम, छावणीवरून त्या जमीनदाराविरुद्ध सैन्याची रवानगी केली.
हिजरी १००४ १३ मोहरम या दिवशी सुलतानाने विजयोन्मादात शहरात प्रवेश
९ सप्टेंबर, केला. नागरिकांनी जयजयकारात त्याचे स्वागत केले या प्रसंगी
इ. स. १५९६ त्यांनी शहरातील रस्ते सोने आणि चांदी यांचे धागे, मखमल, किनखाब इतर उंची कापडे आणि भारीभारी दागिने यांनी सुशोभित केले होते. यानंतर लवकरच बातमी आली की, शाही फौजा चाल करून येत आहेत हे पहाताच कर्नाटकातील काफरांनी आदोनीचा वेढा उठवून आपल्या देशाकडे पळ काढलेला आहे, आणि त्यांच्यातील अनेकजणांची पाठलागात कत्तल करण्यात आलेली आहे. या सुमारास मीरमहमद सालेह हमदानी हा सन्मान्य सय्यद विजापूरनजीक येऊन पोहोचला. त्याने महमद पैगंबराचे काही केस आपल्याबरोबर आणले होते इतक्या अमूल्य अवशेषाचे दर्शन ३२९० घ्यावे याची उत्सुकता सुलतानाला वाटली आणि म्हणून तो मीर हमदानी याला भेटण्यासाठी शहराबाहेर गेला. त्याने त्याला विजापूर शहरात आणले आणि अनेक दिवसपर्यंत बादशाही थाटाने त्याला राहवून घेतले. सुलतानाने मीर हमदानी याला विजापूर दरबारात कायमचे राहण्याबद्दल गळ घालण्याचा प्रयत्न

केला. परंतु मक्केची यात्रा करण्याबद्दल मीर हमदानी हा अतिशय उत्सुक [२] (१८८) होता. त्याने जेव्हा मक्केला जाण्यासाठी सुलतानाचा निरोप घेतला त्यावेळी सुलतानाने त्याला अनेक भारी वस्तू भेटीदाखल दिल्या. मीर हमदानीने सुलतानाला पैगंबराचे दोन पवित्र केस दिले त्याने त्या केसाची स्थापना अतिशय काळजीपूर्वक, हिऱ्यांनी मढविलेल्या एका सोन्याच्या मखरात केली. या ठिकाणाला दर शुक्रवारी रात्री आणि इतर सर्व सुट्ट्यांच्या दिवशी तो वारंवार भेट देत असे.

( १७६ ) या सुमारास अहमदनगर राज्यामध्ये सरदारांमध्ये निर्माण झालेल्या भांडणांनी परमावधी गाठली. परिणामी एका पक्षातील अमिरांनी बादशहा अकबर याचा मुलगा मुराद मिर्झा याला दक्षिणेत पाचारण केले. दक्षिणेमध्ये मोगलांच्या सत्तेचा प्रसार करण्यासाठी या दुहीचा फायदा घेण्याच्या उत्कट इच्छेने महमद मुराद याने तीस हजार फौज घेऊन गुजराथेतून अहमदनगरकडे कूच केले. अहमदनगर शहराला त्याने वेढा दिला. परंतु वेढा अनेक महिने चालल्यानंतर तो उठविणे त्याला भाग पडले. वेढल्या गेलेल्या निजामशाही राजधानीच्या मदतीसाठी इब्राहीम आदिलशहाने मोठे सैन्य देऊन सुहेलखानाला रवाना केले. तो तेथे येऊन पोहोचण्याचे अगोदरच मोगल वेढा उठवून निघून गेले होते. ३३०□ ३३०अ★ ३३१★ ३३२★ ३३३★ ३३४★ ३३५★ ३३६★.

# पुस्तक चौथे

## प्रकरण चौथे

### खानदेशच्या फारुकी घराण्याचा इतिहास

### मलिक राजा फारुकी [४] (२८०)

(१) खानदेशच्या प्रांतात पहिल्याप्रथम स्वातंत्र्य पुकारणारा पुरुष म्हणजे मलिक राजा हा होता. हा खान जहान फारुकीचा मुलगा. याचे वाडवडील अल्लाउद्दीन खिलजी आणि महमद तघलघ यांच्या कारकिर्दीत दिल्ली दरबारातील प्रतिष्ठित अमीर-उमरावांपैकी होते.

(२) ख्वाजा जहानच्या मृत्यूचे वेळी त्याचा मुलगा मलिक राजा हा अतिशय तरुण होता. त्याच्या वाट्याला फारच थोडी वडिलार्जित जहागीर आली. त्याच्या स्वभावात पाहिजे तितका आत्मविश्वास नव्हता. परंतु [४] (२८१) त्याजबरोबर सर्वसाधारणपणे राजे-रजवाड्यांभोवती लाळ घोटीत फिरणाऱ्या नीच आणि हलकट खुषमस्कऱ्यांच्या समूहांतून आपली वर्णी लावावी असे कधीही न वाटण्याइतका स्वाभिमान त्याच्या अंगात होता. वयाने तो थोडा मोठा झाल्यावर त्याला असे आढळून आले की त्याच्या वाट्याला आलेल्या थोड्याशा जहागिरीपैकी आता त्याच्या जवळ काहीच शिल्लक उरले नाही. म्हणून तो सुलतानाच्या फौजेत खाजगी शिलेदार म्हणून भरती झाला. शिकारीच्या नादापाई तो अगदी वेडा होत असे. एक दिवस तो सुलतानाच्या दिमतीस शिकारीसाठी सुलतानाची स्वारी गेली असताना होता. तेव्हा त्याचे असामान्य कौशल्य काही दरबारी मंडळींच्या दृष्टोत्पत्तीस आले. याचा परिणाम असा झाला की त्याची भरती फिरोज तघलघ याच्या घोलमखास ऊर्फ खास शरीर संरक्षकदलात झाली. यानंतर काही काळाने एका प्रसंगी सुलतान शिकारीसाठी गुजराथेत गेला असताना सुलतानाने १३ ते १४ कोस एका काळविटाचा पाठलाग केला. सुलतानाच्या अनुयायांपैकी एकदोघेजण सोडले असता बाकीचे सर्व पाठीमागे पडले. सुलतान आणि त्याचा घोडा यांची पुरी दमछाक झाली. सुलतान आता आपल्या छावणीपासून खूपच दूर आला होता. त्याचा घोडा पार दमून गेला होता. अशावेळी कित्येक तास भटकण्यात घालविले तरी सुलतान आपल्या छावणीत पोहोचण्याची शक्यता अतिशय कमी होती. अशावेळी एका शिकारी कुत्र्याच्या जोडीला पाठीशी-घालून दौडत येत असलेला एक घोडेस्वार सुलतान आणि त्याचे अनुयायी यांच्या दृष्टीस पडला. राजाच्या अनुयायांनी त्याला आपल्याकडे येण्यास खुणावले. तो

आल्यावर सुलतानाच्या चाकरांनी खाण्याचे मिळविण्याची तो काही व्यवस्था करू शकेल काय असे त्याला विचारले. त्याच्यापाशी घोडा होता. घोड्यावर त्याने केलेली शिकार लादली होती. घोड्याकडे बोट दाखवून तो म्हणाला, " माझ्यापाशी काही खाद्यपदार्थ आहेत, आणि जर बादशहाची इच्छा असली तर मी इथल्याइथे विस्तव पेटवून उत्तमपैकी अन्न तयार करून देईन. " बादशहाला असे कळले की, हे सांगणारा दुसरा तिसरा कोणी नसून त्याचा भूतकाळातील एक मान्यवर अधिकारी खानजहान याचा मुलगा मलिकराजा हा आहे. हे कळल्यावर त्याने मलिकराजा याला बढती देण्याचे ठरविले. त्यानंतर पहिल्याप्रथम जो दरबार भरला त्यात त्याने मलिकराजा याला दोन हजार घोडेस्वारांचा मनसबदार या अधिकारावर नेमले. पुढे काही काळाने दक्षिणेच्या सरहद्दीवर असलेल्या थाळनेर आणि कुरोंडे या जिल्ह्यांची जहागिरी त्याने त्याला बहाल केली. [४] (२८२)

(३) हिजरी ७७२ } हिजरी ७७२ यावर्षी मलिक राजाने सैन्य घेऊन
इ. स. १३७० } आपल्या सरहद्दीकडे कूच केले. रक्ताचा एक थेंबही न सांडता त्याने शांततेने आपल्या जहागिरीच्या लहान जिल्ह्यावर कबजा केला. परंतु बागलाणाचा राजा बहर्जी याचा त्याने पराभव केला, आणि दिल्लीच्या सुलतानांना वार्षिक खंडणी देण्याचे त्याच्याकडून कबूल करून घेतले. त्याच्या या पहिल्या मोहिमेत त्याला खंडणी म्हणून पाच मोठे आणि दहा लहान असे हत्ती आणि त्याशिवाय मोती आणि जडजवाहीर, त्याचप्रमाणे सोनेचांदी भरपूर प्रमाणात मिळाली. स्वारीहून परतल्यानंतर त्याने सोन्याच्या झालरीने मढविलेल्या किनखाबाच्या झुली हत्तींवर चढविण्याचा हुकूम केला आणि खानदेशामध्ये तयार होणारी मलमल आणि इतर अनेक वस्तू आणि त्याचप्रमाणे मोती अनेक उंटांवर लादून सुलतानाकडे भेट म्हणून त्यांची रवानगी केली. फिरोझ तुघलखने त्यावेळी असे उद्गार काढले की, मलिक राजाने आज जी गोष्ट केली ती गुजराथच्या सुभेदाराने यापूर्वीच पार पाडणे अवश्य होते. मलिक राजाच्या या कर्तबगारीमुळे सुलतानाने त्याला खानदेशचा सिपाह सालार[३३६.१०] म्हणजे सरसेनापती हा किताब देऊन त्याचा सन्मान केला, आणि ३ हजार घोडेस्वारांचा अधिकारी या जागेवर त्याला बढती दिली. काही वर्षांच्या अवधितच त्याने आपल्याजवळील स्वारांची संख्या १२ हजारांवर नेली, आणि गोंडवनापासून गढमंडलापर्यंतचे राजेरजवाडे यांजवर खंडणी लादली. त्याच्या नावाला इतकी किर्ती प्राप्त झाली की, जजनगर या देशाच्या राजाने त्याचा देश आणि खानदेश यामधील मोठे अंतर लक्षात घेऊनही मलिक राजा याच्याबरोबर मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले.

(४) फिरोजशहा याच्या मृत्यूनंतर माळव्यामध्ये दिलावरखान घोरी याने आपले स्वातंत्र्य जाहीर केले. त्यानंतर दिलावरखान आणि मलिक राजा यांच्यामध्ये अतिशय घनिष्ट असे संबंध प्रस्थापित झाले. इतके की, दिलावरखानाने आपली मुलगी खानदेशचा सुभेदार मलिक राजा याचा मुलगा मलिकनसीर याला विवाहात दिली.

याच सुमारास गुजराथचा मुजफ्फरशहा याने आपले स्वातंत्र्य जाहीर [४] (२८३) केले. यानंतर काही अंतस्थ बंडाळीचा उद्भव झाला त्याचा फायदा घेऊन आणि दिलावरखानाच्या पाठिंब्यावर पूर्णतया विसावून मलिक राजाने गुजराथच्या प्रांतावर आक्रमण केले आणि सुलतानपूर आणि नंदुरबार हे जिल्हे उद्ध्वस्त केले. मुजफ्फरशहा त्यावेळी आपल्या राज्यातील हिंदू काफरांची बंडाळी मोडण्यात गुंतला होता. त्याच्या कानावर वरील बातमी पडताच त्याने झपाट्याने सुलतानपूरकडे चाल केली. तेथून माघार घेणे शहाणपणाचे आहे हे मलिक राजाला उमगले आणि त्याने थाळनेर किल्ल्याचा आश्रय घेतला. या किल्ल्यापर्यंत मुजफ्फरशहा चाल करून आला आणि त्याने किल्ल्याला सक्त वेढा दिला. याप्रसंगी मुजफ्फरशहाबरोबर संधी घडवून आणण्यासाठी त्याने आपल्या आश्रयाखालील चतुरस्र आणि विद्वान मंडळींची नियुक्ती केली. आपल्या राज्यातील काफरांच्या बंडाचा बिमोड करण्यासाठी आपल्याला खानदेश आणि माळवा येथील सुलतानांची मदत मिळेल अशी त्याला आशा होती आणि म्हणून त्याने तहाच्या अटींना आपली संमती दिली. यानंतरच्या काळात मलिक राजाने आपल्या ताब्यातील मुलखापुरत्याच आपल्या लष्करी कारवाया मर्यादित ठेवल्या. आपली उर्वरित हयात त्याने अत्यंत दुर्दम उत्साहाने संस्कृतीच्या निरनिराळ्या कलाकुसरीच्या अंगोपांगांची आणि शेतीच्या कलेची वृद्धी आणि विकास करण्यात व्यतीत केली. आपला मृत्युकाळ समीप आला आहे याची जेव्हा त्याला जाणीव झाली तेव्हा त्याने आपले दोन मुलगे मलिक नसीर आणि मलिक इफ्तिकार यांना बोलावून पाठविले. त्यापैकी थोरल्याला त्याने आपला कुलगुरु आणि आचार्य दौलताबादचा शेखजैनुद्दीन याजकडून प्रसाद म्हणून मिळालेला इच्छा आणि अनुमती यांचा निदर्शक असा पेहेराव दिला आणि त्याची आपला युवराज म्हणून नियुक्ती केली. आपला धाकटा मुलगा मलिक इफ्तिकार याला त्याने थाळनेरचा किल्ला आणि जिल्हा जहागिरी म्हणून बहाल केला. हिजरी ८०१ या वर्षी, शाबान महिन्याच्या २२ तारखेला मलिक राजा मरण पावला. त्याला थाळनेर या गावी पुरण्यात आले. त्याची एकंदर कारकीर्द २९ वर्षे एवढी झाली. ३३६·२० [४] (२८४)

शाबान २२<br>हिजरी ८०१<br>एप्रिल २८<br>इ. स. १३९९

(५) हिजरी १०१३ (इ. स. १६०४) या वर्षी मी, या ग्रंथाचा कर्ता, विजापूरच्या इब्राहीम आदिलशहाच्या मुलीच्या पालखीबरोबर विजापूरहून बुऱ्हाणपूर येथे गेलो. असीरच्या किल्ल्याचा पाडाव झाल्यानंतर मी मिर्जा अली इस्फहानी याला फारुकी घराण्याचा एखादा इतिहास उपलब्ध आहे किंवा काय याबद्दल विचारले. मिर्जाने आपल्या माहितीत असा इतिहास नाही असे उत्तर दिले. परंतु तो पुढे असे म्हणाला की मलिक राजापर्यंत माहिती असलेला फारुकी घराण्याचा वंशवृक्ष आपल्या पाहण्यात आला. या वंशवृक्षाची आपण नक्कल केली आणि ती आपल्याजवळ आहे. वंशावळीत फारुकी घराण्याची उत्पत्ती कशी झाली याचा वंशवृक्ष आहे तो पुढील-

प्रमाणे आहे : खानदेशचा मुसलमान सुलतान मलिक राजा हा खलिफ उमर फरुक याचा वंशज. मलिक राजा हा आपल्या वंशावळीचा माग पुढीलप्रमाणे लावतो—मलिक राजा हा खानजहानचा मुलगा, खान जहान हा अलिखानाचा मुलगा, अलिखान हा उथमनखानाचा मुलगा, उथमनखान हा सिमानशहाचा मुलगा, [३३६.३ब] सिमानशहा हा अशवशहाचा मुलगा, अशवशहा हा अर्मियनशहाचा मुलगा, अर्मियनशहा हा बाल्खच्या इब्राहीमशहाचा मुलगा, इब्राहीमशहा आधमशहाचा मुलगा, आधमशहा हा अहमदशहाचा मुलगा, अहमदशहा हा महमूदशहाचा मुलगा, महमूदशहा हा महमदशहाचा मुलगा, महमदशहा हा आजीमशहाचा मुलगा, आजीमशहा हा अशगरचा मुलगा, अशगर हा महमद अहमदचा मुलगा, महमद अहमद हा इमाम नसीर अबदुल्ला याचा मुलगा आणि इमाम नसीर हा उमर उल्फरुक ऊर्फ खलिफा अर्थात परमेश्वराच्या शेवटच्या प्रेषिताचा प्रतिनिधी याचा मुलगा.

( ६ ) मलिक राजाने दौलताबादचा सद्धर्मी अवलिया जैनुद्दीन [ ४ ] (२८५) याचे शिष्यत्व पत्करले. त्याच्याकडून त्याला इच्छा आणि अनुमती यांचा निदर्शक असा पेहेराव प्राप्त झाला. तो त्याने आपला मुलगा नसीर याच्या स्वाधीन केला. त्याने वरीलप्रमाणेच तो आपल्या मुलाकडे सोपविला. याप्रमाणे बापाकडून मुलाकडे अशी या पोषाखाची पाठवणी जवळजवळ २०० वर्षेपर्यंत झाली. खानदेशाच्या स्वतंत्र सुलतानांपैकी शेवटचा सुलतान म्हणजे राजा अलीखान. असा हा बहुमुल्य ठेवा राजा अलीखानाचा मुलगा बहादुरखान याने जेव्हा आपले राज्य गमावले तेव्हा त्याच्याजवळ होता.

## नसीरखान फारुकी [ ४ ] ( २८६ )

( ७ ) मलिक नसीर याच्या कारकिर्दीत या घराण्याची सत्ता अमर्याद वाढली. मलिक नसीरखान याने देखील राजसत्तेची निदर्शक अशी चिन्हे धारण केली. त्याच्या कारकिर्दीत विद्वान मंडळींना ठिकठिकाणाहून पाचारण करण्यात आले आणि वाङ्मयाच्या विकासाला उत्तेजन देण्यात आले. मलिक नसीर याला गुजराथेच्या सुलतानाकडून खान ही पदवी मिळाली. आपला बाप मलिक राजा फारुकी हा जेव्हा मृत्युवश झाला तेव्हा त्याची इच्छा शाहीछत्र आणि चामर धारण करण्याची होती हे जाणून त्याने आपल्या नावे जाहीररित्या खुत्बा वाचला जावा असा हुकूम दिला. त्याने आसाअहीर याकडून असीरचा किल्ला जिंकून घेतला. [३३६.४ब]

( ८ ) असीरचा किल्ला मूळ ज्यांच्या कबजात होता त्या [ ४ ] (२८७) घराण्यासंबंधीची माहिती अतिशय उद्बोधक असल्यामुळे ती मी या ठिकाणी संपूर्णपणे देत आहे. खानदेशातल्या एक ऊंच डोंगरमाथ्यावर एक मेंढपाळ राहात असे. त्याच्याजवळ गुरेढोरे आदिकरून अमाप संपत्ती होती. खरे सांगायच तर खानदेशा-

मधल्या एका प्रमुख जमीनदारांपैकी तो होता. त्याच्या वाडवडिलांच्या ताब्यात ही जहागीर जवळजवळ ७०० वर्षे चालत आलेली होती. त्यांच्या ताब्यात गुराढोरांचे जे कळप होते त्यांचे जंगलात सुळसुळाट असणाऱ्या दरोडेखोरांच्या हल्ल्यापासून संरक्षण करण्यासाठी त्यांनी फार पूर्वी असीरच्या टेकडीभोवती एक कोट बांधला होता. आपल्या बापाची जहागिरी आसाला मिळाली. अतिशय काटकसरी असल्यामुळे त्याच्याजवळील गुरांच्या कळपांची संख्या ५ हजार म्हशी, ५ हजार गाई, २० हजार मेंढ्या आणि १ हजार घोड्यांइतकी झाली. त्याशिवाय त्याने आपल्या स्वतःच्या संरक्षणासाठी आणि शेतीच्या सर्व कामाला उपयोगात आणता येतील असे १ हजार अनुचर बाळगले. ज्या ज्या वेळी गोंडवन आणि खानदेश येथील शेतकऱ्यांवर संकटे आली तेव्हा तेव्हा त्यांनी आसाकडे मदतीसाठी धाव घेतली आणि आसा किंवा ज्याला आसा गवळी म्हणूनही ओळखत त्याने या संकटांचा परिहार केला. आसाअहीर याच्याजवळील संपत्तीत आणि सामर्थ्यात जरी अमर्याद वाढ झाली तरीदेखील त्याला आसाअहीरा किंवा गवळी हे नाव कायमचे चिकटले. मलिक राजा हा थाळनेर येथे येण्यापूर्वी काही काळ अगोदर खानदेश आणि गोंडवन या जिल्ह्यांत भीषण असा दुष्काळ पडला. या दुष्काळाच्या परिणामातून कोळी अथवा भिल्ल जमातीचे जेमतेम दोन-तीन हजारांवर लोक देखील सहीसलामत निसटू शकले नाहीत. यावेळी गोंडवन आणि खानदेश येथे आसाच्या ताब्यात अनेक धान्यांची कोठारे होती. धान्य विकण्यासाठी [४] (२८८) आसाच्या अधिकाऱ्यांनी ती खुली केली. आसाची बायको ही अत्यंत उदार स्वभावाची होती. तिने आसाची प्रार्थना केली की, " तुम्ही गरीबगुरीबांकडून द्रव्य न घेता त्यांना हे धान्य नेण्याची परवानगी द्या आणि अशा तऱ्हेने इहलोकात चांगले नाव संपादन करा, आणि परलोकात मोक्षसाधना करा (किंवा अमरत्व प्राप्त करून घ्या)." दुष्काळ पीडितांना मदत व्हावी म्हणून आसाने शहराच्या जुन्या भिंती पाडून टाकल्या आणि शहराभोवती मजबूत दगडाच्या एका किल्ल्याची उभारणी केली. या कामामुळे त्याला अनेक मजुरांना चाकरीवर घेता आले. ज्यांना शारीरिक कष्ट करता येणे शक्य नव्हते अशा वृद्ध आणि अपंग माणसांना त्याने धान्य वाटले. या दगडी बांधकामाला आसाअहीर असे नाव पडले आणि पुढे त्याचा अपभ्रंश असीर असा झाला. [३३६.५ロ]

(९) मलिक राजा याने खानदेश प्रांतावर आपली सत्ता स्थापन केल्यावर तेथील जमीनदारांमध्ये पहिल्या प्रथम आसाने त्याच्याशी निष्ठा व्यक्त केली. याचे कारण आसा हा शांत प्रवृत्तीचा आणि अति-महत्त्वाकांक्षा नसलेला असा होता. मलिक राजाला आपल्या जागी स्थिरस्थावर होण्यासाठी ज्या ज्या काही वस्तूंची गरज लागली त्या त्या सर्व त्याने मलिक राजाला भेट म्हणून दिल्या. काही काळानंतर मलिक राजाच्या मनात असा विचार आला की असीरचा किल्ला हा अतिशय मजबूत आणि आपल्या राज्यांच्या मध्यभागी वसलेला आहे. असा किल्ला जर एखाद्या महत्त्वाकांक्षी अधिका-

त्याच्या ताब्यात गेला तर आपल्या राज्याच्या सरकारची घडी खिळखिळी करण्यास आणि ती हादरवून टाकण्यास अशा व्यक्तीला सहज शक्य होईल. परंतु मलिक राजावर आसाचे इतके उपकार होते की, जबरदस्तीने असीरचा किल्ला त्याच्या [४] (२८९) हातातून हिसकावून घेणे हे मलिक राजाला प्रशस्त वाटले नाही. [३३६.६□] ज्यावेळी मलिक नसिर याने राज्यकारभार हाती घेतला त्यावेळी आसाकडून त्याला अनेक प्रकारे वैयक्तिक मदतीचा लाभ झाला. मलिक नसिरला अशी खात्री पटली की आपल्या शांतताप्रिय स्वभावामुळे आसा त्याच्यावर हल्ला करण्यासाठी आपल्याला कोणतेही निमित्त देणार नाही. तरी देखील नसीर याने असीर बळकाविण्याचा आणि तेथे आपली राजधानी करण्याचा निश्चय केला. आपला बेत सिद्धिस नेण्यासाठी म्हणून त्याने पुढील योजना आखली. त्याने आसाला पुढील मजकुराचे पत्र पाठविले. बागलाण आणि अंतूर येथील राजांनी मोठ्या फौजा जमा केल्या आहेत. त्यानी आपले वडील मलिक राजा यांजबरोबर जसे संबंध ठेवले होते तसे आपल्याबरोबर ठेवलेले नाहीत. खेडल्याच्या राजानेही त्याला धमकी दिली आहे. थाळनेरचा किल्ला आपल्या वडिलांनी आपल्या मृत्युसमयी प्रकट केलेल्या इच्छेनुसार आपला भाऊ मलिक इफ्तिकार याच्या ताब्यात आहे. लालिंगचा आपल्या ताब्यातील किल्ला शत्रूच्या मुलुखाच्या इतक्या नजीक आहे की, तो कोणतेच संरक्षण आपल्याला देऊ शकणार नाही. म्हणून माझी आपल्याला अशी विनंती आहे की माझ्या जनान्याच्या मंडळींना आपण असीर किल्ल्यात आधार द्यावा. आसाने या गोष्टीला खुषीने आपली संमती दिली. मलिक नसीर याचा जनाना येईल त्यांना राहण्यासाठी सुखसोयींनी योग्य अशा खोल्या तयार ठेवण्याची आणि त्यांच्याकडे पूर्णपणे लक्ष देण्याची त्याने आज्ञा केली. पहिल्या दिवशी स्त्रियांनी भरलेल्या पुष्कळ डोल्या [३३६.७□] किल्ल्यामध्ये आल्या. या स्त्रियांना आसाची [४] (२९०) बायको आणि मुली भेटण्यासाठी गेल्या. दुसऱ्या दिवशी खबर आली की, मलिक नसिर याची बायको, आई आणि इतर जनाना यांना घेऊन २०० डोल्या येत आहेत. ही बातमी कळल्यावर त्यांचे स्वागत करण्यासाठी आसाने किल्ल्याचे दरवाजे खोलण्याचा हुकूम दिला. त्यांना भेटण्यासाठी म्हणून आपल्या सर्व मुलांसह आसा आपल्या अंतःपुरापासून बऱ्याच अंतरापर्यंत गेला. परंतु जेव्हा त्याने ह्या डोल्यांत स्त्रियांच्या ऐवजी सशस्त्र शिपाई भरलेले बघितले तेव्हा त्याच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. ह्या शिपायांनी डोल्यांमधून पटापट उड्या मारल्या आणि आसाला त्याच्या सर्व कुटुंबियांसहित ठार मारले. त्याच्या घराण्यातील एकही पुरुष मनुष्य त्यांनी शिल्लक ठेवला नाही. (सर्व लहान सहान मुलांची देखील त्यांनी कत्तल केली.) किल्ल्यातील रहिवाशांना या घटनेचा इतका भयंकर धक्का बसला की, ज्या ठिकाणी अशी क्रूर कत्तल झाली तेथून पळून ते आपल्या कुटुंबियांसहित बाहेर निघून गेले. मलिक नसिर ह्यावेळी लालिंगच्या किल्ल्यात होता. आपला बेत सिद्धीस गेल्याचे जेव्हा त्याला कळले तेव्हा तो असीर येथे आला, आणि त्याने किल्ल्याची मजबूत डागडुजी करण्यास

प्रारंभ केला. परंतु ते काहीही असले तरी फारुकी घराण्यातील कोणत्याही व्यक्तीला आसाच्या संपत्तीचा उपभोग घेता आला नाही, ही घटना पुराव्यानिशी सिद्ध झाली आहे. असीरचा किल्ला पडला त्यावेळी जी संपत्ती व जडजवाहीर मलिक नसीरच्या ताब्यात आले ते सर्व पुढे अकबर बादशहा २०० वर्षांनंतर दक्षिणेत चाल करून आला आणि असीरचा किल्ला त्याने ताब्यात घेतला तेव्हा त्याच्या हाती पडले.[३३६-८०]

(१०) फारुकी घराण्याचा हितकर्ता आणि गुरुस्थानी असलेला सिद्धपुरुष दौलताबादचा शेख जैनुद्दिन याला ही बातमी कळली. तेव्हा काफरांच्या [४] (२९१) विरुद्ध मिळालेल्या यशाबद्दल मलीक नसीरचे अभिनंदन करण्यासाठी त्याने खानदेशाकडे कूच केले. शेखला भेटण्यासाठी म्हणून मलीक नसीर आपल्या कुटुंबियांसहित पुढे कूच करून गेला आणि त्याने तापी नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर आपला तळ दिला. शेख जैनुद्दिन आपल्या अनेक शिष्यांना घेऊन तेथे पोहोचला आणि त्याने आपले तंबू नदीच्या पूर्व किनाऱ्यावर ठोकले. मलीक नसीर नदीपार करून गेला आणि त्याने शेखचो आपल्याबरोबर असीरला परतण्यासाठी म्हणून खूप मनधरणी केली. आपल्याला तापी नदी पार करण्याची परवानगी नाही असे सांगून शेखने नसीरची विनंती नाकारली. काही काळ मलीक नसीर आणि शेख हे आपापल्या छावण्यांत मुक्काम करून राहिले. त्यानंतर शेखने आपली तेथून जाण्याची इच्छा प्रकट केली. शेखने खानदेशाच्या प्रांतात एखाद्या जहागिरीचा स्वीकार करावा अशी मलीक नसीरने त्याला अतिशय गळ घातली. त्यावर शेखने उत्तर दिले की, आमच्यासारख्या विरक्तांना जहागिरीची काय गरज आहे? परंतु मलीक नसीर याने नदीच्या पूर्व किनाऱ्यावर एक शहर बांधावे आणि त्याला शेखच्या नावावरून जैनाबाद असे नाव द्यावे, आणि पश्चिम किनाऱ्यावर नसीर ज्या ठिकाणी तळ देऊन होता त्या ठिकाणी दुसरे शहर बांधून त्या शहराला दौलताबादचा प्रसिद्ध शेख बुरहाण उद्दीन [३३६-९०] याच्या नावावरून बुऱ्हाणपूर असे नाव द्यावे एवढी मात्र विनंती त्याने मलीक नसीरला केली. मलीक नसीर याने बुऱ्हाणपूर येथे आपली राजधानी वसवावी अशी शिफारस शेखने केली. याप्रमाणे दोन्ही शहरे बांधण्यात आली. त्यापैकी बुऱ्हाणपूर हे नंतर फारुकी घराण्याच्या राजधानीचे शहर बनले.

(११) एक अतिशय जुनी परंतु अतिशय सत्य अशी म्हण आहे ती अशी की, एका गोधडीत दहा दरवेशी राहतील परंतु दोन सुलतानांना सामावण्यास एखादे मोठे राज्यही लहान आहे. खानदेशाच्या बाबतीत अगदी असेच घडले. कारण जेव्हा मलीक नसीर याने असीरवर ताबा मिळविला तेव्हा त्याची कुटिल दृष्टी आपल्या भावाच्या थाळनेर येथील जहागिरीवर पडली. थाळनेरचा ताबा घेण्यासाठी त्याने माळव्याच्या [४] (२९२) सुलतानाला आपल्याला मदत देण्यास उद्युक्त केले. हा हेतू मनात धरून हिजरी ८२० या वर्षी मलीक नसीर याने थाळनेरच्या दिशेने कूच केले आणि आपला मेव्हणा माळव्याचा सुलतान होशंगशहा यांची मदत

हिजरी ८२० / इ. स. १४१७

मिळविली. मलीक इफ्तिकार याला आपला भाऊ सैन्यासह येताना पाहून आश्चर्याचा धक्का बसला. त्याने मलीक नसीरकडे निषेध प्रगट केला, आणि गुजराथचा सुलतान अहमदशहा याच्याकडून मदत मिळविण्यासाठी त्याला लिहिले. परंतु त्याचा हा प्रयत्न व्यर्थ गेला. सुलतान होशंग याचा मुलगा आणि मलीक नसीर याचा पुतण्या गिजनी-खान हा ५ हजार घोडेस्वार घेऊन मलीक नसीरच्या मदतीसाठी आला. त्यांच्या संयुक्त कारवाईला यश येऊन थोड्याच कालावधीत थाळनेरचा किल्ला पडला. मलीक इफ्तिकार हा कैद झाला. त्याला असीरच्या किल्ल्यावर पाठविण्यात आले. थाळनेरचा किल्ला अशा तऱ्हेने जिंकल्यावर खानदेश आणि माळवा यांच्या फौजात असा ठराव झाला की दोन्ही फौजांनी कूच करावे आणि माळव्याच्या सुलतानाच्या नावे सुलतान-पूरचा कबजा घ्यावा. ह्या हेतूने दोन्ही फौजांनी त्वरेने कूच केले आणि सुलतानपूरच्या किल्ल्याला वेढा दिला. ही बातमी कळल्यावर गुजराथच्या अहमदशहाने आपले सर्व सैन्य घेऊन दक्षिणेकडे कूच केले. मलीक महमूद तुर्क याच्याबरोबर बऱ्याचशा तुकड्या देऊन त्याला त्याने आघाडीवर पुढे रवाना केले. गुजराथच्या सैन्याच्या हालचालींची बातमी कळताच गिजनीखान याने मांडूकडे पळ काढला, आणि मलीक नसीर याने थाळनेरकडे माघार घेतली. मलीक महमूद तुर्क याने थाळनेरला सक्त वेढा दिला. दरम्यान अहमदशहा सुलतानपूर येथे येऊन पोहोचला. माळव्याच्या राजपुत्राने ऐनवेळी दगा देऊन पळ काढल्यामुळे थाळनेर येथे मलीक नसीरची अतिशय विपन्न अवस्था झाली. त्याने अहमदशहाच्या काही वजीरांकडे शस्त्रसंधीची बोलणी सुरू केली. ही बोलणी यशस्वी झाली. गुजराथच्या सुलतानाने मलीक नसीरने पाठविलेला [४] (२९३) नजराणा स्वीकारला एवढेच नव्हे तर मोबदल्यात त्याने मलीक नसीरला पांढरे छत आणि गुलाबी चामर ही बहाल केली, व त्याचा खान ही पदवी देऊन सन्मान केला. खान ही पदवी त्यानंतर मलीक नसीर मरेपर्यंत लावीत असे.

( ११ अ ) यानंतर काही वर्षांनी दक्षिणेच्या अहमदशहा बहमनीला आपल्या मुलाच्या विवाहाच्या निमित्ताने सन्माननीय सोयरिकी घडवून आणावी असे वाटले. म्हणून त्याने आपल्यातर्फे नसीरखानाकडे वकील पाठविले आणि आपला मुलगा राजपुत्र अल्लाउद्दीन याच्यासाठी नसीरखानाच्या मुलीची मागणी केली. अशा तऱ्हेचा संबंध जुळून आल्यास आपल्या सामर्थ्यात भर पडेल असे नसीरखान याला वाटले. त्याने अहमदशहा बहमनीच्या विनंतीचा ताबडतोब स्वीकार केला. बुऱ्हाणपूरहून अहमदाबाद बिदर येथे खानदेशाच्या राजकन्येला अहमदशहा बहमनीच्या वकिलांनी अतिशय मानसन्मानाने पोहोचविले.

(१२) हिजरी ८३३ इ. स. १४२९ | हिजरी ८३३ या वर्षी जलवारा जिल्ह्याचा राजा, राजा कान्हा हा गुजराथच्या सामर्थ्यापुढे पराभव पावून पळाला आणि असीर येथे पोहोचला. तेथे त्याने नसीरखानाला काही हत्ती आणि इतर मौल्यवान वस्तू भेट म्हणून दिल्या. आपला प्रदेश मिळवून देण्यास

नसीरखानाने मदत करावी अशी त्याने नसीरखानापाशी याचना केली. यावर नसीर-खानाने उत्तर दिले की, "गुजराथच्या सामर्थ्याला टक्कर देता येईल एवढी ताकद माझ्यापाशी नाही. परंतु तू जर दक्षिणेच्या सुलतानाकडे मदतीसाठी विनंती केलीस तर कदाचित तो तुझ्या कार्यात तुझ्यासाठी प्रयत्नांची शिकस्त करील." याबाबत दक्षिणेच्या सुलतानाला देण्यासाठी एक खलिता देण्याचे नसीरखानाने राजा कान्हा याला आश्वासन दिले. नसीरखानाच्या सांगण्यावरून अहमदशहा बहमनीने एक छोटासा सेनाविभाग राजा कान्हाला आपला प्रदेश जिंकून घेण्यासाठी मदतीदाखल दिला. सैन्याची ही तुकडी नंदुरबार येथे पोहोचल्यावर त्यातील सैनिकांनी नंदुरबार जिल्ह्यात लुटालूट केली. या सैन्याचा प्रतिकार करण्यासाठी आपल्या सैन्याची एक पलटण पाठविण्याचा गुजराथच्या सुलतानाने हुकूम केला. परिणामी दोन्ही फौजांत लढाई झाली. या लढाईत दक्षिणी फौजांचा पूर्णपणे पराभव झाला आणि [४] (२९४) त्यांच्यापैकी अनेकजण ठार मारले गेले. या लढाईचा परिणाम साहजिकच दक्षिणेच्या सुलतानाचा गुजराथच्या सुलतानाबरोबर संघर्ष निर्माण होण्यात झाला. कारण आपल्या पराजयामुळे झालेली मानहानी आणि सामर्थ्याला लागणारा कालिमा धुऊन काढला जावा असे अहमदशहा बहमनीला वाटले. म्हणून त्याने वरील हेतू मनात धरून राजपुत्र अल्लाउद्दीन याच्या हाताखाली मोठे सैन्य देऊन ही कामगिरी पार पाडण्यासाठी त्याला पाठविले. हे सैन्य दौलताबाद येथे पोहोचल्यावर राजा कान्हा आणि नसीरखान त्याला येऊन मिळाले, आणि सर्वांनी मिळून गुजराथेच्या दिशेने चाल केली. दोन्ही फौजा समोरासमोर आल्या आणि झालेल्या लढाईत[३३६.१०□] पुन्हा एकदा दक्षिणेच्या फौजांचा पराभव झाला. राजा कान्हा याला लढाईतून पळून जाऊन खानदेशाच्या डोंगराळ मुलखाचा आश्रय घेणे प्राप्त झाले.

(१३) हिजरी ८४० । इ. स. १४३६ । हिजरी ८४० यावर्षी नसीरखानाच्या मुलीने आपला नवरा अल्लाउद्दीन शहा याजकडून आपल्याला वाईट वागणूक मिळत असल्याची हकीकत पत्र लिहून आपल्या बापाला कळविली. परिणामी नसीरखानाने आपल्या जावयाबरोबरचे सर्व स्नेहसंबंध तोडून टाकले. हिजरी ८४१ यावर्षी गुजराथच्या सुलतानाच्या चिथावणीवरून त्याने बहमनींच्या मुलखावर स्वारी केली. (हिजरी ८४१ । इ. स. १४३७) प्रथम त्याने वऱ्हाडावर आक्रमण केले. बहमनींच्या कारभारा-वर असंतुष्ट असलेल्या अनेक दक्षिणी अधिकाऱ्यांनी त्याला पाठिंबा दिला. त्याच्या जोरावर नसीरखानाने जाहीररित्या खुत्बा आपल्या नावाने वाचला. नंतर त्याने नरनाळ्याच्या किल्ल्याला वेढा दिला. परंतु अल्लाउद्दीन शहाने मोठे सैन्य देऊन मलीकउत्तुज्जार याची त्याचा प्रतिकार करण्यासाठी रवानगी केली. त्याच्यापुढे टिकाव न लागल्यामुळे मलीक नसीर आणि त्याला सामील झालेले दक्षिणी अधिकारी यांना पलायन करणे भाग पडले. मलीकउत्तुज्जार याने त्यांचा बुऱ्हाणपूरपर्यंत पाठलाग केला, आणि ते शहर त्याने लुटून साफ उद्ध्वस्त केले. नसीरखानाने यानंतर लालिंगच्या किल्ल्याचा आश्रय घेतला, आणि गुजराथ आणि माळवा यांच्या [४] (२९५)

सुलतानांकडे मदत पाठविण्यासाठी त्यांना विनंती केली. त्यांच्याकडून मलीक नसीरला मदत पोहोचण्याचे अगोदरच त्याच्यावर हल्ला करण्याचे मलीकउत्‌तुज्जार याने ठरविले. त्याने झपाट्याने लालिंगच्या दिशेने कूच केले आणि निवडक अशा तीन हजार तिरंदाजाच्या तुकडीसह तो लालिंग येथे येऊन पोहोचला. नसीरखानापाशी फक्त २ हजार सैनिक होते. तरी त्याने मलीकउततुज्जारवर हल्ला चढविला. युद्धाची एकच रणधुमाळी माजली. नसीरखानाला माघार घेणे भाग पडले. मोठ्या कष्टाने तो कसाबसा किल्ल्यात येऊन पोहोचला. या लढाईत त्याने जवळजवळ २० हत्ती आणि आपले सर्व रणसाहित्य गमावले.

(१४) रबिउल्‌अव्वाल, २०
हिजरी ८४१
सप्टेंबर १९
इ. स. १४३७

या गंडांतराचा नसीरखानाच्या मनावर अतिशय विपरित असा परिणाम झाला आणि त्यानंतर थोडयाच दिवसांनी तारीख २० रबिउलअव्वाल, हिजरी ८४१ या दिवशी एकंदर ४० वर्षांच्या कारकिर्दीनंतर तो मरण पावला. नसीरखानाच्या मुलाने थाळनेर येथे नसीरखानाचा बाप मलिकराजा याचे ज्या ठिकाणी दफन केले होते त्याच्या जवळच नसीरखानाचे दफन केले.

## मिरान आदिलखान फारुकी　　　[४] (२९६)

(१५) नसीरखानाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा मिरान आदिलखान हा

जिल्हज ८
हिजरी ८४४
एप्रिल २८
इ. स. १४४१

गादीवर आला. त्याने माळवा आणि गुजराथ या देशांच्या सुलतानांना आपल्याला ताबडतोब मदत पाठविण्याबद्दल अतिशय तातडीची पत्रे लिहिली. त्याप्रमाणे गुजराथचे सैन्य थोड्याच अवधीत सुलतानपूर येथे पोहोचले. या सैन्याने मलीकउत्‌तुज्जार याला लालिंगचा वेढा उठविण्यास आणि दक्षिणेकडे माघार घेण्यास भाग पाडले. या घटनेनंतर मिरान आदिलखानाने एकंदर तीन वर्षे राज्य केले. शुक्रवार ८ जिल्हज, हिजरी ८४४ या वर्षी बुऱ्हाणपूर शहरामध्ये तो ठार मारला गेला. ३३६·११० त्याला कसा मृत्यू आला यासंबंधीची समाधानकारक हकीकत मिळविणे मला शक्य झाले नाही. म्हणून या विषयावर मी अधिक माहिती देऊ शकत नाही. थाळनेर येथे आपल्या बापाच्या कबरी शेजारीच त्याची ( मिरान आदिलखान ) कबर आहे.

## मिरान मुबारकखान फारुकी　　　[४] (२९७)

(१६) मिरान आदिलखानाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा मिरान मुबारक हा

रज्जब १२
हिजरी ८६१
मे १७
इ. स. १४५७

गादीवर आला. त्याच्या कारकिर्दीविषयी आपल्याला उपलब्ध असलेली जी माहिती आहे ती अशी :-- त्याने एकंदर १७ वर्षे राज्य केले. या कालावधीत त्याने कोणत्याही परकीय सत्तेविरुद्ध आक्रमण करण्याची योजना हाती घेतली नाही अथवा स्वतःवर आपल्या शेजारील देशाचा सुलतानांचा वैरभावही ओढवून घेतला नाही. १२ रज्जब, हिजरी ८६१ या वर्षी तो मरण पावला. थाळनेर येथे त्याचे दफन करण्यात आले.

## मिरान घुनी [४] (२९८)
## ऊर्फ
## आदिलखान फारुकी पहिला

(१७) मिरान मुबारकखान याच्या मृत्यूनंतर त्याचा मोठा मुलगा आदिलखान हा गादीवर आला. यापूर्वीच्या खानदेशाच्या कोणत्याही सुलतानाच्या कारकिर्दीत खानदेशाला जेवढे वैभव प्राप्त झाले नव्हते त्याच्या अनेक पटीने आदिलखानाच्या कारकिर्दीत खानदेशची भरभराट झाली. आपल्या शेजारच्या राजांना आदिलखानाने खंडणी देण्यास भाग पाडले, आणि गोंडवन आणि गढमंडला येथील राजांना त्याच्याशी निष्ठा व्यक्त करण्यावाचून दुसरा उपाय उरला नाही. त्याच्या कारकिर्दीत राज्यातले रस्ते कोळी किंवा भिल्ल जमातीच्या दरोडेखोरांच्या होणाऱ्या त्रासापासून मुक्त झाले, आणि खानदेशातील निरनिराळ्या शहरांतील रहिवाश्यांच्या सुखी जीवनाचाही कधी भंग झाला नाही. आदिलखानाने असीरचा किल्ला आणखी तटबंदी उभारून अधिक मजबूत केला आणि किल्ल्याच्या बाहेरच्या बाजूला अधिक मजबूत तटबंदी उभारली. या तटबंदीला मल्लीगर असे नाव पडले. त्याने बुऱ्हाणपूरचा बालेकिल्लाही बांधून काढला आणि बुऱ्हाणपूरच्या शहरात अनेक भव्य प्रासादांची उभारणी केली. आदिलखानाचा सत्ता इतकी अमर्याद वाढली की परिणामी त्याने **शहा-ई-झारखंड** (जंगलचा राजा) असा किताब धारण केला. त्याच्या पूर्वजांनी गुजराथच्या सुलतानाला खंडणी देण्यात कधीही खंड पाडला नव्हता. आदिलखानाने मात्र आपल्या सत्तेच्या मदाने धुंद होऊन गुजराथच्या सुलतानाला वार्षिक खंडणी देण्याची प्रथा मोडली, आणि "गुजराथच्या सुलतानाचा ताबा आम्ही ओळखित नाही आणि त्याच्याशी निष्ठा बाळगण्यास आम्ही बांधील नाही" असे जाहीर केले. या जाहीर निवेदनाची खबर गुजराथचा सुलतान महमूदशहा बेगाडा [४] (२९९) याला कळल्याबरोबर त्याने लगोलग आपल्या सैन्याला खानदेशात चाल करून जाण्यास आणि आदिलखानाने इतक्या काळपर्यंत थकविलेल्या वार्षिक खंडणीची बाकी वसूल केल्याखेरीज खानदेशातून परत न फिरण्याचा हुकूम दिला.

(१८) हिजरी ९०४ / इ. स. १४९८ — या प्रमाणे हिजरी ९०४ यावर्षी गुजराथचे सैन्य खानदेशात घुसले. खानदेशाच्या सैन्यानेही या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी चाल केली. दोन्ही फौजांत लढाई होऊन खानदेशाच्या फौजा मोठ्या मेटाकुटीने थाळनेर आणि असीर येथपर्यंत माघार घेत आल्या. त्यांनी त्या किल्ल्यांचा आश्रय घेतला. गुजराथच्या फौजांनी दोन्ही ठिकाणांना वेढा दिला. महमूदशहाच्या अमर्याद सामर्थ्याबरोबर टक्कर देणे आदिलखानाच्या कुवतीबाहेर गेले. स्वतःचा जीव बचावण्यासाठी आणि आपले सरकार शाबूत राहावे म्हणून आदिलखानाला गुजराथची सर्व थकबाकी चुकती करणे भाग पडले. त्यानंतरच गुजराथच्या फौजा आपल्या देशाकडे परत फिरल्या. या घटने-

रबीउल्अव्वाल १४
हिजरी ९०९
एप्रिल ८
इ. स. १५०३

नंतर ५ वर्षांनी शुक्रवार तारीख १४ रबीउल्अव्वाल, हिजरी ९०९ या वर्षी आदिलखान मरण पावला. त्याने एकंदर ४६ वर्षे राज्य केले. मृत्युसमयी त्याने प्रकट केलेल्या खास इच्छेवरून त्याचे बुऱ्हाणपूर येथील दौलत मैदान[३३६·१२□] राजवाड्याजवळ दफन करण्यात आले.

## दाऊदखान फारुकी [४] (३००)

(१९) आदिलखान मेल्यानंतर त्याच्या जागी त्याचा धाकटा भाऊ दाऊद [३३६·१३□] हा सुलतान पदावर आला. याचे कारण मिरान आदिलखान याला मुलगा नव्हता. त्याला राज्याभिषेक झाल्यानंतर लगेच हुसेन अली आणि यार अली या दोघा मोगल बंधूंचे वर्चस्व अतिशय वाढले आणि दाऊदखानाच्या [४] (३०१) भोवती त्यांनी जणूकाही आपल्या वर्चस्वाची मोहिनी टाकली. परिणामी दाऊदखानाने हुसेन अली याला आपला मुख्य वजीर नेमले, आणि त्याला हिसामउद्दीन ही पदवी दिली. हिसामउद्दीन याच्या चिथावणीवरून हिजरी ९०९ या वर्षाच्या शेवटच्या महिन्यात दाऊदखानाने अहमदनगर राज्याच्या सरहद्दीवरील काही शहरांवर हल्ला करण्याचा आपला उद्देश जाहीर केला. दाऊदखानाकडून अशा तऱ्हेची काहीतरी कारवाई होईल याची अहमद निजामशहा बहरी याची अटकळ होती. त्याने आपले सैन्य घेऊन खानदेशाच्या प्रांतांवर [४] (३०२) चाल केली. दाऊदखानाने माघार घेऊन असीरच्या किल्ल्याचा आश्रय घेतला, आणि माळव्याचा सुलतान नसीरउद्दीन याच्याकडे मदत मागण्यासाठी आपल्या वकिलाची माळव्याला रवानगी केली. माळव्याच्या सुलतानाने दाऊदखान हा आपला शेजारी आहे आणि आपला नातेवाईकही आहे हे लक्षात घेऊन त्याच्या मदतीसाठी आपला एक अधिकारी येकबालखान याला सैन्य देऊन पाठविले. माळव्याच्या सुलतानाबरोबर संघर्ष ओढवून घेण्याची निजामशहा बहरी याची इच्छा नसल्यामुळे त्याने अहमदनगरकडे माघार घेतली. तरीदेखील येकबालखान हा आगेकूच करीत राहिला आणि तो बुऱ्हाणपूरला येऊन पोहोचला. तेथे त्याने सुलतान नसीरउद्दीन याच्या नावे खुत्बा वाचला जाईल अशी दाऊदखानावर सक्ती केली. त्यानंतर त्याने दाऊदखानाकडून दोन हत्ती आणि इतर अनेक किरकोळ मौल्यवान जिनसा खंडणी म्हणून वसूल केल्या आणि तो मांडू येथे परत फिरला. यानंतर काही वर्षांनी बुधवार तारीख १ जमादीलउल्अव्वाल, हिजरी ९१६ या वर्षी एकंदर ८ वर्षे राज्यकारभार केल्यानंतर दाऊदखान मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर मलीक हिसामऊद्दीन आणि दरबारातील इतर अधिकारी यांनी दाऊदखानाचा मुलगा गिजनीखान याला सिंहासनावर बसविले. परंतु यानंतर २ दिवसांनी हिसामउद्दीन याने तरुण बादशहाला विषप्रयोग करविला. त्याला कारण काय घडले ते एक परमेश्वरच जाणे.

हिजरी ९०९
इ. स १५०३

जमादीलउल्अव्वाल १
हिजरी ९१६
ऑगस्ट ६ इ. स. १५१०

## आदिलखान फारुकी दुसरा
## ऊर्फ
## आजम हुमायून

[४] (३०३)

( २० ) गिजनीखानाच्या मृत्यूनंतर खानदेशात राजघराण्यापैकी कोणीही पुरुष-मनुष्य हयात नव्हता. त्यावेळी फारुकी घराण्यातील एक राजपुत्र आलमखान हा अहमदनगर येथे वास्तव्य करून होता. खानदेशाच्या सरदारांनी अहमद निजामशहा याच्याकडे आपले प्रतिनिधी मंडळ पाठविले आणि खानदेशाच्या सुलतान पदावर आलमखान याला बसविण्याची आपल्याला परवानगी देण्यात यावी अशी त्यांनी निजामशहाला विनंती केली. यावर निजामशहा बहरी आणि वऱ्हाडचा सुलतान इमादउल्मुल्क यांची संयुक्त बैठक भरली. या बैठकीत त्यांनी आलमखान  याला खानदेशाचा सुलतान म्हणून मान्यता देण्याचा निर्णय घेतला. त्यावेळी असीर किल्ल्याचा किल्लेदार मलीकलारून नावाचा खानदेशाचा अधिकारी होता. त्याने नव्या सुलतानाची सत्ता मान्य करण्याचे नाकारले. यावेळी आदिल म्हणजे हसनचा मुलगा आणि गुजराथच्या सुलतानाच्या मुलीपासून झालेला नसीरखानाचा नातू हा थाळनेर येथे राहात होता. त्याने महमूदशहाकडे आपल्या आईच्या सांगण्यावरून एक अर्जी दाखल केली. महमूदशहाने आपल्या पूर्वजांची गादी मिळविण्याचे कामी [४] (३०४) आपल्याला मदत करावी अशी विनंती आदिलने या अर्जात केली. या एकंदर घडा-मोडींचा परिणाम खानदेशाच्या राज्यात यादवी युद्ध सुरू होण्यात होणार आहे, हे महमूदशहाने जाणले, आणि आपला नातू आदिलखान याच्या वतीने खानदेशाच्या अंतर्गत बंडाळीत हस्तक्षेप करण्याचा निश्चय केला. या हेतूने त्याने स्वतः खानदेशावर चाल केली. महमूदशहा स्वतः चाल करून येत आहे हे बघितल्यावर हिसामउद्दीन घाबरला आणि त्याने अहमदनगर आणि वऱ्हाडच्या सुलतानांना आलमखानाला पाठिंबा देण्याबद्दल लिहून कळविले. या दोन्ही सुलतानांनी आपल्या फौजांच्या तुकड्या खानदेशाकडे रवाना केल्या. या सैन्यात एकंदर ४ हजार घोडेस्वार होते. गुजराथच्या सैन्याबरोबर टक्कर देणे आपल्याला शक्य होणार नाही, याची जाणीव होऊन खान-देशाच्या सैन्यांतील अधिकारी इतस्ततः पांगले. परिस्थितीने अशा तऱ्हेने पलटी घेतलेली जेव्हा हिसामउद्दीन याने पाहिली तेव्हा त्याने आलमखानाला दक्षिणेत पाठविले आणि तो स्वतः गुजराथच्या सुलतानाला जाऊन मिळाला. असीरच्या किल्ल्याचा ताबा लारनखान याने या पूर्वीच घेतला होता. तोही गुजराथच्या सुलतानाला जाऊन मिळाला. एवढे झाल्यानंतर महमूदशहाने बुऱ्हाणपूरच्या राज्यावर आदिलखान याला बसविले आणि त्याला आजम हुमायून हा किताब दिला. त्यानंतर त्याने मुजफ्फरशहाच्या मुलीशी त्याचा विवाह लावून दिला. या विवाहाच्या प्रसंगी त्याने आदिलखानाला तीन लक्ष चांदीच्या टंका भेट म्हणून दिल्या. आदिलखानाची बायको म्हणजे गुजराथच्या बहादुरशहाची सख्खी बहीण.

(२१) आदिलखान फारुकीने महमूदशहाच्या सांगण्यावरून गादीवर आल्यावर मलिक लारन याला खानजहान ही पदवी आणि अह्वासची जहागिरी दिली. हिसाम-उद्दीनला शाहरियारखान ही पदवी देऊन उमरावपद देण्यात आले आणि दानऊर हे शहर जहागिरीदाखल त्याला बहाल करण्यात आले. त्याशिवाय थाळनेरची मुखत्यारी त्याच्याकडे सोपविण्यात आली. या दोघांशिवाय इतर अनेक सरदारांना पदव्या आणि लहान जहागिरी देण्यात आल्या. त्या नंतर महमूदशहा बेगाडा हा अहमदाबाद येथे परतला.

(२२) याप्रमाणे खानदेशाच्या राज्यकारभारावर आपल्या [४] (३०५) आजाच्या मदतीने स्थानापन्न झाल्यावर आदिलखानाने आपली मालमत्ता आणि कुटुंबीय मंडळी यांना थाळनेरहून बुऱ्हाणपूर येथे हलविले. त्याबरोबरच हिसामउद्दीन याने बुऱ्हाणपूरहून थाळनेर येथे स्थलांतर केले. थाळनेरचा संपूर्ण जिल्हा त्याला आदिलखानाकडून जहागिरीदाखल मिळाला. काही काळानंतर आदिलखानाला असे आढळून आले की त्याला सिंहासनावरून काढून आलमखानाला गादीवर बसविण्याच्या हेतूने हिसामउद्दीन याची अहमदनगरच्या दरबाराबरोबर कारस्थाने चाललेली आहेत. त्याने ताबडतोब हिसामउद्दीनला दरबारात हजर राहण्याबद्दल हुकूम केला. दरबारात बोलावणे कशासाठी आले आहे हे हिसामउद्दीन याने ओळखले. ह्या आज्ञेचा अनादर करून आदिलखानाला चिडण्याचे निमित्त द्यावयाचे नाही किंवा आपल्याबरोबर अगदी थोडी माणसे घेऊन आपल्याला सहजासहजी पकडण्याची संधी आदिलखानाला द्यावयाची नाही असा हिसामउद्दीन याने निश्चय केला. याप्रमाणे ठरविल्यानंतर बरोबर ४००० घोडेस्वारांची फौज घेऊन तो बुऱ्हाणपूरला गेला. तेथून काही अंतरावर त्याची आणि आदिलखानाची भेट झाली. आदिलखानाजवळ जेमतेम ३०० स्वारांचा लवाजमा होता. हिसामउद्दीन याची आदिलखानाने सर्व तऱ्हेने बडदास्त ठेवली आणि दरबारी रिवाजानुसार त्याने दुसऱ्या दिवशी इतमानाने आदिलखानाला भेट द्यावी असे ठरविण्यात आले. ह्या प्रसंगी हिसामउद्दीन हा दिवाणखाना सोडून गेल्याबरोबर लगेच त्याला ठार मारावे अशा तऱ्हेचा हुकूम आदिलखानाने आपल्या अनुयायांना दिला. अपेक्षेप्रमाणे हिसामउद्दीन आदिलखानाच्या भेटीसाठी राजदरबारात आपल्या सर्व अधिकाऱ्यांना बरोबर घेऊन आला. आदिलखानाने दबकून जावे ह्या हेतूने त्याने आपले घोडेस्वारांचे सर्व सैन्य बाहेर खडे उभे केले होते. बऱ्याच वेळपर्यंत आणि रितीरिवाजाप्रमाणे दोघांची भेट झाल्यावर आदिलखानाने हिसामउद्दीन याला शेजारच्या खाजगी दिवाणखान्यात नेले. "आपल्याला काही महत्त्वाच्या आणि खाजगी गोष्टीबद्दल तुझ्याशी बोलावयाचे आहे," असे त्याने हिसामउद्दीन याला सांगितले. तेथून परतल्यावर आदिलखानाच्या रक्षकांनी हिसामउद्दीनवर हल्ला करून त्याची कत्तल केली. गुजराथचा सुलतान महमूदशहा बेगाडा याने आपला एक अधिकारी मलिक बुरहाण याला आदिलखानाचा मंत्री म्हणून आपल्या पाठीमागे ठेवले होते.

त्याने हिसामउद्दीनच्या अधिकाऱ्यांवर ताबडतोब हल्ला केला आणि [४] (३०६) त्यांच्यापैकी बहुतेकांना यमसदनी पाठविले. हा हल्ला होत असतानाच तिकडे गुजराथच्या फौजेतील निवडक घोडेस्वारांची एक तुकडी हिसामउद्दीनच्या घोडदळावर तुटून पडली आणि त्यानी त्यांची पांगापांग केली. आदिलखानाने योजलेल्या या उपायांत जरी भयानक रक्तपात झाला तरी परिणामी त्याची सत्ता थाळनेरच्या सबंध जिल्ह्यावर प्रस्थापित झाली. थाळनेरच्या जिल्ह्याने त्याच्या राज्याचा जवळजवळ अर्धा भाग व्यापला होता. हिसामउद्दीनच्या मृत्यूमुळे आदिलखानाचा एक महत्त्वाकांक्षी आणि बलवान प्रतिस्पर्धी नाहीसा झाला.

(२३) यानंतर काही काळाने आदिलखानाने असीरच्या किल्ल्याला भेट दिली. तेथे शेरखान आणि सैफखान हे दोन गुजराथी अधिकारी आपल्या विरुद्ध अहमदनगरच्या निजामशहा बहरी यांजबरोबर कारस्थान करीत आहेत असे त्याला आढळून आले. प्रत्यक्षात निजामशहा बहरी हा आलमखानाला बरोबर घेऊन खानदेशाच्या सुलतानपदावर त्याला बसविण्यासाठी खानदेशाच्या सरहद्दीवर येऊन दाखल झाला. आदिलखानाने गुजराथच्या मुजफ्फरशहाकडे आपला एक दूत पाठवून त्याला एकंदर घडामोडींची साद्यंत हकीकत कळविली आणि आपल्याला मदतीसाठी म्हणून फौज पाठविण्याबद्दल त्याच्याकडे याचना केली. दूताबरोबर पाठविलेला निरोप मिळाल्यानंतर मुजफ्फरशहाने सैन्य उभे करण्यासाठी म्हणून आदिलखानाकडे १२ लक्ष टंका पाठविण्याबद्दल आपल्या खजिनदाराला हुकूम केला आणि दिलावरखान व सफ्दरखान या दोन अधिकाऱ्यांच्या हाताखाली मोठे सैन्य देऊन त्यांना खानदेशाकडे रवाना केले. आदिलखानाला त्याने त्याजबरोबर असेही कळविले की, "जरूर पडल्यास तुझ्या हक्कांचे संरक्षण करण्यासाठी मी स्वतः चाल करून येईन." तो असेही उद्गारला, "निजामउल्मुल्क बहरी हा स्वतःला सुलतान म्हणवितो. परंतु दक्षिणेच्या सुलतानांच्या राजघराण्यातील एक गुलाम एवढीच त्याची लायकी आहे. फारुकी घराण्याच्या औरस वारसांपैकी जो आदिलखान त्याच्या विरुद्ध आक्रमण करण्याचे धाडस दाखविल्याबद्दल त्याला प्रायश्चित्त भोगावे लागेलच. त्याचा अपराध अधिक आहे, कारण त्याने माझ्या जावयाविरुद्ध आक्रमण केले आहे." गुजराथच्या दरबारात रुजू असलेल्या अहमद निजामशहाच्या वकिलालाही मुजफ्फरशहाने बोलावणे [४] (३०७) पाठवून वरील अर्थाची कडक शब्दाने त्याला समज दिली. त्याला असेही सांगण्यात आले की, "प्रत्यक्ष आमचा राजमुकुट जरी धोक्यात आला तरी देखील आदिलखानाला सर्वतोपरीने मदत देण्याचा आमचा ठाम निश्चय आहे." परिस्थितीने घेतलेली कलाटणी अहमद निजामशहाने पाहिली आणि माघार घेणे शहाणपणाचे ठरविले. शेरखान आणि सैफखान यांना गावीलगडाकडे माघार घेऊ देण्यात आली. यानंतर गुजराथच्या सुलतानाकडून खानदेशात आदिलखानाच्या मदतीकरता पाठविलेले सैन्य येऊन पोहोचले. त्या सैन्याचा उपयोग आदिलखानाने गाळण्याच्या राजाकडून

खंडणी वसूल करून घेण्याकडे केला. गाळण्याचा राजा हा अहमदनगर राज्याचा मांडलिक होता. त्याच्याकडून आदिलखानाने खंडणीच्या रूपाने मोठी रक्कम वसूल केली. यानंतर आदिलखान बुऱ्हाणपूरकडे परतला आणि त्याने गुजराथच्या फौजेला आपल्या देशाकडे जाण्यासाठी निरोप दिला.

(२४) हिजरी ९२३ } इ. स. १५१७ } हिजरी ९२३ यावर्षी आदिलखान आपला सासरा गुजराथचा सुलतान मुजफ्फरशहा याजबरोबर फौज घेऊन मांडू येथे गेला. मुजफ्फरशहाच्या माळव्यावरील मोहिमेत आदिलखानाने त्याला सर्वतोपरी सहाय्य केले. या लढाईची संपूर्ण हकीकत मी गुजराथ आणि माळवा या दोन्ही देशांच्या इतिहासात दिली असल्या कारणाने या ठिकाणी ती पुन्हा देण्याचे कारण नाही असा विचार मी केला.

(२५) हिजरी ९२६ } इ. स. १५२० } हिजरी ९२६ या वर्षी आदिलखान अतिशय आजारी पडला आणि बुऱ्हाणपूर येथे त्याला मृत्यू आला. त्याची कारकीर्द एकंदर १९ वर्षे झाली. त्याच्यानंतर त्याचा वडील मुलगा मिरान महमद हा गादीवर आला. ह्याची आई म्हणजे गुजराथचा सुलतान बहादूरशहा याची बहीण. ३३६.१५०

## मिरान महमदखान फारुकी

## ऊर्फ

## मिरान महमदशहा [४] (३०८)

(२६) मिरान आदिलखान फारुकी दुसरा याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा मिरान महमदखान हा गादीवर आला. तो कारभारावर आल्यानंतर काही कालावधीने वऱ्हाडचा सुलतान इमादशहा आणि अहमदनगरचा सुलतान बुरहाण निजामशहा यांच्यात परस्परामध्ये संघर्ष सुरू झाला. या युद्धामध्ये आपला सर्व मुलुख इमादशहाने गमाविला आणि आश्रयासाठी तो बुऱ्हाणपूर येथे आला. तेथून इमादशहा आणि खानदेशाचा मिरान महमदखान या दोघांनी गुजराथचा सुलतान बहादूरशहा याला पत्र लिहिले आणि अहमदनगरचा सुलतान बुरहाण निजामशहा याच्याबरोबर निर्माण झालेल्या मतभेदात हस्तक्षेप करण्याबद्दल त्याला विनंती केली. यावर बहादूरशहाने पट्टणचा सुभेदार ऐनउल्मुल्क याची बुऱ्हाणपूरकडे रवाना होण्यासाठी नियुक्ती केली आणि दोन्ही पक्षांत तह घडवून आणण्यासाठी मध्यस्थाचे काम त्याने [४] (३०९) करावे अशी त्याला आज्ञा केली. गुजराथच्या दरबाराने प्रकट केलेल्या इच्छेला मान देण्यासाठी म्हणून दोन्ही पक्षातील मतभेद तात्पुरते मिटावे अशा पुढे आलेल्या प्रस्तावाला त्याने आपली संमती दिली. परंतु बहादूरशहाचा वकील परतल्यानंतर लगेच त्याने माहूरवर हल्ला केला आणि माहूरचा किल्ला जिंकून घेतला. त्याचप्रमाणे वऱ्हाडचे

दुसरे अनेक जिल्हे त्याने काबीज केले. याचा परिणाम म्हणून हिजरी ९३४ या वर्षी
हिजरी ९३४ } खानदेशाच्या मिरान महमदखानाबरोबर इमादउल्मुल्कने मैत्रीचा
इ. स. १५२७ } करार केला. मिरान महमदखानाने आपले सर्व सैन्य आणि हत्ती घेऊन इमादउल्मुल्क याच्या मदतीसाठी कूच केले. दोघा सुलतानांच्या फौजांचा मिलाफ गोदावरी नदीच्या तीरावर झाला. काही दिवसानंतर त्यांच्या फौजांत आणि बुरहाण निजामशहाच्या फौजांत युद्ध झाले आणि त्यात बुरहाण निजामशहाचा पराजय झाला. आपल्याला मिळालेल्या यशाचा इमादउल्मुल्क याला गर्व चढला आणि त्याने आपल्या फौजेला लुटालूट करण्यासाठी परवानगी दिली. त्यामुळे त्याची फौज इतस्ततः पांगली गेली. त्यामुळे आपल्या सैन्याची पुनर्रचना करण्याची संधी शत्रूला मिळाली. बुरहाण निजामशहाने ३ हजार घोडेस्वारांच्या तुकडीला बरोबर घेऊन वऱ्हाड आणि खानदेश याच्या संयुक्त फौजांवर हल्ला चढविला. त्या हल्ल्यात त्याने पूर्वी गमावलेले आपले सामानसुमान मिळविले. एवढेच नव्हे तर खानदेशाच्या सैन्यातील अनेक हत्ती काबीज केले. खानदेशाच्या सैन्यापैकी अनेक सैनिक मारले गेले. नुकत्याच विजयी झालेल्या इमादउल्मुल्क याच्या सैन्याचा धुव्वा उडाला आणि त्यांचा ८ मैलापेक्षा जास्त अंतरापर्यंत पाठलाग करण्यात आला. मिरान महमदखानाने असीरच्या मार्गाने माघार घेतली, तर त्याचा दोस्त इमाद् उलमुल्क हा गावीलगडाकडे पळाला. दोघांनी आपापल्या ठिकाणांहून त्यांच्यावर गुजरलेल्या प्रसंगाची हकीकत गुजराथच्या बहादूरशहाला कळविली. अनेक वार त्याच्या विनवण्या केल्यानंतर गुजराथचा सुलतान हा स्वतः बुऱ्हाणपूर येथे चालून आला. तेथून त्याने [४] (३१०) मिरान महमदखान आणि इमादउल्मुल्क यांना बरोबर घेऊन दक्षिणेकडे चाल केली. तो जालन्यापर्यंत घुसला. वाटेत त्याला कोणताही प्रतिकार झाला नाही. तेथे आल्या-नंतर वऱ्हाड स्वतःचे ताब्यात आणण्याचे दृष्टीने बहादूरशहाने योग्य त्या उपाय योजना केल्या आणि वऱ्हाडच्या राज्यकारभारात इमादउल्मुल्कच्या अधिकाऱ्यांना काढून टाकून त्यांच्या जागी आपल्या अधिकाऱ्यांना नेमण्याची धमकी त्याने इमाद-उल्मुल्क याला दिली. बहादूरशहाच्या बेतांचा सुगावा इमादउल्मुल्क याला लागला तेव्हा त्याने याबाबत काय करावयाचे यासंबंधी मिरान महमदखान याच्याबरोबर विचारविनिमय केला. मिरान महमदखानाने पुढीलप्रमाणे उत्तर दिले. : " परकीयांची मदत मागितल्याचा हा साहजिकच परिणाम आहे. यावर उपाय एकच आणि तो म्हणजे बहादूरशहाच्या नावे सार्वजनिक ठिकाणी खुत्बा वाचणे, त्याच्या नावे नाणी पाडणे, त्याचे मांडलिकत्व कबूल करणे आणि त्याच्या राज्याचे आपण सेवक असल्याची ग्वाही देणे हा होय. " मिरान महमदखानाने सुचविलेली योजना अतिशय अपमाना-स्पद होती. तरीही तिचा स्वीकार करण्यात इमादउल्मुल्कने कोणतीही कुचराई दाखविली नाही. परिणामी त्याने बहादूरशहाला वरीलप्रमाणे सुचविले, आणि त्याप्रमाणे कारवाई करण्यासाठी म्हणून ताबडतोब अहमदनगरच्या दिशेने कूच करावे

असा सल्ला त्याने बहादूरशहाला दिला. यामुळे बहादूरशहा इतका खुष झाला की त्याने इमादउल्मुल्क आणि मिरान महमदखान त्यांनी सुचविलेल्या योजनेला आपली पूर्णपणे संमती दिली. यानंतर त्याने वऱ्हाड आणि खानदेश यांच्या सैन्यासहवर्तमान अहमदनगरच्या दिशेने कूच केले. गुजराथच्या इतिहासात यापूर्वीच निवेदन केल्याप्रमाणे गुजराथच्या सुलतानाच्या नावे जाहिररित्या खुत्थ्याचे वाचन करण्यात आले. ही मोहीम संपल्यानंतर बहादूरशहाने भडोचकडे कूच केले आणि मिरान महमदखान व इमादउल्मुल्क हे आपापल्या राजधान्यांकडे परतले.

(२७) हिजरी ९३९ इ. स. १५३२ हिजरी ९३९ या वर्षी माळव्याचा प्रदेश जिंकून घेण्यासाठी बहादूरशहाने माळव्याच्या दिशेने कूच केले. या मोहिमेत बहादूरशहाने जेव्हा मांडूचा किल्ला जिंकून घेतला त्या प्रसंगी मिरान महमदखान हा हजर होता. त्यानंतर तो बुऱ्हाणपूर येथे परतला. [४] (३११) माळव्याचे राज्य बहादूरशहाने आपल्या ताब्यात घेतल्यामुळे अहमदनगरच्या बुरहाण निजामशहाच्या मनात भयंकर धास्ती निर्माण झाली. त्याने मिरान महमदखानाकडे आपला वकील रवाना केला. वकिलातर्फे त्याने खानदेशाच्या सुलतानाबद्दल आपल्याला वाटणारा आदर प्रगट केला आणि अहमदनगर आणि गुजराथ या दोन राज्यांमध्ये त्यावेळी अस्तित्वात असलेले काही मतभेद मिटविण्यासाठी आपल्या वतीने गुजराथच्या सुलतानापाशी बोलणी करण्याची त्याने मिरान महमदखानाला विनंती केली.

(२८) पुढील वर्षी बहादूरशहा हा बुऱ्हाणपूरकडे कूच करून गेला. तेथे त्याची आणि बुरहाण निजामशहाची भेट झाली. बुरहाण निजामशहाला त्याने सफेत छत्र आणि शेंदरी रंगाचे चामर ही बहाल केली. ह्यानंतर बुरहाण निजामशहा हा अहमदनगरकडे परतला आणि बहादूरशहाने माळव्याकडे कूच केले. गुजराथच्या सुलतानाच्या चितोडवरील मोहिमेत मिरान महमदखान हा त्याच्याबरोबर होता. बहादूरशहावर नंतर हुमायून बादशहाने हल्ला केल्यामुळे त्याला मांडूपर्यंत माघार घ्यावी लागली. त्यावेळीही मिरान महमदखान त्याच्याबरोबर होता. हुमायूनने त्यानंतर संपूर्ण गुजराथच्या प्रदेशावर आपला ताबा बसविला आणि आपला एक वरिष्ठ अधिकारी आसफखान याला दक्षिणेकडील देशांतून खंडणी वसूल करण्यासाठी रवाना केले. तो स्वतःही बुऱ्हाणपूरकडे कूच करण्यासाठी निघाला होता. त्याचा उद्देश निःसंशय बुऱ्हाणपूर ताब्यात घेण्याचा होता. परंतु बंगालमधून शेरशहाने दिल्लीच्या ताब्यातील मुलुखात जी धडक मारली त्यामुळे माळव्यातून आग्र्याच्या दिशेने परत फिरणे हुमायूनला भाग पडले. त्याचसुमारास बहादूरशहाने गुजराथ ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला. त्याचवेळी त्याने मिरान महमदशहाला माळव्यावर हल्ला करून दिल्लीच्या अधिकाऱ्यांची हकालपट्टी करण्याची विनंती केली. त्याप्रमाणे मिरान महमदखानाने कारवाई केली आणि गुजराथ सरकारने पूर्वी नेमलेला माळव्याचा सुभेदार मल्लूखान याच्याशी संगनमत करून मांडूचा ताबा घेतला. मिरान महमदखान हा [४] (३१२)

तेथे असताना त्याच्या कानावर बातमी आली की दीव येथील काफर पोर्तुगीजांच्या हातून बहादूरशहा हा ठार मारला गेला आहे आणि बहादूरशहाच्या आईने आपल्या दरबारातील अमीर उमरावांच्याबरोबर मसलत केल्यानंतर खानदेशाचा मिरान महमदखान याला गुजराथचा सुलतान म्हणून जाहीर केले आहे. त्यानंतर थोड्याच काळाने मिरान महमदखान याला गुजराथेला घेऊन जाण्यासाठी मांडू येथे काही प्रतिनिधी आले. दरम्यान अनौपचारिकरित्या त्याला मांडू येथे राज्याभिषेक करण्यात आला. मिरान महमदखानाने मिरान महमदशहा ही पदवी घेतली. परंतु त्याची कारकीर्द ही फारच थोड्या काळपर्यंत टिकली. कारण अहमदाबादकडे जाण्याच्या

जिलकाद १३ हिजरी ९४१ मे ४ इ. स. १५३५

मार्गावर असताना त्याला भयंकर तापाने घेरले आणि तो एकाएकी १३ जिलकाद हिजरी ९४२ या वर्षी मरण पावला. त्याचे शव बुऱ्हाणपूर येथे नेण्यात आले. त्याचा बाप आदिलखान दुसरा याच्या कबरीशेजारीच त्याचे दफन करण्यात आले.

## मिरान मुबारकखान फारुकी[३३६.१६□] [४] (३१३)

(२९) मिरान महमदशहाचा मृत्यू झाला त्यावेळी त्याची सर्व मुले लहान होती आणि राज्याचा कारभार हाती घेता येण्याइतके कोणत्याच मुलाचे वय नव्हते. मिरान महमदशहा याचा बुऱ्हाणपूर येथे मृत्यू झाल्याचे त्याचा भाऊ मुबारक याच्या कानावर पडले. तेव्हा त्याने ताबडतोब शहा हे बिरुद धारण केले आणि आपल्या नावे खानदेशाचा सुलतान म्हणून द्वाही फिरविली. तो सुलतान पदावर आल्यानंतर काही काळाने गुजरातच्या अमिरांनी त्याच्याकडे राजपुत्र महमूद याला ताब्यात घेण्यासाठी म्हणून गुजराथ राज्याचा एक अधिकारी इख्तियारखान याची नियुक्ती केली. राजपुत्र महमूद हा गुजराथच्या बहादूरशहाचा पुतण्या लतिफखान[३३६.१७□] याचा मुलगा होता. बहादूरशहाने त्याला आपल्या हयातीतच खानदेशाच्या मिरान महमदखानाकडे पाठवून त्याला आयुष्यभर [४] (३१४) एखाद्या डोंगरी किल्ल्यावर बंदिस्त करून ठेवण्यास सांगितले होते. मिरान मुबारक याला गुजराथच्या सिंहासनावर सुलतान म्हणून येण्याची महत्त्वाकांक्षा होती. त्याचा भाऊ मिरान महमदशहा याला त्याच्या मृत्यूच्या अगोदर काही काळच गुजराथच्या सिंहासनावर बसविण्यात आल्याचे त्याने पाहिले होते. म्हणून त्याने राजपुत्र महमूद याची सुटका करण्याच्या कामामध्ये अनेक अडथळे निर्माण करण्यास सुरुवात केली. परंतु महमूद याला कैदेत ठेवल्याबद्दल गुजराथच्या अधिकाऱ्यांनी आपली प्रतिक्रिया

हिजरी ९४३ इ. स. १५३६

इतक्या तीव्रपणे प्रकट केली की सद्यःपरिस्थितीत महमूदला सोडण्याचे धोरण हेच लाभदायी ठरणार आहे या जाणीवेने तसा निर्णय घेणे मिरान मुबारक याला भाग पडले. परिणामी त्याने इख्तियारखानाला राजपुत्र महमूदचा ताबा घेण्याची परवानगी दिली. महमूदला गुजराथेत नेण्यात आले

—३४

आणि त्यानुसार हिजरी ९४३ या वर्षी अहमदाबाद येथे त्याला राज्याभिषेक करण्यात आला.

(३०) याच सुमारास गुजराथचा एक अधिकारी इमादउल्मुल्क याने गुजराथेतून पळ काढला आणि तो बुऱ्हाणपूर येथे आश्रयार्थ आला. मिरान मुबारकखान याने त्याचा आदरसत्कार करून त्याला आश्रय दिला आणि त्याने १२००० गुजराथी घोडेस्वारांची जमवाजमव करण्याबद्दल सर्वतोपरी उत्तेजन दिले. या फौजेला बरोबर घेऊन दोघांनी मिरान मुबारकखान याला गुजराथेच्या सिंहासनावर बसविण्याच्या हेतूने गुजराथेच्या दिशेने कूच केले. त्यांना प्रतिकार करण्यासाठी गुजराथचा सरदार दर्याखान हा गुजराथचा सुलतान महमूदशहा तिसरा याला बरोबर घेऊन पुढे सरसावला. दोन्ही फौजांची गाठ पडून अतिशय तुंबळ असे युद्ध झाले आणि त्यात खानदेशाच्या फौजांचा पराभव झाला. मुबारकखानाने असीर येथे पळ काढला आणि इमादउल्मुल्क याने मांडूच्या दिशेने पलायन केले. तेथे त्याने [४] (३१५) माळव्याचा सुलतान कादर याचा आश्रय घेतला. आपल्या विजयानंतर परत न फिरता गुजराथच्या फौजांनी दर्याखानाच्या अधिपत्याखाली पुढे चाल केली आणि खानदेशाच्या मुलखात आक्रमण करून त्यात त्यांनी लुटालूट केली आणि तो प्रदेश साफ उद्ध्वस्त केला. मिरान महमदखान याला त्यांनी अतिशय जबरदस्त दंड देण्यास भाग पाडले. महमूदशहा हा जेव्हा असीरच्या किल्ल्यात बंदिवासात होता तेव्हा त्याने मिरान मुबारकखानाला असे वचन दिले होते की जर का कधीकाळी आपणाला गुजराथच्या सिंहासनावर बसण्यात यश मिळाले तर आपण मिरान मुबारकखानाला नंदुरबारचा जिल्हा तोडून देऊ. या प्रसंगी त्याने अधिकृतपणे नंदुरबारचा जिल्हा मिरान मुबारकखानाच्या ताब्यात सोपविला.

(३१) हिजरी ९६९ } इ. स. १५७२ } हिजरी ९६९ या वर्षी मोगलांच्या फौजानी केलेल्या हल्ल्यासमोर टिकाव न लागल्यामुळे माळव्याचा सुलतान बाजबहादूर याला माघार घेणे भाग पडले. माळवा सोडून तो मिरान मुबारकखान याच्या आश्रयाला आला. सुलतान बाजबहादूर याला माळव्यातून पीर महमदखान या मोगल सेनापतीने हाकलून लावले होते. त्याने बाजबहादूरचा खानदेशाच्या अगदी अंतर्भागापर्यंत पाठलाग केला आणि तो बुऱ्हाणपूरपर्यंत घुसून आला. वाटेतील सर्व प्रदेश त्याने उद्ध्वस्त केला, बुरहाणपूर शहराची नासधूस केली आणि अनेक स्त्रियांची बेअब्रू केली. त्याने इतके निर्घृण अत्याचार केले की ते या ठिकाणी सांगणे अनुचित ठरेल. आपल्यावर ओढविलेल्या या भयानक प्रसंगात आपल्याला सहाय्य करण्याविषयी मिरान मुबारकखान याने वऱ्हाडचा सुभेदार तुफालखान याची पत्र लिहून याचना केली. मुबारकखानावर ओढविलेल्या प्रसंगाच्या गंभीरतेला पोषक ठरेल इतक्या जलदगतीने तुफालखानाने आपल्या सर्व सैन्यासहित खानदेशाच्या दिशेने कूच केले आणि तो मिरान मुबारकखान आणि सुलतान बाजबहादूर यांना येऊन

मिळाला. पीर महमदखानाच्या रानटी फौजा खाण्यापिण्याच्या अतिरेकात आणि विषयासक्तीत इतक्या मशगूल होऊन गेल्या होत्या आणि त्यांनी केलेल्या लुटीची त्यांच्या संपत्तीत एवढी भर पडली होती की आपणहून संघर्ष ओढवून घेऊन हाती पडलेली लूट गमाविण्याकडे त्यांचा बिलकूल कल नव्हता. साहजिकच स्वतःची इच्छा नसताना देखील त्यांचा सेनापती पीर महमदखान याला माळव्यातून माघार घेणे भाग पडले. त्याच्या फौजेतील काही सैनिकांना आपल्या ठिकाणावर पोहोचण्याची इतकी घाई झाली की त्यांनी पीर महमदखानाच्या अगोदरच आगेकूच केले. त्यांच्या पाठोपाठ उरलेल्या छोट्याशा फौजेची तुकडी आणि जड सामानसुमान व लष्करी सामग्री बरोबर घेऊन पीर महमदखान हा निघाला. तुफालखानाच्या [ ४ ] ( ३१६ ) अधिपत्याखाली दोस्तांच्या फौजांनी मोगलांचा पाठलाग केला. मोगलांच्या फौजा इतस्ततः पांगल्या गेल्या असल्याची बातमी त्यांना मिळाली. तेव्हा त्यांनी अतिशय झपाट्याने कूच केले आणि नर्मदेच्या किनाऱ्यावर पीर महमदखानाला गाठले. दोस्तांच्या फौजांनी लगोलग शत्रूवर हल्ला चढविला. मोगलांच्या फौजेपेक्षा दोस्तांच्या फौजा संख्येने अधिक होत्या. त्यामुळे पलायन करण्यातच आपली सुरक्षितता आहे असे वाटून मोगल फौजेने पळ काढला. त्यांच्यापैकी अनेकजण नदीत बुडून मेले. पीर महमदखानाने आपला हत्ती नदीच्या पाण्यात घुसवून देण्याचा हुकूम दिला होता. वर बुडालेल्या अनेक सैनिकांबरोबर पीर महमदखान हा पण बुडून मेला. दोस्तांच्या विजयी फौजांनी आपली आगेकूच तशीच पुढे चालू ठेवली आणि ते मांडू येथे पोहोचले. तेथे गेल्यावर सुलतान बाजबहादूर याने राज्याच्या कारभाराची सूत्रे आपल्या हाती घेतली. यानंतर दोस्तांच्या फौजा आपापल्या देशांकडे परतल्या. यानंतर काही वर्षांनी मिरान मुबारकखान हा बुधवार ६ जमादिलउल्आखर हिजरी ९७४ या दिवशी रात्री मरण पावला. त्याने एकंदर ३२ वर्षे राज्य केले.

जमादिलउल्आखर ६
हिजरी ९७४
डिसेंबर २४
इ. स. १५६६

## मिरान महमदखान फारुकी [ ४ ] (३१७)

(३२) मिरान मुबारकखान मेल्यानंतर त्याचा मुलगा मिरान महमद हा गादीवर आला. याचवर्षी गुजराथचा सुलतान मुजफ्फरशहा तिसरा याचा मुख्य वजीर एतिमादखान याच्या चिथावणीवरून गुजराथचा एक अधिकारी चेंगीजखान याने नंदुरबार जिल्ह्यावर आक्रमण केले. त्याच्या हल्ल्यापुढे खानदेशाच्या अधिकाऱ्यांना माघार घेणे भाग पडले. चेंगीजखानाने मोठ्या धडाडीने थाळनेरच्या किल्ल्याच्या दिशेने धडक मारली. आपल्या प्रदेशात झालेल्या आक्रमणाची बातमी कानी पडल्यावर मिरान महमदखान याने वऱ्हाडचा तुफालखान याला मदतीसाठी बोलाविले. खानदेश आणि वऱ्हाड यांच्या संयुक्त फौजा खानदेशाच्या पश्चिम सरहद्दीकडे कूच

करून गेल्या. थाळनेर येथे आल्यावर त्यांना असे दिसून आले की, चेंगीजखानाच्या फौजा मजबूत ठाण मांडून बसल्या असून त्याच्या दोन्ही बाजूला खोल दऱ्यांचे संरक्षण आहे. त्याचप्रमाणे त्याचा तोफखाना आणि त्याच्या फौजेत असलेली सर्व प्रकारची वाहने यांनी त्याच्या आघाडीवर एक मजबूत फळी उभी केली आहे. खानदेश आणि वऱ्हाडच्या फौजा थाळनेर येथे आल्यावर चेंगीजखानाने आपले मोर्चे सोडून पुढे यावे यासाठी मिरान महमदखानाने त्या दिवशी निरर्थक [ ४ ] (३१८) आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा केली. परंतु रात्रीच्या वेळी आपले सर्व सैन्य आणि तोफखाना मागे ठेवून चेंगीजखान एकटा भडोचकडे पळून गेला. दुसऱ्या दिवशी मिरान महमदखानाने शत्रूने सोडून दिलेल्या जागेचा ताबा घेतला. यावेळी गुजराथ राज्यात अतिशय गोंधळाची आणि अंदाधुंदीची परिस्थिती होती आणि देशात यादवी युद्धाचा प्रादुर्भाव झाला होता. गुजराथेचा सुलतान मुजफ्फरशहा हा एतिमादउल्मुल्क याच्या हातातील निव्वळ एक बाहुले बनला असून महमूदशहाचा तो मुलगाच नव्हे असे गुजराथच्या बहुतेक अमीर उमरावांचे मत होते आणि त्यांनी साहजिकच त्याच्या सिंहासनावरील अधिकाराला मान्यता देण्यास नकार दिला. गुजराथेच्या गादीचे कायदेशीर वारस आपणच आहोत अशी मिरान महमदखानाने आपली स्वतःची समजूत करून घेतली, आणि आपण जर धडाडीने गुजराथेच्या राज्यावरील आपला हक्क सांगितला तर गुजराथेच्या सरदारांकडून आपल्याला पाठिंबा मिळेल, असे कळल्यामुळे मिरान महमदखानाने ३० हजार घोडेस्वार जमविले आणि अहमदाबादकडे कूच केले. दरम्यान गुजराथेमधील यादवी युद्धात चेंगीजखान हा यशस्वी झाला होता. तो गुजराथेच्या राजधानीच्या शहरी होता. तेथून त्याने आपला प्रतिस्पर्धी एतिमादउल्मुल्क आणि मुजफ्फरशहा यांची हकालपट्टी केली होती. मिरान महमदखान हा मोठी फौज घेऊन अहमदाबादनजीक येऊन पोहोचला आहे अशी बातमी चेंगीजखान याला मिळाली. तेव्हा त्याने त्याला प्रतिकार करण्यासाठी केवळ ७ हजार फौज घेऊन कूच केले. दिल्लीच्या मिर्जानी त्याला पाठिंबा दिला. ( यांचा उल्लेख गुजराथ आणि दिल्ली यांच्या इतिहासात आलेला आहेच.) खानदेशाच्या फौजांबरोबर झालेल्या युद्धात चेंगीजखानाला संपूर्ण विजय मिळाला. मिरान महमदखान याने असीरकडे सुरक्षितपणे माघार घेण्यात यश मिळविले, आणि तेवढ्यावरच आपण बचावलो म्हणून स्वतःला धन्य मानले. रणांगणावर त्याचे सर्व हत्ती, तोफखाना आणि खानदेशाचे सुलतान धारण करीत असलेली शाही चिन्हे ही गुजराथच्या फौजांच्या हाती पडली. ही घटना घडल्यानंतर काही काळाने मिर्जांनी दक्षिण गुजराथेचा बहुतेक भाग लुटालूट करून [ ४ ] (३१९) उद्ध्वस्त केला. खानदेशावरही त्यांनी आक्रमण केले, आणि मिरान महमदखान त्याला प्रतिकार करण्यासाठी पुरेशी फौज जमा करीपर्यंत त्यांनी गुजराथेचे अनेक जिल्हे उद्ध्वस्त केले. तेथून त्यांनी खंडणी वसूल केली. मिरान महमदखानाबरोबर गाठ पडण्याचे अगोदरच ते खानदेशाचा प्रांत सोडून चालते झाले.

(३३) हिजरी ९८२ } हिजरी ९८२ यावर्षी अहमदनगरच्या मुर्तजा
इ. स. १५७४ } निजामशहा बहरी याने वऱ्हाडच्या प्रदेशावर आक्रमण केले आणि तो प्रदेश काबीज केला. त्याने तुफालखानाला पकडले आणि बंदिवासात ठेवले. त्याच्या सरकारातला एक अधिकारी खानदेशात दाखल झाला. त्याने आपण इमादउल्मुल्क आहोत आणि तुफालखानाचे प्रतिनिधी म्हणून आपण आलो आहोत असे सांगून मिरान महमदखानाकडे आपल्याला मदत देण्यासंबंधी याचना केली. हा माणूस तोतया होता. पण त्याच्या सांगण्यावरून मिरान महमदखानाची इतकी फसवणूक झाली की त्याने वऱ्हाड परत जिंकून घेण्यासाठी त्याच्याबरोबर जाण्यासाठी म्हणून ५००० सैनिकांची तुकडी रवाना केली. तोतया इमादउल्मुल्कने वऱ्हाडवर चाल केली आणि तो सर्व प्रदेश उद्ध्वस्त केला. परंतु आपला मुख्य वजीर चेंगीजखान[३३६.१८□] इस्फहानी याच्या सांगण्यावरून मुर्तजा निजामशहा वऱ्हाडकडे परत फिरला. खानदेशाच्या फौजांची त्याने शेळ्यामेंढ्यांप्रमाणे पांगापांग केली आणि वऱ्हाडवरील तथाकथित इमादउलमुल्कच्या आक्रमणाला कारणीभूत झालेल्या मिरान महमदखानाकडे आपला मोर्चा वळविला. परिणामी अहमदनगरच्या सुलतानाने बुऱ्हाणपूर शहर बेचिराख केले आणि तो असीरवर चालून गेला आणि त्या किल्ल्याला त्याने सख्त वेढा दिला. बराच काळ वेढा चालल्यानंतर मिरान महमदखानाला तहासाठी याचना करणे भाग पडले. तहाच्या अटीप्रमाणे त्याने मुर्तजा निजामशहाला सहा लक्ष मुजफ्फरी[३३६.१९□] रुपये म्हणजे ३ लक्ष चांदीचे सिक्का एवढे द्रव्य नालबहा म्हणून दिले. त्याशिवाय मुर्तजा निजाम- [४] (३२०) शहाचा मुख्य वजीर चेंगीजखान याला २ लक्ष मुजफ्फरी त्याने दिल्या त्या वेगळ्याच.

(३४) हिजरी ९८४ } हिजरी ९८४ या वर्षी मिरान महमदखान याला
इ. स. १५७६ } तापाने घेरले. काही महिनेपर्यंत ज्वराने त्याची कुचंबणा केली. त्यानंतर मिरान महमदखान मरण पावला. त्याचा एकुलता एक वारस म्हणजे त्याचा मुलगा हुसेनखान हा होता. तो त्यावेळी अल्पवयी होता.

## राजा अलीखान फारुकी [४] (३२१)

(३५) मिरान महमदखानाला ज्या तापाने प्रथम घेरले आणि पुढे त्यातच त्याचा मृत्यू झाला, त्या तापाची पहिली खबर त्याचा भाऊ राजा अलीखान याला मिळाली तेव्हा तो आग्रा येथे होता. त्याने ताबडतोब बुऱ्हाणपूरकडे कूच केले आणि आपल्या भावाच्या मृत्यूनंतर ३ दिवसांनी तो तेथे येऊन पोहोचला. राज्यातील अमीरउमराव त्याला शहराबाहेर भेटण्यासाठी सामोरे गेले. हुसेनखान हा अल्पवयी असल्यामुळे त्यांनी त्याला सिंहासनावरून काढले आणि राज्याच्या मसनदीवर राजा अलीखान याला बसविले. या सुमारास बंगालपासून सिंधपर्यंतच्या माळवा आणि गुजराथ आदिकरून हिंदुस्थानातील सर्व देशांचे सुलतान अकबर बादशहाच्या विजयी शस्त्रबलापुढे पराजित

झाले होते. अकबराच्या प्रचंड सामर्थ्याला तोंड देण्यापेक्षा त्याच्याबरोबरील संघर्ष टाळणेच श्रेयस्कर आहे असा विचार राजा अलीखान याने केला. त्याच्या भावाने सुलतान म्हणून स्वतःला घेतलेल्या पदवीचा त्याने त्याग केला आणि अकबराला पत्र लिहून त्याने आपल्याला मोगलसाम्राज्याचा मांडलिक आणि खंडणीदार म्हणून समजावे अशी त्याच्याजवळ याचना केली. आपण किती प्रामाणिक आहोत याबद्दल अकबराची खात्री पटविण्यासाठी त्याने अनेक भारी आणि मूल्यवान नजराणे त्याच्याकडे पाठविले. काही वर्षांपर्यंत त्याने दक्षिणेतील सुलतानांबरोबर अतिशय मैत्रीचे संबंध ठेवले. राजा अलीखान हा अतिशय विलक्षण बुद्धिमत्तेचा मनुष्य होता. राज्यकर्त्याच्या [४] (३२२) अंगी असावा लागणारा न्यायीपणा त्याच्यात होता. मुत्सद्याची हुशारी आणि शहाणपण त्याच्यात पुरेपूर होती. योद्ध्याच्या अंगी असणाऱ्या शौर्य आणि साहसादि गुणांनी तो युक्त होता. उत्साहाचे वारे त्याच्या अंगात खेळत होते. तर दुर्दम्य महत्त्वाकांक्षा त्याच्या अंगी बाणली होती. त्याची प्रजा त्याला देवासमान मानीत असे. दुसऱ्यांच्या बरोबर आक्रमक युद्धे खेळण्यात त्याने आपली शक्ती खर्च केली नाही. किंवा आपल्या प्रदेशावर दुसऱ्याकडून होणारे आक्रमण स्थितप्रज्ञाप्रमाणे त्याने कधीही सहन केले नाही. हनाफी पंथाच्या विद्वान धर्मपंडितांबरोबर धर्मग्रंथांचे वाचन करण्यात तो आपला वेळ घालवीत असे. निरनिराळ्या कलाकुसरींना उत्तेजन देण्यात त्याच्यासारखा दुसरा कोणी नव्हता. ही परिस्थिती हिजरी १५९३ पर्यंत ( म्हणजे मुर्तजा हिजरी १००२ ) निजामशहाने राज्याच्या कारभारातून आपले अंग काढून घेतले इ. स. १५९३ ) त्या वर्षापर्यंत) टिकली. त्यावर्षी अहमदनगरचा राजप्रतिनिधी सलाबतखान आणि वऱ्हाडचा सुभेदार सय्यद मुर्तजा यांच्यात भांडण निर्माण झाले आणि अहमदनगरपासून १२ मैल अंतरावर दोघांमध्ये युद्धाची ठिणगी पडली. या युद्धात सय्यद मुर्तजाचा पराभव झाला. त्याने १२ हजार सैनिक आणि आपले काही अधिकारी यासहवर्तमान एलिचपूरकडे माघार घेतली. त्यांचा सलाबतखानाकडून कसोशीने पाठलाग करण्यात आला तेव्हा सय्यद मुर्तजा आणि त्याचे अधिकारी यांनी आपला मोर्चा बुऱ्हाणपूरकडे वळविला. त्यांनी राजा अलीखान याचे साहाय्य मागितले. त्याने त्यांना साहाय्य करण्याचे वचन देऊन उत्तेजनही दिले नाही किंवा त्यांना वाटाण्याच्या अक्षताही लावल्या नाहीत. दरम्यान निश्चित उत्तर मिळण्यास राजा अलीखानाकडून विलंब लागल्यामुळे संयम सुटून सय्यद मुर्तजाच्या शिपायांनी बुऱ्हाणपूर शहराची लुटालूट केली आणि नंतर आग्र्याच्या दिशेने त्यांनी कूच केले. राजा अलीखानाने त्यांचा पाठलाग केला आणि या बंडखोर लुटारूंना नर्मदेच्या तीरावर गाठून त्यांचा पराभव केला. त्यांचे सर्व सामानसुमान आणि वाहतुकीची जनावरे राजा अलीखानाच्या हाती पडली. या जनावरांमध्ये १०० हत्ती होते. सय्यद मुर्तजाला मात्र नदीपार होणे शक्य झाले आणि नदी ओलांडून पलीकडे गेल्यावर अकबर बादशहाची गाठ घेण्यासाठी म्हणून तो निघाला. बादशहाची भेट झाल्याबरोबर त्याच्यापाशी त्याने

राजा अलीखान आणि विशेषतः सलाबतखान यांच्याकडून त्याला जी वाईट वागणूक मिळाली होती त्याबद्दल त्याने बादशहापाशी तक्रार केली. अकबराला [ ४ ] (३२३) फार काळापासून दक्षिणेवर आक्रमण करण्याची इच्छा होती. आपली योजना प्रत्यक्ष अंमलात आणण्यासाठी ही चालून आलेली संधी उत्कृष्ट आहे असा त्याने विचार केला. हा हेतू मनात ठेवून त्याने दक्षिणेमधून आपल्याकडे निर्वासित म्हणून आलेल्या सय्यद मुर्तजा आदींना आपल्या चाकरीत दाखल करून घेतले आणि त्यांची लष्करातल्या मोठमोठ्या अधिकारपदावर नेमणूक केली. अकबराने दक्षिणेच्या अधिकाऱ्यांना इतके मोठे पदाधिकार दिलेले जेव्हा राजा अलीखानाने पाहिले तेव्हा दिल्लीपतीच्या आक्रमणाचे वारे कोणत्या दिशेने वाहणार याची त्याला कल्पना आली आणि त्याने आपल्यातर्फे एका वकिलाची अकबराच्या दरबाराकडे जाण्यासाठी नियुक्ती केली. त्याच्याबरोबर सय्यद मुर्तजाकडून त्याने जिंकून घेतलेले सर्व हत्ती आणि त्याशिवाय बरीचशी रक्कम अकबराकडे रुजू करण्यासाठी त्याने दिली. अकबराने हा नजराणा (हिजरी १००३ / इ. स. १५९४) स्वीकारला. पुढील वर्षी म्हणजे हिजरी १००३ या वर्षी सय्यद मुर्तजा आणि दक्षिणेतील त्याच्याबरोबर आलेले इतर अधिकारी यांना मांडूकडे कूच करण्याचा आदेश देण्यात आला. वऱ्हाडवर आक्रमण करण्यासाठी म्हणून मांडू येथे मिर्जा अजीज कोका याने त्याच्या साहाय्यार्थ भरपूर सैनिक त्यांच्या समवेत दिले. या सैन्याचा प्रतिकार करण्यासाठी म्हणून अहमदनगरच्या सुलतानाने मिर्जा महमद तकी याला रवाना केले. नर्मदेच्या तीरावरील हंडिया या गावी दिल्लीची फौज येऊन पोहोचल्यावर सेनाप्रमुखाने आपल्यातर्फे एक माणूस राजा अलीखानाने अहमदनगर आणि वऱ्हाडच्या अधिकाऱ्यात समझोता घडवून आणण्यासाठी मध्यस्थी करण्याच्या हेतूने राजा अलीखानाकडे पाठविला. इकडे राजा अलीखानाने दक्षिणेच्या सैन्याला येऊन मिळावे म्हणून त्याला उद्युक्त करण्यासाठी निजामशाही सेनापती महमद तकी याला त्याबद्दल राजा अलीखानाकडे बोलणी करण्यासाठी सर्वाधिकार देण्यात आले. एकंदर सर्व परिस्थितीचा मुत्सद्याला साजेलशा परिपूर्णतेने विचार केल्यानंतर राजा अलीखानाने दक्षिणेच्या फौजेबरोबर हातमिळवणी करणेच योग्य आहे असा निर्णय घेतला आणि त्याप्रमाणे त्याच्याबरोबर त्याने हंडियाच्या दिशेने कूच केले. मोगल सैन्याच्या तळापासून दोन मैलाच्या अंतरावर आल्यानंतर त्यांनी दुसऱ्या दिवशी मोगलांवर हल्ला करण्याचे ठरविले. [ ४ ] (३२४) परंतु त्या दिवशी रात्री आपली उभारलेली छावणी तशीच ठेवून आणि दिवे जळते ठेवून मोगल सेनापतीने छावणी सोडली आणि वऱ्हाडचा मार्ग धरला. वाटेतला प्रदेश उद्ध्वस्त करून मोगल सैन्य एलिचपूर आणि बाळापूर या शहरांवर घसरले आणि ती शहरे त्यांनी उद्ध्वस्त केली. मोगल सेनापतीने टाकलेल्या डावपेचाची हकीकत जेव्हा राजा अलीखान आणि मिर्जा महमद तकी यांच्या कानावर पडली तेव्हा त्यांनी देखील आपली छावणी उठवून कूच केले. परंतु दरम्यान आपल्या हंडिया येथे मागे ठेवलेल्या सैनिकांबरोबर

कोणत्याही प्रतिकाराला तोंड द्यावे न लागता मोगलांनी पुन्हा हातमिळवणी केली. इकडे अहमदनगर आणि खानदेश यांच्या सेनानींनी आपल्यावर मोगलांचा हल्ला होणार नाही याबद्दल योग्य ती काळजी घेतली आणि ते आपापल्या देशाकडे परतले.

( ३६ ) हिजरी १००४ / इ. स. १५९५ ) हिजरी १००४ या वर्षी बुरहाण निजामशहा याचा मृत्यू झाला. त्यानंतर अकबर बादशहाचा मुलगा राजपुत्र मुराद मिर्जा आणि बैरामखानाचा मुलगा खानखानान यांनी दक्षिण देश पादाक्रांत करण्यासाठी म्हणून उत्तरेकडून कूच केले. त्याच्याबरोबर राजा अली-खानानेही कूच केले. खानखानान आणि अहमदनगरच्या फौजेचा सेनापती सुहेलखान यांच्यामध्ये झालेल्या अलौकिक रणसंग्रामात दारूगोळ्याच्या गाडीत झालेल्या प्रचंड स्फोटात राजा अलीखान आणि त्याचबरोबर अनेक नावाजलेले अधिकारी ठार झाले. ३३६.२०□

( ३७ ) हिजरी १००५ / इ. स. १५९६ ) राजा अलीखानाची कारकीर्द एकंदर २१ वर्षे झाली. त्याचे शव बुऱ्हाणपूर येथे नेण्यात आले आणि त्याला साजेलशा इतमामाने त्याचे दफन करण्यात आले.

## बहादूरखान फारुकी [४] ( ३२५ )

( ३८ ) हिजरी १००५ / इ. स. १५९६ ) राजा अलीखानाचा हिजरी १००५ मध्ये मृत्यू झाल्यानंतर त्याचा मुलगा बहादूरखान हा गादीवर आला. अकबर बादशहाचा सेनापती खानखानान याचे त्याला पूर्ण साहाय्य होते. गादीवर आल्यानंतर बहादूरखान हा आपल्या अंतःपुरातील स्त्रियांच्या सहवासात स्वतःला पूर्णपणे विसरून गेला. त्याने राज्यकारभाराकडे संपूर्णपणे दुर्लक्ष केले आणि हांजीखोर आणि नर्तक यांच्या नादात तो आपला वेळ घालवू लागला. जेव्हा राजपुत्र मुरादमिर्जा शहापूर या शहरी मरण पावला तेव्हा त्याच्या जागेवर दक्षिणेच्या मोहिमेवर सेनापती म्हणून राजपुत्र दानियल मिर्जा याची नेमणूक झाली. तद्देशीय प्रथेप्रमाणे बहादूरखानाने दानियल मिर्जाकडे त्याच्या भावाच्या मृत्यूबद्दल दुखवट्याचा संदेश पाठविला नाही किंवा दक्षिणेमधील मोगल फौजेचा सेनापती या अधिकारपदावर नेमणूक झाल्याबद्दल त्याचे अभिनंदन देखील केले नाही. यानंतर काही वर्षांनी अकबर बादशहा दक्षिणेवर आक्रमण करण्याच्या उघडउघड हेतूने मांडू येथे येऊन दाखल झाला. बहादूरखानाचा बाप राजा अलीखान याचे धोरण अकबर बादशहाच्या चांगुलपणावर विसंबून राहण्याचे होते. बहादूरखानाने या धोरणाचा त्याग केला आणि आपले सैन्य घेऊन अकबराबरोबर सहकार्य करण्याचे ऐवजी तो असीरच्या किल्ल्याकडे चालता झाला आणि तेथे त्याने आपल्याला कोंडून घेतले. एवढेच नव्हे अकबराने किल्ल्याला वेढा दिल्यास वेढ्याला तोंड देण्याच्या दृष्टीने तयारी सुरू केली.

या तयारीची पूर्तता करण्याकरता त्याने गावातील कामगार, कारागीर [४] (३२६) आणि दुकानदार, वगैरे मिळून एकंदर १५००० लोकांना असीरच्या किल्ल्यात बोलावून घेतले. काम करण्यासाठी उपयोग व्हावा म्हणून त्याने घोडी आणि गुरेढोरे किल्ल्यात आणून भरली. पुढेमागे त्यांचा उपयोग भक्ष्य म्हणून आणि इतर कामासाठी होईल असाही त्याचा उद्देश असावा. अकबर बादशहाच्या कानावर जेव्हा बहादूरखानाने चालविलेल्या तयारीची हकीकत गेली तेव्हा त्याने खानखानान आणि राजपुत्र दानियल मिर्जा यांना अहमदनगरचा वेढा चालू ठेवण्यासाठी हुकूम रवाना केला आणि त्याने स्वतः दक्षिणेकडे कूच केले. त्याने बुऱ्हाणपूर शहराचा ताबा घेतला आणि आपल्या एका अधिकाऱ्याला असीरगडला वेढा देण्यासाठी पाठीमागे ठेवले. किल्ल्याची नाकेबंदी बऱ्याच काळपर्यंत चालू राहिली. तेथल्या घाणीने हवा दूषित झाली आणि दररोज मरणाऱ्या अनेक गुराढोरांमुळे अनेक साथींनी धुमाकूळ घातला. या सुमारास प्रचलित असलेल्या एका दंतकथेला अधिकच प्रसिद्धी मिळाली आणि किल्ल्यावरील शिबंदीचा सहजगत्या त्यावर विश्वास बसला. ती दंतकथा म्हणजे जादूटोण्याचा उपयोग करून किल्ले जिंकून घेण्याचे सामर्थ्य अकबराच्या अंगात आहे आणि ज्या मोहिमेवर अकबर बादशहा निघत असे तेव्हा त्याच्याबरोबर जादूगार जात असत. आपल्यावर ओढवलेल्या आपत्तीचे मूळ म्हणजे अकबर उपयोगात आणीत असलेला जादूटोणा हे होय अशी बहादूरखानाने आपल्या मनाची समजूत करून घेतली आणि त्याच्या भोवतालच्या भयानक परिस्थितीने जो धुमाकूळ घातला होता तिचा प्रतिकार करण्यासाठी त्याने कोणतीच उपाययोजना केली नाही. मृत जनावरांची वासलात लावण्यासाठीही त्याने आज्ञा दिली नाही किंवा शुश्रूषागृहे उभारण्यासंबंधी काही हालचाल केली नाही. ज्यांचा किल्ल्यावर काही उपयोग नव्हता अशा माणसांना बाहेर पाठविण्याची तजवीज देखील त्याने केली नाही. सरतेशेवटी किल्ल्यावरील शिपाई अगदी थकून गेले आणि कर्तव्य पार पाडण्याकडे त्यांचे पूर्णपणे दुर्लक्ष होऊ लागले. अखेर मोगलांनी किल्ल्यावर धडक दिली आणि मल्लीगर या नावाने ओळखला जाणारा खालचा किल्ला आपल्या ताब्यात घेतला. बहादूरखानाजवळ दहा वर्षे पुरेल एवढे धान्य आणि अपार द्रव्यसंचय होता तरी देखील बहादूरखानाचा उन्मत्तपणा इतक्या थराला गेला की त्याने आपल्या सैनिकांच्या पगाराची थकबाकी ठेवली. किल्ल्यावरील शिपायांनी शेवटी पाहिले की आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लागण्याची काही आशा नाही तेव्हा त्यांनी बहादूरखानाला पकडण्याचे आणि त्याला अकबर बादशहाच्या स्वाधीन करण्याचे ठरविले. परंतु त्यांचा हा बेत सिद्धीस [४] (३२७) जाण्याचे अगोदरच बहादूरखानाला या बेताचा सुगावा लागला. त्याने आपल्या अधिकाऱ्यांची सल्लामसलत घेतली. त्यांनी एकमताने असा निर्णय दिला की यापुढे उपाययोजना करण्याच्या पलीकडे परिस्थिती गेली आहे. दरम्यान रोगराईने भयानक धुमाकूळ घातला. किल्ल्यावरील शिबंदीचे धैर्य पूर्णपणे खचले आणि ती दुर्बल झाली.

किल्ला अकबर बादशहाच्या स्वाधीन करण्यासाठी बोलणी सुरू करणे एवढा एकच मार्ग आता उरला. किल्ल्यावरील शिबंदीच्या प्राणांना धोका देण्यात येऊ नये आणि त्यांना आपल्या मालमत्तेसह किल्ल्यावरून सुरक्षित जाऊ देण्यात यावे या गोष्टीची याचना तहाच्या वाटाघाटीत करण्याचे ठरले. अकबर बादशहाने या अटींना मान्यता दिली परंतु बहादूरखानाला त्याच्या खाजगी मालमत्तेसह किल्ल्यावरून बाहेर सुरक्षितपणे जाऊन देण्याचा प्रस्ताव मात्र अकबर बादशहाने नाकारला. ही सर्व मालमत्ता अकबर-बादशहाच्या हाती पडली.

(३९) हिजरी १००८ | इ. स. १५९९ | फारुकी घराण्यातील शेवटचा सुलतान बहादूरखान हा अशा रितीने हिजरी १००८ या वर्षी अकबर-बादशहाच्या आधीन झाला. असीरचा अजिंक्य किल्ला त्यावरील दहा वर्षेपर्यंत पुरेल इतक्या सामुग्रीसह आणि अगणित संपत्तीसह अकबर बादशहाच्या विजयी सैन्याच्या हाती पडला.

(४०) बुऱ्हाणपूर[३३७*] शहराच्या[३३८*] नजीकच असलेले बहादूरपूर हे शहर बहादूरखानाने वसविले होते.

# पुस्तक ५ वे

## प्रकरण ५ वे

### वऱ्हाडच्या इमादशाही घराण्याचा इतिहास

#### फत्तेउल्ला इमादउल्मुल्क [३] (४८५)

( १ ) या घराण्यातील प्रसिद्धी पावलेला पहिला पुरुष हा विजयनगरच्या हिंदू काफरांचा वंशज होता. हा लहान असताना ( बहमनीच्या ) विजयनगरबरोबर झालेल्या युद्धात कैद केला गेला. वऱ्हाडचा सुभेदार आणि प्रमुख सेनापती खानजहान याच्या संरक्षक दलात त्याची भरती झाली. तो जसजसा मोठा होत गेला तसतसे त्याच्या अंगचे गुण आणि धारिष्ट ही प्रकर्षाने प्रकट होऊ लागली. खानजहानचे त्याच्या गुणांकडे लक्ष गेले आणि त्याची त्याच्यावर इतकी मर्जी बसली की त्याने फत्तेऊल्लाची नियुक्ती उच्चाधिकारावर केली. खानजहानच्या मृत्यूनंतर तो बहमनींच्या महमदाबाद बिदर येथील दरबारी दाखल झाला. महमदशहा बहमनीच्या कारकिर्दीत ख्वाजा महमूद गावानच्या दरबारातील प्रतिष्ठेमुळे त्याला इमाद उलमुल्क [३] (४८६) ही पदवी देण्यात आली. त्यानंतर त्याची नेमणूक वऱ्हाडच्या फौजेच्या सेनापतीच्या अधिकारपदावर करण्यात आली. ३३९०

हिजरी ८९० ) हिजरी ८९० या वर्षी त्याने आपले स्वातंत्र्य पुकारले.
इ. स. १४८४ ) त्यानंतर थोड्याच अवधीनंतर तो कालवश झाला. त्याच्यानंतर त्याचा मोठा मुलगा सुलतान पदावर आला. ३३९अ*

#### अल्लाउद्दीन इमादशहा [३] (४८७)

( २ ) फत्तेऊल्ला याच्या मृत्यूनंतर त्याचा मोठा मुलगा अल्लाउद्दीन हा राज्याधिकारावर आला. बहमनी घराण्याच्या इतर अमिरांचा कित्ता त्याने गिरविला आणि स्वतःला त्याने सुलतान म्हणून जाहीर केले. त्यावेळी त्याने अल्लाउद्दीन इमादशहा ही पदवी घेतली आणि आपले शाही निवासस्थान गावील येथे स्थापन केले. अमीर बरीद याच्या छळाला कंटाळून महमूदशहा बहमनी याने जेव्हा पलायन केले तेव्हा महमूदशहाला सिंहासनावर पुन्हा बसविण्याच्या उद्देशाने अल्लाउद्दीन इमादशहाने वऱ्हाडचे सर्व सैन्य घेऊन बिदरकडे कूच केले. बहमनी घराण्याचे पुनरुत्थापन होईल या भीतीने बुरहाण निजामशहा बहरी हा अमीर बरीदच्या मदतीला धावून गेला. यापूर्वी सांगण्यात आल्याप्रमाणे लढाई अगदी ऐन रंगात आली असताना महमूद-

शहाने आपल्या उपकारकर्त्याजवळून पळ काढला आणि आपल्याला पुन्हा अमीर बरीद याच्या बंधनात जखडून घेतले.

( ३ ) हिजरी ९२३ इ. स. १५१६ } हिजरी ९२३ या वर्षी अमीर बरीद याने बिदरहून कूच केले आणि प्रथम माहूरचा किल्ला जिंकून घेतला. त्यानंतर त्याने रामगीरवर हल्ला चढविला आणि किल्ल्यावर घसरा करून तो काबीज केला. किल्ल्याचा किल्लेदार खुदावंदखान हबशी याला त्याने ठार केले. [३] (४८८) या आक्रमणाची बातमी समजताच अल्लाउद्दीन इमादशहाने खुदावंदखानाच्या कुटुंबियांना मदत करण्याच्या मिषाने आपल्या फौजेची जमवाजमव करण्यास सुरुवात केली. इमादशहाबरोबर युद्ध टाळावे या हेतूने अमीर बरीद याने माहूर आणि रामगीर या दोन किल्ल्यांवर खुदावंदखानाच्या मुलांच्या नेमणुका केल्या आणि त्यांनी अल्लाउद्दीन इमादशहाचे मांडलिक म्हणून राहावे असा सल्ला त्याने त्यांना दिला. अल्लाउद्दीन इमादशहा कूच करीत किल्ल्यांजवळ आला अणि त्याने दगाफटका करून दोन्ही किल्ल्यांवर आपला कबजा केला. खुदावंदखानाचे मुलगे बुरहाण निजामशहाकडे आश्रयाकरता पळून गेले. इकडे अल्लाउद्दीन इमादशहा याने किल्ल्यांवर आपल्या तर्फेचे किल्लेदार आणि शिबंदी यांच्या नेमणुका केल्या.

( ४ ) अल्लाउद्दीन इमादशहाने जबरीने वरील किल्ल्यांवर कबजा केल्यामुळे आणि वऱ्हाड बळकाविल्यामुळे निजामशहाच्या दरबारात अतिशय चीड आणि असंतोष निर्माण झाला. परिणामी अहमदनगर आणि वऱ्हाड या राज्यामध्ये वारंवार लढाया झाल्या. या लढ्यात इमादशहाची इतकी ससेहोलपट झाली की त्याला आपली राजधानी गावील इकडे पळून जावे लागले. यापूर्वी अल्लाउद्दीनचा विवाह इस्माईल आदिलशहा याच्या मुलीबरोबर झाला होता. त्यामुळे त्या दोघांमध्ये मैत्रीचे दृढसंबंध निर्माण झाले होते. परंतु या सुमारास इस्माईल आदिलशहा हा विजयनगरच्या राजाबरोबर युद्धात गुंतला असल्याकारणाने त्याला आपला दोस्त आणि जावई अल्लाउद्दीन याला मदत करणे शक्य नव्हते. या परिस्थितीचा फायदा घेऊन बुरहाण निजामशहाने अल्लाउद्दीन इमादशहाकडून माहूर आणि रामगीर हे दोन किल्ले हिसकावून घेतले.

( ५ ) हिजरी ९३४ इ. स. १५२७ } हिजरी ९३४ या वर्षी अल्लाउद्दीन इमादशहा याने खानदेशचा सुलतान मिरान महमदखान [३] (४८९) याजबरोबर संगनमत करून बुरहाण निजामशहाचा सूड घेण्यासाठी त्याच्यावर चाल केली.

( ६ ) दोहो बाजूस घनघोर युद्ध झाले आणि बुरहाण निजामशहाला विजयश्रीने माळ घातली. त्याच्या ताब्यात शत्रूचे सर्व हत्ती आणि तोफखाना ही आली. अल्लाउद्दीन आणि महमदखान यांनी आपापल्या राजधान्यांकडे काढता पाय घेतला. अल्लाउद्दीन आणि महमदखान यांनी प्रथम इस्माईल आदिलशहाकडे मदतीची याचना

केली होती. वर झालेल्या युद्धात महमदखानाने आपले सर्व हत्ती आणि तोफखाना गमाविली होती. त्याचे गुजराथचा बहादूरशहा याजबरोबर नाते होते. त्याजकडे त्याने मदतीसाठी याचना केली. बहादूरशहाची आपल्या राज्याचा विस्तार व्हावा हीच एकमेव इच्छा होती. आपला हा बेत प्रत्यक्षात आणण्यासाठी ही एक चांगली संधी आहे असा त्याने विचार केला. त्याने त्याप्रमाणे आपल्याबरोबर बरीच मोठी फौज घेऊन दक्षिणेच्या दिशेने कूच केले. परंतु अल्लाउद्दीन याला गुजराथच्या सुलतानाच्या खऱ्याखुऱ्या बेताचा लगोलग सुगावा लागला. त्याने गावील येथे बहादूरशहाच्या नावे खुत्बा वाचला आणि त्याचे वऱ्हाडवरील सार्वभौमत्व मान्य केले. त्याच वेळी खानदेशाचा मिरान महमदखान याने अहमदनगरच्या राज्यावर बहादूरशहाने ताबडतोब चालून जावे असा त्याच्या पाठीशी धोशा घेतला आणि अहमदनगरच्या निजामशाही घराण्यावर बहादूरशहाने सक्तीने शरणागती लादावी असा त्याला आग्रह केला. अल्लाउद्दीन आणि मिरान महमद यांच्या तोंडपुजेपणाचा बहादूरशहाला अंतर्यामी अतिशय आनंद झाला आणि त्याने दौलताबादमार्गे अहमदनगरकडे कूच केले. पूर्वी कथन केल्याप्रमाणे तेथे त्याने आपल्या नावाची नाणी पाडली आणि सार्वभौमसत्ताधीश म्हणून आपल्या नावाने द्वाही फिरविली. यानंतर उपरिनिर्दिष्ट सुलतान आपापल्या राजधान्यांकडे परत फिरले. थोड्याच कालावधीनंतर अल्लाउद्दीन इमादशहा मरण पावला. त्याच्या नंतर त्याचा मोठा मुलगा सुलतानपदावर आला.

## दर्या इमादशहा [ ३ ] ( ४९० )

( ७ ) गादीवर आल्यानंतर काही काळ उलटल्यावर दर्या इमादशहा याने आपली मुलगी बिबी दौलत हिचे बुरहाण निजामशहाशी लग्न लावले. दर्या इमादशहाने आपल्या मृत्यूपर्यंत दक्षिणेमधील सर्व सुलतानांबरोबर अत्यंत सलोख्याचे संबंध ठेवून राज्यकारभार केला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा अल्पवयी मुलगा सुलतानपदावर आला.

## बुरहाण इमादशहा [ ३ ] ( ४९१ )

( ८ ) दर्या इमादशहाचा मृत्यू झाल्यानंतर त्याचा मुलगा बुरहाण इमादशहा हा गादीवर आला. तो वयाने पोरगेलासा होता. त्याचा मंत्री तुफालखान दक्कनी हा राजप्रतिनिधी म्हणून राज्यकारभार पाहू लागला. बुरहाण इमादशहा हा वयात येऊन आपल्या राज्याचा अधिकार पाहाण्यायोग्य होण्याचे अगोदरच तुफालखानाने खानदेशाचा सुलतान आणि निजामशाही दरबार यांच्या मदतीने वऱ्हाडचे राज्य बळकावले. सरतेशेवटी त्याने गादीचा खरा वारस बुरहाण इमादशहा याला लोखंडी बेड्या घालून नरनाळ्याच्या किल्ल्यात बंदिवासात ठेवले आणि स्वतःला राज्यभिषेक करून घेतला. ( तो स्वतःला सुलतान म्हणवून घेऊ लागला. )

## तुफालखान [३] (४९२)

(९) तुफालखान हा अतिशय साहसी होता. योजलेले बेत पूर्णत्वाला नेण्यासाठी ज्या उदात्त गुणवत्तेची आवश्यकता असते ती त्याच्या अंगी प्रकर्षाने एकवटलेली होती. ही गुणवत्ता म्हणजे पहाडालाही लाजवील असे साहस आणि पूर्णत्वास पोहोचलेले युक्तीचापल्य. त्याने वऱ्हाडची गादी बळकाविल्यानंतर त्याच्या सामर्थ्यांत इतकी झपाट्याने वाढ होत गेली की विजापूर आणि अहमदनगरच्या सुलतानांना तुफालखानाचा नाश केल्याखेरीज गत्यंतर नाही असे वाटू लागले. त्यांनी आपल्या फौजा एकवटून त्याच्यावर चाल केली. दोन्ही सुलतानांना तोंड देणे तुफालखानाच्या कुवतीपलीकडचे होते. म्हणून त्याने अली आदिलशहा आणि त्याचा वजीर यांच्याशी संधान बांधले. आदिलशहाने युद्ध थांबवावे म्हणून त्याने आदिलशहाकडे मौल्यवान हिरे-माणकांचा नजराणा भेट म्हणून पाठविला. मुर्तजा निजामशहाच्या हे संगनमत जेव्हा दृष्टोत्पत्तीस आले तेव्हा त्याने अहमदनगरकडे माघार घेतली. परंतु हिजरी
हिजरी ९८० / इ. स. १५६८ } ९८० या वर्षी बुरहाण इमादशहाची नरनाळा किल्ल्याच्या बंदीवासातून मुक्तता करण्याच्या इराद्याने तुफालखान विरुद्ध मुर्तजा निजामशहाने पुन्हा चढाई केली.

(१०) या आक्रमणाचा मात्र तुफालखानाने धसका घेतला आणि मदत मागण्यासाठी आपल्या वकिलाला त्याने गोवळकोंड्याचा इब्राहीम कुतुबशहाकडे रवाना केले. कुतुबशहाकडून मदत आल्यावर त्याने अहमदनगरचा वजीर [३] (४९३) चेंगीजखान याच्यावर हल्ला चढविला. परंतु तुफालखानाचा पूर्णपणे पराभव झाला. त्याचा सक्त पाठलाग करण्यात आला. पाठलागात त्याची खूप हानी झाली. अखेर त्याला नरनाळ्याच्या किल्ल्यात कोंडण्यात आले. त्याच्या मुलाने गाविलगडच्या किल्ल्याचा आश्रय घेतला. नरनाळ्याचा किल्ला एका उंच डोंगरावर असून अतिशय मजबूत होता. सहजासहजी त्याचा पाडाव होणे कठीण होते. हे ध्यानात घेऊन मुर्तजा निजामशहाने तात्पुरता त्या किल्ल्याला वेढा दिला आणि अखेर अहमदनगरला परत फिरण्याचे ठरविले. परंतु किल्ल्यावरील शिबंदीपैकी पुष्कळांना फितविण्यात चेंगीजखानाला यश आले. त्यांच्यापैकी काहीजण किल्ल्यावरून निसटून त्याला येऊन मिळाले. त्यांना भरपूर बक्षिशी देण्यात आली. इकडे किल्ल्यावर रसद आणि दाणागोट्याची तूट पडली आणि त्यामुळे किल्ल्यावरील अनेकांनी पळून आलेल्यांचे अनुकरण केले. सरतेशेवटी किल्ल्यावर तोफा चालविणारे फक्त बारा गोलंदाज शिल्लक राहिले. किल्ल्यावरील बंदोबस्ताची उत्तम प्रकारे माहिती पळून आलेल्या सैनिकांकडून चेंगीजखानाने मिळविली. अतिशय मोठ्या प्रयत्नाने त्याने एक तोफ किल्ल्यावर चढविण्यात यश मिळविले. या तोफेच्या भडिमाराने किल्ल्याचा एक बुरूज उद्ध्वस्त करून टाकण्यात आला. त्यामुळे पडलेल्या खिंडाराजवळ एका रात्री एक अधिकारी २८ सैनिक आणि एक बिगुलवाला यांना घेऊन पोहोचला. त्यांनी तटबंदी पार केली

आणि त्याचवेळी बिगुलवाल्याला बिगुल वाजविण्याचा हुकूम देण्यात आला. तुफालखानापाशी आता फारच थोडी माणसे शिल्लक होती. त्याला वाटले की किल्ल्यावर शत्रूकडील बऱ्याच माणसांनी प्रवेश मिळविला आहे. या समजुतीने त्याने किल्ल्याचे रक्षण करण्याचा कसलाही प्रयत्न न करता किल्ल्यालगतच्या डोंगरात पळ काढला. दुसऱ्या दिवशी मुर्तजा निजामशहाने किल्ल्यावरील ताब्यात घेता येण्याजोग्या सर्व सामुग्रीवर आपला कबजा केला आणि आपल्या सैनिकांना किल्ला आणि शहर लुटण्याची मुभा दिली. तुफालखानाच्या पाठलागावर सय्यद हुसेन अस्राबादी याला पाठविण्यात आले होते. तिसऱ्या दिवशी त्याने तुफालखानाला गाठले आणि त्याला कैद करून मुर्तजा निजामशहाच्या छावणीत आणले. त्यानंतर काही [ ३ ] (४९४) काळाने गाविलगडचा किल्ला मुर्तजा निजामशहाच्या स्वाधीन झाला. तुफालखानाचा मुलगा समशेरउल्मुल्क याला कैद करण्यात आले. कैदेत असलेल्या बुरहाण इमादशहाला वऱ्हाडच्या गादीवर बसविण्याचे ऐवजी मुर्तजा निजामशहाने त्याची रवानगी तुफालखान आणि त्याचा मुलगा समशेरउल्मुल्क यांच्याबरोबर निजामशाही राज्यातील एका किल्ल्यावर केली. तेथे त्यांना बंदिस्त करण्यात आले. असे म्हणतात की त्या ठिकाणी काही कालावधीनंतर निजामशहाच्या आज्ञेने त्या तिघांना गळा दाबून ठार मारण्यात आले. काहीजणांच्या मते तुफालखान आदिकरून सर्वांची ४० कुटुंबीय मंडळी होती. ही सर्वजण एका रात्री किल्ल्यावरील रक्षकांनी त्यांचा क्रूरपणे छळ केल्यामुळे मरण पावली. त्यांचे हालहाल करण्याचे कारण म्हणजे त्यांच्या निर्वाहासाठी मिळणारी रक्कम रक्षकांना लुबाडून घ्यावयाची इच्छा निर्माण झाली. परंतु त्या दुर्दैवी कैद्यांनी या गोष्टीला मान्यता देऊनही त्या रक्षकांचे समाधान झाले नाही. त्यांनी त्या सर्व कैद्यांना एका रात्री छोट्याशा तळघरात कोंडले. त्या रात्री भयंकर उष्मा होत होता. श्वास कोंडल्यामुळे दिवस उजाडावयाचे आतच ते सर्व कैदी मृत्युमुखी पडले. अशा तऱ्हेने इमादशाही घराण्याचा आणि वऱ्हाडची गादी बळकाविणाऱ्या तुफालखानाचा अस्त झाला. ३४०* ३४१*

# बिदरच्या बरीदशाही घराण्याचा इतिहास

## कासीम बरीद [३४२□] [३](४९५)

(१) बरीदशाही घराण्याची अहमदाबाद बिदर या राजधानीच्या ठिकाणी स्थापना झाल्यानंतर आज तागायत त्या घराण्यातील सात पुरुष सुलतानपदावर आले. [३४३*]

(२) कासीम बरीद तुर्क याला ख्वाजा शहाबुद्दीन अली येजदी याने बिदर येथे आणले आणि जॉर्जियन गुलाम म्हणून त्याला सुलतान महमूदशहा लष्करी बहमनी याला विकले. महमूदशहाने आपल्याजवळील जॉर्जियन सेवकांमध्ये त्याची भरती केली. महमूदशहाच्या कारकिर्दीत पैठण आणि चाकण यामधील प्रदेशात मराठा बंडखोरांनी धुंडाई माजविली होती. तिचा मोड करण्यासाठी कासीम बरीद याला पाठविण्यात आले. या कामगिरीत आपल्या शौर्याने कासीम बरीद नावारूपाला आला. एका ठिकाणी झालेल्या चकमकीत कासीम बरीद याने विशेष शौर्य गाजवून जय मिळविला आणि साबाजी मराठा याला ठार मारले. सुलतानाने साबाजीच्या मुलीबरोबर कासीम बरीदचा मुलगा अमीर बरीद याचा त्याने केलेल्या सेवाचाकरीचे बक्षीस म्हणून विवाह लावून दिला. साबाजीच्या ताब्यातील मुलूख देखील त्याच्याकडे लावून देण्यात [३]:(४९६) आला. साबाजीच्या चाकरीत असलेले ४०० च्या वर मराठे शिपाई कासीम बरीदच्या चाकरीत शिरले. त्यांच्यापैकी पुष्कळ जणांची मने त्याने मुसलमान धर्म स्वीकारण्याबद्दल वळविली. कासीम बरीदच्या चाकरीत शिरलेल्या या मराठा शिपायांबद्दल अमीर बरीदच्या मनात अतिशय आपुलकीची भावना होती. मुलाच्या लग्नामुळे निर्माण झालेले जे नवीन नाते होते त्यामुळे कासीम बरीदचे त्याच्या जहागिरीवरील वर्चस्व अतिशय वाढले. त्याचा परिणाम असा झाला की, सुलतान महमूदशहा बहमनीच्या कारकिर्दीत इतर अमिरांप्रमाणेच त्याच्याही मनात आपल्याला राजकीय सत्ता प्राप्त व्हावी अशी इच्छा उत्पन्न झाली. आदिलशहा, निजामशहा आणि इमादशहा यांच्या सल्ल्यावरून त्याने औसा, कन्धार आणि उदगीर हे किल्ले बळकाविले. त्याने बहमनी सुलतानाकडे अहमदाबाद बिदर हे शहर आणि बिदरचा किल्ला ठेवून स्वतःच्या नावे खुत्बा वाचला आणि नाणी पाडली. आपल्या जहागिरीवर त्याने एकंदर १२ वर्षे महमूदशहा बहमनीच्या कारकिर्दीतच स्वतंत्रपणे राज्य चालविले. कासीम बरीदचा मृत्यू हिजरी ९१० या वर्षी झाला.

हिजरी ९१० }
इ. स. १५०४ }

## अमीर बरीद (३०४* ते ३४९*)

(३) आपल्या बापाच्या मृत्यूनंतर अमीर बरीद सुलतान पदावर आला. याच्या राजवटीत महमूदशहा बहमनी कालवश झाला. बहमनी घराण्यातील शेवटचा

सुलतान कलीमउल्ला शहा बहमनी हा बिदरहून अहमदनगरकडे पळून गेला. याच सुमारास इस्माईल आदिलशहाने बिदर जिंकून घेतले पण ते त्याने अमीर बरीद याच्या पुन्हा स्वाधीन केले. ज्यावेळी अलाउद्दीन इमादशहा आणि खानदेशाचा सुलतान मिरान महमदखान यांच्या चिथावणीवरून गुजराथच्या बहादूरशहाने [ ३ ] (४९७) दक्षिणेवर आक्रमण केले, त्यावेळी इस्माईल आदिलशहाने अमीर बरीद याला विजापूर येथे बोलावू पाठविले. अमीर बरीदकडे त्याने ४००० परदेशी घोडदळाचे अधिपत्य दिले. या घोडदळातील घोडेस्वारांनी इमामांचे अनुयायित्व दाखविणारी १२ कोनी शिरस्त्राणे परिधान केली होती. यापूर्वीच सांगण्यात आल्याप्रमाणे हे घोडदळ बुरहाण निजामशहाच्या सहाय्यार्थ पाठविण्यात आले. अमीर बरीद याने बहादूरशहाबरोबर झालेल्या लढाईत असामान्य शौर्य गाजविले. अखेर यानंतर काही वर्षांनी बुरहाण निजामशहाच्या सहाय्यार्थ कूच करून जात असताना अमीर बरीद एकाएकी आजारी पडला आणि त्याला दौलताबाद येथे मरण आले. त्याचा भाऊ ख्वाजा जहान याने अमीर बरीदचे शव अहमदाबाद बिदर येथे आणले. बिदर येथे त्याचे दफन करण्यात आले.

( ४ ) हिजरी ९४५ ⎫ अमीर बरीद याची एकंदर कारकीर्द ४५ वर्षे
इ. स. १५२९ ⎭ एवढी झाली.

## अली बरीदशहा (३५२* ते ३५५*)

( ५ ) बरीदशाही घराण्यामध्ये स्वतःला सुलतान म्हणवून घेणारा पहिला पुरुष म्हणजे अली बरीदशहा. कारण जरी त्याचा आजा कासीम बरीद याने राजचिन्हे धारण केली होती तरी तो स्वतःला सुलतान म्हणवून घेत नसे. अली बरीदशहा गादी-वर आल्यानंतर जेव्हा बुरहाण निजामशहाने आपला वजीरशहा ताहिर याला बरीदशहाचे अभिनंदन करण्यासाठी पाठविले तेव्हा अली बरीदशहाने परिणामांची क्षिती न बाळगता शहा ताहिरचा धर्मपंथ आणि त्याची मते यावर कडाडून हल्ला चढविला. यावेळी अलीबरीद याने बोलण्याच्या ओघात शहा ताहिरला जे टोमणे मारले त्यामुळे शहा ताहिरची मनःस्थिती संतप्त झाली आणि तो अली बरीदशहाच्या दरबारातून चालता झाला. अहमदनगर येथे परत आल्यावर त्याने आपल्याला मिळालेल्या अपमानास्पद वागणुकीची हकीकत बुराहाण निजामशहाच्या कानावर घातली आणि बिदरवर सैन्यासहवर्तमान चालून जाण्यासाठी त्याने [ ३ ] (४९८) बुरहाण निजामशहाला उद्युक्त केले. अली बरीदशहाने कल्याणीचा किल्ला इस्माईल आदिलशहाच्या ताब्यात दिला आणि त्याची मदत मागितली. इतके जरी झाले तरी बुरहाण निजामशहाने इतक्या झपाट्याने कूच केले की त्याच्या फौजा नजिक आल्याबरोबर औसा, कन्धार आणि उदगीर हे किल्ले त्याच्या स्वाधीन झाले. त्याने

बिदरच्या राज्याचा बहुतेक सर्व मुलूख पादाक्रान्त केला. अली बरीदशहाच्या ताब्यात सालीना ४००,००० होन उत्पन्न येईल एवढा मुलूख जेमतेम राहिला.

( ६ ) हिजरी ९८७ } ९८७ यावर्षी मुर्तजा निजामशहा याने बिदरच्या
इ. स. १५७९ } ताब्यातील उर्वरित मुलुखावर आक्रमण केले आणि खुद्द बिदरच्या राजधानीला वेढा दिला. अली बरीदची परिस्थिती अतिशय शोचनीय झाली आणि त्याने मदतीसाठी अली आदिलशहाकडे आपला वकील पाठविला. अली आदिलशहाने अली बरीदकडील दोन गुलामांची मागणी केली आणि ते आपल्याकडे पाठविल्यास आपण मदत करू असे कळविले. अली बरीदशहाने या गोष्टीला संमती दिली. अली आदिलशहाकडून २००० घोडेस्वार महमदाबाद बिदरचा वेढा उठविण्यासाठी म्हणून अली बरीदच्या मदतीसाठी कूच करून गेले. अली बरीदशहाच्या मदतीला आदिलशाही फौजा येत आहेत याची मुर्तजा निजामशहाला खबर कळली. त्याचवेळी आपला भाऊ बुरहाण निजामशहा याने अहमदनगर येथे बंडाचा झेंडा उभारल्याचेही त्याला कळले. तेव्हा त्याने अहमदनगरकडे माघार घेतली. किल्ल्याचा वेढा चालू ठेवण्याकरता त्याने मिर्जा यादगार याला आणि त्याच्या मदतीसाठी म्हणून गोवळकोंड्याकडून अहमदनगरच्या फौजेला येऊन मिळालेल्या कुतुबशाही फौजेला पाठीमागे ठेवले. परंतु विजापूरच्या फौजा बिदरपासून काही मैल अंतरावर चालून आल्या नाही तोच मिर्जा यादगार याने माघार घेतली. यानंतर अली बरीदशहाने वर उल्लेखिलेल्या दोन गुलामांना त्यांच्या इच्छेविरुद्ध विजापूरकरांच्या स्वाधीन केले. एका धन्याकडून दुसऱ्या धन्याच्या ताबेदारीत जावे लागल्यामुळे झालेला अपमान त्या तरुण गुलामांना अत्यंत असह्य झाला. यापूर्वीच सांगितल्याप्रमाणे या दोन गुलामांना जेव्हा विजापूर येथे आणण्यात आले तेव्हा त्यातील एकाने अली आदिलशहाला यमसदनास पाठविले. यानंतर काही काळाने अली [ ३ ] ( ४९९ )
हिजरी ९९० } बरीदशहा मरण पावला. त्याची कारकीर्द एकंदर २५ वर्षे झाली.
इ. स. १५६२ } त्याच्यानंतर त्याचा मोठा मुलगा सुलतानपदावर आला.[३५६□]

## इब्राहीम बरीदशहा*

( ७ ) हिजरी ९९७ } इब्राहीम बरीदशहाने एकंदर सात वर्षे राज्य केले
इ. स. १५६९ } आणि नंतर तो मरण पावला.[३५७□]

## कासीम बरीदशहा दुसरा

( ८ ) हिजरी १००० } इब्राहीम बरीदशहाच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ
इ. स. १५७२ } कासीम बरीदशहा दुसरा हा गादीवर आला त्याने तीन वर्षे राज्य केले आणि नैसर्गिकरित्या त्याचा मृत्यू झाला.

## मिर्जा अली बरीदशाहा

(९) कासीम बरीदशहा दुसरा याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा गादीवर आला. हा लहान असून त्याचे नाव मिर्जा अली बरीद असे होते. त्याचा एक नातलग अमीर बरीद याने काही कालावधीनंतर बिदरचे राज्य बळकाविले आणि मिर्जा अली बरीद याला बिदरमधून भागानगरला काढून लावले. त्यानंतर त्याने स्वतःला राज्याभिषेक करून घेतला आणि अमीर बरीद ही पदवी धारण केली.

## अमीर बरीदशाहा दुसरा [३] (५००)

(१०) हिजरी १०१८ } इ. स. १६०९ } प्रस्तुत वर्ष हिजरी १०१८ हे आहे. यावेळी बिदरच्या सिंहासनावर सुलतान म्हणून अमीर बरीदशहा दुसरा हा आहे.

## गोवळकोंड्याच्या कुतुबशाही घराण्याचा इतिहास

### सुलतान कुली कुतुबशहा [ ३ ] (३२१)

( १ ) इब्राहीम कुतुबशहाच्या कारकिर्दीत पर्शियाचा एक रहिवासी शहा खुर्शा याने एक ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथात त्याने कुतुबशाही घराण्याच्या उदयाचा इतिहास दिला होता. या ग्रंथाची प्रत मला मिळू शकली नाही त्यामुळे या घराण्याच्या इतिहासासंबंधी जेवढी माहिती मला मिळविता आली तेवढयावरच समाधान मानणे मला भाग पडले.

( २ ) सुलतान कुली हा वटार्लू तुर्कमान जमातीच्या वशंजांपैकी होता असे म्हणतात. ही जमात अली शुकुर याच्या संप्रदायातील होती. [ ३ ] (३२२) त्याच्या दरबारातील काही अमिरउमरावांनी असे ठामपणे प्रतिपादन केले की सुलतान कुली हा पर्शियाचा सुलतान मिर्जा जहानशहा याचा नातू होता. त्यांनी प्रकट केलेल्या या मताचा पुरस्कार करणारा निश्चित आणि ठाम पुरावा मात्र मला मिळू शकला नाही. असे सांगितले जाते की सुलतान कुलीचा जन्म हमदान येथे झाला आणि महमदशहा बहमनीच्या कारकिर्दीच्या अगदी अखेरीला तो दक्षिणेत आला. त्यावेळी तो तारुण्याच्या ऐन भरात होता. महमदशहा बहमनीच्या शरीररक्षक दलात अनेक तुर्की लोकांच्या पलटणी होत्या. त्यापैकी एका पलटणीत त्याची भरती झाली. कोणत्याही अधिकाराच्या जागेला उपयुक्त अशा उत्कृष्ट शिक्षणाचा लाभ त्याला झाल्यामुळे त्यानंतर एका सरकारी विभागात एका खात्याचा सचिव म्हणून त्याची नियुक्ती करण्यात आली. यानंतर काही काळाने बहमनी दरबाराकडे तक्रारी आल्या की तेलंगणातील रहिवासी आणि छोटे छोटे जमीनदार यांनी सरकारी सारा भरण्याचे सपशेल नाकारले आहे आणि त्यांनी बंडाचे निशाण उभारले आहे. तेव्हा महमदशहा बहमनीने तेलंगणात एका अधिकाऱ्याच्या हाताखाली फौजेची रवानगी करण्याचे ठरविले. परंतु सुलतान कुलीने आपण फौज घेतल्याशिवाय तेलंगणात जातो आणि तेथील परिस्थिती समाधानकारकपणे आटोक्यात आणतो अशी सुलतानाकडे सांगी पाठविली. त्याप्रमाणे त्याची या कामावर नेमणूक करण्यात आली. त्याच्या कामगिरीत त्याला इतके यश आले की थोड्याच कालावधित त्याने हिंदूंनी बळकाविलेले तेलंगणातील अनेक लहान लहान जिल्हे परत जिंकून घेतले.

( ३ ) महमूदशहा बहमनीच्या कारकिर्दीत सुलतान कुलीला अमीरपदाचा मान देण्यात आला आणि त्याला कुतुबउल्मुल्क या पदवीचा मानकरी करण्यात आले. त्यानंतर काही काळाने युसुफ आदिलशहा, महमद निजामशहा आणि फतेउल्ला इमादशहा यांनी बहमनींबरोबरची राजनिष्ठा झुगारून दिली आणि आपले स्वातंत्र्य जाहीर केले आणि आपापल्या मुलखात १२ इमामांच्या नावे खुत्थ्याचे जाहीर पठण व्हावे असा हुकूम काढला. या परिस्थितीत बहमनी घराण्याचा एक अधिकारी आणि

सेनापती या नात्याने सुलतान कुली यानेही बारा इमामांच्या नावे जाहीररित्या खुत्ब्याचे पठण करण्याची प्रथा सुरू केली. हिजरी ९१८ यावर्षी महमूदशहा बहमनीच्या हातातील उरलीसुरली सत्ता नाहीशी झाली. राज्यकारभारात त्याच्या अंगी दुबळेपणा आला आणि [ ३ ] ( ३२३ ) राज्यातील सत्ता त्याचा वजीर बरीद याजकडे जाऊन बरीदचे वर्चस्व राज्यकारभारात प्रस्थापित झाले. तोपर्यंत सुलतान कुली याने आपले स्वातंत्र्य पुकारले नाही. परंतु वरीलप्रमाणे परिस्थिती अस्तित्वात आल्यानंतर त्याने आपले स्वातंत्र्य जाहीर केले.

हिजरी ९१८
इ. स. १५१२

( ४ ) हिंदुस्थानात रूढ असलेल्या सर्वमान्य पद्धतीचे अनुकरण न करता सुलतान कुली याने आपल्या दरबारी रितीरिवाजाबाबत पर्शियातील चालीरितींचे अनुकरण केले. त्यापैकी एक रूढ पद्धत दिवसातून पाच वेळा नौबती अथवा शाही वाद्यवृंदांकडून वाद्ये वाजविण्याची होती. त्याने राज्यातील अधिकाराच्या सर्व जागांवर आपल्या देशबांधवांची भरती केली. सुलतानपदाच्या सर्व मानमरातबांचा स्वीकार केल्यानंतरही तो बिदरच्या महमूदशहा बहमनीकडे उंची आणि भारी नजराणा भेट म्हणून पाठवीत असे.

( ५ ) दक्षिणेमधील सर्व सुलतानांबरोबर सुलतान कुली कुतुबशहा याचे संबंध शांततेचे आणि मैत्रीचे होते. या प्रसंगाला अपवाद म्हणजे ज्यावेळी फतेउल्ला इमादशहा याच्या चिथावणीवरून गुजराथचा सुलतान बहादूरशहा याने दक्षिणेवर आक्रमण केले आणि अहमदनगरच्या निजामशाही राज्याच्या बव्हंशी सर्व प्रदेशात जाळपोळ आणि लुटालूट केली हा होय. त्यावेळी सुलतान कुली कुतुबशहा याने आपला वकील पाठविला आणि बहादूरशहाबरोबर मैत्रीची बोलणी सुरू केली. परंतु बहादूरशहा जेव्हा गुजराथेला परतला तेव्हा हिजरी ९४० या वर्षी बुरहाण निजामशहाच्या चिथावणीवरून इस्माईल आदिलशहा याने सुलतान कुली कुतुबशहाच्या ताब्यातील कल्याणीच्या किल्ल्याला वेढा दिला. आदिलशाही फौजांबरोबर मुकाबला करणे सुलतान कुली कुतुबशहा याला शक्य न झाल्याने त्याने विजापूरच्या फौजांची रसद तोडण्यासाठी म्हणून आपल्या सैन्याची केवळ एक तुकडी रवाना केली. कुतुबशहाचे सुदैव म्हणून याच सुमारास इस्माईल आदिलशहाला एकाएकी तापाने घेरले आणि त्यातच त्याचा मृत्यू झाला. यावर सुलतान कुली कुतुबशहा याने तह घडवून आणण्यासाठी मध्यस्थी म्हणून बुरहाण निजामशहाकडे आपला एक दूत पाठविला. यानंतर विजापूर आणि गोवळकोंडा यामध्ये तह झाला.

हिजरी ९४०
इ. स. १५३३

( ६ ) सुलतान कुली कुतुबशहाचा सर्वांत मोठा मुलगा जमशीद हा होता. आपल्या बापाचा मृत्यू कधी होईल याची तो बराच काळपर्यंत मार्ग–[ ३ ] ( ३२४ ) प्रतिक्षा करीत होता. वरील घटनेनंतर काही काळाने त्याने आपल्या एका गुलामाला सुलतान कुली कुतुबशहाचा खून करण्यास उद्युक्त केले. त्याप्रमाणे एके दिवशी कुतुबशहा काही हिऱ्यांची पारख करत असताना ह्या गुलामाने खंजीर उपसला आणि

हिजरी ९५० } कुतुबशहाच्या हृदयात खोलवर खुपसला. ही घटना हिजरी ९५०
इ. स. १५४३ } या वर्षी झाली. आपण केलेले कृत्य सांगण्यासाठी खुनी गुलाम जमशीदकडे धावतपळत गेला परंतु या खुनाच्या पाठीमागे आपला हात आहे हे जगजाहीर होईल या भीतीने त्याने त्या गुलामाला जागचेजागी तलवारीचा वार करून ठार मारले.

(७) सुलतान कुली कुतुबशहा याने एकंदर ३३ वर्षेपर्यंत राज्यकारभार केला. त्याच्या पाठीमागे त्याचे जमशीद, हैदर आणि इब्राहीम असे तीन मुलगे हयात होते. [३५८★]

## जमशीद कुतुबशहा [ ३ ] (३२५)

(८) आपल्या बापाच्या मृत्यूनंतर जमशीद कुतुबशहा हा तख्तावर आला. त्या प्रसंगी बुरहाण निजामशहाचा मुख्य वकील आणि पेशवा व धर्मगुरू शहा ताहिर याचे तेथे आगमन झाले. शहा ताहिरने जमशीद कुतुबशहाचे अभिनंदन केले. यानंतर काही काळाने आदिलशाही आणि निजामशाही सुलतानांमध्ये युद्ध पेटले. तेव्हा निजामशहाला मदत करण्यासाठी म्हणून जमशीद कुतुबशहाने आपल्या फौजेची जमवाजमव केली. त्यानंतर त्याने काकनी या गावाकडे कूच केले आणि तेथे त्याने एक मजबूत किल्ला बांधला. आदिलशहा या सुमारास रामराजा आणि बुरहाण निजामशहा याच्या संयुक्त फौजांबरोबर मुकाबला करण्यात गुंतला असल्यामुळे कुतुबशहावर चालून जाण्यासाठी सैन्याची रवानगी त्याला करता आली नाही. याचा फायदा घेऊन कुतुबशहाने काकनीहून एटगीरच्या किल्ल्याकडे कूच केले आणि किल्ल्याला त्याने वेढा दिला. दरम्यान इब्राहीम आदिलशहाने आपल्या दुसऱ्या शत्रूबरोबर शस्त्रसंधी केली होती. त्याने आपला एक सेनापती आसदखान लारी याच्याबरोबर भरपूर फौज देऊन त्याला एटगीरचा वेढा उठविण्यासाठी रवाना केले. ही बातमी कळल्यावर जमशीद कुतुबशहाने बुरहाण निजामशहाला पत्र लिहिले. त्यात त्याने असे कळविले की मी जे काही केले ते तुम्ही आणि रामराजाने आदिलशहाविरुद्ध केलेल्या कारवाईबरोबर एकोपा साधण्यासाठीच. या पत्रात जमशीद कुतुबशहाने त्याचा सल्ला घेतल्याशिवाय किंवा आदिलशहाबरोबर जो व्यवहार झाला त्याबद्दल त्याच्या कानावर काहीच न घालता तो केल्याबद्दल बुरहाण [ ३ ] (३२६) निजामशहाची खरडपट्टी काढली. जमशीद कुतुबशहाच्या या पत्रावर बुरहाण निजामशहाने कळविले की आपण जे काही केले त्याचे स्वरूप कायम नसून ती केवळ तात्पुरत्या स्वरूपाची तडजोड आहे. बुरहाण निजामशहाने जमशीद कुतुबशहाला काकनी येथे भरपूर शिबंदी ठेवण्याचा सल्ला दिला आणि त्याला असे वचन दिले की पावसाळा संपल्यानंतर आपण दोघांनी आपल्या फौजा एकवटून संगनमताने आदिलशाही मुलखावर चढाई करण्याची योजना आखू. मी स्वतः आदिलशाही मुलखाचा भीमानदीच्या पूर्वेकडचा सर्व भाग आपल्या ताब्यात घेईन. बुरहाण निजामशहाने

असेही सुचविले की एटगीर, सागर आणि कुलबर्गा ही तुम्ही आपल्या ताब्यात घ्यावी आणि नळदुर्ग आणि सोलापूर यावर माझा हक्क राहावा. निजामशहाच्या कारस्थानी स्वभावाची जमशीद कुतुबशहाला पूर्णपणे कल्पना होती. त्याने काकनीवर आपला ताबा ठेवला, एवढेच नव्हे तर एटगीरचा वेढा अधिक सक्त केला. परंतु विजापूरचा सेनानी आसदखान लारी याने प्रथम काकनीच्या किल्ल्यावर हल्ला केला. किल्ल्याचा वेढा तीन महिने चालल्यावर त्याने अचानक फौजा घुसवून किल्ला सर केला. किल्ल्यावरील एकूण-एक शिबंदीला त्याने ठार केले आणि तेथून झपाट्याने कूच करीत तो एटगीरच्या दिशेने निघाला. आसदखान लारीच्या फौजा नजीक आल्याचे दिसताच जमशीद कुतुबशहाने किल्ल्याचा वेढा उठविला आणि आपल्या देशाकडे त्याने माघार घेतली. आसदखान लारीने त्याचा पाठलाग केला. दोन्ही फौजांत झालेल्या अनेक चकमकीत आसदखानालाच नेहमी विजय मिळत गेला. यापैकी अखेरच्या चकमकीत आसदखान आणि जमशीद कुतुबशहा यांची लढाई जुंपली. या लढाइत आपल्या तलवारीचे आसदखानाने जमशीद कुतुबशहावर घाव घातले. त्याच्या तलवारीच्या वाराने कुतुबशहाच्या नाकाचे टोक तुटले, त्याच्या गालावर खोलवर जखम झाली आणि त्याच्या वरच्या ओठाचा थोडासा भाग फाटला. या जखमांमुळे कुतुबशहाच्या चेहऱ्यावर कायमचे व्यंग राहिले एवढेच नव्हे तर त्याला धडपणे खाणे अथवा पिणे हेही कठीण झाले. आपल्या राजधानीला परतल्यावर त्याने आपले वकील विजापूर येथे पाठविले आणि त्यांनी विजापूरच्या सुलतानाबरोबर शस्त्रसंधी घडवून आणली. यानंतर कुतुबशहाने हिंदूंच्या ताब्यात असलेला प्रदेश जिंकून घेण्याकडेच स्वतःच लक्ष वळविले. त्यासाठी झालेल्या लढायांत तो आजारी पडला आणि दोन वर्षे तर तो जगतो की मरतो अशी परिस्थिती निर्माण झाली. [३] (३२७) त्याची अस्वस्थता जसजशी वाढत गेली तसतसा त्याचा स्वभाव दिवसेंदिवस खिन्न बनत गेला. अगदी क्षुल्लक कारणावरून सुद्धा त्याने अनेकांना देहदंडाची शिक्षा दिली. त्याच्या क्रौर्यामुळे त्याची प्रजा भयचकीत होऊन हवालदिल झाली. त्याचे दोघे भाऊ बिदरला पळून गेले. त्यापैकी मोठा हैदरखान हा काही कालानंतर मरण पावला आणि त्याच्याहून धाकटा भाऊ इब्राहीम ह्याने विजयनगरकडे पळ काढला. दरम्यानच्या काळात हिजरी ९५७ } जमशीद कुतुबशहाला देखील हिजरी ९५७ या वर्षाच्या सुरुवातीला इ. स. १५५० } मृत्यू आला. त्याने एकंदर सात वर्षेपर्यंत राज्य केले. ३५९*३६०*

## ३६१□ इब्राहीम कुतुबशहा [३] (३२८)

(१) पुढे दिलेल्या वृत्तांन्तावरून त्या काळी दक्षिण देशात द्वंद्व युद्ध खेळण्याची लोकांची मजल कुठपर्यंत गेली होती हे दिसून येईल. इब्राहीम कुतुबशहा हा आपला भाऊ जमशीद कुतुबशहा सुलतानपदावर असताना विजयनगर येथे होता. त्याची रामराजाने उत्तम प्रकारे बडदास्त ठेवली आणि त्याच्या उदरनिर्वाहासाठी एका

जहागिरीचे उत्पन्न नेमून दिले. ह्या जहागिरीची मालकी रामराजाचा अधिकारी अंबरखान हबशी याजकडे होती. एकदा त्याची इब्राहीम कुतुबशहाबरोबर रस्त्यात गाठ पडली आणि अंबरखानाने आपली जहागिरी बळकाविल्याचा इब्राहीम कुतुबशहावर आरोप केला. इब्राहीम कुतुबशहाने यावर उत्तर दिले की सुलतानांना आपल्या ताब्यातील जहागिरीची मर्जीप्रमाणे वासलात लावण्याचा अधिकार आहे आणि विजयनगरच्या राजाने स्वतःच्या इच्छेप्रमाणे आपल्याला ती जहागीर बहाल केली [३] ( ३२९ ) आहे. एवढे बोलून इब्राहीम कुतुबशहा आपल्या वाटेने निघाला. परंतु अंबरखानाने तलवारीच्या बळावर आपल्या सुलतानपदावर हक्क शाबीत करून घेण्याची तुझी हिम्मत नाही असे बोलून इब्राहीम कुतुबशहाला डिवचले आणि तू भ्याड आहेस असे सांगून त्याची निर्भत्सना केली. अंबरखानाच्या उद्धटपणाबद्दल इब्राहीम कुतुबशहाने त्याला ताकीद दिली. परंतु इब्राहीमने दाखविलेल्या संयमामुळे अंबरखानाच्या क्रोधात अधिकच भर पडली आणि त्याने गलिच्छ भाषेत इब्राहीम कुतुबशहाला शिव्या देण्यास सुरुवात केली. यावर इब्राहीम कुतुबशहा घोड्यावरून खाली उतरला आणि त्याने म्यानातून तलवार उपसली. अंबरखानही त्याच्यावर धाऊन गेला. परंतु इब्राहीमच्या प्रसंगावधानाचा त्याला फायदा मिळाला आणि त्याने आपल्या प्रतिस्पर्ध्याला कंठस्नान घातले. अंबरखानाचा भाऊ जवळच उभा होता. त्याने आपल्या भावाचीच तळी उचलून धरली आणि इब्राहीमवर हल्ला केला. पण त्याने दाखविलेल्या अविचारीपणामुळे त्याचाही बळी पडला. इकडे जमशीद कुतुबशहाचा मृत्यू झाल्यानंतर त्याच्या दरबारी मंडळींनी त्याच्या २ वर्षांच्या अल्पवयी मुलाला सिंहासनावर बसविले. यावर कुतुबशहाच्या अमिरांनी राजवाड्यात एकच गर्दी जमविली आणि एकच कोलाहल माजविला. त्यांची दंगल इतकी वाढली की राज्याचा वकील आणि पेशवा मुस्तफाखान याने विजयनगरला असलेल्या इब्राहीम कुतुबशाहाला लिहिले आणि तावडतोब गोवळकोंड्याला निघून येण्याविषयी त्याला कळविले. राज्याच्या सरहद्दीपाशी तो आल्यावर मुस्तफाखान त्याला सामोरा गेला. मुस्तफाखानाला त्याने मिरजुमला ह्या अधिकारपदावर नेमले आणि त्याला मानाचा पोषाख दिला. थोड्याच कालावधित इब्राहीम कुतुबशहाला सलाबतखान ३००० घोडेस्वार घेऊन येऊन मिळाला आणि त्याचप्रमाणे दरबारात दंगल माजविणारे आणि अल्पवयी सुलतानाची बाजू घेणारे दक्षिणी यांना सोडून आलेले अधिकारी त्याला सामील झाले. इब्राहीम कुतुबशहा गोवळकोंड्याच्या राजधानीला पोहोचेपर्यंत त्याला येऊन मिळालेल्या स्वारांची संख्या ६००० वर गेली. यामुळे त्याच्या तख्तनशीन होण्याबाबत कोणतीच अडचण उरली नाही. दुसऱ्या दिवशी इब्राहीम कुतुबशहा हा सुलतनपदावर कोणत्याच प्रकारचा विरोध न होता विराजमान झाला. या परिस्थितीला कारण म्हणजे मुस्तफाखानाची अमाप लोकप्रियता होती. हे ध्यानात घेऊन इब्राहीम कुतुबशहाने यानंतर काही काळाने आपली बहीण मुस्तफाखानाला विवाहात दिली. [ ३ ] ( ३३० )

(१०) हिजरी ९६५ । हिजरी ९६५ या वर्षी इब्राहीम कुतुबशहाने हुसेन
इ. स. १५५८ ∫ निजामशहाबरोबर संगनमत करून विजापूरच्या राज्यावर आक्रमण केले. दोघांमध्ये त्यावेळी असे ठरले की हुसेन निजामशहाने कुलबर्गा घ्यावे आणि इब्राहीम कुतुबशहाने एटगीरचा कब्जा घ्यावा. या योजनेनुसार दोघाजणांनी पहिल्याप्रथम कुलबर्ग्याच्या दिशेने कूच केले. त्यावेळी इब्राहीम कुतुबशहाला हुसेन निजामशहाच्या प्रबल सामर्थ्याची कल्पना आली आणि त्या सामर्थ्याचा साम्राज्यतृष्णेच्या कामी उपयोग करण्याकरता सहाय्य करण्यास त्याने आपली अनिच्छा प्रकट केली आणि म्हणून काही दिवसानंतर एकाएकी तो आपली छावणी उठवून गोवळकोंड्याकडे चालता झाला. आदिलशाही फौजांबरोबर एकाएकी मुकाबला करणे हुसेन निजामशहाला अशक्य झाल्यामुळे त्याने अहमदनगरकडे माघार घेतली. जेव्हा अली आदिलशहा आणि रामराजा यांच्या संयुक्त फौजांनी हुसेन निजामशहाविरुद्ध चाल केली तेव्हा त्यांनी इब्राहीम कुतुबशहाला आपल्याला येऊन मिळण्याविषयी आवाहन केले आणि राजकीय स्वार्थी हेतू मनात बाळगून कुतुबशहा त्यांना जाऊन मिळाला. आदिलशहा आणि रामराजा यांनी अहमदनगरला वेढा दिला. त्यावेळी वेढ्यात तो हजर होता. परंतु अहमदनगरचा पाडाव झाल्यावर त्याच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे आदिलशहा आणि रामराजा यांना न विचारता आणि न सांगता-सवरता त्याने आपल्या सैनिकांस कुल फौजेतून काढून घेतले. आपल्या छावणीचा थोडासा भाग त्याने जागेवर ठेवला आणि स्वतः गोवळकोंड्याकडे माघार घेतली. युद्ध संपल्यानंतर इब्राहीम कुतुबशहाने आपला वकील हुसेन निजामशहाकडे पाठविला आणि त्याची मुलगी बिबी जुमली हिच्याबरोबर विवाह करण्यासंबंधीची आपली इच्छा त्याने निजामशहाला कळविली. हुसेन निजामशहाने कळविले की अली आदिलशहाकडून कल्याणीचा किल्ला संयुक्तरितीने चढाई करून हिसकावून घेण्यास आपण संमती देत असाल तर आपण केलेली विनंती मला मान्य आहे. कुतुबशहाने हिजरी ९७१ ⟩ या बेताला मंजुरी दिली आणि त्याप्रमाणे हिजरी ९७१ यावर्षी
इ. स. १५६४ ⟆ निजामशहा आणि कुतुबशहा यांनी आपापल्या राजधान्यांहून कल्याणीच्या किल्ल्याचा पाडाव करण्यासाठी कूच केले. कल्याणीजवळ कुतुबशहा आल्यावर त्याचा आणि बिबी जुमली हिचा विवाह मोठ्या थाटाने साजरा झाला. त्यानंतर दोघांच्या संयुक्त फौजांनी कल्याणीला वेढा दिला. दरम्यान अली आदिलशहा याने अहमदनगर आणि गोवळकोंडा या राज्यांच्या सुलतानांविरुद्ध रामराजा, तुफालखान आणि अमीर बरीद यांच्याशी संगनमत करून दोस्तीचा तह केला होता. [३](३३१) त्यामुळे कल्याणीचा वेढा उठविणे शहाणपणाचे आहे असा हुसेन निजामशहा आणि इब्राहीम कुतुबशहा यांनी विचार केला आणि त्यांनी आपापल्या राजधान्यांकडे वेढा उठवून माघार घेतली. रामराजा आणि अली आदिलशहा यांनी अहमदनगरपर्यंत हुसेन निजामशहाचा पाठलाग केला. मार्गातील सर्व निजामशाही मुलख त्यांनी उद्ध्वस्त केला. परतताना त्यांनी तेलंगणाच्या सरहद्दीवरील उदगी या गावी जवळजवळ

६ महिने छावणी केली आणि तेलंगणाच्या राज्याच्या काही भागात जाळपोळ आणि लुटालूट केली. तेलंगणाच्या सर्व राज्यांत घबराटीचे वातावरण पसरले. तेव्हा इब्राहीम कुतुबशहाने आपला वकील पाठविला आणि तहाची याचना केली.

( ११ ) हिजरी ९७२ ) यानंतर पुढल्याच वर्षी म्हणजे हिजरी ९७२ या
इ. स. १५६५ ) वर्षी इब्राहीम कुतुबशहा याने दक्षिणेतल्या इतर मुसलमान सुलतानांबरोबर संगनमत करून रामराजाविरुद्ध चाल केली. या लढाईत रामराजा ठार मारला गेला आणि त्याचा सर्व प्रदेश मुसलमान सुलतानांनी व्यापला. या यशस्वी मोहिमेवरून परतल्यानंतर कुतुबशहाचा वजीर आणि मेहुणा मुस्तफाखान आर्दिस्तानी हा रायचूर येथे कुतुबशहापासून वेगळा पडला आणि मक्केला जाण्याच्या मिषाखाली तो अली आदिलशहाला जाऊन मिळाला. मुर्तजा निजामशहाच्या कारकिर्दीत त्याची आई खुनजा सुलताना हिने माजविलेली बेदिली आणि सर्व राज्यभर निर्माण केलेली फाटाफूट यासंबंधी थोडीफार हकीकत वर दिलेली आहे. या सुमारास विजापूरच्या पूर्व सरहद्दीवर एक मजबूत किल्ला बांधण्याकरता अली आदिलशहाने आपला सुप्रसिद्ध सेनापती किश्वरखान लारी यास रवाना केले. या किल्ल्याला त्याने धारूर असे नाव दिले. याच वेळी त्याने निजामशाही सरकारातील अनेक गावे जिंकून घेतली.

(१२) मुर्तजा निजामशहा या वेळी वयात आला होता. आपल्या आईच्या कारस्थानी स्वभावापासून आपली कातडी बचावावी या हेतूने आईला किल्ल्यात बंदिस्त करून ठेवण्यास तो उद्युक्त झाला. यानंतर त्याने खानखानानला फौज [ २ ] (३३२) देऊन धारूरचा किल्ला काबीज करण्यासाठी नियुक्त केले आणि त्याच वेळी त्याला मदत करण्यासाठी म्हणून इब्राहीम कुतुबशहाला आवाहन केले. परंतु कुतुबशहा धारूर येथे पोहोचण्याचे अगोदरच धारूरचा किल्ला निजामशाही फौजांच्या हाती पडला होता. त्यामुळे आता कुतुबशाही आणि निजामशाही फौजांनी मिळून विजापूरच्या मुलुखावर आक्रमण केले. दोघांच्या फौजा कूच करून जात असताना इब्राहीम कुतुबशहाने अली आदिलशहाला परस्परामधील संपूर्ण मैत्रीची ग्वाही देणारे असे पत्र लिहिले आणि केवळ स्वतःपुरत्याच शस्त्रसंधीच्या अटी अली आदिलशहाला सादर केल्या. अली आदिलशहाने हे पत्र तसेच मुर्तजा निजामशहाकडे रवाना केले. इब्राहीम कुतुबशहाची दगलबाज कारवाई नजरेस आल्याबरोबर निजामशहाने त्याच्या छावणीवर हल्ला करण्यासाठी घोडेस्वारांचे एक पथक रवाना केले. कोणत्याही प्रतिकाराचा प्रयत्न न करता इब्राहीम कुतुबशहाने गोवळकोंड्याकडे पळ काढला. या पळापळीत त्याने १५० हत्ती तर गमावलेच परंतु त्याबरोबरच अनेक उत्कृष्ट अधिकारी आणि सैनिक यांना तो मुकला. त्याचा मुलगा अबदूल कादर हा जेव्हा राज्याच्या सरहद्दीपाशी आला तेव्हा त्याने आपण स्वतः काही अधिकाऱ्यांना बरोबर घेऊन दबा धरून राहण्याची आणि पाठलाग करीत येणाऱ्या शत्रूचा सैन्याच्या पिछाडीवर हल्ला करण्यासाठी बापाची परवानगी मागितली. इब्राहीम कुतुबशहाला साहजिकच

आपल्या मुलाचा मत्सर वाटला. त्याला असे वाटले की राजपुत्राचा आपल्याला ठार मारण्याचा बेत आहे आणि हा बेत सिद्धीस गेल्यास त्याला सिंहासन बळकावून सुलतान पदावर विराजमान व्हावयाचे आहे. म्हणून कुतुबशहाने अबदूल कादर यास एका किल्ल्यावर कैद करून ठेवले आणि काही काळाने त्याला विष घालून ठार मारण्याचा हुकूम दिला.

(१३) हिजरी ९८९ / इ. स. १५८१ } हिजरी ९८९ या वर्षी इब्राहीम कुतुबशहा एकाएकी मरण पावला. त्याने एकंदर ३२ वर्षे राज्य केले.[३६२★]

## महमद कुली कुतुबशहा [ ३ ] (३३३)

(१४) इब्राहीम कुतुबशहाच्या पाठीमागे त्याचे तीन मुलगे होते. त्यापैकी सर्वांत मोठा महमद कुली हा त्याच्यानंतर गादीवर आला. त्या वेळी त्याचे वय १२ वर्षांचे होते. सुलतानपदावर आल्यानंतर त्याने तावडतोब शहा निजाम इस्पहानी याच्या मुलीबरोबर लग्न केले. इस्पहानी हा तुबातीबा जमातीतील सय्यद घराण्यातला होता. इब्राहीम कुतुबशहाच्या कारकिर्दीत बऱ्याच काळपर्यंत तो अमीरजुम्ला या अधिकाराच्या जागेवर होता. सय्यद इस्पहानीच्या चिथावणीवरून त्याने अहमदनगरचा सेनापती सय्यद मुर्तजा सबजावरी याला मिळण्यासाठी कूच केले. त्यांच्या संयुक्त कारवाईचा उद्देश नळदुर्गवर हल्ला करण्याचा होता. परंतु नळदुर्गचा वेढा बराच काळ चालल्यानंतरही नळदुर्गच्या किल्लेदाराने दाद न दिल्याने त्यांनी विजापूरवर चाल करून जाण्याचे ठरविले. पण तिथेही दुर्दैव आणि अपयश हात धुवून त्यांच्या पाठीशी लागले. तेव्हा महमद कुली कुतुबशहाच्या दरबारी मंडळींनी आपले म्हणणे त्याच्यासमोर सादर केले. ते असे—दक्षिणेमधील सुलतान जर प्रत्यक्ष लढाईत भाग घेण्यासाठी गेले तर आपल्या दोस्त राष्ट्रांची मदत मागण्याची प्रथा त्यांच्यामध्ये प्रचलित आहे आणि अशा वेळी त्या दोस्त राष्ट्रांचे सुलतान त्यांना मदत करण्यासाठी प्रत्यक्ष चाल करून जातात. अहमदनगर आणि गोवळकोंडा या राज्यांमध्ये पूर्वापार अशी प्रथा चालत आलेली आहे. त्यामुळे अहमदनगरच्या [ ३ ] (३३४) एका सेनापतिबरोबर आपल्यासारख्या बादशहाने प्रत्यक्ष लढाईत भाग घेणे हे त्या दृष्टिकोनातून विचार केला असता भूषणावह आहे असे म्हणता येत नाही. दरबारी मंडळींचे हे निवेदन वस्तुतः महमद कुतुबशहाला सय्यद मुर्तजाबरोबर चाल करून जाण्याचा सल्ला देणाऱ्या सय्यद इस्पहानीला उद्देशून होते. पण या निवेदनातील अचूक सत्य महमद कुतुबशहाला तंतोतंत पटले आणि त्याप्रमाणे त्याने सय्यद मुर्तजाच्या फौजेबरोबर चालून जाण्यास सपशेल नकार दिला. यावर अहमदनगरच्या सेनापतीने निजामशहाला असे सुचविले की, कुतुबशाही आणि निजामशाही फौजांनी आपापल्या देशांकडे परत फिरावे. त्याचप्रमाणे अहमदनगरला लागून असलेला आदिलशाही

मुलखाचा भाग निजामशाही फौजांनी आपल्या ताब्यात घ्यावा आणि कुतुबशाही फौजांनी आपल्या इच्छेप्रमाणे कुलबर्गा आणि सरहद्दीवरील इतर ठिकाणे ताब्यात घ्यावी. हा प्रस्ताव निजामशहाला संमत झाल्यावर दोन्ही फौजा परस्परांपासून विभक्त झाल्या आणि त्यांनी आपापल्या सरहद्दीकडे कूच केले. महमद कुली कुतुबशहा हा कुलबर्गा येथे येऊन पोहोचला. तो जिल्हा जिंकून घेण्यासाठी त्याने आपला सेनापती मिर्जा जैन ऊर्फ मुस्तफाखान याला ७ हजार घोडेस्वारांची फौज आणि अनेक हत्ती देऊन ठेवले. नंतर तो स्वतः गोवळकोंड्याकडे निघाला. तेथे त्याने आपला वजीर आणि सासरा शहा मिर्जा याला त्याने दिलेल्या सल्ल्याबद्दल बंदिवासात ठेवले. यानंतर काही काळाने त्याने शहा मिर्जा याला त्याचे मूळ गाव इस्पहान येथे पाठविण्याचा हुकूम केला. परंतु वाटेतच तो मरण पावला.

( १५ ) दरम्यान मुस्तफाखानाने कुलबर्ग्याला लागून असलेली अनेक गावे जिंकून घेतली. परंतु त्याच्यावर विजापूरचा सेनापती दिलावरखान याने बलाढ्य सैन्यानिशी हल्ला केला. झालेल्या लढाईत दिलावरखानाला विजय मिळाला. या विजया-पाठोपाठ मुस्तफाखान गोवळकोंड्याला पोहोचण्याच्या अगोदर दिलावरखानाने त्याच्यापासून १२० हत्ती आणि इतर पुष्कळ मौल्यवान सामानसुमान काबीज केले.

( १६ ) हिजरी ९९५ } या प्रसंगानंतर दोन्ही राज्यांमध्ये तह झाला तो तह
इ. स. १५८६ } आजतागायत टिकून आहे. हिजरी [ ३ ] (३३५)
९९५ या वर्षी विजापूरहून गोवळकोंड्याकडे एका वकिलाची रवानगी झाली. या वकिलातीचा उद्देश कुतुबशहाच्या बहिणीची इब्राहीम आदिलशहाबरोबर विवाहासाठी मागणी घालण्याचा होता. त्याप्रमाणे राजकन्येची रवानगी विजापूरला करण्यात आली.

( १७ ) महमद कुली कुतुबशहाच्या कारकिर्दीला जेव्हा सुरुवात झाली तेव्हा तो भागामती नावाच्या एका नर्तकीच्या नादाने लुब्ध झाला. त्याने तिच्या कायम सेवेत राहण्यासाठी म्हणून १ हजार घोडेस्वारांचे एक पथक लावून दिले. गोवळकोंड्यांची हवा दूषित आणि राहण्यासाठी अयोग्य अशी झाल्यामुळे त्याने तेथून ८ मैल अंतरावर एका भव्य शहराची स्थापना केली. आपली आवडती कंचनी भागामती हिच्या नावावरून त्याने या शहराला भागानगर असे नाव दिले. जरी हल्ली या शहराच्या एका भागाचे भागानगर हे नाव टिकून आहे तरी कालांतराने या शहराला हैद्राबाद असे नाव पडले. या शहराचा घेर एकूण १० मैल आहे. हिंदुस्थानातल्या इतर शहरांप्रमाणे येथील रस्ते नसून ते रुंद आणि स्वच्छ आहेत. तेथील हवा आतिशय निरोगी असून शहरातील काही प्रमुख बाजारपेठांमधून वाहत्या पाण्याचे झरे खेळविण्यात आलेले आहेत. रस्त्यांच्या दोन्ही बाजूला झाडांच्या रांगा लावण्यात आलेल्या असून त्यामुळे चालणाऱ्यांना आल्हादकारक सावली आणि मनोहारी देखावा यांचा भरपूर आनंद उपभोगण्यास मिळतो. रस्त्याच्या दोन्ही बाजूस असलेली दुकाने मजबूत दगडाने बांधून काढण्यात आलेली आहेत. महमद कुली कुतुबशहाच्या राजवाड्याचे वर्णन हिंदुस्थानातील अतिशय सुंदर आणि प्रशस्त या शब्दांत केले जाते. [३६३★]




# तळटीपा

## कुलबर्ग्याचे बहमनी घराणे

( १ ) * फरिश्त्याने बहमनी सुलतानांचा इतिहास इ. स. १६०२ मध्ये लिहून पुरा केला तर **बुरहाणचा** कर्ता सय्यद अली याने आपले लिखाणाचे काम इ. स. १५९२ मध्ये संपविले.

( २ ) * या ठिकाणी ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे की, अलीशहाने धारूर येथे आपल्या नावे द्वाही फिरविली आणि अलाउद्दीन हा किताब धारण केला. काही काळानंतर त्याचा भाऊ पहिला बहमनी सुलतान हसन गंगू यानेही हीच पदवी धारण केली. खरे पाहिले तर त्यांनी धारण केलेली ही पदवी म्हणजे त्यांचा चुलता ज्या खिलजी घराण्याचा सेवक होता त्या घराण्यातील अलाउद्दीन खिलजी या नावावरूनच होय. त्याचप्रमाणे सिंहासनावर येण्यापूर्वी हसन गंगू याने जफरखान ही जी पदवी धारण केली ती त्याचा चुलता हिजबरुद्दीन जफरखान याच्या नावावरूनच. **इसामी** ( ४६४ ) या सबंध जमातीचा उल्लेख जफरखानी आणि खिलजी निजाद असा करतो.

( ३ ) * गंगू या ब्राह्मणाचे नाव सोडून दिल्यास इतर सर्व अधिकाऱ्यांचा उल्लेख **इसामी** ( ५२५–२७ ) आणि **बुरहाण** ( १६ ) या ग्रंथात आढळतो. गंगू ब्राह्मणाचा उल्लेख फक्त फरिश्ता करतो.

( ४ ) * **रमजान** महिना संपण्याचे अगोदर ४-५ दिवस सुलतानाने दिल्लीकडे कूच केले. त्याने ईदचा सण सुलतानपूर येथे साजरा केला. या ठिकाणी सुलतानाने साम्राज्यामध्ये उद्‌भवलेली बंडे आणि दंगेधोपे यांच्या कारणाबाबत जियाउद्दीन बरनी याच्याबरोबर चर्चा केली.

( ५ ) * ह्या आणि इतर अनेक ठिकाणी फरिश्त्याचा ग्रंथ वाचताना दैवयोगाचा कसा जबरदस्त पगडा लेखकाच्या मनावर पडला होता हे ध्यानात आल्यावाचून राहात नाही.

( ६ ) * राज्यारोहणाची तारीख **बरनी** ( ५१४ ) याने शुक्रवार २३-११-१३४७ ही दिली आहे. ही तारीख चुकीची आहे. कारण त्यावेळी हजर असलेला इसामी ही तारीख ३-८-१३४७ अशी देतो.

( ७ ) * **मुंतखाब** ( १, २३६ ) या ग्रंथात असे विधान केले आहे की जफरखानाने इस्माईल याला पदच्युत केले आणि स्वतः सिंहासनावर आरोहण केले.

(८) * फरिश्त्याच्या ग्रंथाच्या हस्तलिखितात सगळीकडे ही विसंगती दिसून येते. कारण जर:का सुलतानाचे नाव हसन असे असते तर शहराचा उल्लेख हसनाबाद असा करण्यात आला असता. परंतु ज्यांनी या ग्रंथाची नक्कल केली त्यांच्या हातून सुलतानाच्या अथवा शहराच्या नावाबद्दल काहीतरी गफलत झालेली दिसते.

(९) * बहमनी घराण्याची स्थापना झाल्यावर पश्चिम अहमदनगरच्या डोंगराळ भागातील कोळ्यांनी आपल्याला बरेच स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले. ह्यामधील एक कोळी अधिकारी जव्हारचा राजा झाला. जव्हारच्या राज्यात सुरुवातीला अहमदनगर जिल्ह्याचा बराचसा भाग मोडत असे· (*Trans. Bom. Geog. Soc. I.* 244) जव्हारच्या अधिपतींच्या ताब्यात २२ किल्ले असून त्यांचे वार्षिक उत्पन्न ९ लाख रुपये होते. ( Mackintosh in *Trans. Bom. Geog. Soc. I*. 240)

(१०) * बहमनशहा हा जेव्हा गादीवर आला तेव्हा राजधानी म्हणून गुलबर्ग्याचा उल्लेख झाला तरी प्रत्यक्ष दरबार मात्र दौलताबाद येथेच होता.

(११) * या आणि इतर अनेक ठिकाणी फरिश्त्याचे हिंदू समाजाच्या स्थिती-बद्दलचे अज्ञान आपल्याला दिसून येते. नाहीतर त्याच्या काळातच नव्हे तर दक्षिणेत मुसलमानी आक्रमण होण्याचे अगोदर बराच काळ ब्राह्मणांकडेच फक्त सरकारी हिशेब ठेवण्याचे काम होते ही गोष्ट त्याला ज्ञात झाली असती.

(१२) * कर्नाटक म्हणजे कोल्हापूर आणि बिदर यांना समांतर काढलेल्या रेषेच्या दक्षिणेकडील कानडी भाषा बोलला जाणारा प्रदेश होय.

(१३) * या ठिकाणी ही गोष्ट नमूद करणे आवश्यक आहे की बहमनींनी सुरुवातीला पश्चिम अहमदनगर आणि पुणे हा प्रदेश ५२ महालांमध्ये विभागला. प्रत्येक विभागावर त्यांनी वंशपरंपरेच्या हक्काने एका कोळी प्रमुखाची नेमणूक केली आणि त्याला बहमनी राज्याच्या सरदारात दाखल करून घेतले. या ५२ प्रमुख अथवा नाईकांवर त्यांनी **सरनाईक** या अधिकाऱ्याची नेमणूक केली. **सरनाईक** हा मुसलमान असे आणि त्याचा राज्यकारभार जुन्नर येथून चाले. ( Mackintosh in *Trans. Bom. Geog Soc. I.* 238)

(१४) * मेजर किंग यांनी **बुरहाणे मासिर** या सय्यद अलीच्या फारशी ग्रंथाच्या पहिल्या भागाचे इंग्रजीत भाषांतर केले. त्यातील पहिल्या प्रकरणाला टीप म्हणून मेजर किंग यांनी **तजकिरत-उल्-मुलुक** या ग्रंथातला उतारा दिला आहे. त्यात बहमनी घराण्याची उत्पत्ती आणि अल्लाउद्दीन हसन शहा बहमनी याची कारकीर्द यासंबंधीचा वृत्तान्त दिला आहे. समकालीन इतर ग्रंथांत असलेल्या मजकुरात आणि या वृत्तांतात बरीच तफावत आहे. तरीसुद्धा एक मनोरंजक आणि वेगळ्या पद्धतीने दिलेली हकीकत म्हणून ती खाली देत आहे.

कुशाग्र बुद्धीच्या वाचकांपासून बहमनी घराण्याच्या कुलवृत्तांताची हकीकत लपवून ठेवण्यात काहीच अर्थ नाही. त्या घराण्यातील अनेक व्यक्तींना मी भेटलो आहे. त्यांच्यापैकी काहीजण असे सांगतात की, पर्शियाचा बादशहा बहमन हा आपला मूळ पुरुष होता. बहमन हा इस्फन्दियारचा मुलगा आणि गरशास्पचा नातू.

दुसऱ्या एका हकीकतीत असे म्हटले आहे की हसन गंगू हाच बहमनी घराण्याचा संस्थापक. हा हसन गंगू एक उच्च घराण्यातला तरुण होता परंतु दैव उलटल्यामुळे त्याच्यावर दुरावस्था ओढविली.

एक दिवस तो जंगलात एका झाडाच्या सावलीखाली झोपला होता. गंगू पंडित बहमन ( ब्राह्मण ) त्या ठिकाणाहून जात असताना त्याने झाडाखाली झोपलेल्या या तरुणाला बघितले. त्याच्या डोक्यावर एका जातिवंत विषारी नागाने आपली फडा धरली होती. हिरव्यागार गवताची एक धारदार पाती त्या नागाने आपल्या तोंडात धरली होती आणि हसन गंगूच्या तोंडावर बसणारी चिलटे तो नाग हाकलून लावीत होता. गंगू ब्राह्मणाने वरील गोष्ट पाहिली आणि त्याला कळून चुकले की या तरुणाच्या दैवात मोठे भाग्य साठविले आहे. हसनला जाग येईपर्यंत तो नाग त्याच्या डोक्यावर फणा धरून होता. तो जागा झाल्यावर नागाने फडा खाली केली आणि तो आल्या मार्गाने चालता झाला. यावर तो ब्राम्हण हसनकडे गेला आणि त्याच्या कुलाविषयी त्याने चौकशी केली. हसनने आपल्याबद्दलची सर्व माहिती त्याला सांगितली. गंगू पंडित हसनला म्हणाला, " अतिशय मोठे भाग्य तुझ्या नशिबी मला दिसते. " हसनने त्याला विचारले, "आपण असे का म्हणता ?" गंगू पंडित उत्तरला, "आताच मी एक विचित्र घटना बघितली. तू निद्रित असताना एक मोठा नाग तेथे आला आणि तुझ्या मस्तकावर आपली फडा उभारून, तोंडात गवताची काडी धरून तुझ्या तोंडाभोवती उडणाऱ्या माशा तो मारीत राहिला. तू जागा झालास, आणि एखाद्या चाकराप्रमाणे मान खाली घालून तो येथून नाहीसा झाला. नागासारख्या भयंकर जनावराने ज्या अर्थी तुझी अशी सेवा केली आहे त्या अर्थी तुझे भाग्य उदयास येणार आहे यात काहीच शंका नाही. भविष्यकाळात तुझ्या छत्राखाली चाकरी करावयास मिळावी असे मी अगदी मनापासून इच्छितो. कदाचित योगायोग जमून तुझी कृपा झाल्यास मला एकादी मोठी मानाची जागाही मिळेल. माझी तुझ्यापाशी अशी नम्र विनंती अर्जी आहे की तुझ्या नावाच्या अखेर तू माझे नाव जोडावेस आणि तू आणि तुझे वंशज यांनी आपल्या सर्व फर्मानांवर बहमनी दस्तखत करावी. " गंगू पंडिताच्या या विनंतीचा हसनने स्वीकार केला. त्याने आपल्या नावापुढे बहमनी असे लिहिण्यास सुरुवात केली. पुढे त्याच्या कुळातील १८ सुलतानांनीही आपणास बहमनी असे म्हणवून घेतले.

हसन गंगू हा शेख महमद सिराज जुनैदी या शेखसाहेबाच्या चाकरीत कोणत्या तरी अधिकारावर होता. आपला बहुतेक वेळ तो आपल्या कामाच्या खोलीत घालवीत

असे. त्या काळी गंगी हा मिरज जिल्ह्याचा ( याला हल्ली मुर्तजाबाद असे म्हणतात ) एक भाग होता. तेथे एक दिवस शेख जुनैदी स्नान करावे या बेतात होता. आपले पागोटे त्याने मस्तक धुण्यासाठी म्हणून काढले. ते लगेच हसन गंगूने आपल्या हातात घेतले आणि स्वतःच्या डोक्यावर ठेवले. यावर शेख म्हणाला, " हसन गंगू जणू माझ्यापासून सुलतानशाहीचा मुकुटच मागून घेत आहे. "

याप्रमाणे काही काळ गेल्यावर हसनने एक दिवस फार अडचणीत असल्याची तक्रार शेख जुनैदीकडे केली. शेख उत्तरला, " सर्व गोष्टी वेळ जमून आली म्हणजेच घडून येतात. "

मुर्तजाबादचा प्रदेश काफरांच्या मुलुखात मोडत होता. त्या ठिकाणी एक देखील मशीद नव्हती. शेखने तेथे एक मशीद स्थापन केली. तेथे असलेल्या सर्व मुसलमानांनी एकमुखाने शेखला त्या मशिदीचा मुख्य नेमले.

एक दिवस कर्मधर्मसंयोगाने हसनने मातीने एक भांडे भरले आणि ते त्याने वर उचलले. शेख जुनैदी ते पाहून म्हणाला, " हसनची इच्छा या जगाचे ओझेच जणू वाहण्याची दिसते. "

एक दिवस शेख जुनैदी निद्रिस्त होता. त्याच्या अंगावर सूर्यकिरण येऊ लागले. हसनने आपल्या अंगरख्याने त्याच्यावर सावली धरली. शेख जागा झाला आणि त्याच्या नजरेस ही गोष्ट आली. तेव्हा तो म्हणाला, " हसन माझ्यापासून जणू शाही कनातीचीच अपेक्षा करीत आहे. "

एकदा हसनची आई शेख जुनैदीनकडे गेली आणि तिने त्याला आपली हलाखीची परिस्थिती सांगितली. शेखने तिला एका विशिष्ट जागेवर खणण्यास सांगितले आणि तो म्हणाला, " तुमच्या सर्व इच्छा पुऱ्या होतील. " शेखच्या आज्ञे-प्रमाणे त्यांनी ती जागा खणण्यास सुरुवात केली. खणता खणता त्यांना दगड आणि चुना यात बांधलेले बांधकाम आढळले. त्याची माहिती त्यांनी शेखला दिली. शेख म्हणाला, 'तुमच्या इच्छा पुऱ्या झाल्या असे समजून तुम्ही त्या सर्वसाक्षी परमेश्वराचे आभार माना. तुम्ही आभार मानलेत तर तुमचे वैभव मी अधिक वृद्धिंगत करीन.' "

एक दिवस हसन आपल्या धन्याच्या चाकरीत गुंतला असताना शेख म्हणाला, " हे राजाधिराज तू सैन्य गोळा कर आणि जिहाद पुकारून पाखंड्यांचा सर्व प्रदेश इस्लामच्या छायेखाली आण. " हसनने उत्तर दिले, " महाराज, जिहाद पुकारण्या-साठी आणि लढाईची तयारी करण्याकरता द्रव्याची जरुरी आहे आणि आता मी तर असा भिकारी आहे. " यावर शेख जुनैदी म्हणाला, " त्या अतिशय पवित्र आणि अतिशय उच्चस्थानी वास करीत असलेल्या परमेश्वराने तुझ्यावर संपत्तीची खैरात केली आहे. " यानंतर शेख हसनला घेऊन त्याने ज्या जागी त्याला खणण्यास सांगितले

होते तेथे तो गेला. त्या ठिकाणी पडलेली संपत्ती जुनैदीने हसनला दाखविली. जुनैदीच्या सांगण्याप्रमाणे हसनने आपल्याला पाहिजे होते तेवढे द्रव्य तेथून नेले. त्या द्रव्याच्या जोरावर त्याने फौज जमविली. यानंतर तो शेखकडे आला आणि त्याने शेखला ही गोष्ट सांगितली. गंगू पंडिताने हसनची चाकरी करण्यात आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. या गोष्टी घडल्यानंतर शेख जुनैदी हसनला म्हणाला, " आता तू शुक्रवारी या ठिकाणी हजर राहा कारण विधिलिखिताने नेमून दिलेला तोच दिवस आहे."

-रात्र पडल्यावर हसन त्या ठिकाणी हजर झाला. शेखबरोबर असलेल्या फौजेसमवेत त्याने फातिहाची प्रार्थना म्हटली. शेखने हसनच्या कमरेला कमरपट्टा बांधला आणि त्याला मिरजेच्या दिशेने कूच करण्यास सांगितले.

हसन मिरजेच्या आसमंतातल्या प्रदेशात येऊन पोहोचला. त्या किल्ल्याची सुभेदारी एका स्त्रीकडे होती. तिचे नाव राणी दुर्गावती असे होते. त्यांच्या येण्याची कल्पना नसल्यामुळे ती प्रवासावर गेली होती. दोघांची गाठ पडली आणि चकमकीला सुरुवात झाली.

या लढाईत मुसलमानांच्या फौजेला संपूर्ण विजय प्राप्त झाला. राणी दुर्गावतीला कैद करण्यात आले. मुसलमानी सैन्य मिरजेच्या किल्ल्यात शिरले. या विजयाची खबर एका पत्रान्वये शेखकडे रवाना करण्यात आली. शेख जुनैदीला या बातमीने आनंद झाला. त्याने हसनला उत्तर पाठवून कळविले की तुला आणि इस्लामच्या प्रजेला हा पहिला विजय शुभदायी असल्यामुळे मिरज शहराला मुबारकाबाद हे नाव देण्यात यावे. ही घटना हिजरी ७४८ (इ. स. १३४७) या वर्षी घडली यानंतर शेख जुनैदीने हसनला आशिर्वाद देऊन सांगितले " आता तुम्ही आक्रमण चालू ठेवा, विजयश्री तुमच्या बाजूला आहे. "

मुबारकाबाद आणि आजूबाजूचे जिल्हे याप्रमाणे हसनच्या ताब्यात आले. यानंतर मुसलमानांचे वैभव आणि सत्ता यांची दिवसेंदिवस वाढ होत गेली. त्यांनी त्या बाजूच्या प्रदेशांतील बंडाळीचा बिमोड केला आणि प्रतिस्पर्ध्यांचा विरोध मोडून काढला. नंतर त्यांनी शेख जुनैदीच्या सल्ल्यानुसार गुलबर्ग्याच्या दिशेने कूच केले.

गुलबर्ग्याच्या आसमंतातील प्रदेशांत आल्यावर त्यांनी गुलबर्ग्याच्या किल्ल्याचा कोतवाल आणि त्या किल्ल्यावरील शिबंदी यांच्या हालचाली आणि कारवाया यांच्यावर सक्त नजर ठेवली. किल्ल्यावरील शिबंदीची संख्या आणि त्यांनी केलेली युद्ध-सामुग्रीची जमवाजमव याबद्दलचा त्यांनी अंदाज घेतला. एकंदर परिस्थितीची कल्पना आल्यावर त्यांनी असे ठरविले की शत्रूशी तुलना करता आपली फौज कमी आहे आणि आपल्याकडून किल्ला घेणे जमणार नाही. याप्रमाणे त्यांनी शेख जुनैदीला सांगितले. त्याने उत्तर दिले, " बुधवारी रात्री परतबराय हा आपल्या देवतेच्या दर्शनाला जाईल. ती जागा गुलबर्ग्यापासून तीन **फरसाखच्या** ( अंदाजे-साडेदहा मैल ) अंतरावर आहे." त्याच वेळेची संधी साधून तू किल्ल्यावर चाल करून जा, कारण विजय हा तुमचाच आहे.

शेखचे उत्तर ऐकून हसनला आनंद झाला. त्याने शेख जुनैदीच्या पायाचे चुंबन घेतले. ठरलेल्या दिवशी रात्री त्याने किल्ल्याच्या दिशेने कूच केले. किल्ल्यातील शिबंदीला परतबराय (बहुधा किल्ल्याचा कोतवाल असावा) परत आला असावा असे वाटले. त्यांनी किल्ल्याचा दरवाजा उघडला. हसन गंगूने धाडसाने किल्ल्यात प्रवेश केला आणि किल्ल्यातील शिबंदीला बाहेर काढून लावले. ही बातमी कळताच परतबराय गोंधळून गेला. आपल्या फौजेसहित तीर्थक्षेत्राहून तो माघारा फिरला आणि इस्लामच्या फौजेला येऊन भिडला. लढाईची एकच धुमश्चक्री उडाली. मुसलमानी फौजेने शत्रूवर बाणांचा पाऊस पाडला. या धामधुमीत परतबराय मारला गेला आणि त्याची फौज पांगली. परतबरायाचे शरीर किल्ल्याच्या दरवाज्याजवळ पुरण्यात आले. त्याची निशाणी अजून अस्तित्वात आहे.

गुलबर्ग्याचे नाव बदलून अहमदाबाद असे ठेवण्यात आले. आणखी कोणताही प्रसंग न घडता हसन गंगूला अहमदाबाद शहरामध्ये राजसिंहासनावर बसविण्यात आले. त्याने सुलतान अल्लाउद्दीन बहमनशहा हा किताब धारण केला. त्याने गंगू पंडिताला मोठ्या हुद्यावर चढविले. दोघांमध्ये असा करार झाला की, "सुलतान अल्लाउद्दीन आणि त्याचे सर्व वारस यांनी "बहमनशहा" हे आडनाव लावावे." ही घटना **हिजरी** ७४८ (इ. स. १३४७) या वर्षी घडली.

अल्लाउद्दीन हसनशहा याने शहाणपणाने आणि खंबीरपणे राज्यकारभार केला. त्याची कारकीर्द १३ वर्षे, १० महिने आणि २७ दिवस झाली. तो **हिजरी** ७६१ (इ. स. १३५९) या वर्षी मृत्यू पावला. त्याने आपल्या हयातभर शेख जुनैदीचे शिष्यत्व पत्करले. त्याच्या वारसांनीही या बाबतीत त्याचाच कित्ता गिरविला.

सुलतान हसनने आपला मोठा मुलगा सुलतान महमद यास आपला वारस म्हणून नेमले.

**तजकिरत उल्मुलुक** या ग्रंथामधील टीप समाप्त.

(९५) * सुलतानाच्या नवीन सिंहासनावरील राज्यारोहणाची तारीख सर हेग यांनी २१-३-१३६५ अशी दिली आहे ती चुकीची आहे.

(९६) * शेख सिराजउद्दीन जुनैदी याने महमदशहाला राज्याभिषेक केला. शेख सिराजउद्दीन याचा जन्म इ. स. १२७१ मध्ये पेशावर येथे झाला. तो महमद-**बिन**-तुघलक याच्याबरोबर दक्षिणेत आला. असे म्हणतात की त्याने प्रतापरुद्र याचे मन इस्लाम धर्माचा स्वीकार करण्याबाबत वळविले. ३१-५-१३३० रोजी तो विजापूर येथे गेला. तेथून तो कोर्चा या खेडेगावात राहण्यासाठी गेला. पुढे अल्लाउद्दीन हसन याने त्याला आपला धर्मगुरू मानले. काही काळाने तो गुलबर्गा येथे गेला. वयाच्या १११ व्या वर्षी इ. स. १३८० मध्ये तो मरण पावला.

( १७ ) □ महमदशहा बहमनीच्या कारकिर्दीत **शिलेदार** हा शब्द रूढ झाला असावा. त्याची तुलना युरोपातील घोडेस्वाराबरोबर करता येईल. युरोपात घोडेस्वार हा विशिष्ट प्रतीचा सरदार असून राजाच्या पाठोपाठ घोड्यावर स्वार होऊन तो जाई. त्याच्याबरोबर एक अथवा दोन अनुचर असत.

(१८) * **बुरहाण-इ-मासिर, तबकाते-अकबरी** आणि इतर ग्रंथांत सैफुद्दिन घोरी याच्या नावाचा उल्लेख आढळत नाही. इतकेच नव्हे तर समकालीन इसामी याच्याही ग्रंथात त्याचा निर्देश केलेला नाही.

(१९) □ **नोबत** म्हणजे एक प्रकारचे वाद्य. अगदी सुरुवातीला **नोबत** या प्रकारात नऊ वाद्यांचा एक ताफा असे. यामधील वाद्यांची संख्या सुलतानाच्या मर्जीनुसार वाढविली जात असे.

(२०) □ अशा तऱ्हेने अभिवादन करण्याची पद्धती हिंदुस्थानच्या अनेक भागांतून आता नाहीशी झाली आहे. ही बहुधा तार्तर लोकांच्या बरोबर हिंदुस्थानात आली. पेकिनमधील तार्तर लोकांच्या दरबारातील कतू पद्धतीशी या पद्धतीचे बरेच साम्य आहे. अजूनपावेतो पेकिनमधील इंग्रज वकिलांनी या पद्धतिप्रमाणे अभिवादन करण्यास नकार दिला आहे.

(२१) * महमदशहाच्या नाण्यावर अहसनाबाद आणि फतेबाद या टांकसाळी असलेल्या गावांचा निर्देश आढळतो. गुलबर्ग्याला अहसनाबाद हे नाव पहिल्या बहमनी सुलतानाने दिले.

(२२) * तेलंगणाच्या राजाचे नाव कान्हानायक असे होते. तुघलक सुलतानांचा पाडाव करण्याचे कामी त्याने एके काळी जफरखान याला मदत केली होती. त्याचा मृत्यू १३७५ या वर्षी झाला.

( २३ ) □ या ठिकाणी ब्रिग्ज असे सांगतो की, " मुळात असलेल्या नावात बदल करण्यास माझे मन धजावले नाही. हे नाव असलेले कोणतेही शहर माझ्या ऐकिवात नाही. जवळजवळ २०० वर्षांनंतर वेलमकोंडा अथवा वेल्लमकोंडा हे एका बलवान राजाच्या राजधानीचे शहर होते. माझ्या मते खरा शब्द वेल्लमकोंडा हाच असावा. कारण पट्टण ( शहर ) आणि कोंडा ( टेकडी ) हे शब्द जर का एखादे गाव टेकडीच्या पायथ्याशी वसले असेल तर समानार्थाने वापरतात. इथे उल्लेख आलेले गाव याप्रमाणे टेकडीच्या पायथ्याशी वसलेले आहे. अर्थात या अनुमानाला एक आक्षेप आहे आणि तो म्हणजे असा की या ठिकाणी उल्लेखिलेली कौलास आणि कल्याणी ही गावे कुलबर्गा आणि वेल्लमकोंडा यांना जोडणाऱ्या अगदी जवळातल्या जवळच्या अशा रस्त्यावर नाहीत. "

( २४ ) □ बहादूरखानाची नेमणूक यापूर्वी वरंगळच्या राजाकडे वकील म्हणून झालेली होती.

(२५) ▫ या ठिकाणी अलिप्त राहण्याचा जो विशेषार्थाने उल्लेख करण्यात आलेला आहे तो आंबवलेल्या पदार्थापासून करण्यात आलेल्या दारूबाबतचा आहे. हिंदुस्थानामधील मुसलमान सुलतानांचे ही दारू म्हणजे एक आवडते पेय असावे असे दिसते.

(२६) ▫ सय्यद म्हणजे महमद पैगंबराचे, त्याची मुलगी फातिमा हिच्या-पासून झालेले वंशज.

(२७) ▫ **तोहफत-उस-सलातीन** या ग्रंथाचा कर्ता मुल्ला दाऊद बिदरी याने कथन केलेला वृत्तान्त ग्राह्य मानावयाचा ठरवल्यास हिंदूंनी या काळी तोफांचा वापर करण्यास सुरुवात केली होती असे म्हणावे लागेल. यानंतर आलेल्या परिच्छेदात असे म्हटले आहे की पुढील मोहिमेत मुसलमानांनी प्रथमच तोफांचा उपयोग केला. परंतु माझी या दोन्हीही विधानांवर विश्वास ठेवण्याची तयारी नाही. पुढील परिच्छेदा-वरून फार तर असे म्हणता येईल की १३६८ मध्ये मुसलमांनानी पश्चिमी राष्ट्रांकडून कदाचित तोफा पैदा केल्या असाव्यात. कारण यापूर्वी १८ वर्षे अगोदर क्रेसीच्या लढाईत आठव्या एडवर्डने तोफांचा उपयोग केला होता असे म्हणतात. अर्थात असे अनुमानही असंभवनीय वाटते. आणि फरिश्ता जेव्हा असे सांगतो की मुसलमानांनी तोफखान्याचा वापर करण्याची ती पहिलीच वेळ होती, त्यावेळी त्याने असेही सांगितलेले आहे की गोलंदाजीत प्रवीण असलेले तुर्क आणि युरोपीयन हे गोलंदाजांचे काम करीत. इ. स. १४९८ मध्ये पोर्तुगीज हिंदुस्थानात आले त्याअगोदर येथे तोफ-खान्याचा सर्रास उपयोग केला जात असे हे निश्चित. कारण तसा उल्लेख **फरिया-इ-सोजा** यामधील हकीकतीत आपल्याला आढळतो. ( पहा खंड १, प्रकरण ५, पान ५९ आणि प्रकरण ९, पान ९९ ) अर्थात हे जरी काहीही असले तरी मुसलमानांनी पाश्चिमात्त्य देशाकडून तोफखान्याचा वापर करण्याची कला शिकण्याच्या अगोदर हिंदूजवळ तोफा होत्या असे अनुमान आपल्याला वरील परिस्थितीवरून काढता येत नाही.

( २८ ) ▫ हिंदूंच्या धार्मिक भावनांशी जो परिचित आहे त्याला गोहत्या हिंदूंच्या दृष्टीने भयंकर भ्रष्टाचाराचा एक प्रकार आहे हे सांगण्याची आवश्यकता नाही.

( २९ ) ▫ म्हणजे वाघाच्या शिकारीत तरबेज आणि शौर्य आणि साहस यामध्ये त्याबाबतीत प्रसिद्ध असलेला.

( ३० ) ★ Sewell याने आपल्या *A Forgotten Empire* (37) या पुस्तकात भोजमलराय याचे खरे नाव मल्लीनाथ होते असे दिले आहे.

( ३१ ) ▫ सर्वसाधारणपणे देव अथवा दिव या शब्दामध्ये परमेश्वर अभिप्रेत नसला तरी पुष्कळदा राजाचा उल्लेख करण्यासाठी देखील हा शब्द उपयोगात

आणला जातो. यानुसार देवगिरीच्या राजाचा आणि त्याच्या मुलाचा उल्लेख आपल्याला रामदेव आणि शंकरदेव असा अनुक्रमे केलेला आढळतो. तेलंगणाच्या राजाला विनायकदेव असे संबोधलेले आपल्याला आढळते. अजूनपावेतो देखील राजमहेंद्रीचा राजा आणि हिंदुस्थानच्या पूर्वकिनाऱ्यावरील अनेक राजेरजवाडे राजा ही पदवी धारण करीत असल्याचे आपल्याला दिसते.

( ३२ ) □ महाराष्ट्राचा उल्लेख फरिश्ता नेहमी महरुत असा करतो.

( ३३ ) ★ बहरामखानाच्या बंडाचा फायदा घेऊन मलिकराजा याने खानदेशच्या राज्याची स्थापना केली असे विधान **Camtbridge History of India** (3, 494) या ग्रंथात केले आहे, ते चुकीचे आहे.

( ३४ ) ★ शेख जैनुद्दीन दाऊद याचा जन्म इराणमध्ये सिराज या गावी १३०२ या वर्षी झाला. तो १३२७ मध्ये दौलताबाद येथे आला. नसिरखान फारुकी याने खानदेशातील जैनाबाद या शहराचे नाव या अवलियाच्या नावावरून ठेवले. त्याचा मृत्यू २७-१०-१३६९ मध्ये झाला. बहरामखानाच्या बंडाबाबत **बुरहाण** ( ३३ ) या ग्रंथात असे दिले आहे की बहरामखान हा शेखजैनुद्दीन याच्याकडे दाखल झाला. त्याने बहरामखानाला सुलतानाची क्षमा मागण्याबद्दल सांगितले. सुलतानाने बहरामखानाला क्षमा केली परंतु त्याला राज्य सोडून जाण्याचा हुकूम केला.

( ३५ ) □ ५ लाखांच्या वर हिंदूंची कत्तल झाल्याचे वर्णन करताना फरिश्त्याला होत असलेल्या आनंदाच्या उकळ्या पाहिल्यावर असे वाटते की मोठ्या माणसांच्या मनाची देखील रूढी आणि परंपरागत शिक्षण यामुळे केवढी तरी दिशाभूल होऊ शकते.

( ३६ ) ★ महमदशहाची कारकीर्द अकरा वर्षे, दोन महिने आणि सात दिवस झाली असे **तबकाते-अकबरी** आणि **बुरहाण** या ग्रंथात दिलेले आहे. परंतु **बुरहाण** या बाबतीत विश्वसनीय नाही. कारण महमदशहा गादीवर आल्याची तारीख तो ७५८ **हिजरी** ही देतो. पण प्रत्यक्षात ही तारीख १-३-७५९, ११-२-१३५८ ही आहे.

( ३७ ) □ फरिश्ता आणि त्याने आधारादाखल दिलेला ग्रंथकर्ता या दोघांचीही गोव्याच्या दक्षिणेस पश्चिम किनाऱ्यावर असलेले सुदाशेवगर जवळील रामेश्वर म्हणजेच हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील अगदी दक्षिण टोकाला असलेले सिलोन बेटाच्या समोरचे खरेखुरे सेतुबंध रायेश्वर अथवा रामेश्वर असे मानण्यात चुक झाली असल्याची शक्यता संभवते. याठिकाणी उल्लेख आलेले ठिकाण नकाशावर केप रामस असे दाखविलेले आहे आणि प्राचीन विजयनगरच्या राज्याच्या सीमाप्रदेशात ते मोडते.

( ३८ ) □ याच सुमारास बुक्करायाचा मृत्यू झाला आणि हरिहर दुसरा हा गादीवर आला. वेंकटरामनय्या यांनी आपल्या मुजाहिदशहा बहमनी या ग्रंथात असे

विधान केले आहे की बुक्क याचा मृत्यू २६–१२–१३७६ आणि २४-२-१३७७ या दरम्यान झाला असावा. मुजाहिदशहाने रामेश्वरपर्यंत मजल मारली असणे शक्य नाही असेही विधान त्यांनी केले आहे.

( ३९ ) ▫ पूर्वी कधीही समुद्र न पाहिल्याने रामेश्वरला भेट देण्याच्या आलेल्या या संधीचा फायदा घ्यावा असे सुलतानाला वाटणे साहजिकच होते. तेथील एका विश्वसनीय रहिवाशाने मला सांगितले की रामेश्वर येथे अजून एक मशीद आहे आणि मुसलमानी जमातीच्या अस्तित्वाची तेवढीच एक निशाणी आसमंतातल्या प्रदेशात आहे. ऐतिहासिकदृष्ट्या बघितले असता या प्रश्नाला महत्त्व नाही असे म्हणता येणार नाही आणि म्हणून त्याबाबत सत्य परिस्थिती काय आहे हे शोधून काढणे हा एक संशोधनाचा विषय होऊ शकेल. कारण अल्लाउद्दीन खिलजीच्या कारकिर्दीत एका मशिदीची बांधणी करण्यात आल्याचा उल्लेख त्याच्या कारकिर्दीच्या वृत्तांतात नमूद केलेला आहे. आपल्या काळात ती मशीद उभी असल्याचे फरिश्ता सांगतो. मला ज्याने वरील माहिती सांगितली तोही बहुतेक वरील मशिदीच्या संदर्भात बोलत असावा.

( ४० ) ▫ तोफखाना किंवा दारुगोळ्याच्या इतर कोणत्यातरी शस्त्रप्रकाराचा मुकर्रबखान हा सर्वाधिकारी असावा असे दिसते. तो मूळचा आशिया-मायनरचा रहिवाशी होता.

( ४१ ) ▫ मुल्ला दाऊद बिदरी आणि ज्या इतर ग्रंथकर्त्यांपासून फरिश्त्याने आपल्या इतिहासग्रंथाचे संकलन केले त्यांनी नमूद केलेले रामेश्वर म्हणजे सिलोन बेटाच्या समोरचेच होय ही फरिश्त्याच्या मनाची पक्की समजूत झालेली दिसते. परंतु कृष्णरायाच्या ताब्यात म्हैसूर पलीकडचा कोणताही प्रदेश नव्हता आणि त्याचप्रमाणे फरिश्ता ज्या कालखंडाचा उल्लेख करतो त्यावेळी मदुरा येथे तामूल घराण्याचे बलशाली राज्य अस्तित्वात होते याबद्दल संशयाला काहीच जागा नाही. या गोष्टीची फरिश्त्याला जाणीव असावी असे दिसत नाही. तेथील लोक कानडी किंवा तेलंगी यापैकी कोणतीच भाषा बोलत नसत तर त्याहून अगदी भिन्न असलेली तामूल भाषा बोलत. अर्थात याबाबत आश्चर्य वाटण्याचे काहीच कारण नाही, कारण फरिश्ता हा इराणमधील राहणारा आणि हिंदुस्थान देशाला अतिशय नवखा असा होता. त्यामुळे हिंदूबद्दलची त्याला असलेली सर्वसाधारण माहिती आणि मुसलमानांनी भेट न दिलेल्या हिंदुस्थानातील भागांचा भूगोल याबद्दलचे त्याचे ज्ञान अतिशय अपरिपक्व आणि पुष्कळदा चुकीचे असे.

( ४२ ) ▫ थळघाट म्हणजे डोंगराखालचा समुद्रकिनाऱ्यावरील कोकण या नावाने ओळखला जाणारा प्रदेश.

(४३) □ भाषांतरकाराने अदोनीला भेट दिल्याला अनेक वर्षे होऊन गेली. जरी भाषांतरकाराने अदोनीची बारकाईने पाहणी केली नसली तरी देखील हिंदुस्थानातील अनेक डोंगरी किल्ल्यांपैकी एक प्रचंड आणि विस्तृत असा तो किल्ला आहे असे त्याला दिसून आले.

(४४) * याबाबत **बुरहाण**मध्ये (३५) असा उल्लेख आहे की सुलतानाचा खून कृष्णेच्या तीरावर झाला. याउलट **तजकीरत** (८६) या ग्रंथात दिलेली गोष्ट वेगळी आहे. ती अशी–सुलतान हा सुरक्षितपणे अहसनाबाद गुलबर्गा येथे पोहोचला. शुभ वेळ बघून शहरात प्रवेश करावा असे त्याने ठरविले, आणि शहराबाहेर त्याने छावणी दिली. येथे मुजाहिद आणि एक हबशी यांचे भांडण होऊन दुसऱ्या दिवशी मुजाहिदचे मस्तक नसलेले धड सिंहासनावर टाकलेले आढळून आले. **बुरहाण-इ-मासिरच्या** आपल्या भाषांतरातील तिसऱ्या प्रकरणाला मेजर किंग यांनी टीप दिलेली आहे. या टीपेत **तजकीरत-उल्-मुलुक** या ग्रंथामधील मजकूर देण्यात आला आहे.

## (४५) * मुजाहिदशहा बलवंत बहमनी याची कारकीर्द

सुलतान महमदशहा याच्या मृत्यूनंतर मुजाहिदशहा बहमनी हा गादीवर आला. त्याला बलवंत—सामर्थ्यवान असे म्हणत. एका जेवणाच्या वेळी तो ३० शेर धान्या-इतक्या पदार्थांचा सप्पा उडवीत असे. (१ शेर म्हणजे ७९ **दिरहम** आणि एक **दिरहम** म्हणजे ४८ ग्रेन) आणि दिवसातून अशी तीन जेवणे तो घेत असे. खरी गोष्ट काय ती एक परमेश्वरालाच माहीत.

दक्षिणेतील सुलतान राज्यारोहणाचे प्रसंगी एक प्रथा पाळीत. ती अशी— दक्षिणेतील अवलिया शेख महमद सिराजउद्दीन सुलतानपदावर येणाऱ्या व्यक्तीला एक पैरण आणि पागोटे भेट म्हणून देई. ही वस्त्रे सुलतान अंगावर चढवी आणि शुभ-मुहूर्तावर मग त्याला राज्याभिषेक करण्यात येई. सुलतान मुजाहिदला राज्याभिषेक झाला तेव्हा असाच समारंभ झाला.

सुलतान मुजाहिद दररोज शेख सिराजउद्दीनच्या दरग्यात जाई. तेथे त्याच्या-बरोबर तो राज्यकारभारविषयक चर्चा करीत असे. एक दिवस मुजाहिद शेखला म्हणाला की इस्लामचे वैभव वाढविण्यासाठी पाखंड्यांविरुद्ध जिहाद पुकारण्याची माझी इच्छा आहे. शेख सिराजउद्दीनने फातिहात म्हटला आणि मुजाहिदची योजना आपल्याला पसंत असल्याचे सांगितले. मुजाहिदने यानंतर अनेक दिवस सैन्याची तयारी करण्यात घालविले. फौजेची जमवाजमव झाल्यानंतर त्याने मोठी फौज बरोबर घेऊन अदोनी किल्ल्यावर चाल केली आणि किल्ल्याला वेढा दिला. वेढा वर्षभर चालला होता. अखेर पाण्याचा तुटवडा पडल्याने शिबंदीने आपण शरण येत असल्याचे कळविले. किल्ल्याचा सुभेदार बाहेर येऊन सुलतानाला भेटला. तहाच्या अटी

ठरल्यावर किल्लेदार किल्ल्याकडे परतला. किल्ला मोकळा करून किल्ल्याचा ताबा घेण्यासाठी सुलतानाचा एक अधिकारी किल्लेदाराबरोबर किल्ल्यात गेला.

शेख सिराजउद्दीनचा एक अनुचर म्हणाला की सुलतान मुजाहिदशहाने आपल्या-पासून विजयसूचक आशिर्वाद घेतला आणि इतरांनीही त्याला तुझा युद्धात जय होईल असे शुभाशीर्वाद दिले. यावर शेख उत्तरला की माझा विजय निदर्शक आशिर्वाद मी आता परत घेतला आहे. या अनुचराने वरील अर्थ सूचित करणारा एक खलिता मुजाहिदशहाकडे नेऊन पोहोचविला आणि शेख सिराजउद्दीन जे काही बोलला होता ते सर्व त्याने सुलतानाला सांगितले. यावर सुलतानाला जेव्हा शेखच्या खलित्यातील मजकुराचा अर्थ कळला तेव्हा दरबारात तो खलिता त्याने वाचून दाखविला आणि तो म्हणाला, " माझ्या पूर्वजांनी या फकिरड्यांना जेव्हा राजसत्तेचा उपयोग करण्याचा अधिकार दिला तेव्हा आपण काय करीत आहो हे त्यांना कळून आले नाही. हे फकीर सदा भुकेले आणि कंगाल असतात. त्यांच्यात आणि आपल्यामध्ये कसला आला आहे बंधुभाव ? जा आणि शेख सिराजउद्दीनला विचारा की त्याच्या या मगरूर बोलण्याचा अर्थ काय ? त्याला मी योग्य वागवावयाचे कसे याचा धडा शिकवितो. " यावर तो अनुचर म्हणाला, " तुझ्या मनात जर हेच विचार असतील तर तुला विजय कधीच मिळणार नाही. "

त्या दिवशी रात्री मुसळधार पाऊस पडला. त्यामुळे किल्ल्यातील शिबंदीला भरपूर पाण्याचा पुरवठा मिळाला. त्यांना सुलतानाबरोबर तह केल्याचा पश्चात्ताप झाला आणि त्यांनी किल्ल्याची पुन्हा मजबुती करण्यास सुरुवात केली. किल्ल्यातील लोकांनी मुजाहिदशहाच्या किल्ल्यावरील प्रतिनिधीचे मुंडके तोडले आणि ते तोफेत भरून मुजाहिदशहाच्या फौजेच्या दिशेने ती तोफ उडविली.

जेव्हा मुजाहिदशहाच्या कानावर किल्ल्यावरील शिबंदीच्या प्रतिकाराची बातमी गेली तेव्हा तो अहसनाबादकडे परतला. दुसऱ्या दिवशी शुभ मुहूर्तावर शहरात प्रवेश करावा या हेतूने त्याने शहराबाहेरच तळ दिला. त्याने शेख सिराजउद्दीनच्या अनुयायांना अनेक धमकावण्या दिल्या. मुजाहिदशहाच्या फौजेत आणि सरदारांत अनेक हबशी होते. त्यांच्या हातून झालेल्या काही कृत्यांनी मुजाहिदशहा संतापला आणि त्यांनाही तो धमकीवजा बोलला. त्यामुळे हबशांना मुजाहिदशहाची दहशत बसली. दुसऱ्या दिवशी मुजाहिदशहाचे मस्तकाशिवाय नुसते धड सिंहासनावर पडलेले लोकांना आढळले. सर्वांची अशी समजूत झाली की हे भयंकर कृत्य करणारे म्हणजे जीनच असावेत. शेख सिराजउद्दीनच्या अनुयायांनी मुजाहिदशहाचे शव सुलतानांची प्रेते पुरत त्या जागी पुरू दिले नाही. तेव्हा मुजाहिदशहाला तेथून जवळच दुसऱ्या ठिकाणी पुरण्यात आले.

**तजकिरत उल्मुलुक** मधील टीप समाप्त.

(४६) ★ मुजाहिदचा चुलता असा दाउदचा उल्लेख फरिश्त्याने केलेला आहे तो चुकीचा आहे. **तबकाते अकबरी** या ग्रंथात दाउद हा मुजाहिदचा चुलत भाऊ आहे असे म्हटले आहे. याउलट **बुरहाण**चा कर्ता (३६) दाउदचा उल्लेख मुजाहिदचा धाकटा भाऊ असा करतो.

(४७) ★ या बाबत **बुरहाण**मध्येही असेच विधान केले आहे की दाउद हा जागच्या जागी ठार झाला.

(४८) ★ दाउदनंतर गादीवर आलेल्या राजपुत्राचे नाव फरिश्त्याने चुकीने महमूद असे दिले आहे. खरे नाव महमद असे आहे.

(४९) □ म्हणजे अनुक्रमे दौलताबाद, माहूर आणि कौलास या उत्तरेकडील प्रांतांचे तीन **सुभेदार**.

(५०) □ मुळामध्ये शब्द आहे **गुलाम-इ-तुर्क** म्हणजे विकत घेतलेला तुर्क. परंतु या गुलामांना सर्वसाधारणपणे मुसलमानांमध्ये मोठमोठ्या पदावर चढविण्यात आलेले आपल्याला दिसते आणि त्यांच्यापैकी अनेकांनी नवीन राज्यांची स्थापना केल्याचेही आपल्याला आढळून येते.

(५१) ★ गियासुद्दीनच्या नाण्यावर **तहमतन** ही पदवी आहे. **बुरहाण** या ग्रंथाच्या हैद्राबाद येथून निघालेल्या प्रतीवर गियासुद्दीन बहमन हे नाव आढळते ते अर्थात चुकीचे आहे.

(५२) □ प्रधान मंत्र्याला **पेशवा** या पदवीने संबोधण्याची पद्धत या सुलतानाच्या कारकिर्दीत रूढ झाली. त्यानंतर अहमदनगरच्या सुलतानांनी आपल्या मंत्र्यांना त्या पदाने विभूषित केले आणि त्यांच्यापासून सातार्‍याच्या राजांनी ती प्रथा उचलली.

(५३) ★ **जफरुलवली** या ग्रंथात तगलचीन याचा उल्लेख एक खिलजी उमराव असा केलेला आहे. एके काळी तो सुलतानाचा गुलाम असल्याचे या ग्रंथात सांगितले आहे. (१,१६०)

(५४) □ राज्याचे सर्वाधिकार बहाल केल्याचे सूचित करणारी ही पदवी **राजप्रतिनिधी** पदाच्या बरोबरीची आहे.

(५५) □ फिरोजशहा बहमनी हा सुलतान अबुल मुजफ्फर, गाजी, फिरोजशहा, रोज अफजून म्हणजे विजयश्रीचा सार्वभौम अधिपती, पवित्र योद्धा, सुलतान फिरोज आणि ज्याचे वैभव प्रत्यंदिनी वृद्धिंगत होत आहे असा या पदव्यांनी विभूषित होता.

(५६) ★ फेट्याच्या आकाराचा रत्नजडीत मुकुट वापरणारा फिरोजशहा हा पहिलाच बहमनी सुलतान होता-**तबकाते अकबरशाही** (३०)

(५७) □ म्हणजे तात्पुरता विवाह

( ५८ ) □ १६ व्या शतकात लिहिणाऱ्या फरिश्त्याने युरोपियन आणि रशियन हे दोन विभिन्न जमातीचे लोक आहेत असे मानले आहे.

( ५९ ) □ नवे आणि जुने बायबल.

( ६० ) □ कृष्णा आणि तुंगभद्रा नद्यांमधील प्रदेश.

( ६१ ) ★ शेरवानी आपल्या पुस्तकात ( १७४ ) सागर जिंकून घेतल्याचे वर्ष १३९८ हे देतात **बुरहाण**मध्ये ही तारीख १३९९ ही दिली आहे.

( ६२ ) □ माळवा आणि खानदेश या प्रदेशांचे सुलतान.

( ६३ ) ★ या ठिकाणी फरिश्त्याने मांडूच्या पहिल्या सुलतानाबद्दल माहिती देताना चुकीचे विधान केलेले आहे. कारण दिलावरखान घोरी याने १४०२ पर्यंत आपले स्वातंत्र्य जाहीर केलेले नव्हते.

( ६४ ) □ हेराडॉट्सच्या काळात टायग्रिसमध्ये ज्या तऱ्हेच्या होड्यांचा उपयोग केला जात असे त्यांना टोपली होडया म्हणत. येथील लोकांना माहीत असलेल्या होडया आणि वरील प्रकारच्या होडया जवळ जवळ सारख्याच होत्या. मोठ्या तोफा असलेली ब्रिटिश सैन्याची एक तुकडी इ. स. १८१२ मध्ये त्या तोफा न उतरविता देखील अशाच तऱ्हेच्या टोपली होडयातून तुंगभद्रा नदी पार करून गेली.

( ६५ ) □ एक प्रकारचे वाद्य.

( ६६ ) □ तेलंगी स्त्रिया वाद्य-संगीताबरोबर पदन्यास करीत असताना अतिशय कौशल्याने प्रत्येक हातात दुधारी खंजीर घेऊन जो अप्रतिम खेळ करतात, तो पाहिल्यानंतर खरोखरच कौतुक वाटल्यावाचून राहात नाही.

( ६७ ) □ तह घडवून आणणाऱ्या मध्यस्थाला तहानुसार राजाला मिळणाऱ्या रकमेचा दहावा हिस्सा देण्याची प्रथा हिंदुस्थानात आतापर्यंत जे अनेक तह लिखित असे उपलब्ध आहेत त्यामध्ये स्वीकारलेली आपल्याला दिसून येते. तहाच्या अटीमध्ये उघड उघड ही रक्कम नमूद केली जाई आणि तह घडवून आणणाऱ्या यशस्वी मुत्सद्दयाला मिळणारे एक वाजवी बक्षीस या दृष्टीनेच त्याकडे बघितले जाई.

(६८) □ तैमूरकडे फिरोजशहाने पाठविलेली वकिलात आणि तिचे परिणाम हे जेव्हा माळवा आणि खानदेशच्या सुलतानांना ज्ञात झाले तेव्हा फिरोजशहाच्या बेतांची त्यांना जाणीव झाली कुलबर्ग्याहून अतिशय दूर असलेल्या खेडल्यावरील हल्ल्यामुळे फिरोजशहाच्या महत्त्वाकांक्षी बेताबद्दल जे संशय सुलतानांच्या मनात निर्माण झाले होते त्यांना पाठिंबा मिळाला. साहजिकच उत्तरेकडील सुलतानांनी विजयनगरच्या राजाबरोबर बचावात्मक तह करण्यासाठी वाटाघाटी सुरू कराव्या हे अगदी साहजिक होते. कारण बहमनी सुलतानांचे लक्ष्य उत्तरेकडील सुलतानांपासून द्विधा करण्याचे सामर्थ्य विजयनगरच्या राजाकडे होते यात काहीच शंका नाही.

( ६९ ) ★ याबाबत **बुरहाण** (४४) या ग्रंथात असे विधान केले आहे की भानूर आणि मुसलकल वगैरे प्रान्त यावेळी सुलतानाच्या सैन्याने आपल्या ताब्यात घेतले होते. पहा. Venkataramnayya, *Ind. Ant.*, 1941, p. 35.

( ७० ) ◻ हिंदू राजांची परिस्थिती इतकी अपमानास्पद अवस्थेप्रत नेण्यात आली असली पाहिजे की आपल्या मुली मुसलमानांना देण्याखेरीज दुसरा इलाज त्यांजजवळ उरला नसावा. एक राजकीय धोरण म्हणून हिंदूंना मुसलमानांना याबाबत शरण जाणे भाग पडले असावे. मुसलमानांच्या स्वभावातील नीचतर अशा भावनांचे शमन करण्यासाठी जरी या प्रथेचा उपयोग केला गेला तरी प्रत्यक्षात मात्र परिणामी मुसलमान आणि हिंदू अधिक जवळ येतील अशीच अपेक्षा ह्या प्रथेचा अवलंब करताना केली गेली. दोन्ही जमातीत अशा तऱ्हेचे संबंध प्रस्थापित होण्यापूर्वी जी कट्टर द्वेषाची भावना होती तिचे वरील गोष्टीमुळे पुष्कळसे शमन झाले.

( ७१ ) ◻ या कामाचे अवशेष अजूनही ( १५० वर्षांपूर्वी ) दृष्टीस पडतात. परंतु हल्लीच्या रहिवाशांना कोणत्या उद्देशाने ही कलाकृती बांधण्यात आली होती त्याविषयी काहीएक कल्पना नाही.

(७२) ◻ या सत्पुरुषाची कबर अजूनही (१५० वर्षांपूर्वी ) उभी आहे. ही बहुधा इ. स. १६४० मध्ये सय्यद महमद गीसू दराज याचा वंशज महमद अमीन हुसेनी याने विजापूरचा सुलतान महमद आदिलशहा याच्या कारकिर्दीत दुरुस्त केली अथवा बांधून काढली.

(७३) ◻ पानगळ हे अदोनीपासून ७० मैलांपेक्षा जास्त अंतरावर नाही.

( ७४ ) ★ याबाबत **जफरूलवली**(१६२)या ग्रंथात गुजराथच्या सुलतानाने फिरोजशहाला मदतीचे आश्वासन दिल्याचे विधान आहे.

( ७५ ) ◻ दोन्ही नावे जागरुकता अथवा दक्षता असा अर्थ दाखवितात.

( ७६ ) ◻ ह्या असामान्य परंतु नेहमी व्यापाराला लागणारे सामानसुमान वाहून नेणाऱ्या जमातीविषयी माहिती *Transactions of th: Literary Society of Bombay, Vol. I* या ग्रंथात मिळते.

(७७) ★ होशीयार आणि बेदर हे दोघेजण रणांगणात ठार मारले गेले असे **बुरहाण** ( ५१ ) या ग्रंथात विधान केलेले आहे.

( ७८ ) ★ **बुरहाणे मासिरच्या** आपल्या भाषांतरातील आठव्या प्रकरणाला टीप म्हणून मेजर किंग यांनी **तजकिरत उल्मुलुक** या ग्रंथातला सुलतान फिरुजशहाच्या कारकिर्दीसंबंधीचा उतारा दिला आहे. त्याचा अनुवाद पुढे दिला आहे.

## सुलतान फिरुजशहाची कारकीर्द
## फिरुजशहा बहमनी

सुलतान फिरुज हा न्यायी, उदार, धार्मिक आणि सत्प्रवृत्त बुद्धीचा होता. तो कुराणाच्या नकला करून द्रव्यार्जन करीत असे आणि आपला उदरनिर्वाह करी. त्याच्या जनान्यातील स्त्रिया ह्या सुद्धा कशिद्याचे काम करून ते विकीत आणि मिळालेला पैसा आपल्या उपजिविकेकरिता खर्च करीत. त्याच्यासारखा दुसरा बादशहा झाला नाही. त्याचा न्यायीपणा आजतागायत महशूर आहे. त्याने बांधलेल्या अनेक कलाकृती आज पहावयास मिळतात. कृष्णा नदीच्या तीरावर त्याने एक मोठे शहर वसविले. त्या शहरात त्याने एक प्रचंड इमारत बांधली. त्या शहरासभोवार त्याने कोरीव दगडाची ६००० यार्ड लांबीची एक भिंत बांधली. त्या शहरी तो बऱ्याच काळपर्यंत चैनीत आणि सुखासमाधानात राहिला. ( १ **फरसख** = ६००० यार्ड ).

एकदा अतिशय मुसळधार पाऊस पडला. नदीच्या पाण्याला इतका पूर आला की नदीच्या आजूबाजूचा ३ ते ४ **फरसख** इतक्या प्रदेशात पाणीच पाणी झाले. त्याने अतिशय नुकसान झाले. शहराच्या रस्त्यांत आणि बाजारपेठांत इतके पाणी झाले की सुलतानाला आणि त्याच्या कुटुंबियांना सात दिवस आणि रात्री वर उल्लेखिलेल्या इमारतीच्या वरच्या मजल्यावर रहावे लागले. ते शहर आणि त्या सभोवार बांधलेला तट अजून उभा आहे. परंतु सुलतानाने स्वतःसाठी बांधलेला राजवाडा मात्र आज नाहीसा झाला आहे. सुलतानाने बांधलेले शहर आज फिरुजाबाद या नावाने प्रसिद्ध आहे.

सुलतान फिरुजने बाबा कमाल या अवलियाला आपला गुरू केले आणि त्याचे शिष्यत्व पत्करले. सुलतानाच्या कबरीसमोर बाबा कमालची ठाशीव बांधणीची कबर आहे. त्या कबरीखाली सुलतानाने आपल्या हयातीत बांधलेले एक पाण्याचे टाके आहे. वरील कबर आणि कबरीखालचे पाण्याचे टाके आजही पहावयास मिळतात.

राज्याच्या लहानमोठ्या बाबीतला सर्व कारभार सुलतान फिरुजने सुलतान अहमदच्या हाती सोपविला. सुलतान फिरुज मात्र आपल्या सेवाधर्मात गर्क झाला. याचा परिणाम असा झाला की सुलतान अहमदचे राज्यातील सामर्थ्य अतिशय वाढले, राज्याचे अमीर, उमराव, वजीर आणि सारी फौज यांना त्याने आपल्या बाजूला वळवून घेतले आणि सुलतान फिरुजविरुद्ध कारस्थाने करण्याच्या तो प्रयत्नास लागला.

एक दिवस सुलतान फिरुज याला कोणी एकाने अशी खबर दिली की सुलतान अहमद त्याच्याविरुद्ध बंड करण्याच्या विचारात आहे. त्याचा बेत सुलतानाला कैद करून सिंहासनावर बसण्याचा आहे. याच माणसाने सुलतानाला सावध राहण्याविषयी सल्ला दिला. सुलतान फिरुजने उत्तर दिले, "दैवगतिविरुद्ध उपाययोजना करणे कधी तरी शक्य आहे का? माझ्यानंतर तो राज्यपदावर येणार यात काहीच संशय नाही."

एकदा सुलतानाच्या फौजेतील सत्तर सैनिकांनी बंडाळी केली. सुलतान फिरुजने त्यांना ठार करण्याची आज्ञा दिली. पण सुलतान अहमदने हस्तक्षेप केल्यामुळे त्यांना माफ करण्यात आले. एवढेच नव्हे तर त्यांना बढतीही देण्यात आली. हीच माणसे सुलतान फिरुजला ठार मारण्याच्या सुलतान अहमदने केलेल्या कटात त्याला सामील झाली. सुलतानच्या चाकरीत त्याच्या खाजगीकडे अनेक हबशी गुलाम होते. त्यापैकी एक सुलतानाच्या जामदारखान्याचा अधिकारी होता. तो दररोज सकाळी सुलतानाच्या महालात त्याचा पोषाख आणीत असे आणि तो सुलतानाच्या अंगावर चढवी. दिवसें-दिवस जसजशी सुलतान अहमदची सत्ता वाढत गेली त्याप्रमाणात त्याची राज्यपद घेण्याची इच्छा बळावू लागली. त्याने सुलतान फिरुजचे हबशी गुलाम आणि रक्षक शिपाई यांना तऱ्हतऱ्हेची खोटी आमिषे दाखविली आणि सुलतान फिरुजला ठार मारण्याच्या कटात त्याने त्या सर्वांना आपल्याकडे वळवून घेतले.

यानंतर एक दिवस कटाची सर्व सिद्धता झाल्यावर सुलतान अहमद हा सुलतान फिरुजला ठार मारण्याच्या उद्देशाने सुलतान फिरुजच्या राजवाड्याशी येऊन दाखल झाला. राजवाड्याच्या रक्षक सैनिकांनी सुलतान अहमदला याप्रमाणे पाहिले आणि त्यांनी अहमदच्या बरोबर असलेल्या माणसांवर हल्ला चढविला. झालेल्या चकमकीत दोन्ही बाजूंची अनेक माणसे ठार झाली. अखेर सुलतान फिरुजच्या जामदारखान्याचा मुख्य हबशी जमादार याने रक्षक सैनिकांना सांगितले की मी सुलतानाकडे जातो आणि त्याला सुलतान अहमदने केलेल्या हल्ल्याची खबर देऊन येतो. पण या अगोदरच हबशी जमादाराने सुलतान अहमदला असे वचन दिले होते की चकमक चालू असताना मी सुलतान फिरुजला ठार करीन. याप्रमाणे चकमक चालू असताना संधी साधून तो हबशी जमादार सुलतान फिरुजच्या अंतःपुरात शिरला. सुलतान फिरुज त्यावेळी कुराण वाचण्यात दंग झाला होता. त्या हबशाने सुलतान फिरुजला छातीत खंजीर खुपसून ठार मारले आणि बाहेर येऊन लोकांना सुलतान ठार झाल्याचे जाहीर केले.

सुलतानाचा खून झाल्याची बातमी त्याच्या फौजेला कळली. तेव्हा त्यांनी युद्धातून माघार घेतली. प्रत्येकजण आपापला जीव वाचविण्याच्या मार्गास लागला. राज्यातल्या काही अमिरांनी सुलतान फिरुज याच्या मोठ्या मुलाला सिंहासनावर बसविले. परंतु सुलतान अहमदने त्याच क्षणी त्याला ठार मारले आणि स्वतःच्या नावाने सुलतान म्हणून द्वाही फिरविली.

सुलतान फिरुजने एकंदर २५ वर्षे ७ महिने आणि १२ दिवस राज्य केले. सुलतान फिरुजपर्यंत गादीवर एकंदर आठ बहमनी सुलतानांनी अहसनाबाद येथे राज्य केले. त्या सर्वांची मिळून कारकीर्द एकंदर ८२ वर्षे, ५ महिने आणि १८ दिवस झाली. परंतु यासंबंधी परमेश्वरच काय ते जाणे.

**तजकिरत उल्मुलुक** या ग्रंथामधील आठव्या प्रकरणाला दिलेली टीप समाप्त.

(७९) ★ सागर शहराच्या उपनगरात रौजा येथील जुन्या मशिदीतील नमाज पढण्याच्या जागी एक दगड बसविण्यात आलेला आहे. त्यावर शियाबुद्दीन ही पदवी आढळते. **बुरहाण** (५३) पहिल्या अहमदचा याच पदवीने उल्लेख करतो. सुलतानाच्या बापाचे नाव दाउद नसून अहमदखान असे होते आणि हा अहमदखान बहमनशहाचा मुलगा होता असेही बुरहाण या ग्रंथात दिले आहे. उपलब्ध झालेल्या नाण्यांवरून **बुरहाण**मधील या विधानाला पुष्टी मिळते.

(Speight, *Coins of the Bahamani Kings*, *Isl*, *Cul*. 1935, p. 295)

(८०) ▫ वली अथवा साधुपुरुष ही पदवी धारण करणारा हिंदुस्थानातील एकमेव सुलतान म्हणजे अहमदशहा बहमनी होय असे मत ब्रिग्जने प्रकट केले आहे.

(८१) ▫ मलिक-उत्-तुज्जार या पदवीचा शब्दशः अर्थ व्यापाऱ्यांचा राजा अथवा मालक असा होतो.

(८२) ▫ प्रत्येक अधिकाऱ्याच्या हाताखाली किती माणसे आहेत हे दर्शविणारी लष्करी पदवी देण्याची प्रथा पूर्वेकडे फार पुरातन काळापासून प्रचलित आहे. बायबलात १० आणि १०० शिपायांवरचे अधिकारी यांचा उल्लेख आपल्याला आढळतो. रोमन लोकांचे देखील १०० सैनिकांचे सेनानी होते. तार्तरांचे युजबाशी म्हणजे १०० सैनिकांचे आणि मीनबाशी म्हणजे हजार सैनिकांचे सेनानी होते. हिंदुस्थानी मुसलमानांनी ही पद्धती आपल्याबरोबर आणली आणि ५००० सैनिकांचा सेनानी त्यांनी निर्माण केला. पंचहजारी हे सेनानीपद सांख्यिक दर्जा दाखविणारे सर्वांत उच्च समजले जात असे. यापेक्षा जास्त सैनिकांच्या अधिकाऱ्याला **सरलष्कर** अथवा सेनापती असे म्हणत.

(८३) ▫ तोघ अथवा तोघा म्हणजे निशाण. हे तिबेटमध्ये सापडणाऱ्या गाईच्या शेपटीपासून बनवीत असत. तार्तरांनी ही प्रथा हिंदुस्थानात आणली आणि त्याचप्रमाणे पश्चिम युरोपमध्ये देखील नेली. कॉन्स्टॅन्टिनोपल येथे स्थापन झालेल्या तुर्की सरकारने एक-दोन अथवा तीन शेपट्यांचे निशाण वापरावयाला सुरुवात केल्यावर युरोपियन या तऱ्हेच्या निशाणाशी परिचित झाले. युरोपियन जो तोघा वापरतात तो घोड्यांच्या केसापासून बनविलेला असतो.

(८४) ★ सुलतानाच्या सर्व स्वाऱ्यांचे वर्णन करताना अशा तऱ्हेचे उल्लेख जेव्हा जेव्हा येतात तेव्हा **बुरहाण**च्या ग्रंथकर्त्याला आनंदाच्या उकळ्या फुटतात. काफर आणि अनेक देवांवर विश्वास ठेवणारे हिन्दू यांचा सुलतानाने नाश केला आणि देवळे पाडून त्या जागी मशिदी बांधल्या, या गोष्टींचे वर्णन **बुरहाण**चा कर्ता मोठ्या चवीने करतो. (५८–६०) या बाबतीत **बुरहाण**चा कर्ता आणि फरिश्ता हे दोघेही सारखेच आहेत. शेरवानी (२२०) यांनी आपल्या पुस्तकात या दोघांची भलावणी करण्याचा प्रयत्न केला आहे परन्तु ती मनाला पटण्यासारखी नाही.

(८५) □ या काळात तोफा आणि बंदुका यांचा उपयोग केला जात नसे, असे जे मत मी प्रकट केले त्याला या परिच्छेदातील मजकुराने पुष्टी मिळते.

(८६) □ याठिकाणी बांधला असा जो शब्द आहे तो पुन्हा बांधला अथवा दुरुस्त केला असा असावयास पाहिजे होता. कारण जर का हा किल्ला प्रथमतः एखाद्या मुसलमान सुलतानाने बांधलेला असता तर त्याला दुसरे एखादे नाव दिले गेले असते. परंतु ज्या एकाच नावाने हा किल्ला ओळखला जातो त्यावरून त्या किल्ल्याची बांधणी हिंदू असावी इतकेच नाही तर तो खूप जुना असावा आणि त्याचा काळ गवळी राजांच्या कालखंडाचा असावा, ह्या गोष्टी निश्चितपणे सिद्ध होतात. ह्या गवळी राजाच्या राज्या-विषयी आपल्याला जी माहिती मिळते तिचे लिहिलेले वृत्तान्त उपलब्ध नसून त्याबद्दलची हकीकत ही निव्वळ दंतकथांवर आधारलेली आहे.

(८७) ★ **बुरहाण**चा कर्ता (६१) माळव्याच्या सुलतानाचा उल्लेख ईलखान असा करतो. हा उल्लेख त्याने आल्फखान या ऐवजी चुकीने केला असावा. गादीवर येण्यापूर्वी होशंग घोरी याचे आल्फखान हे नाव होते.

(८८) □ हरम या शब्दाचा अधिक अर्थ सांगण्याची जरुरी नाही. शब्दशः हरम म्हणजे इज्जत. मुसलमानाची बायको आणि त्याच्या कुटुंबातील इतर बायका मंडळी ही त्याच्या इज्जतीसारखी असतात.

(८९) ★ याबाबत **बुरहाणने** (५४) जून १४२४ अशी तारीख दिली आहे. बिलग्रामी हा आपल्या **तारीख-इ-दक्खन** या ग्रंथात हिजरी ८३३ ही तारीख देतो. या तारखेला दुसरा कोणताही आधार नाही. रफिउद्दीन सिराजी हा असे म्हणतो की गादीवर आल्याबरोबर अहमदने आपली राजधानी बिदर येथे नेली.

(९०) □ बिदरचा किल्ला हा अतिशय मजबूत असून त्याच्या भोवतालचा खंदक हा ज्या कातळावर किल्ला बांधण्यात आलेला आहे त्यातूनच खोदलेला आहे. दक्षिणेतील अतिशय संस्मरणीय अशी कलाकृती म्हणून या किल्ल्याचा उल्लेख करावा लागेल. त्या किल्ल्यावर अचानक हल्ला चढवून कधीतरी तो घेण्यात आला असेल ही गोष्ट मला तरी असंभवनीय वाटते. शहरातील काही अवशेष आणि उपनगरातील अनेक कबरी ह्यावरून एके काळी ह्या शहराची रचना भव्य असावी याची खात्री पटते. हिंदुस्थानातील मुसलमानी राज्याशी संबंधित असलेल्या प्रत्येक गोष्टीप्रमाणे या शहराची देखील विपन्नावस्था झालेली आहे आणि दिवसेंदिवस झपाट्याने या शहराचा ऱ्हास होत आहे.

(९१) □ ही तिन्ही राज्ये पूर्वी कधीतरी एका हिंदू राजाच्या अमलाखाली एकवटली होती ही गोष्ट असंभवनीय वाटते. परंतु बिदर हे कोणे एके काळी एखाद्या हिंदू राजाची राजधानी असण्याची शक्यता संभवते.

( ९२ ) ★ या बाबत **बुरहाणचा** ग्रंथकर्ता असे म्हणतो की सुलतानाच्या कारकिर्दीची १२ वर्षे पूर्ण झाल्यावरच राज्याची विभागणी करण्यात आली.

( ९३ ) ★ **बुरहाण** या ग्रंथात महमद याचा सुलतानाचा दुसरा मुलगा असा उल्लेख आहे. इतरत्र राजपुत्र महमूद याचाही उल्लेख आढळतो. कदाचित एकाच राजपुत्राचा ग्रंथकर्त्यांनें दोन्ही नावाने उल्लेख केला असावा.

( ९४ ) ★ इ. स. १४२९ मध्ये बहमनी राज्यांत जमिनीची मोजणी होऊन नवीन पद्धतीवर सारा आकारणी केली गेली. तिचे काम दादू नरसू काळे ह्या ब्राह्मणावर आणि दरबारातील एका तुर्की खोजासरावर सोपविले गेले. ( Grant Duff's **Marathas**, 26 ).

( ९५ ) ▫ या काळाच्या पूर्वी कधीतरी कोकणावर हल्ला झाला असावा असे म्हणण्यास जागा नाही. या ठिकाणा कोकणावर झालेल्या स्वारीचा जो उल्लेख आला आहे तिचा कोकण प्रदेश जिंकून घेण्याचे ऐवजी तेथे लुटालूट करण्यापुरताच मर्यादित असावा असे दिसते. फार प्राचीन काळात दाभोळ आणि चेऊल ही बंदरे मुसलमानांच्या ताब्यात असल्याचा उल्लेख आढळतो. पण त्यांच्या ताब्यात अंतर्भागाचा किती मुलूख होता याबद्दल मात्र संशय घेण्यास भरपूर जागा आहे.

( ९६ ) ▫ माहीम म्हणजे मुंबई. माहीमवर झालेल्या या हल्ल्याचे कोणत्याही दृष्टीने समर्थन करता येणार नाही. याचा परिणाम दक्षिणी लोकांचा त्या ठिकाणी आणि इतर ठिकाणी अनेक वेळा अतिशय मानहानीकारकपणे पराभव होण्यावाचून दुसरा काहीच झाला नाही.

( ९७ ) ▫ दक्षिणेच्या फौजेने गंगथडीच्या मार्गाने खानदेशात प्रवेश केला.

( ९८ ) ★ ही मोहीम इ. स. १४२७ मध्ये झाली असे **बुरहाण** या ग्रंथात दिले आहे.

( ९९ ) ★ या वृत्तान्ताबाबत **बुरहाण**च्या ग्रंथकर्त्याने दिलेल्या माहितीत बरीच तफावत आहे. गुजराथच्या इतिहासासंबंधी हकीकत देताना **बुरहाण**चे वृत्तान्त त्रोटक वाटतात.

( १०० ) ▫ आपला मोठा भाऊ फिरोज याचा गळा दाबून त्याला ठार मारण्यास सुलतानाला या इसमाने उद्युक्त केले असा आरोप त्याच्यावर केला जातो. या इसमाच्या रक्तपिपासू वृत्तीची जाणीव झाल्यामुळे आपल्या सिंहासनावरील अधिकाराला हा धोकेबाज प्रतिस्पर्धी आहे असे अनुमान सुलतानाने साहजिकच काढले.

( १०१ ) ▫ मेसापोटेमियातील करबल्याचा रहिवासी. या ठिकाणी महमद पैगंबराचा नातू हुसेन हा ठार मारला गेला आणि तेथेच त्याचे दफन करण्यात आले.

(१०२) □ या संबंध प्रकरणात पौर्वात्त्य देशामधील लष्करातल्या उमरावांच्या अमर्याद उद्धटपणाचे अतिशय भडक असे चित्र रंगविण्यात आले आहे. आणि त्याच अनुषंगाने अहमदशहा वली याने अवलियांच्या ठायी जो भक्तिभाव प्रकट केला आहे त्याचे मोठ्या धीरोदात्ततेने चित्रण करण्यात आले आहे.

(१०३) □ बिदर येथील त्याच्या कबरीवर दिलेली तारीख ८३९ हिजरी अशीच फक्त आहे. ज्या वेळी या कबरीचे बांधकाम पुरे करण्यात आले ती ही तारीख असावी. कबरीच्या दरवाजावर पुढीलप्रमाणे शीलालेख आहे :– माझ्या हृदयात जर कधीकाळी वेदना उत्पन्न झाली तर त्यावर माझा उपाय पुढीलप्रमाणे आहे — दारूचा एकच प्याला आणि मला अत्यानंद अनुभवित असल्याची अनुभुती मिळेल.

(१०४) (१०५) * बुरहाणच्या वृत्तान्ताप्रमाणे अहमद पहिला हा ३–१०–८२५/२२–९–१४२१ या वर्षी गादीवर आला आणि त्याने १२ वर्षे ९ महिने २४ दिवस राज्य केले. परंतु यावरून पहिल्या अहमदच्या मृत्यूची जी तारीख मिळतेत्यापेक्षा वेगळी तारीख अधिक समकालीन पुराव्यावरून उपलब्ध होते. ती म्हणजे अहमद-शहाच्या कबरीमध्ये शुक्रुल्ला कजवीनी याने कोरलेली २९–९–८३९ / १७–४–१४३६ ही तारीख होय. **तजकिरत** (१०४१) या ग्रंथात दिलेली ८४२ हिजरी सन १४३९ ही अहमदच्या मृत्यूची तारीख चुकीची आहे.

(१०६) * **बुरहाण** या ग्रंथात वकिलांची दिलेली नावे पुढीलप्रमाणे आहेत. ती अशी : शहा निमतुल्ला याचा शिष्य शेख खोजन, राजपुत्र महमद याचा गुरू काजी मुसा नौलाखी आणि मलीक-उस-शराक कलंदरखान (५४)

(१०७) □ अलेक्झांडरने आपल्याला स्वप्नात दिसलेली व्यक्ती म्हणजेच जरूसलेम येथील ज्यू लोकांचा धर्मगुरू याबाबत सांगितलेली गोष्ट आणि याठिकाणी सांगितलेली गोष्ट यामधील योगायोग हा अतिशय विलक्षण वाटतो. अलेक्झांडरला आपण ज्युपिटरचा मुलगा आहोत अशी प्रसिद्धी मिळण्याबद्दल जशी तीव्र इच्छा होती तद्वतच अहमदशहा बहमनीला आपण वली अथवा साधु पुरुष म्हणून ओळखले जावे याबद्दल होती.

**बुरहाणे मासिर** या ग्रंथाच्या आपल्या भाषांतरातील नवव्या प्रकरणाला मेजर किंग यांनी पुढीलप्रमाणे टीप दिली आहे :

## (१०८) * तजकिरत-उल-मुलुक या ग्रंथात आलेली सुलतान अहमदशहाच्या कारकिर्दीची हकीकत

## महमदाबाद ऊर्फ बिदर शहराचा बहमनी सुलतान अहमद वली शहा याची कारकीर्द

## अहमदशहा बहमनी

सुलतान फिरूज याचा खून झाल्यानंतर सुलतान अहमद हा गादीवर आला.

एकदा सुलतान ( महमदाबाद ) बिदर नजिकच्या जंगलात शिकारीसाठी गेला होता. तेथे त्याने सशाच्या शेपटीला कुत्र्याने धरल्याचे दृश्य बघितले. ससा कुत्र्यावर उलटला आणि त्याने आपली सुटका करून घेतली. हे पाहून सुलतान अहमद उद्गारला, "एक यःकश्चित् ससा कुत्र्यावर कुरघोडी करतो त्या अर्थी या प्रदेशातले वातावरण वीरवृत्तींना पोषक आहे. येथे जर मी शहराची स्थापना केली आणि त्या शहराला माझी राजधानी बनविले तर या ठिकाणी जन्माला येणारे आणि येथल्या हवेत वाढणारे आणि पोसणारे सर्वजण निश्चितच शूर निपजतील." याशिवाय अहसनाबाद शहरामध्ये सुलतानाला रक्तस्रावाचा विकार झाला होता. त्यामुळे अहसनाबाद शहर हे राजधानीला योग्य असे ठिकाण नव्हते. या कारणामुळे एका शुभ मुहूर्तावर त्याने महमदाबाद शहराच्या बांधणीला सुरुवात केली. थोड्याच काळात शहराची बांधणी सुलतानाच्या मनाप्रमाणे पूर्ण झाली. या शहरात मग सुलतानाने आपले उर्वरित आयुष्य सुखासमाधानात आणि ख्यालीखुशालीत घालविले.

सुलतान अहमदशहाच्या कारकिर्दीत मखदूम खाजाजहान हा खुरासाणातून व्यापाराच्या निमित्ताने बिदर येथे आला. राजकारणात त्याने अतिशय कर्तबगारी दाखविली आणि बहमनी सुलतानांची विश्वासाने आणि इमाने-इतबारे चाकरी केली. खाजाजहानचा मृत्यू सुलतान हुमायून याचा मुलगा सुलतान महमद शहा याच्या कारकिर्दीच्या अखेरीस झाला. त्याच्या अंगातल्या कर्तबगारीने त्याची सर्वत्र प्रसिद्धी झाली.

सुलतान अहमद हा हिजरी ८३० ( इ. स. १४२६ ) मध्ये गादीवर आला. त्याच वर्षी त्याने महमदाबाद शहराच्या बांधणीला सुरुवात केली. त्याची कारकीर्द १२ वर्षे, ९ महिने आणि २४ दिवस एवढी झाली. त्याने शांततेने आणि सुखाने राज्य केले आणि प्रसिद्धी मिळविली. तो हिजरी ८४२ ( इ. स. १४३८ ) मध्ये मरण पावला. पण या संबंधीची हकीकत परमेश्वरालाच ठाऊक.

## खाजाजहानचे दक्षिणेत आगमन. खाजाजहान बहमनींच्या चाकरीत शिरतो. खाजाजहान मोठ्या पदावर चढतो.

मागे सांगण्यात आले आहेच की मखदूम खाजाजहान हा कर्मधर्मसंयोगाने दाभोळ बंदरात उतरला. दाभोळला त्या काळी मैमून मुस्तफाबाद असेही म्हणत. खाजाजहान हा शहाणा, सुस्वभावी आणि अनुभवी असा पुरुष होता. दाभोळ येथे त्याची ज्या ज्या काही व्यक्तींची गाठ पडली त्यांच्या वागण्याने तो अतिशय स्तिमित आणि आश्चर्यचकित झाला. एक दिवस बाजारात तो एका व्यापाऱ्याच्या दुकानात बसला होता तेव्हा दाभोळ बंदराचा सुभेदार मोठ्या भपक्याने आणि डामडौलाने बाजारातून मिरवीत चाललेला त्याने पाहिला तो एका सिंहासनावर बसला होता. त्याच्या हातावर एक बुलबुल पक्षी होता आणि त्या पक्ष्याबरोबर तो खेळत होता. हे पाहून

खाजाजहानला अतिशय आश्चर्य वाटले आणि तो आपल्या मनाशीच विचार करता झाला. " ह्या देशातील लोक अतिशय साधे आणि खेळकर वृत्तीचे दिसतात यात काहीच संशय नाही. या लोकांमध्ये एखादा आपले जीवन अतिशय सुखाने घालवू शकेल आणि त्यांच्या संगतीत भरपूर आनंद लुटू शकेल, आणि अशा तऱ्हेने त्यांच्यात राहून त्याचा मानमरातब वाढेल."

अशा तऱ्हेचा विचार करीत असताना खाजाजहानला असे वाटले की आपण बिदर या राजधानीच्या शहरी जावे. परंतु सुलतानाने अशी आज्ञा जारी केली होती की परदेशी माणूस अथवा व्यापारी मग तो कोणत्याही देशातून आलेला असो, त्याने आपले जे काही काम असेल ते आल्या बंदरामध्ये उरकून घ्यावे. परंतु त्याला दरबारात येण्याची सक्त मनाई असावी. यानुसार खाजाजहानने दाभोळ बंदराच्या सुभेदाराची भेट घेतली. त्याने सुभेदाराला अनेक मूल्यवान भेटी दिल्या आणि आपल्याला बिदर या राजधानीच्या शहराकडे जाण्याची परवानगी देण्यात यावी अशी त्याने याचना केली. सुभेदाराने त्याला सुलतानाच्या वरील आज्ञेचे कारण पुढे केले आणि त्याला परवानगी नाकारली. यावर खाजाजहान म्हणाला, " मी आतापर्यंत रुम, सिरिया, इजिप्त, खुरासाण, तुर्कस्तान इत्यादि देशांत प्रवास केला आहे. या देशांत प्रवास करीत असताना मी अतिशय दुर्मिळ अशा वस्तू गोळा केल्या आहेत. त्या राजेरजवाड्यांना भेटी देण्यास योग्य आहेत. अशा वस्तू सुलतानाच्या नजरेस सुद्धा पडू नयेत ही मोठी दुःखाची गोष्ट आहे." तो असेही म्हणाला की, " यासंबंधी मी सुलतान आणि त्याचे मंत्री यांना लिहून कळविले आहे. त्यांना मी अनेक भेटी रवाना करीत आहे. आपणही सुलतानाच्या अधिकाऱ्यांना यासंबंधी काही तरी लिहून कळवा. असे झाल्यास मला माझ्या कार्यात यश येण्याची शक्यता आहे."

यावर दाभोळ बंदराच्या सुभेदाराने राज्याच्या अधिकाऱ्यांकरवी सुलतानाकडे एक खलिता रवाना केला. याच सुमारास खाजाजहानने पाठविलेली पत्रे राज्याच्या अधिकाऱ्यांना मिळाली. पत्रातील मजकूर जाणून घेतल्यावर सर्वांनी मिळून त्यासंबंधात सुलतानाची भेट घेण्याचे ठरविले. परंतु खाजाजहानला बिदर येथे कोणत्याही परिस्थितीत येऊ देऊ नये असे सुलतानाचे मत होते. सुलतान आपल्या अधिकाऱ्यांना म्हणाला, " ही परदेशी माणसे मोठी हुशार आणि कारस्थानी असतात. येथील लोकांना ते सहज फसवू शकतील. या माणसाला जर आपण इथे येण्याची परवानगी दिली तर तो इथे आल्यानंतर अगदी थोड्या अवधीत सत्ता आणि सामर्थ्य संपादन करील आणि असे झाल्यास ते तुम्हा कोणालाही आवडणार नाही." सुलतानाच्या या बोलण्यावर त्याचे अधिकारी म्हणाले, "एकटा एक माणूस असे काय करू शकतो आणि हा तर एक व्यापारी आहे. आपण तो कोणत्या दर्जाचा माणूस आहे आणि चाकरी करण्याला तो योग्य आहे किंवा नाही याची परिक्षा पाहू. तो जर खरोखरी नालायक असेल तर मग त्याचे इथले वास्तव्य थोड्या काळापुरतेच राहील. त्याचे काम लवकरच

आटपेल आणि त्यानंतर आपण त्याला येथून जाण्यास सांगू" याप्रमाणे सुलतानाच्या अधिकाऱ्यांनी खाजाजहानसंबंधी सुलतानाला अतिशय गळ घातली. अखेर सुलतानाने खाजाजहानला येण्यास परवानगी दिली. काही दिवसांनंतर खाजाजहान हा बिदर येथे येऊन पोहोचला. त्याच्याबरोबर त्याने आणलेला माल होता. त्याने दरबारातल्या प्रत्येक अधिकाऱ्याची गाठ घेतली आणि त्यांना आपल्या येण्याचा उद्देश समजावून सांगितला. सरदारांनी त्याला सांगितले की सुलतानाला तू काही वस्तू नजर म्हणून दे. या सल्ल्याप्रमाणे खाजाजहानने काही अरबी घोडे, दुर्मिळ रेशमी कपडा, काही तुर्की आणि हबशी गुलाम, अनेक तऱ्हेचे मोती आणि मूल्यवान हिरेमाणके आणि उत्तमोत्तम हस्ताक्षरातल्या आणि उत्कृष्ट बांधणीच्या कुराणांच्या प्रती वगैरे गोष्टी सुलतानाला नजर केल्या. या वस्तू घेऊन तो दरबारात निघाला तेव्हा वरील कुराणांच्या प्रतींपैकी एक प्रत त्याने आपल्या मस्तकावर घेतली. इतर त्याने आपल्या गुलामांच्या डोक्यावर ठेवल्या आणि तो सुलतानानजीक येऊन पोहोचला. जेव्हा सुलतानाला कळविण्यात आले की गुलामांच्या डोक्यावर कुराणाच्या प्रती आहेत, तेव्हा तो आपणहून सिंहासनावरून उठला. त्याने खाजाजहानच्या मस्तकावरील कुराणाची प्रत आपल्याकडे घेतली आणि ती आपल्या सिंहासनावर ठेवली. नंतर तो वजिरांकडे वळून म्हणाला, "खाजाने आपल्याबरोबर कुराणाची प्रत आणली. साहजिकच परमेश्वरी वाणीला मान देण्यासाठी मला माझ्या सिंहासनावरून उठणे भाग पडले. माझ्याच दरबारात जणू काही खाजाने मला आज्ञा केल्यासारखेच हे झाले. आता यापुढे त्याच्या हातून काय होते ते बघावयालाच पाहिजे." सुलतानाने खाजाने नजराणा म्हणून आणलेल्या सर्व वस्तू नजरेखालून घातल्या आणि राजवाड्यात रवाना केल्या. यानंतर त्याने खाजाजहानकडे इतर राजेरजवाड्यांबद्दल चौकशी केली. खाजाने सुलतानाने विचारलेल्या सर्व प्रश्नांची व्यवस्थित आणि मनासारखी उत्तरे दिली. त्याने इतर राज्यांतल्या लोकांच्या चालीरिती आणि राहणी याबद्दलची तऱ्हेतऱ्हेची माहिती सुलतानाला दिली. खाजाजहानने सांगितलेल्या माहितीने सुलतानाला अतिशय आश्चर्य वाटले आणि त्याने अधिक माहिती सांगण्याबद्दल खाजाजहानला आग्रह केला. खाजाजहानच्या संगतीने सुलतान अतिशय खूष झाला आणि त्याने खाजाजहानला दररोज आपल्याकडे येण्याची आज्ञा दिली. त्याने खाजाजहानवर अनेक बक्षिसांची खैरखैरात केली आणि त्याला राहण्याकरिता एक मोठी प्रशस्त आणि भव्य इमारत नियुक्त करून दिली. दरबारातल्या इतर चाकरांप्रमाणे खाजाजहान दरबारात दररोज हजर रहात असे. प्रत्येक वेळी तो सुलतानाला नजर करण्यासाठी भेटी आणीत असे. त्यामुळे दिवसेंदिवस सुलतानाची त्याच्यावरची मर्जी वाढत गेली. सुलतानाजवळ खाजाजहानचे वजन इतके वाढले की तो राज्यकारभारविषयक आणि आर्थिक बाबींबाबत खाजाजहानचा सल्ला घेऊ लागला. खाजाजहानच्या सल्लयाने आणि संमतीने सुलतानाने केलेल्या प्रत्येक गोष्टीत त्याला यश मिळत गेले. याचा परिणाम असा झाला

की सुलतान प्रत्येक बाबीत खाजाजहानवर अधिकाधिक विसंबून राहू लागला. खाजा-जहानचा अधिकार आणि दर्जा ही पण त्यामुळे वाढली. या घडामोडी चालू असताना सुलतान अहमद मरण पावला.

**तजकिरत उलमुलुक** मधली टीप समाप्त.

(१०९) ★ याबाबत **बुरहाण** या ग्रंथात जफरखान ऊर्फ अल्लाउद्दीन अहमद हा सुलतानाचा (अहमदशहा वली बहमनी) सर्वांत मोठा मुलगा होता असे ठामपणे विधान केलेले आहे.

(११०) ▫ खलफ हसन ऊर्फ मलिक-उत्-तुज्जार हा परदेशी व्यापारी असल्याचे पूर्वीच सांगितले आहे. दक्षिणेतील सुलतानांच्या कारकिर्दीत दक्षिणी आणि हबशी व पर्शियन आणि तुर्की यांमधील वैमनस्य सातत्याने टिकून राहिले.

(१११) ▫ दक्षिणी इतिहासकारांनी मोगल हे नाव अरबी, पर्शियन अथवा तार्तर वगैरे सर्व जातींच्या परदेशी मुसलमानांना सरसकट दिले. वस्तुतः मोगल हे नाव फक्त एका जातीपुरतेच मर्यादित असावयास पाहिजे.

(११२) ▫ हा लहानसा आणि आता क्षुल्लक समजला जाणारा किल्ला एकेकाळी नासिरखानाचे मजबूत असे आश्रयस्थान असावा असे दिसते. शेकडो गडकोटांनी भरलेला बागलाणाचा प्रदेश अजून मुसलमानांच्या कबजात आलेला नव्हता. परंतु त्याने असीरच्या किल्ल्यात आश्रय घेतला नाही, ही घटना चमत्कारिक वाटते कारण जर तेथे त्याने तयारी केली असती तर दक्षिणेच्या फौजांना प्रतिकार करणे त्याला निश्चित सहज शक्य झाले असते.

(११३) ▫ अतिशय चमत्कारिक आणि बोधपर म्हणून या घटनेचा उल्लेख करावा लागेल. हिंदूंच्या मनात परकीयांबरोबर संबंध ठेवण्याबाबत जी एक तिरस्काराची भावना असते ती त्यांच्या हितसंबंधाच्या आड येत असल्यास ती ते सहज दूर करू शकतात हे यावरून दिसून येते. हिंदू राजा मुसलमानांविरुद्ध लढण्यासाठी मुसलमानांची भरती करीत असल्याचे याहून प्रतीकात्मक असे दुसरे उदाहरण सापडणे अशक्य आहे.

(११४) ▫ मुसलमानांच्या मनात देखील काफरांसमोर मान वाकविण्याबद्दल संदेह होता या भावनेला प्रतिसाद देण्यासाठी हिंदू राजा आपल्या पुढ्यात कुराणाची प्रत ठेवी आणि मुसलमान त्यापुढे मान वाकवीत. हा आदर त्यांनी आपल्यालाच दिला आहे अशी हिंदू राजा आपल्या मनाची समजूत करून घेई. अशा तऱ्हेने दोन्ही पक्षांच्या भावनांची बूज राखली जाई.

(११५) ▫ शिर्के हे कोकणातल्या अतिशय प्राचीन अशा घराण्याचे आडनाव होते. हल्लीच्या साताऱ्याच्या राजाची आई ही शिर्के घराण्यातील होती.

(११६) □ लेखकाच्या शैलीची कल्पना यावी यासाठी उदाहरण म्हणून वरील उतारा जसाच्या तसा शब्दशः दिला आहे. कोकण प्रांताच्या सर्वसाधारण स्वभाव विशेषांचे यथातथ्य वर्णन करणारा उतारा म्हणून या वर्णनाचा उल्लेख करावा लागेल. अर्थात मुसलमानी सैन्याचा ज्या ठिकाणी सर्वनाश करण्यात आला ते ठिकाण निश्चित करणे हे मात्र तितके सोपे नाही.

(११७) □ चाकण येथे सय्यदांवर जो हल्ला झाला त्याची तुलना फरिश्ता करबला येथे अबदुल्ला-**बीन**-जियाद आणि शम्स-उल-जोशन यांनी महमद पैगंबराचा नातू हुसेन आणि त्याचे ७० अनुयायी याजवर चाल करून जो हल्ला केला आणि त्यांचा नाश केला त्याचबरोबर करतो.

(११८) □ हुसेनवर हल्ला करण्याची चिथावणी देणाऱ्यांमध्ये खलिफ येजीद हा होता.

(११९) □ शत्रूची फळी फोडण्याबद्दल प्रसिद्धी मिळालेला म्हणजे सफशिकन ऊर्फ कासीम बेग.

(१२०) ★ या बाबत फरिश्त्याने दिलेली हकीकत चुकीची आहे असे शेरवानी (२५५) यांनी विधान केले आहे. **तुहफतुसलातीन** या ग्रंथामध्ये एकही स्त्री अगर मूल ठार मारले गेले नाही असा उल्लेख आढळतो.

(१२१) ★ ही सारी घटना फरिश्त्याने किती कटुतेने सांगितलेली आहे हे वाचकाच्या सहज नजरेस येईल. परंतु याबाबत समालोचन करणाऱ्या १९ व्या शतकातील युरोपियन माणसाला त्याच घटनेकडे बघणाऱ्या शिया मुसलमानांइतके भावनावश होता येणार नाही. सेंट बार्थोलोम्युच्या दिवशी जी कत्तल झाली तिचे वर्णन करणाऱ्या एखाद्या प्रॉटेस्टन्ट लेखकाच्या मनःस्थितीची जर त्याने कल्पना केली तर या प्रसंगाचे वर्णन करताना मुसलमान इतिहासकाराच्या मनाची कशी विदीर्ण अवस्था झाली असेल त्याचा थोडासाच का होईना पण अंदाज त्याला करता येईल.

(१२२) □ म्हणजे अनुषंगाने सुलतानाचा पुतण्या.

(१२३) □ चाकण येथील परकीयांच्या कत्तलीतून पळून गेलेला कासीम बेग तोच हा.

(१२४) □ ज्यावेळी निराशेच्या आहारी जाऊन व्यक्ती आपल्या हाताने आपल्या पायावर कुऱ्हाड पाडून घेतात अगर जुलमापुढे मान वाकविण्याची तयारी नसल्यामुळे त्या जुलमाचा नाश करण्यास प्रवृत्त होतात त्यावेळी हुकुमशहाच्या वर्तनावर जाहीररित्या कडक भाषा वापरून जे कोरडे ओढले जातात त्याचे वरील घटना म्हणजे एक उदाहरण आहे.

**तजकिरत–उल्-मुलुक** या ग्रंथात सुलतान अल्लाउद्दीन याच्या कारकिर्दीच्या आलेल्या हकीकतीचे मेजर किंग यांनी भाषांतर केले. त्याचा मराठी अनुवाद खाली दिला आहे.

## अल्लाउद्दीन शहा बहमनी

## सुलतान अहमदशहाचा मोठा मुलगा सुलतान अल्लाउद्दीन याची कारकीर्द

(१२५) ★ सुलतान अहमदशहाचा मृत्यू झाल्यावर त्याच्या जागी त्याचा मुलगा सुलतान अल्लाउद्दीन हा गादीवर आला. त्याचा व्यवस्थित जम बसला. सुलतान अहमदशहा हा मखदूम खाजाजहान याचा व्यवस्थित मान ठेवी, त्यापेक्षाही जास्त मान सुलतान अल्लाउद्दीन त्याचा ठेवू लागला. खाजाजहानने राज्याची भरभराट करण्यासाठी आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. त्याच्या सुव्यवस्थेमुळे राज्याचे उत्पन्न अतिशय वाढले आणि खजिन्यात द्रव्याची भर पडली. खाजाजहानच्या धोरणाने राज्याच्या वसुलाची कल्पनातीत वाढ झाली आणि खजिन्यात इतके द्रव्य जमा झाले की त्याच्या एक शतांश इतक्या हिश्शानेही पूर्वीच्या सुलतानांच्या काळी कधी वसूल झाला नव्हता. खाजाजहान हा पुष्कळ प्रसंगी राज्याच्या सरहद्दीवर काफरांच्या प्रदेशावर फौज पाठवीत असे. अशा वेळी त्यांचा मुलूख तो आपल्या ताब्यात घेत असे आणि पराजितांपासून खंडणी म्हणून तो भरपूर द्रव्य वसूल करी. ज्या ज्या दिशेला सुलतानाची फौज मोहिमेवर जात असे, त्या त्या ठिकाणी विजयश्री त्यांच्या गळ्यात माळ घाली. खाजाजहान वजीर असताना सगळीकडून आणि सर्व देशांतून शिपाई फौजेत भरती होण्यासाठी आणि व्यापारी व्यापार करण्यासाठी बिदर शहरात जमा होत.

सुलतानाची एकंदर कारकीर्द २३ वर्षे, ९ महिने आणि ७ दिवस झाली. तो **हिजरी** ८६६ (इ. स. १४६१-६२) या वर्षी मरण पावला. त्याने आपल्या हयातीतच आपला मुलगा हुमायूनशहा याला आपला वारस म्हणून नेमले होते.

(१२६) ★ पहिल्या अहमदचा मृत्यू १७ एप्रिल १४३६ रोजी झाला. त्याचा मुलगा अहमद दुसरा याने २३ वर्षे ९ महिने राज्य केले असे **हफ्त इक्लीम** या ग्रंथात दिले आहे. **बुरहाण** (८८) या ग्रंथात त्याच्या पाठीमागून गादीवर आलेल्या हुमायूनचा राज्यारोहण समारंभ ७ मे १४५८ रोजी झाला असे विधान आहे. म्हणजे ७-५-१४५८ ही तारीख दुसऱ्या अहमदच्या मृत्यूची समजली पाहिजे. परंतु दुसऱ्या अहमदचा मृत्यू ३ एप्रिल १४५८ या तारखेच्या अगोदर झाला असला पाहिजे. कारण या तारखेला हुमायूनने आपला भाऊ हसनखान याला पदच्युत केले. **तबकाते** (११८) या ग्रंथात त्याने अहमद हे आपल्या बापाचे नाव राज्यारोहणाचे वेळी धारण केल्याचे दिले आहे. सफवी हा देखील हुमायूनला अहमदशहाचा मुलगा असे संबोधितो.

(१२७) ☐ खुरासाणात शहा नियतउल्ला याजकडे ज्या धर्मनिष्ठ व्यक्तींना पाठविण्यात आले होते त्यापैकी एक. ही बहुतेक सर्व मंडळी अनेकदा तेथील दरबारी भानगडीत पडल्याचे आपल्याला दिसून येते.

(१२८) ☐ राजवाड्यातील शयनगृहे आणि खाजगी दिवाणखान्यांचे अधिकारी.

(१२९) ☐ सैफखानाला ठार मारण्यात आले; राजपुत्राचे डोळे काढण्यात आले. हबीबुल्ला याला धर्माबाबतच्या त्याच्या विशिष्ट स्थानामुळे फक्त बंदीवासाची शिक्षा देण्यात आली.

(१३०) ★ रफिउद्दीन शिराजी हा आपल्या ग्रंथात असे सांगतो की महमूद गावान हा हिंदुस्थानात पहिल्या अहमदच्या कारकिर्दीत आला. ही हकीकत खरी नसावी कारण उपलब्ध पुरावा तो १४५३ मध्ये आल्याचे दर्शविते. उत्तर इराण-मधल्या रिश्त या गावाजवळील गावानचा तो रहिवासी. म्हणून त्याला गावान हे नाव मिळाले. **मुंतखाब** ( ३,१०५ ) या ग्रंथात असे दिले आहे की एकदा गावानने आपल्या सैनिकांना काही बंजारा जमातीचे लोक हाकलत असलेल्या आणि अशा रीतीने शत्रूला फसवून चाललेल्या दोन हजार गाईंवर ( गावान ) स्वार होऊन दौड करावयास लावले म्हणून त्याला गावान असे नाव मिळाले. या गोष्टीला इतर कोठेही आधार मिळत नाही. किंबहुना हीच गोष्ट खलफ हसन बसरी आदी व्यक्तींच्या बाबतही सांगण्यात आलेली आहे.

(१३१) ☐ पौर्वात्य देशामध्ये अशी पद्धत होती की सरकारी अधिकाऱ्यांनी एक दिवसाकरता देखील त्यांना दरबार सोडून बाहेर जावयाचे झाल्यास सुलतानाची परवानगी घेतल्यावाचून जाऊ नये. ज्यावेळी अशी परवानगी मिळत नसे तेव्हा तो आपला अपमान झाला असे संबंधित अधिकारी समजे आणि सुलतानाविरुद्ध बंडाची तयारी करी.

(१३२) ☐ राजघराण्यातील आपापसात होणाऱ्या विवाहप्रसंगाच्या वेळी आपल्या प्रजाजनांसह हजर राहणे हे किती गैरसोयीचे होते हे या ठिकाणी पूर्णपणे दिसून येते. अर्थात सिकंदरखानाने जो आव आणला होता तो त्याला न शोभणारा आणि उद्धटपणाचा होता.

(१३२अ) ★ **बुरहाण** (९२) या ग्रंथात निजामउल्मुल्क याला ठार मारल्याची हकीकत दिली आहे. परन्तु पान ९८ वर **बुरहाण** या ग्रंथात असे विधान केले आहे की निजाम-उद्दीन अहमदशहा याच्या कारकिर्दीत माळव्याच्या महमूद खिलजीवर झालेल्या स्वारीत निजाम उल्मुल्क हा होता. यावरून हुमायूनशहाकडून त्याचा वध झाला नसावा असे म्हणण्यास हरकत नाही.

(१३३) ☐ सुलतानाच्या शरीररक्षकांत प्रामुख्याने विकत घेतलेल्या गुलामांचा भरणा असे. या गुलामांना अतिशय सन्मानपूर्वक वागणूक दिली जाई आणि अनेकदा

ते थोर कीर्तिप्रत पोहोचत असत. या रक्षकांतून सुलतान आपले अनुचर आणि विश्वासू वैयक्तिक सेवक यांची निवड करी. आपल्या जीवनात यशाची पुढची पायरी गाठावयाची झाल्यास एक सुलतानच ते करू शकेल अशी शिकवण त्यांना दिली जाई. पौर्वात्य देशांतील दरबारांत वरील प्रथा सातत्याने टिकून राहिली. रोमन बादशहाचे पदरी असलेली प्रेटोरियन पथके, फ्रान्सचे स्वीस रक्षकदल आणि कॉन्स्टॅन्टिनोपलचे जॅनिसरीस म्हणजे अनियंत्रित हुकुमशहांची या तऱ्हेच्या सत्ता आणि संरक्षण देणाऱ्या साधनांबद्दलची अनिवार आवड असल्याचा भरपूर पुरावा आहे.

(१३४) ▫ सुलतानाच्या कारकिर्दीच्या सुरुवातीला त्याच्या सिंहासनावरील अधिकाराबाबत वादंग निर्माण करणारा सुलतानाचा नातेवाईक आणि राजपुत्र सिंकदरखानाचा बाप.

(१३५) ▫ बीड हे यावेळी शहा निमतउल्लाच्या वारसाच्या ताब्यात होते. साहजिकच शहा हबीबुल्लाखानाबद्दल त्यांना जिव्हाळ्याची भावना होती.

(१३६) ▫ इराणचा प्राचीन काळातील एक बादशहा याने आपला सैताना-बरोबर सौदा केला. परिणामी त्याच्या कच्छपी दोन सर्प लागले. त्याच्या खांद्यातून ते वर येत आणि दररोज माणसाचा मेंदू खायला घालण्याची त्याच्याजवळ मागणी करीत.

(१३७) ▫ अरबस्तानचा एक क्रूर आणि जुलमी राजा.

(१३७ अ) * इ. स. १४६० मध्ये दक्षिण हिंदुस्थानात पावसाच्या अभावी जो भयंकर दुष्काळ पडला त्याला दामाजीपंताचा दुष्काळ म्हणून ओळखले जाते. (Lieut. Colonel Etheridges *Report on Famines in the Bombay Presidency* (1868).

(१३८) ▫ महानदीच्या तीरावर बसलेले ओरिसाचे प्राचीन राजधानीचे शहर.

(१३८ अ) * **बुरहाण** (९६) या ग्रंथात हुमायूनशहाच्या मृत्यूपत्राची हकीकत दिली आहे. त्यामध्ये असे सांगितले आहे की महमूद गावानने हुमायूनच्या तीन मुलांपैकी सुलतानपदाला योग्य असलेल्या कोणाही एकाला गादीवर बसवावे असा सल्ला दिला. या हकीकतीवर विश्वास ठेवणे कठीण आहे. कारण हुमायूनचा मोठा मुलगा हाच आठ वर्षांचा होता. साहजिकच त्याला गादीवर बसविण्याचा प्रश्न वादातीत होता.

(१३८ ब) * हुमायूनशहाचा खून झाला असावा असे **बुरहाण** या ग्रंथाचा कर्ता सूचीत करीत नाही. हुमायूनशहाला नैसर्गिक कारणामुळेच मृत्यू आला असण्याची शक्यता अधिक संभवते असे अनुमान **बुरहाण**चा कर्ता काढतो.

(१३९) ▫ किरमानचा सुप्रसिद्ध शहानीमतउल्ला याचा शहा मुहीबउल्ला हा नातू होता.

(१४०) □ फरिश्त्याने या ठिकाणी सहीसही बिदरचा मुल्ला दाऊद आणि बहमनी घराण्याचे इतर इतिहासकार यांची भाषा उचलताना योग्यायोग्यतेचा अथवा संशोधनक्षमतेचा उपयोग हिंदूंनी एकाएकी माघार का घेतली त्याची कारणे शोधून काढण्याकडे केला नाही. कारण तेलंगणाचा ताबा मिळविण्यासाठी विचार-पूर्वक झालेली युती ही केवळ १६० सैनिक चाल करून आल्यावर मोडून पडली असे समजणे हास्यास्पद आहे.

(१४१) □ या ठिकाणी किल्ल्याच्या नावाचा फरिश्ता उल्लेख करीत नाही.

(१४२) □ तलवारीच्या मुठी भरीव पोलादाच्या करीत असत आणि रुंद पात्यांच्या तलवारींचे वजन पेलावे म्हणून त्या भारी बनवीत असत.

(१४३) □ हत्ती पिसाळल्यावर बेफाम बनत आणि बऱ्हंशी एकमेकांवर हल्ला करीत. अनुवादकाराने या तऱ्हेचा प्रसंग एकदा प्रत्यक्ष पाहिला होता. त्यात दोन्ही हत्तींच्या माहुतांनी केलेल्या कसोशीच्या प्रयत्नामुळे ज्या हत्तीवर हल्ला झाला होता त्यावर बसलेल्या व्यक्ती हत्तीच्या पायाखाली सापडून चिंधड्या होण्यापासून बचावल्या होत्या.

(१४४) □ सुलतानाची निशाणी ही नेहमी हत्तीवरून वाहून नेत आणि सुलतान जेव्हा रणांगणात जाई तेव्हा ती त्याच्या समवेत नेत असत. हिंदुस्थानातील फौजांचे भवितव्य अनेकदा ह्या निशाणीच्या अभावी ठरवले गेल्याचे सर्वश्रुत आहे. हल्ली जेथे सैन्याच्या प्रत्येक तुकडीचे अथवा विभागाचे स्वतंत्र असे चिन्ह आहे आणि त्याशिवाय बरोबर तोफखानाही आहे तेथे अशा सेनाविभागाचे मनोधैर्य सहजासहजी कमकुवत होत नाही.

(१४५) □ बालेकिल्ला अथवा किल्ला अजूनही तग धरून राहिला.

(१४६) □ प्रत्येक राज्याकडून होणाऱ्या आक्रमक हालचालींविरुद्ध राज्या-राज्यांमध्ये आपापसात जी असूयेची भावना निर्माण होते ती नेहमीच त्यांच्या सामर्थ्यावर दबाव आणण्यास कारणीभूत ठरते. युरोपमधील राज्यांनी जो समतोलपणा वारंवार प्रस्थापित केला आणि ज्याची अतिशय काटेकोरपणे देखभाल केली, त्याची तितक्याच काटेकोरपणे मुसलमानांनी दखल घेतली. परंतु त्या सर्वांनाच जेव्हा एका प्रकारच्या मनोदौर्बल्याने पछाडले तेव्हा ते सर्व मोगलांच्या अधिसत्तेला बळी पडले.

(१४७) □ या ठिकाणी ज्या अनेक महमूदांचा उल्लेख आला आहे त्यांच्या-मधील विभिन्नता दाखविण्याची पूर्णपणे काळजी घेण्यात आली आहे हे वाचकांच्या सहज दृष्टोत्पत्तीस येईल. माळव्याच्या राजाच्या नावापाठीमागे नेहमी सुलतान ही पदवी लावण्यात आली आहे तर गुजरातच्या सुलतानाच्या नावापाठीमागे शहा हे पद चिकटविण्यात आले आहे. या उलट दक्षिणेच्या वजिरांचा त्याच्या ख्वाजा आणि गावान या विशिष्ट नामाभिधानांनी उल्लेख करण्यात आला आहे.

(१४८) ▫ विषुववृत्तावरील वातावरणात तहान आणि उष्णता यापासून संभवणाऱ्या भयंकर यातनांचा अनुभव केवळ काही तासापुरताही ज्याने सहन केला नाही त्याच्या मनाला या अनुभूतीची कल्पना आणून देणे जवळजवळ अशक्यप्राय आहे. पाण्याशिवाय मोठ्या अंतरापर्यंत कूच करण्यामुळे जे बळी पडतात (आणि या गोष्टी पौर्वात्य देशातील ब्रिटिश सैन्याबाबतही बऱ्याच वेळा घडून आल्या आहेत.) ते हीच गोष्ट दर्शवितात की प्रत्येक मजलीला पाण्याचा आणि इतर वस्तूंचा भरपूर पुरवठा आहे किंवा नाही याबद्दल खात्री अगोदर करून घेणे हे अतिशय महत्त्वाचे आहे.

(१४९) ▫ गोंड हे हिंदू नाहीत ही गोष्ट सर्वसाधारण हिंदी माणसाला आणि विशेषेकरून युरोपीयन माणसाला ज्ञात नाही, या गोष्टीची जाणीव फरिश्त्याला आहे असे दिसते. या अतिशय कुतूहलाच्या वस्तुस्थितीबद्दल संशोधन करण्यात मि. रिचर्ड जेन्किन्स यांनी पुष्कळ वेळ आणि मेहनत खर्ची घातली आहे. त्यांच्या संशोधनापासून काय निष्पत्ती झाली त्याबाबत अधिक प्रकाश ते जगासमोर टाकतील अशी आशा प्रकट करणे प्रस्तुत आहे.

(१५१) ▫ क्रूरकर्म्या हुमायूनच्या पाठीमागे निजाम, महमद आणि अहमद हे तीन मुलगे हयात होते.

(१५२) ▫ ही दुर्दैवी घटना कोणत्या तारखेला घडली ती फरिश्ता नमूद करीत नाही. सुलतान जेव्हा सिंहासनावर बसला तेव्हा त्याचे वय फक्त ८ वर्षांचे होते आणि त्याचा वयाच्या चौदाव्या वर्षी झालेला विवाह हा खाजाजहान याच्या मृत्यूपर्यंत झालेला नव्हता. साहजिकच ही घटना घडली तेव्हा सुलतानाचे केवळ बालवय असावे. ही गोष्ट हेच दर्शविते की आशिया खंडातील हुकूमशहांना ते अगदी लहान असतानाच अशा तऱ्हेच्या रक्तरंजीत हत्याकांडांशी परिचित व्हावे लागे.

(१५२ अ) * सुलतान महमद याच्या कारकिर्दीच्या सुरुवातीच्या काळात खाजाजहान तुर्कशाही या तुर्कस्तानातून गुलाम म्हणून आलेल्या परंतु नंतर सत्ता बळकाविलेल्या उमरावाच्या हाती राजसूत्रे होती. त्याची बडतर्फी झाल्यानंतर मलीक-उत्-तुज्जार ऊर्फ ख्वाजाजहान महमूद गावान या तुर्की अमिराकडे राज्याचे अधिकार गेले. बहमनींच्या राजकारणात याप्रमाणे तुर्कस्तानातून हिंदुस्तानामध्ये गुलाम म्हणून आलेल्या पण आपल्या कर्तृत्वाने उच्च पदाला चढलेल्या अशा अनेक व्यक्तींचा शिरकाव झाला वरील दोघांशिवाय इतर अनेक तुर्की सरदार बहमनींच्या दरबारात लहान-मोठ्या अधिकारावर होते. खाजाजहान तुर्कशाही आणि महमूद गावान या दोघांनी सुलतान महमदशहाची कारकीर्द गाजविली. महमदशहाच्या कारकीर्दीत पडलेला पायंडा पुढे महमूदशहाच्या कारकीर्दीत हसनखान खुरासानी, ऐन उल्मुल्क जहांगीर खान ऊर्फ अली तुर्क वगैरेंनी चालू ठेवला.

(१५२ ब) ★ **मुंतखाब** (३, १०३) या ग्रंथात सुलतानाने यावेळी केलेल्या भाषणाचा सारांश दिला आहे. त्यामध्ये महमूद गावानला अलाउद्दीन या पदवीने संबोधले आहे. ही पदवी दुसऱ्या कोणत्याही ग्रंथात मिळत नाही.

(१५३) ▫ अशा तऱ्हेने वेढा संपविण्याची पद्धती अनेक वेळा यशस्वीरित्या उपयोगात आणली गेली आहे. वेढ्यात अडकलेली शिबंदी वेढा घालणाऱ्यावर जे हल्ले चढविते त्यावेळी त्यांना पत्करावा लागणारा हा एक अतिशय मोठा धोका असतो.

(१५४) ▫ सरहद्दीवर असलेल्या प्रांतातील उत्पन्नाची वसुली व कारभार ही अनेकदा लष्करी मनसबदारांवर सोपविण्यात येई. याचा उद्देश त्या प्रांताचे परचक्रापासून संरक्षण व्हावे असा असे. परंतु पुष्कळदा या धोरणाची परिणती त्या प्रांतावर नेमण्यात आलेल्या अधिकाऱ्याकडून बंडाचे निशाण उभारण्यात होई.

(१५५) ▫ महमूद गावान याला मलिक-उत्-तुज्जार म्हणजे व्यापाऱ्यांचा मुख्य आणि ख्वाजाजहान या पदव्या होत्या. राज्यातील सर्वांत मानाची जागा ही व्यापाऱ्यांचा प्रमुख या नामाभिधानाने ओळखली जावी ही वस्तुस्थिती तत्कालीन संस्कृतीची स्थिती दाखविणारे एक मनोहारी उदाहरण आहे असे म्हणावे लागेल.

(१५६) ▫ पूर्वी एकदा मुसलमानी सैन्याचा नाश, खेळणा ऊर्फ विशाळगडच्या राजाने घडवून आणला होता ही घटना या अगोदरच कथन केलेली आहे.

(१५७) ▫ ताजीम देण्यासाठी आणि आनंदाचे प्रसंग साजरे करण्यासाठी या प्रथेचा अवलंब तोफा उपयोगांत येण्याच्या पूर्वी करण्यात येत असे.

(१५७ अ) ★ फिरोजशहा बहमनीच्या काळात गोवा हे बहमनींच्या ताब्यात असावे अथवा बंदर म्हणून बहमनींना गोव्याचा वापर करू देण्याबाबत विजयनगरबरोबर बहमनींचा करार झाला असावा. कारण १४७२ मध्ये महमूद गावानने महमदशहा तिसरा याच्या कारकिर्दीत ते काबीज केले.

(१५८ अ) ★ Sewell and Aiyangar यांच्या मते गोवा १४७० साली जिंकून घेण्यात आले परंतु महमूद गावान याने लढाईच्या मैदानातून लिहिलेल्या पत्रावरून गोव्याचा पाडाव १ फेब्रुवारी १४७२ पर्यंत झाला नसावा असे दिसते.

(१५९) ▫ सार्वजनिक जीवनामधून राजमाता बऱ्याच काळापूर्वीपासूनच निवृत्त झाली होती. परंतु आपली मोहीम यशस्वीरित्या संपवून आलेल्या सेनापतीचा सन्मान करण्यासाठी या खास प्रसंगी तिने आपल्या निश्चयापासून तात्पुरते दूर होण्याचे ठरविले असावे असे दिसते.

(१६०) ▫ खुष कदम याला आता किश्वरखान ही पदवी होती. त्याच्या ताब्याखाली पूर्वी दाभोळ आणि कोल्हार हे प्रांत होते.

( १६० अ ) ★ निकीटीन हा रशियन प्रवासी अनेक महिने बिदर येथे वास्तव्य करून होता. त्याने राजधानीतले जीवन अगदी सूक्ष्मपणे बघितल्यानंतर त्याचे वर्णन आपल्या ग्रंथात केलेले आहे. बिदरचा उल्लेख तो सर्व मुसलमानी हिन्दुस्तानातील मोठे शहर असा करितो. याठिकाणी हिन्दुस्तानातील सर्व भागातून लोक जमा होत. लोकांविषयी सांगताना निकीटीन असे म्हणतो की, सर्वसाधारणपणे प्रजा गरीब होती. परंतु अमीरउमराव मात्र अतिशय श्रीमंत होते. सुलतानाचा बिदर येथे भव्य वाडा असून त्याचे संरक्षण शंभर सशस्त्र सैनिक करीत. येणाऱ्या-जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीची नोंद ठेवली जाई. सुलतानासंबंधी लिहिताना निकीटीन असे लिहितो की, सुलतानाचे वय २० वर्षाचे असून तो चणीने बारीक होता. त्याला शिकारीची अतिशय आवड होती. निकीटीनने ईदच्या दिवशी सुलतानाच्या निघालेल्या मिरवणुकीचे अतिशय सुंदर असे वर्णन दिलेले आहे. महमूद गावानविषयी तो असे सांगतो की वजिराबरोबर दररोज ५०० माणसे भोजनासाठी बसत. ही मंडळी समाजातील उच्चवर्णीय वर्गांपैकी नसत. वजिराच्या तबेल्यात दोन हजार घोडे रात्रंदिवस जय्यत तयारीनिशी ठेवले जात.

( १६१ ) ▫ ओरिया म्हणजे ओरिया देश किंवा ओरिसा.

( १६२ ) ▫ हे ठिकाण म्हणजे बहुधा अन्तूर आणि अजंठा यामधील उषागड हे असावे.

( १६३ ) ▫ या सुविख्यात उमरावाचा बराच काळपर्यंत दौलताबादवर ताबा होता. यावेळी मात्र दौलताबादेच्या प्रमुखाच्या कामात बरीच वाढ करण्यात आली. युसुफ आदिलखानाच्या अधिपत्याखाली आता जो प्रांत देण्यात आला होता त्याचा दौलताबादचा किल्ला आणि सभोवारचा जिल्हा म्हणजे एक छोटासा भाग होता.

( १६४ ) ▫ रांजणी म्हणजे बहुधा रानजंगम. त्याच नावाच्या जिल्ह्याचे ते प्रमुख शहर असावे.

( १६५ ) ▫ वजिराच्या मालकीच्या त्याला देण्यात येत असलेल्या संपत्तीचा सुलतानाने अव्हेर करणे म्हणजे कृतघ्नपणा दाखविण्यासारखे झाले असते. पूर्वेतील देशामध्ये अशा तऱ्हेने देणगीचा अव्हेर करणे म्हणजे अपमानाचे निदर्शक समजत असत, आणि त्यामधून असा अर्थ काढीत की देऊ केलेली संपत्ती ही घेण्यायोग्य तरी नाही किंवा ती देणाऱ्याची अशा तऱ्हेने नजराणा देण्याची पात्रता तरी नाही. त्यामुळे सार्वजनिक जीवनातील व्यक्तींनी अशा तऱ्हेने बक्षिसांची देवाण-घेवाण करणे हे त्या राज्याच्या विशिष्ट धोरणाचे अंग बनून जाते. ज्या ठिकाणी युरोपीयन लोकांचा संबंध आला तेथे ही प्रथा जवळजवळ बंद होत चालली आहे, परंतु जोपर्यंत पौर्वात्य देशातील राजे आपले दरबार संभाळून आहेत आणि आपल्या देशातील चालीरिती आणि सवयी यांना चिकटून आहेत तोपर्यंत अशा प्रथांचे संपूर्ण निराकरण करणे कठीण आहे.

( १६६ ) □ ह्या उपान्त्याक्षरांत पौर्वात्य विद्वानाला द्विपकल्पाच्या दक्षिणेतील भागात वापरल्या जाणाऱ्या भाषेची छाया पडलेली दिसून येईल.

( १६७ ) □ हा किल्ला आता ब्रिटीश फौजांनी व्यापलेला असून त्या प्रदेशातील सपाटीवर असलेला अतिशय मजबूत असा किल्ला म्हणून त्याची गणना होते.

( १६७ अ ) ★ दक्षिणेमध्ये पहिल्याप्रथम सुरुंगाच्या दारूचा उपयोग या ठिकाणी केला गेला ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. २२९

( १६७ ब ) ★ या स्वारीमध्ये महमूद गावानबरोबर त्याचा मुलगा अलि मलिक-उत्-तुज्जार हा गेला होता. त्याने लढाईत मिळालेल्या यशाबद्दल काही ओळी रचल्या. त्या ओळी **बुरहाण** या ग्रंथात दिल्या आहेत.

( १६८ ) □ ज्यांनी दुष्काळाचा अनुभव घेतलेला नाही त्याला विषुववृत्तावरील प्रदेशांत बऱ्याच काळपर्यंत पडलेली अवर्षणे आणि नियमित पडणाऱ्या पर्जन्यवृष्टीतील खंड यामुळे जी भयंकर परिस्थिती उद्भवते त्याची कल्पना करता येणार नाही.

( १६९ ) □ बहमनी हे बिरुद धारण करणाऱ्या राजघराण्याचा उदय ज्या परिस्थितीत झाला ती परिस्थिती वाचकाने या ठिकाणी आठवावी.

( १६९ अ ) ★ पहिल्या सुलतान महमद याने मसनद-इ-अली ही पदवी दौलताबादच्या सुभेदाराला दिली होती. यावेळी मात्र ही पदवी कोणत्याही प्रांताच्या सुभेदाराला दिली जात असावी असे दिसते. **बुरहाण.**

( १७० ) □ या प्रदेशाला पूर्वकालात आलेली युरोपीयन मंडळी नरसिंगा असे म्हणत. कदाचित ह्या राजपुत्राच्या नावावरूनच त्या प्रदेशाला ते नाव पडले असावे.

( ·७१ ) □ या ठिकाणी फरिश्त्याने किल्ल्याच्या नावाचा उल्लेख केलेला नाही.

( १७२ ) □ या वाक्यावरून आपल्याला असे दिसून येते की, मलिक हसन निजाम उल्मुल्क ( एक दक्षिणी अधिकारी ) हाही बरोबर गेला असावा. परन्तु संदर्भात असे स्पष्टीकरण दिले आहे की सैन्यामध्ये परदेशी सैनिक आणि दौलताबाद व जुन्नर येथील फौजांच्या तुकड्या होत्या. त्यावरून मलिक हसन हा निश्चितपणे या फौजेबरोबर गेला नव्हता.

(१७३ ) ★ '**मुस्लीम पोलिटिकल थॉट अँन्ड अॅडमिनिस्ट्रेशन**' या आपल्या पुस्तकात हरूनखान शेरवानी यांनी महमूद गावान याने केलेल्या सुधारणाबद्दल पुढील माहिती दिलेली आहे :

महमूदने राज्याची विभागणी ८ माफक आकाराच्या विभागात केली. जुन्या वऱ्हाडचे गावील आणि माहूर, जुन्या दौलताबाद प्रांताचे दौलताबाद आणि जुन्नर, जुन्या गुलबर्ग्याचे विजापूर आणि गुलबर्गा आणि नवीन भर पडलेल्या तेलंगणाचे

राजमहेंद्री आणि वरंगळ याप्रमाणे राज्याचे आठ प्रांत पाडण्यात आले. महमूद गावानने पूर्वीच्या प्रांतांचे आकार निम्म्याहून कमी केले. इतकेच नव्हे तर प्रत्येक प्रांतातील काही प्रदेश त्याने नव्या सुभेदारांच्या अमलाखालून काढून तो सुलतानाच्या प्रत्यक्ष अमलाखाली आणला. या प्रदेशाचा उल्लेख **खासा-इ-सुलतानी** असा करण्यात येऊ लागला.·अशा तऱ्हेने प्रांतिक **सुभेदार** अथवा सरंजामी **तरफदार** याच्यावर त्यांच्याच प्रांतात नियंत्रण ठेवण्याचा आपला हेतू महमूद गावानने सिद्धीस नेला.

यापूर्वी प्रत्येक तरफदाराची त्याच्या हाताखालील प्रांताच्या लष्करी कारभारावर अनियंत्रित सत्ता असे. त्याच्या मनाप्रमाणे तो आपल्या हाताखाली सैनिकांची भरती करू शकत असे. इतकेच नव्हे तर त्याला मिळालेल्या मनसबीच्या प्रमाणात सैनिकांची संख्या न ठेवता जी बचत होई ती तो आपल्या ताब्यात ठेवू शकत असे. अशा परिस्थितीत राज्यावर परचक्र आल्यास धोकादायक परिस्थिती निर्माण होण्याची शक्यता होती. महमूद गावानने लष्करी कारभारात आमूलाग्र सुधारणा घडवून आणल्या. त्याने असा नियम घालून दिला की, सबंध प्रांतात तरफदाराच्या प्रत्यक्ष अमलाखाली एकच किल्ला असावा व इतर किल्ल्यांवरील किल्लेदारांची नेमणूक ही मध्यवर्ती सरकारतर्फे व्हावी आणि त्या सत्तेलाच-ते जबाबदार राहावेत. मनसबदार हे त्यांना नेमून दिलेल्या सैनिकांच्या संख्येपेक्षा कमी सैनिक बाळगतात आणि त्यामुळे प्रांताच्या कारभारात अंदाधुंदी आणि गैरशिस्त माजते म्हणून महमूद गावानने असा नियम केला की, प्रत्येक मनसबदाराने आपल्या हाताखाली ठेवलेल्या प्रत्येक ५०० माणसांगणिक त्याला १ लक्ष होन देण्यात यावे. जर का नक्त रकमेऐवजी मनसबदाराला जहागीर देण्यात आली तर जहागिरीपासून जितके उत्पन्न कमी येईल त्याची भरपाई मध्यवर्ती सरकारने करावी. जर का एखाद्या मनसबदाराने अथवा जहागिरदाराने नेमून दिलेल्या सैनिकांच्या संख्येएवढी फौज बाळगली नाही तर त्या प्रमाणात त्याने आपल्या उत्पन्नाचा भाग सरकारी खजिन्यात आदा करावा. हा नियम करून त्याने प्रत्येक मनसबदाराला सरंजामी फौजेवरील खर्चाबाबत मध्यवर्ती सरकारशी जबाबदार धरले. या बाबतीत त्याने स्वतः धडा घालून दिला. खर्चवेच वजा जाता उरलेली रकम तो खजिन्यात जमा करी. स्वतःसाठी या रकमेतून तो एक छदामही खर्च करीत नसे. मुलकी आणि लष्करी सुधारणांव्यतिरिक्त महमूद गावानने शेतसाऱ्याच्या पद्धतीत आमूलाग्र सुधारणा घडवून आणली. त्याने जमिनीची पद्धतशीर मोजणी केली, खेडी आणि शहरे यांच्या सीमा निश्चित केल्या आणि शेतसाऱ्याबाबत संपूर्ण चौकशी करून त्याने तो निश्चित केला. थोडक्यात एकीकडे त्याने राज्याचे उत्पन्न निश्चित ठरविण्याबाबतची योजना आखली तर दुसरीकडे अमीरउमरावांच्या सत्तेवर बंधन घालून त्याने मध्यवर्ती सरकारचा वचक वाढविण्याचा प्रयत्न केला. ( पाने २३७–२४१ )

( १७४ ) □ एक होन म्हणजे अंदाजे साडेतीन रुपये. या अंदाजाप्रमाणे पाचशे घोडेस्वार बाळगण्यासाठी दिलेल्या जहागिरीचे उत्पन्न साडेतीन लाख रुपये

येईल. त्यामधून वसुली अधिकारी आणि मुलकी पोलीस दल यांच्यावरील दहा टक्के खर्च उणा केल्यास तीन लक्ष पंधरा हजार रुपये नक्त शिल्लक राहतात. हल्लीच्या दिवसात वर वर्णन केलेले घोडेस्वारांचे दल हिंदुस्थानात ब्रिटीश सैन्यामध्ये उभारण्यास त्याकरिता खर्चावयास लागणाऱ्या रकमेपेक्षा वरील रक्कम ५० टक्क्यांपेक्षाही जास्त आहे.

अशा तऱ्हेचा तौलनिक अभ्यास उपयोगी आणि माहितीपूर्ण ठरेल. सकृत्-दर्शनी पाहिले असता इतिहासकारांनी केलेल्या या विधानावर विश्वास ठेवावयाचा म्हटल्यास आपल्याला असे दिसून येईल की आजच्यापेक्षा त्यावेळी हिंदी सैन्यातील शिपायांना भरपूर पगार दिला जाई. जर आपण धातूंच्या हल्लीच्या आणि त्या काळांतील संबंधित किंमती विचारात घेतल्या तर वरील फरकाला फार मोठे स्वरूप देण्यात आले आहे असे आपणांस दिसून येईल.

१४१७ मध्ये दक्षिणेतील बहमनी राजे आणि १८२८ मधील दक्षिणेतील ब्रिटीश सरकार यांच्या हाताखाली स्वतःचे घोडे आणि शस्त्रे आणि त्याचप्रमाणे दाणा गोटाही स्वतःच पुरविणाऱ्या पाचशे घोडेस्वारांच्या तुकडीच्या पगाराचा तुलनात्मक तक्ता पुढे दिला आहे :

| संज्ञा | १४१७ मधील बहमनी घोडदळाची एक तुकडी | | १८२८ मधील ब्रिटीश घोडदळाची एक तुकडी | | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| | प्रत्येक हुद्देदाराला दरमहा | हुद्देदारांचा कुल पगार | प्रत्येक हुद्देदाराला दरमहा | हुद्देदारांचा कुल पगार | |
| सेनापती | २५०० | २५०० | १००० | १००० | ब्रिटीश |
| रिसालदार | ८०० | ८०० | ५०० | ५०० | सेनेमध्ये |
| पाच जमादार | २०० | १००० | १०० | ५०० | सेनापती |
| वीस दफादार | ९० | १८०० | ६० | १२०० | हा |
| हिशेबनीस अथवा | | | | | युरोपियन |
| पगार वाटणारा | १५० | १५० | ५० | ५० | असे |
| ५०० शिपाई | ४० | २०००० | ३० | १५००० | |
| | | २६२५० | | १८२५० | |
| | | × १२ महिने | | × १२ महिने | |
| | | ३१५००० | | २१९००० | |

( १७५ ) □ या आणि इतर प्रसंगी दक्षिणी आणि हबशी लोकांनी परकीयां-विरुद्ध एकजूट केलेली आपल्याला दिसून येते.

( १७६ ) □ या ठिकाणी केलेल्या कोटीचे भाषांतर करता येणे शक्य नाही. म्हातारपणी पांढऱ्या शुभ्र दाढीला लाल रंग देऊन प्रथम रंगवितात आणि नंतर नीळ लावून तिला काळी करतात.

( १७६ अ ) * याबाबत **बुरहाण** ( १२९ ) या ग्रंथात असे सांगितले आहे की, ख्वाजा महमूद गावान हा त्या दिवशी राजवाड्यात गेल्यास त्याचे अतिशय घोर परिणाम होतील असे भविष्य ज्योतिष्यानी वर्तविले होते. **हफ्त इक्लीम** ( ६० ) या ग्रंथात असे दिले आहे की महमूद गावानच्या हाताखाली दहा हजार शिपाई होते. परंतु त्यांचा उपयोग करण्याचा विचारही त्याने मनात आणला नाही.

( १७७ ) □ या ठिकाणी पवित्र इतिहास ग्रंथात सांगितलेल्या सुप्रसिद्ध जोसेफच्या गोष्टीचा उल्लेख केलेला आहे.

( १७८ ) □ इंग्रजीमध्ये भाषांतर केलेल्या या पर्शियन शब्दातून वजिराच्या मृत्यूची म्हणजे **हिजरी** ८८६ ही तारीख निघते.

( १७८ अ ) * महमूद गावानच्या मृत्युबद्दल सफवी याने आपल्या **जउल-लामी** ( १०, १४४ ) या ग्रंथात **बुरहाण** आणि **फरिश्ता** यांच्यापेक्षा वेगळी हकीकत दिलेली आहे. ती अशी : महमूद गावान हा सुलतानाला लहानपणी उधळेपणा न करण्याबद्दल आणि नोकराचाकरांना पैसा आणि मरातब वाटण्याबाबत नेहमी छेडीत असे. सुलतान जेव्हा वयात आला तेव्हा त्याच्या वर्तनावर गावानने घातलेली बंधने त्याला आवडेनाशी झाली. आपल्या रक्षणकर्त्याला दूर करण्याचा मार्ग तो शोधू लागला. एकदा असे झाले की सुलतान हा सतरा दिवस नरसिंहाच्या प्रदेशात स्वारीवर होता. या संधीचा फायदा महमूद गावानच्या शत्रूंना त्याच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविण्यासाठी मिळाला. त्यांनी सुलतानाच्या खास मर्जीतील काही वजीर ख्वाजाकडे पाठविले आणि त्यांच्याबरोबर सुलतानाचा पुढीलप्रमाणे निरोप दिला. तो असा : " मी आपल्यापासून बराच काळपर्यंत दूर राहिलो आहे. याबद्दल मला अतिशय खेद होत आहे. नरसिंहाच्या सैन्याकडून रात्रीच्यावेळी हल्ला होण्याची शक्यता असल्यामुळे त्याच्याविरुद्ध सर्व तऱ्हेचा बंदोबस्त करणे जरूर आहे हे मी आपल्याला मुद्दाम कळवू इच्छितो ". या खोट्या धोक्याच्या सूचनेवर महमूदने विश्वास ठेवला आणि ही सूचना खुद्द सुलतानाकडूनच आली आहे असे वाटून त्याने आपल्या हाताखालील सैन्याला सुसज्ज होण्याचा हुकूम दिला. यावर गावानच्या शत्रूंनी झपाट्याने सुलतानाकडे कूच केले आणि सुलतानाला सांगितले की, " महमूद गावान हा मिळेल त्या पहिल्या संधीला आपल्या छावणीवर हल्ला करण्याची तयारी करीत आहे. आमच्याबद्दल आपल्या मनात संशय आला असल्यास या तयारीची प्रत्यक्ष पाहणी करण्यास आपण कोणाला तरी पाठवावे. त्यानुसार पाठविलेल्या गुप्त हेराने ख्वाजाने चालविलेल्या तयारीची खबर दिली. त्यावेळी सुलतान दारू पिऊन धुंद झाला होता.

त्याने खाजाला आपल्या समक्ष येण्याचा हुकूम दिला. ज्यावेळी खाजा सुलताना समक्ष आला त्यावेळी त्याला त्याच्याविरुद्ध जे कपट कारस्थान केले गेले होते त्याची यत्किंचितही कल्पना नव्हती. खाजावर सुलतानाच्या एका गुलामाने तलवारीचा प्रहार केला आणि त्याचे प्राण जाईतोपर्यंत तो खाजावर प्रहार करीत राहिला. ही घटना ६ **सफर** ८८६ **हिजरी** या वर्षी घडली. आसदखान हाही त्याच दिवशी मारला गेला. ही बातमी जेव्हा मक्का येथे पोहोचली तेव्हा मी तिथे होतो. ज्याने ज्याने ती बातमी ऐकली त्याला अतिशय दुःख झाले. या वृत्तांतावरून आपल्याला असे म्हणता येईल की सफवी याला मक्का येथे जशी बातमी पोहोचली तशी त्याने ती दिली. या बातमीत जरी थोडेफार तथ्य असले तरी महमूद गावानला आपल्या विरुद्ध चाललेल्या कटाबद्दल यत्किंचितही माहिती नव्हती असे म्हणणे बुद्धीला पटत नाही. **बुरहाण** मध्ये या घटनेची तारीख ५ एप्रिल १४८१ अशी दिली आहे. सफवी ही तारीख ६ एप्रिल १४८१ अशी देतो.

(१७९) □ १७ व्या शतकाच्या अखेरीला औरंगजेबाने बिदर जिंकून घेतले. त्याने दूरवर पसरलेल्या या भव्य इमारतींचा उपयोग दोन कारणांसाठी करून घेतला. एक दारूगोळा साठविण्याचे कोठार म्हणून आणि दोन घोडदळातील सैनिकांच्या बराकी म्हणून. एकदा चुकून तेथील दारूचा स्फोट झाला. त्या स्फोटात या भव्य इमारतींचा बहुतेक भाग नष्ट झाला. आजूबाजूलाही या स्फोटाने भयंकर नुकसान घडवून आणले. तरीपण आजतागायत तेथील बऱ्याचशा इमारती ज्या उभ्या आहेत त्यावरून त्यांच्या भव्यतेची आणि कलाकुसरीच्या सुंदरतेची थोडीफार कल्पना येते. पूर्वी असलेल्या चौकाची रूपरेखा आणि अजूनही संपूर्ण स्थितीत असलेली काही दालने आपल्या दृष्टीस पडतात. अजूनही पूर्वीचा एक मनोरा आहे तसा उभा आहे. त्याची उंची १८० फुटांपेक्षा अधिक असून त्याच्यावर ठिकठिकाणी संगमरवराचे चौकोनी दगड बसविण्यात आले असून त्यावर कुराणातील वाक्ये पांढऱ्या अक्षरात कोरलेली आहेत. हे दगड तीन फूट लांब असून ते हिरव्यागार रंगाच्या आणि सोन्याने वेष्टिलेल्या पृष्ठभागावर बसविलेले आहेत. ते बघितल्यावर एकेकाळी ही कलाकृती केवढी भव्य असावी याची कल्पना प्रेक्षकाला येते. बिदर येथे भरभराटीस आलेल्या बहमनी आणि बरीद घराण्यांच्या वैभव संपन्नतेच्या अनेक सुंदर अवशेषांपैकी एक म्हणून बिदरमधील महाविद्यालयाचा उल्लेख करावा लागेल. सर्व प्रवाशांना आणि विशेषतः जे या इतिहासाच्या अभ्यासात रस घेतात त्यांना बिदरला भेट देण्यासाठी हे अवशेषच जीवन्त होऊन आले आहेत की काय असे वाटते.

(१८०) □ लारी म्हणजे दोन शिलींग किंमत असलेले चांदीचे नाणे.

(१८१) □ त्या काळी कवडी हे एक नाणे होते. ३० कवड्यांची किंमत एक पेनीएवढी होती.

(१८२) □ फराश म्हणजे छावणीतील सामानसुमानाचा अधिकारी.

(१८२ अ) □ महमदशहाच्या मृत्यूची तारीख **बुरहाण** (१३४) २७ मार्च १४८२ अशी देतो. महमदशहाने वीस वर्षे, आठ महिने आणि दोन दिवस राज्य केले असेही या ग्रंथात सांगितले आहे. **हफ्त इक्लीम** (६२) या ग्रंथात हा अवधी एकोणीस वर्षे आणि साडेचार महिने असा दिला आहे.

(१८३) ★ सुलतानाला आपला मृत्यू जवळ आला आहे असे वाटू लागले. त्याने राजपूत्र महमूद याची वारस म्हणून नियुक्ती केली. राज्यातील अमिर-उमरावां-कडून त्याने राजनिष्ठेच्या शपथा घेवविल्या. आपले दुःख विसरण्यासाठी तो व्यसना-सक्त बनला. २७ मार्च १४८२ रोजी वयाच्या २९ व्या वर्षी सुलतान मरण पावला. (Sewell and Aiyangar यांनी सुलतानाच्या मृत्यूची तारीख २१ मार्च ही दिली आहे–A Forgotten Empire, 102).

(१८४) ★ सुलतान महमूदशहा याच्या राज्यारोहणानंतर बहमनींच्या प्रमुख सरदारांमधील झालेल्या संघर्षाची हकीकत पुढे दिलेली आहे :-- बिदरमधील परिस्थिती अनिश्चित आहे आणि मध्यवर्ती सत्ता केव्हा कोसळून पडेल याचा नेम नाही असे पाहून ठिकठिकाणच्या प्रांतिक सुभेदारांनी या गोष्टीचा फायदा घेण्याचे ठरविले. प्रथम उठाव कासीम बरीद याने केला. सुलतानाने त्याच्याविरुद्ध दिलावर-खानास पाठविले. त्याच्यासमोर टिकाव न लागल्याने कासीम बरीद हा बालकोंड्या-कडे पळून गेला. त्याचा पाठलाग करीत असताना दिलावरखानास ठार मारले गेले. तेव्हा कासीम बरीद पाठीमागे फिरला आणि सरळ राजधानीवर चालून आला. तेथे आल्यावर त्याने वजिराचे अधिकार आणि दौलताबाद व बालाघाट हे प्रांत आपल्याला जहागिरी म्हणून देण्यास महमूदशहाला भाग पाडले, (**बदायुनी** ३, १२६). कासीम बरीदने राज्यकारभार आपल्या हाती घेण्याचा प्रयत्न केला परंतु त्याच्या विरुद्ध राज्यातील इतर सरदारांनी उठाव केला, आणि देवनी येथे कासीम बरीदच्या फौजांचा पाडाव केला. लढाई चाललेली असताना सुलतान घोड्यावरून खाली पडला. असे म्हणतात की त्याला इतर सरदारांनी मोठ्या सन्मानाने राजधानीत नेऊन सिंहासनावर बसविले. ही लढाई सुलतानाच्या मृत्युपूर्वी एक वर्ष झाली असे सय्यद अलाने केलेले विधान चूक आहे. कारण त्यापूर्वी अनेक वर्षे अगोदर कासीम बरीदचा मृत्यू झाला होता.

(१८५) ★ **बुरहाण** (१०९) आणि **मुंतखाब** (३, १०२) या ग्रंथांत सुलतान जेव्हा गादीवर आला तेव्हा त्याचे वय १५ वर्षांचे होते असे सांगितले आहे.

(१८५ अ) ★ निजाम-उद्दीन अहमद याने आपल्या **तबकाते अकबरशाही** या ग्रंथात (४३०) सुलतान महमूदशहा याचे नाव शहाबुद्दीन महमूदशहा बहमनी असे दिले आहे.

( १८६ ) □ माझे असे मत आहे की, फरिश्ता हा स्वतः पर्शियन असल्यामुळे त्याने या ठिकाणी वापरलेला गुलाम हा शब्द अतिशय इमानी चाकर असे दर्शवितो. पर्शियामध्ये संरक्षक दलातील शिपायांना **गुलाम-इ-शाही** असे बिरुद असते, आणि या दलात देशातील अतिशय नावाजलेल्या अमिरउमरावांच्या मुलांची भरती केली जात असे.

(१८७) □ या ठिकाणी दिलेले वर्णन अतिशय बहारदार आहे आणि ते आशियातील दरबारात हजर असलेल्या व्यक्तींच्या मनःचक्षुसमोर त्याकाळी घडलेल्या प्रसंगाचे उत्कृष्ट चित्रण उभे करते.

( १८८ ) □ परस्परांच्या हातात हात घालून चालणे हे उत्कृष्ट मैत्रीचा आणि परस्परांबद्दलच्या आदराच्या भावनेचा दाखला देते. या ठिकाणी युसुफसमोर दोन उद्दिष्टे होती. त्याने वजिराचा उजवा हात आपल्या डाव्या हातात घेऊन त्याच्याबद्दल आपल्या मनातील अतिशय स्नेहाची भावना दाखविली. परंतु त्याचवेळी आपला उजवा हात मोकळा ठेवून त्याने वजिराला आपल्याजवळील बाजूच्या शस्त्राचा उपयोग करता येणार नाही एवढी खबरदारी घेतली.

( १८९ ) □ सुलतानाच्या अज्ञानपणात राजप्रतिनिधीच्या अधिकारासारखेच अधिकार असलेला एक हुद्दा.

( १९० ) □ याचा अर्थ असा की राज्यातील अर्धी सत्ता निजाम उल्मुल्क बह्री याच्या आश्रयाखाली असलेल्या हबशी आणि दक्षिणी यांच्या हातात होती आणि अर्धी सत्ता युसुफ आदिलखानाच्या आश्रयाखाली असलेल्या परदेशी मुसलमानांच्या हातात होती.

( १९१ ) □ आदिलखान दक्कनी हा वरंगळचा उप-सुभेदार होता. हा आदिलखान म्हणजे विजापूरचा सुभेदार, खाजा महमूद गावान याचा मित्र आणि परदेशी मुसलमानांचा पुढारी युसुफ आदिलखान-तुर्क हा नव्हे.

( १९२ ) □ शहरांतील पोलीस दलाचा प्रमुख.

( १९३ ) □ शरीररक्षक दलाचा सेनापती.

( १९४ ) □ याला फख्र-उल्मुल्क अशी ही पदवी होती.

( १९५ ) □ इंदापूर हे अशा ठिकाणी वसलेले होते की, परंडा आणि सोलापूरपासून खाजा जहान दक्कनीच्या सैन्याबरोबर मिलाफ होण्याला सहज अटकाव झाला असता. त्याचप्रमाणे जुन्नरहून मलीक अहमद चेऊल येथे पोहोचताच चेऊलच्या मदतीसाठी दक्षिण कोकणात पार घाटातून सैन्य उतरविणे शक्य झाले असते.

( १९६ ) □ खाजा महमूद गावान याने प्रत्यक्षात अमलात आणलेल्या नवीन नियमानुसार प्रांतामधील ज्या किल्ल्यांवर शिबंदीची भरती ही दरबारातून पाठविण्यात

आलेल्या सैनिकांमधून होत असे त्या किल्ल्यांवर प्रांताचे तरफदार अथवा सुभेदार यांचा ताबा चालत नसे, ही गोष्ट या ठिकाणी नमूद करणे जरूरीचे आहे.

( १९७ ) * बहमनींचा वजीर महमूद गावान खाजा जहान हा इराणच्या गिलान प्रांताचा रहिवासी होता. त्याने आपल्या देशबांधवांना आपल्या हाताखाली अधिकारांच्या जागा दिल्या. बहादूर गिलानी हा महमूद गावानचा देशबांधव. किश्वरखानाचा उल्लेख यापुढील हकीकतीत अगर इतरत्र कोठेही येत नाही परन्तु त्याच्या किश्वरखान खाजा जहानी या नावावरून तो महमूद गावानच्या आश्रितांपैकी असावा असे दिसते. कोकण प्रांत आणि खलफ हसन मलीक उत्-तुज्जार याच्या ताब्यात असलेल्या प्रदेशावर तो सुभेदारीच्या अधिकारावर असावा असे मानण्यास जागा आहे. त्याच्यानंतर सुभेदारीच्या जागेवर बहादूर गिलानी याची नेमणूक झाली. महमूद गावानचा खून झाल्याचे त्याच्या कानावर पडले तेव्हा त्याने बंड केले. ( Bailey, History of Gujarat, 217–219 ) गुजराथबरोबर त्याचे वैमनस्य आले नसते तर कदाचित् त्याला स्वतंत्र घराण्याची स्थापना करता आली असती. तरी सुद्धा त्याने सर्व कोकण प्रांत आणि दक्षिणेतील काही जिल्हे व किल्ले यावर १३ वर्षे आबादीत सत्ता गाजविली.

( १९८ ) ▫ सुलतान कुली ऊर्फ कुतुब उल्मुल्क यानेच गोवळकोंड्याच्या कुतुबशाही घराण्याची स्थापना केली.

( १९९ ) ▫ हे शहर कोणते याचा नक्की ठावठिकाणा लावता येत नाही.

(१९९ अ) ★ **तबकाते** (४३४) या ग्रंथात बहादूर गिलानीकडून पाठविण्यात आलेल्या वकिलाचे नाव देण्यात आले आहे. त्याचप्रमाणे राजपुत्राचा जन्म मिरज किल्ल्याच्या तटबंदीबाहेर झाला असेही सांगण्यात आले आहे.

( २०० ) ▫ पगारासाठी दरबारावर अवलंबून असलेल्या फौजेवर अधिकार चालविणारे लष्करी अधिकारी.

( २०१ ) ▫ हे गाव अक्कलकोटजवळ आहे.

( २०२ ) ▫ या मोहिमेत घडलेल्या प्रसंगांची सविस्तर हकीकत विजापूरच्या सुलतानांच्या इतिहासात दिलेली आहे.

( २०३ ) ▫ या घडामोडी चालू असताना शहा इस्माईल सफवी याजकडून एक वकील आला. शहा इस्माईल सफवी याच्याकडून आलेल्या वकिलाचे नाव मिर्जा इब्राहीमखान असे होते. **तबकाते अकबरी** या ग्रंथात हे नाव यादगार बेगकीजलबाश असे दिले आहे. इब्राहीमखानाने पूर्वी गुजराथचा सुलतान दुसरा मुजफ्फर याला भेट दिली होती. त्याने इब्राहीमखानाचा अतिशय मानमरातब ठेवला. परन्तु तेथे माळव्याचा शहाजादा सुलतान महमद याने त्याचा अतिशय अपमान केला. ( Bailey, Gujarat 244–247 ) बहमनी सुलतानाकडून तो नंतर सुलतान

इस्माईल आदिलशहा याच्या दरबारात गेला. त्याने इब्राहीमखानाचा मान-सन्मान केला.

( २०४ ) * सुलतानाच्या विजयनगरवरील मोहिमेची हकीकत पुढीलप्रमाणे आहे : बहमनींच्या राज्यातील अंदाधुंदी बघितल्यानंतर विजयनगरचा राजा सालुव नरसिंह याने या परिस्थितीचा फायदा घेण्याचे ठरविले. सालुव नरसिंहाने इ. स. १४८५ मध्ये विजयनगरचा राजा विरुपाक्ष तिसरा याला गादीवरून काढून गादी स्वतः बळकाविली होती. नरसिंहाने आपला सेनापती ईश्वरनायक आणि त्याचा मुलगा नरसा नायक यांना बहमनींवर चालून जाण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे त्या दोघांनी कंदुकुर येथे बहमनींच्या छावणीवर हल्ला करून त्यांचा संपूर्ण पराभव केला. तेथून त्यांनी ओरिसाच्या मुलखावर चढाई केली. बहमनींकडून त्यांना कोणताही प्रतिकार झाला नाही. ( Aiyangar, **Sources of Vijaynagar History**, 9, 88 and 106. ) विजयनगरचा हा विजय अल्प मुदतीचा ठरला. कारण ओरिसाचा राया पुरुषोत्तम याने तिसऱ्या महमदशहाच्या मृत्यूनंतर ६ वर्षांच्या आत गोदावरी-कृष्णा दुआबात आपला कब्जा केला, आणि बहमनींची कोंदाबिंदूपर्यंत हकालपट्टी केली. ओरिसा आणि विजय-नगर या राज्यांमध्ये त्यानंतर संघर्षाचे अनेक प्रसंग आले. ( Banerji 315, 316 )

इ. स. १४९८ मध्ये कुतुब उल्मुल्क याची तेलंगणचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. त्याने बहमनींचे वर्चस्व पुन्हा प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. इ. स. १५०४ मध्ये शीतबखान नावाच्या स्थानिक अधिकाऱ्याने वरंगळ जिंकून घेतले आणि ओरिसाचा राजा रामचंद्र याजबरोबर मैत्री केली. तेव्हा कुतुब उल्मुल्क याने वरंगळवर चाल करून ओरिसाचा राजा आणि शीतबखान याच्या संयुक्त फौजांचा पराभव केला. ओरिसाच्या राजाने या वेळी गोदावरी नदी ही बहमनी आणि ओरिसा या राज्यांमधील सरहद्द मानण्याचे कबूल केले इ. स. १५०३ मध्ये सुलतानाने विजयनगरच्या ताब्यातील रायचूर आणि मुद्गल जिंकून घेण्यासाठी ५ हजार स्वार आणि ७० हजार पायदळ घेऊन त्या दिशेने चाल केली. सुलतानाला अकरी येथे कुतुब उल्मुल्क आणि अंकोर येथे युसूफ आदिल हे दोघेजण येऊन मिळाले. ऐनउल्मुल्क हा कऱ्हाड आणि कोल्हापूरच्या बाजूने विजयनगरकडे निघाला. याचा परिणाम होऊन विजयनगरचा राजा शरण आला आणि थकलेली खंडणी त्याने दिली. रायचूर आणि मुद्गल यांचा ताबा युसुफ आदिलकडे सोपविण्यात आला. इ. स. १५०९ कृष्णदेवराय हा विजय-नगरच्या गादीवर आला. त्याने आक्रमक धोरण स्वीकारून युसुफ आदिलचा मुलगा इस्माईल याच्या ताब्यातून रायचूर आणि मुद्गल ही दोन शहरे जिंकून घेतली. इ. स. १५१४ मध्ये त्याने ओरिसाच्या राजाकडून उदयगिरी आणि २३ जून १५१५ रोजी कोन्दाबिंदू ही शहरे जिंकून घेतली. त्यानंतर त्याने वेणुकोन्डा, अमरावती, राजमहेन्द्री, कोंडापल्ली आणि नालगोंडा यावर कब्जा केला. याप्रमाणे त्याने दक्षिण हिंदुस्तानच्या पूर्व किनाऱ्यावरील बहमनी आणि ओरिसा याचा अंमल उठवून लावला. इ. स.

१५१६ मध्ये ओरिसाच्या राजाने कृष्णदेवरायाबरोबर तह केला. या कृष्ण देवरायाने खुद्द बिदरवर हल्ला करून ते शहर उद्ध्वस्त केले अशी एक आख्यायिका आहे. ( Dr. Shrinivasachar, **History of Warangal in Hyderabad Arch. Report,** 1934-1935, 33 )

(२०५) * बहमनी सुलतान आणि त्यामधून निर्माण झालेल्या ५ शाखा यांचे आणि विजयनगरचे सतत संघर्ष होत राहिले. विजयनगरच्या राज्याची राजकीय, आर्थिक आणि सामाजिक परिस्थिती याबद्दलची माहिती करून घेणे हे दक्षिणेचा मध्ययुगीन कालातील इतिहास समजावून घेण्याच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. विजयनगर राज्याची स्थापना ही संगमाच्या ५ मुलानी केली असे इतिहासकार सिवेल यांचे म्हणणे आहे. तर हेरास यांच्या मते विजयनगरची राजधानी अनागोंदी हिची स्थापना होयसळ राजा वीर बल्लाळ तिसरा याने केली. विजयनगरचे पहिले घराणे संगमाच्या नावाने ओळखले जाते. हरीहर पहिला आणि बुक्क पहिला यांनी आपल्या-कडे संपूर्ण सार्वभौमत्वाचे पद घेतले नाही. परंतु त्यांच्यामागून गादीवर आलेल्या दुसऱ्या हरीहराने मात्र आपल्याला महाराजाधिराज अशी पदवी घेतली. या हरीहराचा मुलगा बुक्क दुसरा याने बहमनी राज्याच्या उत्तर सीमेवर हल्ला केला. याच्या कार-किर्दीत विजयनगरच्या राज्याची खूपच वृद्धी झाली. त्याच्यामागून इ. स. १४०६ मध्ये देवराय पहिला हा गादीवर आला. बहमनींबरोबर झालेल्या लढायांत त्याला बऱ्याच वेळा पराजय पत्करावा लागला. हा १४२२ मध्ये मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा नातू देवराय दुसरा म्हणून गादीवर आला. बहमनींबरोबर झालेल्या युद्धात जरी त्याला म्हणण्यासारखे यश आले नाही तरी त्याने राज्यकारभारात सुधारणा केली. आपल्या चाकरीत त्याने मुसलमानांचा समावेश करून राज्याच्या व्यापाराची व्यवस्था लक्ष्मण नावाच्या अधिकाऱ्याकडे सोपविली. देवराय १४४६ मध्ये मरण पावला. त्यानंतर मल्लिकार्जुन हा गादीवर आला. त्याने बहमनी सुलतान आणि ओरिसाचा राजा यांचे झालेले हल्ले परतवून लावले. याचा मृत्यू १४६५ मध्ये झाला. त्याच्यानंतर गादीवर आलेला विरुपाक्ष दुसरा हा अकार्यक्षम ठरला. बहमनी आणि ओरिसा या राज्यांनी विजयनगरचा बराच प्रदेश जिंकून घेतला. विरुपाक्षाला चंद्रगिरीचा मुख्य नरसिंह साळुव याने इ. स. १४८६ मध्ये पदच्युत केले. त्याने विजयनगरचा बराचसा प्रदेश परत जिंकून घेतला. याचे बहुतेक श्रेय साळुवाचा सेनापती नरसा नायक याच्याकडे जाते. इ. स. १५०५ साली नरसा नायकाचा मुलगा वीर नरसिंह याने साळुव राजाला पदच्युत करून आपण गादी बळकाविली. याच्यानंतर त्याचा मुलगा कृष्णदेवराय हा गादीवर आला. विजयनगरच्या गादीवर आलेल्या राजांत कृष्णदेवरायाचे स्थान फार मोठे आहे. याच्या कारकिर्दीत विजय-नगर राज्याची वाढ झाली इतकेच नव्हे तर सर्वांगीण प्रगतीही झाली. त्याची शेवटची मोहीम इ. स. १५२० मध्ये इस्माईल आदिलशहाविरुद्ध झाली. रायचूर येथे

त्याने मोठा विजय मिळविला. कृष्णदेवराय १५३० मध्ये मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा सावत्रभाऊ अच्युतराय हा गादीवर आला. याच्या कारकिर्दीत राज्यातील अधिकार त्याच्या दोन मेव्हण्यांनी बळकाविले. त्यांच्या विरुद्ध राज्यातील सुभेदारांनी राम, तिरूमल आणि वेंकट या आरविडू घराण्यातील तिघा भावांच्या नेतृत्वाखाली बंड केले. राज्यामध्ये अंदाधुंदी निर्माण झाली. अच्युतरायानंतर वेंकटाद्री गादीवर आला. त्याची कारकीर्द जेमतेम सहा महिने टिकली आणि अच्युतरायाचा पुतण्या सदाशिवराय हा गादीवर आला. प्रत्यक्षात कारभार मात्र वर उल्लेखिलेल्या रामरायाकडेच होता. रामरायाचे धोरण दक्षिणेतील शाह्यांच्या भांडणात हस्तक्षेप करण्याचे होते. त्याचा इतिहास आणि तालिकोटच्या लढाईत या धोरणाची झालेली परिणती याची हकीकत वर आलेली आहेच. तालिकोटच्या पराभवानंतर विजयनगरचे दक्षिणेच्या राजकारणातील महत्त्वाचे स्थान नाहीसे झाले.

## विजयनगरचे वैभव :

१५ व्या आणि १६ व्या शतकात अनेक परदेशी प्रवासी हिंदुस्थानात आले. त्यांनी विजयनगरचे अतिशय उत्तम वर्णन लिहून ठेवले आहे. इ. स. १४२० मध्ये निकोलाय कोन्टी या इटालियन प्रवाशाने विजयनगरला भेट दिली. तो म्हणतो विजयनगर शहराचा घेर ६० मैल आहे. शहरात ९० हजार शस्त्रधारी सैनिक आहेत. हिन्दुस्थानातल्या इतर कोणत्याही राजांपेक्षा विजयनगरचा राजा सामर्थ्यवान आहे. इ. स. १४४२–४३ मध्ये अब्दुर रज्जाक हा विजयनगर येथे आला. तो म्हणतो विजयनगरचे राज्य लोकांनी गजबजलेले आहे. राजाच्या खजिन्यात दालनापाठीमागे दालने असून ती सोन्याने गच्च भरलेली आहेत. राज्यातील सर्व नागरिक, गरीब आणि श्रीमंत, हे अंगाखांद्यावर सोन्याचे आणि हिऱ्याचे अलंकार घालतात. पाइस हा पोर्तुगीज प्रवासी म्हणतो विजयनगरच्या राजाची संपत्ती अफाट असून त्याच्याजवळ असंख्यात शिपाई आणि हत्ती आहेत. विजयनगर शहरात सर्व देशातील लोक असून शहरामध्ये सर्व वस्तूंची सुबत्ता आहे.

वरील वर्णनावरून विजयनगरच्या भरभराटीची कल्पना येते. शेती हा राज्यातील लोकांचा प्रमुख धंदा होता. त्याशिवाय इतर अनेक उद्योगधंदे होते. कारागीर आणि व्यापारी यांच्या संघटना असून राज्याच्या आर्थिक जीवनात त्यांचा मोठा भाग होता. व्यापाराला विजयनगर राज्यात अतिशय मोठे स्थान होते. अब्दुर रज्जाक म्हणतो विजयनगरच्या राज्यात एकंदर ३०० बंदरे होती. ब्रह्मदेश, चीन, अरबस्थान, पर्शिया, पोर्तुगाल वगैरे देशांशी या बंदरातून व्यापार चाले. कापड, तांदूळ, लोखंड, साखर आणि मसाल्याचे पदार्थ यांची निर्यात होई. तर हत्ती, घोडे, मोती, तांबे, पारा, वेलवेट वगैरे वस्तूंची आयात होई. विजयनगर राज्याची नाणी सोने, तांबे आणि रुपे या धातूंपासून पाडीत. नाण्यांवर देवता आणि प्राणी यांची चित्रे कोरलेली असत. किंमतीचे प्रमाण अतिशय कमी असे.

विजयनगर राज्यात स्त्रियांचे स्थान अतिशय मानाचे होते. देशाच्या राजकीय आणि सामाजिक जीवनात त्या भाग घेत असत. स्त्रियांना सर्व प्रकारच्या कलांचे शिक्षण दिले जाई. बहुपत्नीकत्त्वाची प्रथा राज्यात रूढ होती. पती मृत झाल्यानंतर स्त्रिया सती जात. देशाच्या सामाजिक आणि धार्मिक जीवनात ब्राह्मणांचे स्थान महत्त्वाचे होते.

सांस्कृतिक आणि कलात्मक जीवनातही विजयनगरचे स्थान अग्रगण्य होते. विजयनगरचे राजे संस्कृत, तेलगु, तामीळ आणि कन्नड या भाषांचे आश्रयदाते होते. त्यांच्या आश्रयाखाली अतिशय उच्च प्रतीचे असे साहित्य निर्माण झाले. विजयनगरचा राजा कृष्णदेवराय हा स्वतः उत्तम साहित्यिक होता. त्याने तेलगु भाषेत **अमुक्त मूल्यदा** नावाचा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. त्याचा राजकवि पेदण्णा याचे तेलगु लेखकांमध्ये अतिशय मोठे स्थान आहे. स्थापत्यशास्त्रामध्ये विजयनगरची प्रगती वाखाणण्यासारखी होती. विजयनगर शहराचे अवशेष पाहिल्यानंतर विजयनगरने स्वतःची अशी विशिष्ट स्थापत्य परंपरा निर्माण केली असे म्हटले तर त्यात काहीच वावगे होणार नाही. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे सुप्रसिद्ध हजार आणि विठ्ठलस्वामी या देवळांचे देता येईल. चित्रकला आणि गायनकला यांनीही विजयनगर राज्यात मानाचे स्थान मिळविले.

विजयनगर राज्यात राज्यकारभाराचे स्वरूप मध्यवर्ती आणि केन्द्रशासीत असे होते. विजयनगरच्या राजाजवळ नेहमी खडे सैन्य तयार असे. काही लेखकांनी विजयनगर राज्यातील कारभाराचा उल्लेख लष्करी राजवट असा केलेला आहे तो मात्र चुकीचा आहे. राजाची सत्ता मुलकी आणि कायदेविषयक बाबीत अनियंत्रित असे. परंतु या सत्तेचा राजाकडून कधीही दुरुपयोग केला जात नसे. कृष्णदेवरायाच्या **अमुक्त मूल्यदा** या ग्रंथात राजाच्या कर्तव्याचे उत्तम तऱ्हेने वर्णन केलेले आहे. राजानी धर्माकडे लक्ष ठेवून राज्य करावे असे तो म्हणतो. राजाला मदत करण्यासाठी एक मंत्रिमंडळ असे. त्या शिवाय वेगवेगळ्या खात्यांवर वेगवेगळ्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या जात. राज्याची विभागणी प्रांतांमध्ये झालेली असून प्रांतावर प्रांताधिकाऱ्याची नेमणूक होई. विजयनगर राज्याचे असे ६ प्रांत होते. प्रांताधिकारी हे मुल्की, लष्करी आणि कायदेविषयक बाबीत मुखत्यार असत. विजयनगर राज्यात स्थानिक संस्थांचा राज्यकारभार खेडे हे घटक धरून केला जात असे. राज्याचा खेड्याच्या राज्यकारभारावरील संपर्क **महानायकाचार्य** या अधिकाऱ्यामार्फत ठेवला जाई. जमिनीपासून येणारा शेतसारा ही राज्याची उत्पन्नाची मुख्य बाब असे. जमिनीच्या साऱ्याची आकारणी जमिनीच्या कसाप्रमाणे ठरविली जाई. शेतसाऱ्याशिवाय जनतेवर इतर अनेक कर लादले जात. राजाशिवाय न्यायदानासाठी इतर अनेक अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या जात. अपराधाबद्दल गुन्हेगारांना अतिशय कडक शासन केले जाई. विजयनगरच्या सैन्याची शिस्त अतिशय उत्कृष्ट असे.

मुख्य सेनानीला **दंडनायक** असे म्हणत. सैन्यामध्ये पायदळ, घोडदळ, हत्ती, उंट आणि तोफखाना असे विभाग असत. जरूर लागेल तेव्हा मध्यवर्ती सेनादलाला मांडलिक आणि प्रांतिक सुभेदार यांच्या सैन्याची मदत होई. वरील वर्णनावरून विजयनगर राज्यामधील एकंदर परिस्थितीची आपल्याला कल्पना येते.

( २०६ )★ बहमनीकालीन राज्यव्यवस्था पुढीलप्रमाणे होती : बहमनींच्या अमलाखाली महाराष्ट्र हा राजकीय आणि भौगोलिक दृष्ट्या एक स्वतंत्र घटक बनला. बहमनींच्या नव्या राज्यव्यवस्थेचे दूरगामी परिणाम महाराष्ट्राच्या राजकीय आणि सामाजिक जीवनावर झाले. राज्ययंत्रणेच्या बाबतीत बहमनींनी दिल्लीच्या सुलतानांचाच वारसा पुढे चालू ठेवला. राज्यकारभार चालविणे सोयीचे जावे म्हणून त्यांनी राज्य-हितदक्ष अशा अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या. राज्याचा प्रमुख हा सुलतान असून त्याच्या मदतीसाठी दिल्लीच्या सुलतानासारखेच मंत्रिमंडळ असे. बहमनी राज्याची पुनर्रचना करण्याची जरुरी दुसरा बहमनी सुलतान महमदशहा ( पहिला ) याला भासली. त्याने आपला वजीर मलीक सैफुद्दिन घोरी याच्या सल्ल्यावरून राज्याची विभागणी दौलताबाद, वऱ्हाड, बिदर आणि गुलबर्गा या चार प्रांतात केली. यापैकी दौलताबाद, वऱ्हाड आणि गुलबर्गा या प्रांतात महाराष्ट्राचा बहुतेक भाग सामावलेला होता. या प्रांतांच्या सुभेदारांना अनुक्रमे **मसनद-इ-अली, मजलीस-इ-अली, आजम-इ-हुमायून** आणि **मलीक नायब** अशा पदव्या होत्या.

ही प्रांतिक राज्यव्यवस्था जवळजवळ शंभर वर्षे टिकली. राज्याची पुनर्रचना करण्याचा प्रश्न महमूद गावानने शमसुद्दीन महमद ( तिसरा ) यांच्या कारकिर्दीत हाती घेतला. शंभर वर्षांत बहमनींच्या प्रदेशात जी वाढ झाली होती त्यामुळे प्रांताचा आकार उत्तम राज्यव्यवस्थेच्या दृष्टीने अवास्तव होता. राज्याची पुनर्घटना करण्याची जरुरी महमूद गावानला आणखी एका कारणास्तव वाटली. प्रांतिक सुभेदारांच्या ताब्यात फार मोठा मुलूख आल्यामुळे त्यांची सत्ता आणि सामुग्री यात अमाप वाढ झाली होती. त्यामुळे प्रांतिक अधिकाऱ्यांची मजल केन्द्रीय सत्तेबरोबर फटकून वागण्यापर्यंत गेला. यामधील धोका महमूद गावानने ओळखला आणि प्रांतिक सुभेदारांची सत्ता कमी करण्यासाठी राज्यकारभारामध्ये आमूलाग्र सुधारणा करण्याचे त्याने ठरविले. राज्याच्या पूर्वीच्या चार प्रांतांऐवजी त्याने आता राज्याची आठ प्रांतांत विभागणी केली. सुभेदारांवर वचक राहण्यासाठी प्रत्येक प्रांतातला काही भाग त्याने **खास-इ-सुलतानी** म्हणून सुलतानाच्या खाजगीकडे तोडून दिला. याबरोबरच त्याने राज्याच्या लष्करी संघटनेत आमूलाग्र बदल घडवून आणले. पूर्वी प्रांतातल्या प्रत्येक किल्ल्यावर सुभेदार हा किल्लेदाराची नेमणूक करीत असे. महमूद गावानने प्रांतातील एक किल्ला सोडून बाकी सर्व किल्ल्यांवर किल्लेदारांच्या नेमणुका केन्द्रीय सरकारकडून केल्या जाव्या असे ठरविले. प्रांतिक सुभेदार त्यांना ठरवून दिल्याप्रमाणे सैनिकांची संख्या पुरी करीत नसत. नवीन सुधारणाखाली सैनिकांच्या

संख्येनुसार सुभेदाराला रोख रक्कम देण्यात यावी असे ठरले. या सुधारणांचा प्रभाव फारसा पडला नाही कारण महमूद गावानच्या विरुद्ध कारस्थाने होऊन त्यात त्याचा खून झाला. बहमनी राज्याची अखेर काय झाली याचा इतिहास सर्वश्रुत आहेच.

बहमनी सुलतानानी जहागिरी देण्याच्या पद्धतीचा अवलंब केलेला होता. परंतु जहागिरीदाखल सर्रास जमीन देण्याचे धोरण मात्र त्यांनी स्वीकारले नाही. जहागिरीची मुदत सुलतानाच्या मर्जीवरती अवलंबून असे. जहागीर एकाकडून काढून दुसऱ्याकडे सुलतान सोपवू शकत असे. या जहागिरी वंशपरंपरागत स्वरूपाच्या नव्हत्या. त्यांचे स्वरूप निव्वळ लष्करी होते. जहागिरदाराची भूमिका दुहेरी होती. एकाच वेळी तो सुलतानाच्या दरबाराचा सदस्य असे आणि त्याचप्रमाणे स्थानिक कारभाराचा तो प्रमुखही असे. दरबाराचा सदस्य म्हणून तो मंत्रिमंडळाला जबाबदार राही. परंतु स्थानिक कारभाराबाबत मात्र त्याच्या हाती भरपूर सत्ता असे. बहमनींनी जहागिरीच्या ऐवजी प्रत्यक्षात मात्र **मोकासा** देण्याच्या पद्धतीलाच जास्त प्राधान्य दिले. मोकासादाराची जबाबदारी सरकारच्या वतीने महसुलाची जबाबदारी बघण्याची असे. जहागिरदाराप्रमाणेच मोकासदाराची भूमिकाही दुहेरी असे.

बहमनींची लष्करी संघटना ही दिल्ली सुलतानांच्या लष्करी संघटनेसारखीच होती. या संघटनेत बदल करण्याची जरुरी बहमनींना वाटली नाही. बहमनींनी आपल्या सैन्याचा विकास परिस्थितीनुरूप होऊ दिला आणि युद्धाचे बदलते तंत्र आपल्या लष्करी दलात सामावून घेतले. युद्धकलेत आता एका नवीन प्रभावी शस्त्राचा अंतर्भाव झाला होता. हे शस्त्र म्हणजे तोफखाना. तोफांचा उपयोग अदोनीच्या वेढ्यात इ. स. १३६६ मध्ये झाल्याचे उल्लेख आहेत. या नवीन शस्त्रामुळे सारे युद्धतंत्रच बदलून गेले. डोंगरी किल्ले बांधण्यात येऊ लागले आणि शहराभोवती मजबूत भिंती बांधण्यात आल्या. बहमनींना सैनिकांचा तुटवडा कधीच पडला नाही. बहमनींनी त्यांच्या अस्तित्वाच्या कालात ज्या युद्धात भाग घेतला त्यावरून त्यांच्या सैन्याची संख्या १ लाखाच्या आसपास असावी. या संबंधात १५ व्या शतकाच्या मध्यात हिंदुस्तानात आलेला इटालीयन प्रवासी निकोलाय कोन्टी याने मोठे उद्बोधक विवेचन केले आहे. बहमनींचे राज्य दक्षिणेच्या पश्चिम किनाऱ्यावर पसरले असल्याचे तो सांगतो. त्यांचे नौदल सामर्थ्यशाली असून बहमनींच्या राज्यातील गोद्यांमध्ये बांधली जाणारी गलबते ही इटलीमध्ये बांधल्या जाणाऱ्या गलबतांपेक्षा मोठी होती असे तो म्हणतो. युद्धशास्त्राचे वर्णन करताना तो म्हणतो की, सैनिक तलवारी, भाले, धनुष्यबाण आणि ढाली या शस्त्रांचा उपयोग करीत. त्याचप्रमाणे दारुगोळ्यांचा भडिमार करणारी यंत्रे आणि तोफा यांचाही उपयोग केला जाई.

बहमनी कालीन राजकीय परिस्थिती काय होती याबद्दलची चर्चा याठिकाणी अप्रस्तुत होणार नाही. बहमनी राज्याची स्थापना आणि माळवा, खानदेश आणि गुजराथ ही निर्माण झालेली नवी राज्ये यामुळे दक्षिणेचा उत्तरभारताबरोबरील संबंध

पूर्णपणे तुटला. ही परिस्थिती १६ व्या शतकाच्या अखेरीला मोगल दक्षिणेकडे येईतोपर्यंत कायम राहिली. या दरम्यानच्या काळात दक्षिणेमध्ये ज्याला दक्षिणेचे म्हणता येईल असे राजकीय आणि सांस्कृतिक वातावरण निर्माण झाले. बहमनींची सत्ता स्थिर झाल्यावर इराण, इराक आणि अरबस्तान या देशातून अनेक परदेशी मुसलमान दक्षिण भारतात आले. त्यामध्ये साधुसंत, विद्वान, कवी आणि व्यापारी यांचा समावेश होता. या परकीयांना **गरीब-उद्द-दियार** आणि **अफकी** या नावाने ओळखित तर उत्तरेकडून दक्षिणेत स्थायिक झालेल्यांना दक्षिणी असे संबोधित. बहमनींच्या कारकिर्दीत ज्या राजकीय संस्थांचा उगम आणि सांस्कृतिक विकास झाला त्यावर या दोन्ही पक्षातील वैमनस्याची छाप पडलेली आपल्याला दिसून येईल. परदेशी मुसलमानांनी आपल्या विद्वतेने विशेषतः महमूदशहा बहमनी दुसरा याची कारकीर्द गाजविली. महमूदशहा हा स्वतः विद्वान असून त्याला पर्शियन आणि अरबी या भाषा येत होत्या. त्याने मिर फजलुल्लाईजू आणि ख्वाजा शमसुद्दीन हाफीज या विद्वान परदेशी मुसलमानांना हिंदुस्तानात बोलाविले. गुलबर्गा, बिदर, कंधार, एलिचपूर, दौलताबाद, जुन्नर, चेउल, दाभोळ वगैरे लहानमोठ्या शहरात त्याने शिक्षणाची केन्द्रे उघडली. या ठिकाणी हे नमूद करण्यासारखे आहे की बहमनींच्या पहिल्या पन्नास वर्षांच्या कारकिर्दीत परदेशी आणि दक्षिणी यांच्यामधील स्पर्धेचे स्वरूप हे राज्याच्या सुस्थितीला पोषक असे होते. त्याचे श्रेय बहमनींचे जवळजवळ ५० वर्षे ज्याने राज्य चालविले त्या मलीक सैफुद्दिन घोरी या वजिराला द्यावे लागेल. वजिराचा इ. स. १३९७ मध्ये मृत्यू झाल्यावर ही स्पर्धा विकोपाला गेली, आणि गादीवर आलेला सुलतान फिरोजशहा याने परदेशी मुसलमानांच्या अमर्याद अधिकारावर बंधन घालण्याचे ठरविले. त्यासाठी त्याने हिंदूंना राज्यकारभारात अधिकाधिक स्थान देण्याचा आ'ण शिया धर्माला उत्तेजन देण्याचा उपक्रम सुरू केला. फिरोजशहाच्या मृत्यूनंतर गादीवर आलेल्या अहमदशहाने त्याच्या विरुद्ध धोरण स्वीकारले. त्याने मुख्य वजिराच्या जागी खलफ हसन बसरी या परदेशी मुसलमानाची नेमणूक केली. या नेमणुकीमुळे दक्षिणी आणि परदेशी यांच्यामध्ये वैमनस्य निर्माण झाले. खलफ हसन बसरी याला जे श्रेष्ठत्व प्राप्त झाले त्यामुळे दक्षिणी मुसलमानांना त्याचा द्वेष आणि मत्सर वाटू लागला. यातूनच दक्षिणी आणि परदेशी मुसलमानांच्या लढाऊ स्पर्धेला सुरुवात झाली आणि तिचा शेवट बहमनी राज्याचा विनाश होण्यात झाला. याच सुमारास शहा निमतुल्ला किरमानी याचा नातू शहा नुरुल्ला हा दक्षिणेत आला. त्याचा एका राजकन्येबरोबर विवाह झाला. यामुळे दक्षिणी·आणि परदेशी मुसलमान यांच्यामधील संघर्षाला धार चढली. ही तेढ दरबारातील राजकारणापुरती मर्यादित न राहता युद्ध क्षेत्रापर्यंत पोहोचली. परिणामी बहमनींना अनेक लढायांत पराभव पत्करावा लागला. याची परिणती अल्लाउद्दीन अहमद दुसरा याच्या कारकिर्दीत हजारो परदेशी मुसलमानांची चाकण येथे कत्तल होण्यात झाला.

काही कालानंतर महमूद गावानचे दक्षिणेत आगमन झाले. त्याने स्वीकारलेल्या विशिष्ट धोरणामुळे ही तेढ तात्पुरती शमली. त्याने राज्यातील महत्त्वाच्या जागा दोन्ही पक्षांत विभागून दिल्या. जरी ही स्पर्धा तात्पुरती कमी झालेली दिसली तरी तिचे पूर्णपणे निर्मूलन करण्यात त्याला यश आले नाही. या स्पर्धेतून बहमनी राज्याचा नाश होणार याची त्याला पूर्ण कल्पना आली. परमेश्वरी संकेतच म्हणून की काय महमूद गावानचाच या स्पर्धेत बळी पडला. या कालखंडात झालेल्या प्रगतीचे आणि तो कालखंड गाजविणाऱ्या महमूद गावानचे अतिशय उत्तम असे वर्णन निकीटीन या रशियन प्रवाशाने दिले आहे. निकीटीन हा हिन्दुस्तानामध्ये १४६९ ते १४७४ या कालावधीत होता. तो म्हणतो—मुसलमानी हिन्दुस्तानचे मुख्य शहर म्हणजे बहमनींची राजधानी बिदर होय. केवळ दक्षिणेमधील लोकच या ठिकाणी जमत असत असे नाही तर सर्व हिन्दुस्तानातील लोकांची बिदर शहरात आवक होई. बहमनी राज्यात गुलबर्गा नावाच्या शहरात हिन्दुस्तानातील सर्व भागातून व्यापारी जमा होत आणि दहा दिवसपर्यंत तेथे व्यापार करीत. राजधानीमधून वीस हजार घोडे याठिकाणी विक्रीसाठी दरवर्षी आणले जात. बहमनी राज्याचे व्यापार उदीमाचे मुस्तफाबाद दाभोळ हे शहर होते. याठिकाणी मिसर, अरबस्तान, खुरासाण, तुर्कस्तान वगैरे ठिकाणांहून खरेदी-विक्रीसाठी घोड्यांची आवक होई आणि हिन्दुस्तानच्या आणि आफ्रिकेच्या किनाऱ्यावरील शहरांबरोबर मोठ्या प्रमाणावर येथून व्यापार होई. निकीटीन पुढे म्हणतो की, बहमनींच्या राज्यातील सर्वसाधारण प्रजा गरीब होती. परंतु अमिरउमराव मात्र अतिशय श्रीमंत होते. अमिरउमराव चांदीच्या पालख्यांचा जाण्या-येण्यासाठी उपयोग करीत. त्यांच्या बरोबरील स्वारीत ३०० घोडेस्वार, ५०० सैनिक, १० दिवटे आणि १० वादक असत. ज्या राजवाड्यात सुलतानाचे निवासस्थान असे तो दिसावयाला अप्रतीम होता. त्या वाड्यातील प्रत्येक वस्तूवर कोरीव काम होते अथवा तिच्यावर सोन्याचा अगर चांदीचा मुलामा चढविण्यात आलेला होता. ईदच्या दिवशी प्रत्यक्ष सुलतानाला पहाण्याचा योग निकीटीन याला आला होता. बहमनी राज्याच्या या वैभवात महमूद गावानचा फार मोठा वाटा होता. त्याने हिन्दुस्तानाबाहेरील देशांशी सांस्कृतिक संबंध जोडले. त्या काळातील अत्युत्कृष्ट फारसी लेखक म्हणून महमूद गावानची प्रसिद्धी होती. **रियाजूल इन्शा** या नावाने प्रसिद्ध झालेला त्याचा पत्रसंग्रह या विधानाला साक्ष देईल. अतिशय विद्वान म्हणून गणल्या गेलेल्या मौलाना जामी, शरफुद्दिन अली अल याजदी, खाजा उबेदुल्ला अलअहरार, जलालुद्दिन दावनी, आणि इतर अनेक विद्वान मंडळींबरोबर त्याचा सतत पत्रव्यवहार चालू असे. बहमनींचा ऱ्हास झाल्यावर त्यांच्या बरोबरच या वैभवाला उतरती कळा लागली.

(२०७) * बहमनी सुलतान हे कला, स्थापत्य आणि शास्त्र यांचे आश्रयदाते होते. बहमनी काळामध्ये ज्या शिल्पाची बांधणी झाली त्या शिल्पामध्ये भारतीय,

तुर्की, इजिप्शीयन आणि फारसी शिल्प शास्त्रांचा सुरेख आविष्कार झालेला आपल्याला दिसून येतो. बहमनी शिल्पकलेची उत्कृष्ट उदाहरणे म्हणून गुलबर्ग्याची जामी-मशीद, दौलताबादचा चांदमिनार ( १४३५ ) आणि बिदर येथील महमूद गावानने बांधलेले महाविद्यालय यांचा दाखला आपल्याला देता येईल. बहमनी कालीन बांधल्या गेलेल्या अनेक इमारतींची उभारणी जुन्या देवळांच्या जागी आणि त्या देवळासाठी उपयोगात आणलेल्या बांधकामातूनच अनेकवार झाल्यामुळे त्या इमारतीवर हिन्दू शिल्पाची छाया पडणे अपरिहार्य होते. पुढे पश्चिम आशिया आणि आफ्रिका येथून मुसलमानांची आयात झाल्यावर तुर्की आणि इजिप्शियन स्थापत्यशास्त्राचे परिणाम बहमनी शिल्पावर झाले. १५ व्या शतकाच्या उत्तरार्धात इराणमधून मुसलमानांची आवक झाली आणि इराणी स्थापत्याचा प्रभाव बहमनी शिल्पावर पडला. कालांतराने एतद्देशिय स्थापत्य-कलेने परदेशातून आलेल्या शिल्पकलेवर मात केली. १६ व्या शतकात अहमदनगर, विजापूर आणि वऱ्हाड येथील राज्यांत ज्या शिल्पाची उभारणी झाली त्या शिल्पावर एतद्देशीय शिल्पकलेचा प्रभाव पडला. विजापूरच्या आदिलशहाने बांधलेल्या सर्व कलाकृती या विधानाची प्रचिती देतील. अहमदनगरच्या सुलतानांच्या काळात बांधल्या गेलेल्या वास्तूंचे जे वर्णन इतरत्र आले आहे त्यावरूनही वरील विधानाची सत्यता पटेल.

( २०८ ) * बहमनी आणि बहमनींनंतर ज्या ५ शाहयानी दक्षिणेत राज्य केले त्यांच्या कारकीर्दिच्या ३५० वर्षांच्या कालखंडात वाङमयाचा उत्तम तऱ्हेने विकास झाला. यामध्ये विशेषतः मराठी आणि फारसी या भाषांचा उल्लेख करावा लागेल. यादवकालीन महाराष्ट्राच्या इतिहासातील १३ वे शतक म्हणजे वाङमयाच्या प्रांतातील पुनरुद्धाराचे युग असेच म्हणावे लागेल. दक्षिणेवरील मुसलमानांची स्वारी, यादवांचा पाडाव आणि मुसलमानी सत्तेची दक्षिणेतील स्थापना या घटनांनी दक्षिणेमधील राजकीय आणि सामाजिक घडीला जबरदस्त हादरा दिला आणि येथील धार्मिक आणि दैनंदिन जीवनात आमूलाग्र क्रांती घडवून आणली. या घटनेचे तत्कालीन वाङमयावर अतिशय दुरगामी असे परिणाम झाले. राजाश्रय सुटलेले मराठी वाङमय आता पोरके बनले. त्या काळात निर्माण झालेल्या मराठी वाङमयाचा आदर्श सामान्य माणसांच्या सुखदुःखाशी समरस होणारे असाच राहिला. या कालातील आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीने तत्कालीन वाङमयावर परिणाम केला आणि ती म्हणजे सूफी पंथाचे तत्त्वज्ञान. हा सूफी पंथ महाराष्ट्रातील भक्तिसंप्रदायाच्या अगदी जवळचा असे म्हटल्यास ते सयुक्तीकच होईल. किंबहुना १५ व्या शतकात उदयास आलेल्या महानुभाव आणि दत्तात्रेय पंथी यांनी हिन्दू आणि मुसलमान या दोन धर्मांना एकत्र आणून त्यामधून एक नवीन विचारप्रणाली मांडण्याचा प्रयत्न केला. दत्तात्रेय पंथाचा प्रामुख्याने प्रचार करणारी व्यक्ती म्हणजे श्रीपाद श्रीवल्लभ ही होय. त्यांचे शिष्योत्तम गंगाधर सरस्वती यांनी '**गुरुचरित्र**' हा ग्रंथ लिहिला. या

ग्रंथात दत्तात्रेयाच्या जीवनातील अनेक प्रसंग आणि दंतकथा अतिशय रसाळ वाणीने वर्णन केलेले आहेत. या ग्रंथाचे स्वरूप अध्यात्मिक राहिले नाही. दत्तात्रेय पंथाने महाराष्ट्रातील लोकांच्या मनावर शेकडो वर्षेपर्यंत आपली पकड राखली होती. या पंथाचे एक सुप्रसिद्ध पुरस्कर्ते जनार्दनस्वामी हे अहमदनगरच्या सुलतानांच्या चाकरीत होते. त्यांनी काही गीते आणि अभंग यांची रचना केली. परंतु या कालखंडातील वाङ्मयात ज्यांनी प्रचंड भर घातली ते म्हणजे जनार्दनस्वामींचे शिष्य एकनाथ महाराज ( जन्म १५४८ ) हे होत. एकनाथांना स्फुर्ती मिळाली ती ज्ञानेश्वरीपासून. त्यांनी प्रथम भागवतपुराणाच्या अकराव्या अध्यायावर भाष्य केले. ज्ञानेश्वरी सोडल्यास इतर कोणत्याही ग्रंथाने एकनाथांच्या या भाष्याइतकी विद्वत्तेची मजल गाठली नाही. या भाष्यात तत्त्वज्ञान आहे, काव्य आहे. त्यामधून आपल्याला एकनाथाच्या गहन विचार बुद्धीची आणि लालित्याने भरलेल्या शैलीची प्रचिती येते. त्यांनी लिहिलेले इतर ग्रंथ म्हणजे **रुक्मिणी स्वयंवर, बालक्रीडा, प्रल्हादचरित्र, सुखशतक, आनंदलहरी, अनुभवानंद, रामायण** वगैरे. एकनाथांना समकालीन अशा विठा-रेणुकानंद, जनी-जनार्दन आणि राम-जनार्दन यांचाही या ठिकाणी उल्लेख करणे अवश्य आहे. या सर्वांनी आणि विशेषतः जनी-जनार्दन यांनी भक्तीने भरलेले अभंग आणि तत्त्वज्ञान विषयक ग्रंथ यांची रचना केली. एकनाथांचे इतर समकालीन म्हणजे **वरदनागेश** या ग्रंथाचा कर्ता अडाण्या कवी, कान्हो, नामा, निर्मल पाठक, आणि गीतेच्या दहाव्या अध्यायावर भाष्य लिहिणारा आणि चमत्कारिक स्वभावाबद्दल प्रसिद्ध असलेला बहिरा पिसा. परंतु या सर्वांत प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल तो दास पंत कवी यांचा ( जन्म १५५१ ). यांचे वडील अहमदनगरच्या सुलतानांच्या चाकरीत होते. दासोपंतांचे लिखाणही प्रचंड असून त्यांनी भगवत्गीतेवर ६ वेगवेगळी भाष्ये रचली. त्यांनी लिहिलेले इतर ग्रंथ म्हणजे **पदार्णव वाक्य विवृत्ति** आणि **पंचीकरण** हे होत. यातील शेवटचा ग्रंथ कापडावर लिहिला असल्या कारणाने **पासोडी** या नावाने तो प्रसिद्ध आहे.

एतद्देशीय भाषेचा जो विकास या कालखंडात झाला तो एक तऱ्हेच्या दडपणाखाली झाला. याउलट फारसी भाषा ही राजाश्रयाखाली नांदू लागल्यामुळे त्या भाषेचा विकास जेत्याची भाषा म्हणून झाला. त्या काळातील फारसी लेखकांनी काव्य, चरित्र, इतिहास, धर्म या आणि इतर अनेक विषयांवर ग्रंथरचना केली. ऐतिहासिक ग्रंथामध्ये शहा ताहीर दक्कनी यांच्या **फतनामा** या ग्रंथाचा, खुरशहा याच्या **तारीखी इलची-इ-निजाम** या ग्रंथाचा, सय्यद अली अजीजुल्ला तबातबा याच्या **बुरहाण-इ-मासीर** या ग्रंथाचा आणि महमद कासीम हिन्दूशहा याच्या **तारीखी फरिश्ता** या ग्रंथाचा उल्लेख करावा लागेल.

त्या काळच्या पर्शियन लेखकामध्ये पत्ररूपाने ग्रंथलेखन हे अतिशय मोठ्या

प्रमाणावर केले गेले. यामध्ये बहमनी सुलतानांचा सुप्रसिद्ध वजीर महमूद गावान याच्या **रियाजुल इन्शा** या ग्रंथाचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल.

पर्शियन कवींमध्ये ज्यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल त्यांची नावे पुढीलप्रमाणे—मौलाना कासीम मशहदी, शेख मुय्नुद्दिन महमद, मुल्ला मुशीन लारी, ख्वाजा अहमद सिराज, मुल्ला मलीक कुमी, मुल्ला हैदर करहानी, शहा कासीम मशहदी आणि मिरजा सादीक.

( २०९ ) * दुसरा प्रवासी म्हणजे डुराते बारबोसा. हा १५०० ते १५१४ या काळात हिंदुस्तानात होता. युसुफ आदिलशहाला गोवा हे अतिशय आवडत असे आणि गोवा येथे तो बराच काळ रहात असे, असे बारबोसा म्हणतो. आदिलशहाच्या राज्यात अनेक लहानमोठी शहरे होती. तेथील शेती संपन्न असून राज्यात धान्याची भरपूर सुबत्ता होती. राज्याचा व्यापार मोठ्या प्रमाणावर चालत असून त्यापासून सुलतानाला मोठे उत्पन्न मिळत असे. बारबोसाने दुसऱ्या महमूदशहा बहमनीचे अतिशय उत्कृष्ट असे वर्णन दिलेले आहे. विजापूरचे सुलतान काही काळपर्यंत तरी नामधारी बहमनी सुलतानांना मानीत असत. साहजिकच बारबोसाने दिलेले तत्कालीन राजकीय परिस्थितीचे वर्णन या ठिकाणी उद्धृत करणे अतिशय उद्बोधक ठरेल :

दुसरा महमूदशहा बहमनी हा अतिशय वैभवात आणि चैनीमध्ये अहमदाबाद बिदर या शहरी रहात असे. सुलतानाचे सर्व राज्य त्याच्या मुसलमान अमिरांमध्ये विभागलेले असून प्रत्येकाकडे लहानमोठी शहरे आणि खेडी विभागून दिलेली होती. हे अमीर आपल्या मर्जीप्रमाणे राज्य चालवीत. त्यामुळे सुलतानाला आज्ञा देण्याचा कधीही प्रसंग येत नसे. कारभारात तो कधीही ढवळाढवळ करीत नसे. हे सर्व अमीर त्याला मानत असत, आणि त्याच्या भेटीला येते वेळी नजराणा म्हणून राज्यातील वसूल त्याला देत. त्यांच्यापैकी एखाद्याने बंड केल्यास इतर त्याच्यावर चाल करून जात, त्याचा नाश करीत किंवा त्याला सुलतानाच्या आज्ञा पाळणे भाग पाडीत. ह्या अमिरांमध्ये परस्परांत युद्धे होत. कधीकधी एकमेकांचा मुलूखही ते जिंकून घेत. परंतु सुलतान त्यांच्यामध्ये शांतता प्रस्थापित करी. प्रत्येक अमीराकडे घोडेस्वार आणि तिरंदाज असत. त्यांचा पोषाख कापसाच्या धाग्यापासून बनविलेला असे, आणि ते डोक्यावर टोप्या घालीत. आपल्या शिपायांना ते भरपूर पगार देत. त्यांना अरबी, पर्शियन आणि तद्देशिय दक्षिणी भाषा बोलता येत. हे अमीर लढाईवर जाताना कापडाचे तंबू घेऊन जात. ते घोड्यावर बसून युद्ध करीत. त्यांचे शस्त्र म्हणजे दुधारी तलवार असे. अनेकांच्या जवळ लोखंडी दंड आणि कुऱ्हाडी असत. प्रत्येक शिपायाजवळ दोन सैनिकांना पुरतील एवढी लढाऊ हत्यारे असत. त्यांच्यापैकी अनेकजण लढाईवर जाताना आपल्या स्त्रियांना बरोबर घेऊन जात. या राज्यातील हिन्दू प्रजाजन हे रंगाने काळे, उत्तम शरीरयष्टीचे आणि शूर होते. बहुतेकजण पायदळी युद्ध करत. तर काहीजण घोड्यावर बसून युद्ध करीत. त्यांची शस्त्रे म्हणजे

तलवार, ढाल, धनुष्य आणि बाण ही असत. त्यांची तिरंदाजी उत्कृष्ट असे. गोमांस सोडून इतर सर्व मांस ते भक्षण करीत. ते मूर्तीची पूजा करीत. त्यांच्यामध्ये मनुष्य मरण पावल्यावर त्याला दहन करीत. त्यांच्यामध्ये पुरुष मृत झाल्यावर त्याची पत्नी स्वेच्छेने स्वतःला चितेवर जाळून घेई.

( २१० ) ★ बहमनी सत्ता अशा तऱ्हेने विलयाला जात असताना विजयनगरचे सामर्थ्य वाढत होते. त्याचप्रमाणे पोर्तुगीजांनीही पश्चिम किनारपट्टीवर आपला अंमल बसविण्यास सुरुवात केली होती. इ. स. १५१४ मध्ये त्यांनी गोव्यावर कायम ताबा मिळविला होता. इ. स. १५०९ मध्ये विजयनगरच्या गादीवर कृष्णदेवराय हा आला होता. इ. स. १५१० मध्ये पोर्तुगीज गव्हर्नर अल्बुकर्क याने विजापूर आणि झामोरीन यांच्या विरुद्ध तहाची बोलणी करण्यासाठी विजयनगरकडे आपला वकील फादर लुईस याला पाठविले. परंतु पोर्तुगीजांना त्यात यश न येऊन लुईसचा खून झाला. कृष्णदेवरायाला यशस्वीपणे तोंड देण्यात थोड्याफार अंशी युसुफ आदिल आणि कुतुब उल्मुल्क हे यशस्वी झाले. ( Sewell and Aiyangar, 242 )

( २१० अ ) ★ महमूदशहाच्या मृत्यूची *A History of Forgotten Empire* या ग्रंथात दिलेली १८-१२-१५१७ ही तारीख आणि **बुरहाणमध्ये** दिलेली २०-१२-९२४ ( हिजरी ) ही तारीख या दोन्ही तारखा चुकीच्या आहेत.

( २११ ) □ पूर्वेकडील देशांमध्ये कोणीही शिंकल्यास ते सुचिन्हाचे अथवा दुचिन्हाचे लक्षण समजले जाई. परंतु त्यामुळे काहीतरी बदल घडून येणार असे मात्र नेहमीच समजले जात असे.

( २१२ ) ★ बहमनी राज्याचे तुकडे झाल्यावर ज्या पाच शाहया अस्तित्वात आल्या त्यासंबंधी पुढील माहिती उद्बोधक ठरेल. कॉन्स्टॅटिनोपलचा सुलतान अमुराथ ( १४२१-१४५१ ) याचा युसुफ आदिलशहा हा मुलगा हा जन्माने तुर्क होता. याने विजापूरच्या आदिलशाही घराण्याची स्थापना केली. या घराण्यात एकंदर ९ सुलतान झाले आणि त्यांनी जवळ जवळ २०० वर्षे राज्य केले. ( see *Bijapur Statistical Account* ) याच सुमारास गोवळकोंडा येथे सुलतान कुतुबउल्मुल्क याने कुतुबशाही ( १५१२ ते १६८७ ) घराण्याची आणि बिदर येथे कासिम बरीद याने बरीदशाही घराण्याची स्थापना केली ( १४९२-१६०९ ) बहमनी सुलतान हे राज्य-पदाच्या अत्युच्च अधिकारावर जरी १५२६ पर्यंत राहिले तरी इ. स. १४९० मध्ये अहमदनगर आणि १४८९ मध्ये विजापूर येथील सुभेदारांनी आपल्या राजनिष्ठेचे जू झुगारून दिल्यावर आणि आपले स्वतंत्र राज्य स्थापन केल्यावर बहमनी सुलतानांची सत्ता संपुष्टात आली असे म्हणावे लागेल. कर्नल मेडोज टेलरच्या मते एक हुमायूनशहा ( १४५७-१४६१ ) सोडल्यास बाकीच्या बहमनी सुलतानांनी प्रजेचे संरक्षण करून न्यायाने आणि चांगले राज्य केले. दक्षिणेतील हिंदूंमध्ये सामाजिक धारणा आणि

स्थानिक सरकारे यांची दृढमुल असलेली बीजे टिकून राहिली इतकेच नव्हे तर मुसलमान राजकर्त्यांनी त्यांची जोपासना केली. तत्कालिन सामाजिक व राजकीय परिस्थितीत ढवळाढवळ न करता किंवा स्थानिक संस्थांचे रंगरूप पालटण्याचा प्रयत्न न करता मुसलमान राज्यकर्त्यांनी स्वतःच्या कार्यसिद्धीसाठी त्यांचा उपयोग करून घेतला. मशिदीबरोबर संलग्न असलेल्या आणि उत्पन्नाची बाब म्हणून जमिनी लावून दिलेल्या खेड्यांतील शाळांनी फारसी आणि अरबी शिक्षणाची वाढ केली. ह्याचा परिणाम राजकर्त्यांचे वाङ्मय आणि त्यांचा धर्म यांचा प्रसार होण्यात झाला. या शिक्षणाचे परिणाम अजून देखील बहमनी राज्याच्या अंकित असलेल्या प्रदेशात आपल्याला दिसून येतील. दक्षिणेची राजधानी असलेले बिदर शहर येथे मोठ्या प्रमाणात परदेशी व्यापाराची वृद्धी झाली. देशोदेशीचे व्यापारी आणि प्रवासी बिदरला भेट देऊ लागले. बहमनी सुलतानांनी सार्वजनिक उपयोगाची फारच थोडी बांधकामे केली. पाणीपुरवठ्यासाठी धरणे वा बंधारे, रस्ते किंवा पूल आणि सराया किंवा टपाल व्यवस्था यांचा जवळ जवळ अभावच होता. त्यांची प्रमुख बांधकामाची कामगिरी म्हणजे त्यांनी बांधलेले प्रचंड किल्ले. आज ५०० वर्षांनंतर देखील त्यांची स्थिती पहिल्याइतकीच भक्कम आणि मजबूत आहे. यापैकी डोंगरी किल्ल्यांना भुयारे, बोगदे, बाजूला अधेमधे बुरुज असलेली तटबंदी, रुंद असे पाण्याने भरलेले अथवा कोरडे खंदक यांनी अजिंक्य केले, तर भुईकोट किल्ल्यांना मुख्य तटबंदीशिवाय थोड्या थोड्या अंतरावर असलेल्या बुरुज आणि शिखरे यांनी युक्त असलेल्या उंच बांधलेल्या भिंतींनी मजबूती आणली. मोठ्या संख्येने हिंदूंचे जबरदस्तीने धर्मांतर झालेले आपल्याला आढळत नाही. परदेशी मुसलमानांची इराण, अरबस्तान, तार्तर, अफगाणिस्तान आणि ॲबिसिनिया या देशांमधून सातत्याने आवक होत राहिली. यापैकी बहुतेक परदेशी मुसलमान लष्करी पेशाचे होते. त्यांनी एतद्देशीय हिंदू स्त्रियांबरोबर विवाह केले आणि दक्षिणेत मुसलमानांची एक नवी जात अस्तित्वात आणली. ( *Architecture of Bijapur*, 12–13 )

## अहमदनगरची निजामशाही : तळटीपा

( २१३ ) □ अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा संस्थापक अहमद निजाम उल्मुल्क याचा उल्लेख **बुरहाणचा** कर्ता सय्यद अली याने अगदी सुरुवातीला सुलतान आणि शहाजादा या नावाने केला आहे अर्थात् त्यावेळी त्याला हे दोन्हीही किताब नव्हते. सयद अलीने अहमदला इतरही अनेक सन्मानार्थ विशेषणांनी संबोधले आहे. याचे कारण उघड आहे. ते असे : **बुरहाण-इ-मासीर** या ग्रंथात यानंतर बहमनी घराण्याचा इतिहास संपून अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा इतिहास सुरू होतो.

( २१४ ) □ मलिक हसन निजाम उल्मुल्क याचा मुलगा मलिक अहमद हा

महमदशहा लष्करी याला एका सुंदर ब्राह्मण मुलीपासून झाला असे सर्वत्र म्हटले जाई. असे म्हणतात की काही ज्योतिषांच्या सांगण्यावरून या मुलाला मलिक हसन याच्या स्वाधीन करण्यात आले. (**हफ्त इक्लीम**, ६३; **बुरहाण**, १६८) मलिक अहमदचे वंशज हे पुढे अहमदनगरचे सुलतान झाले. त्यांचे कुळ हे मोठे आहे हे दाखविण्यासाठी बहुधा या गोष्टी रचण्यात आल्या असाव्या.

(२१५) □ आपला बाप मलिक नायब याच्या खुनाबद्दल मलिक अहमद याने कोणतीही प्रतिक्रिया दाखविलेली दिसत नाही.

(२१६) □ मिरजुम्ला म्हणजे अर्थमंत्री.

(२१७) □ जैनुद्दिन अली तालीश हा पुणे जिल्ह्यातील चाकणचा सुभेदार होता.

(२१८) □ ही टेकड्यांची रांग अहमदनगर शहराला समांतर रेषेमध्ये धावते. हल्ली या टेकड्यांना कदुराबाद या नावाने ओळखीत नाहीत. मुरी घाट हा अहमदनगर शहरापासून नैऋत्येस ४० मैलांवर आहे.

(२१९) □ हे कदुराबाद म्हणजे जालना शहर होय.

(२२०) □ तिसगावचा घाट हा देऊळगावचा घाट या नावानेही प्रसिद्ध आहे. हा भिंगार गावाच्या नजिक आहे. या ठिकाणीच पुढे अहमदनगर शहराची बांधणी करण्यात आली.

(२२१) □ जहांगीरखानाच्या या हालचालींचा परिणाम शत्रूच्या दृष्टीने अत्यंत अनुकूल अशी परिस्थिती निर्माण होण्यात झाला. परण्ड्याहून कोणत्याही प्रकारची मदत मिळण्याची आशा त्याला राहिली नाही.

(२२२) □ आजमखान हा परण्ड्याच्या ख्वाजाजहानचा मुलगा.

(२२३) □ या बाग-इ-निजामचे अवशेष आज देखील अहमदनगर येथे दृष्टीस पडतात.

(२२४) □ याबाबत असे म्हणता येईल की फरिश्त्याच्या काळात अशा तऱ्हेची पद्धत अस्तित्वात असावी परंतु दक्षिणेमध्ये जेव्हा हिंदू राजांच्या राजवटी सुरू झाल्या त्यावेळी छत्र वापरण्याचा अधिकार वंशपरंपरेने सरदारी ज्यांच्याकडे आहे असे अधिपती अथवा राजाने तसे खास अधिकार ज्या व्यक्तीला दिले आहेत अशांकडेच होता.

(२२५) □ खानदेशाला तिन्ही बाजूंनी वेढणारा जो डोंगराळ मुलूख आहे तो चोर-दरोडेखोरांच्या दृष्टीने इतका उपयुक्त होता की पूर्वी आणि आता देखील दरोडेखोरांना त्या प्रदेशात उत्कृष्ट संरक्षण मिळत असले पाहिजे.

(२२६) □ मुसलमान इतिहासकार मराठा घोडदळ आणि कोळी घोडदळ यांची सर्वसाधारणपणे गल्लत करतो.

( २२७ ) □ ज्या वेळी फक्त एकच तलवार अथवा काठीचा उपयोग केला जातो तेव्हा त्या प्रकाराला येकंग बाजी म्हणत. ज्या वेळी ढाल अगर एकेका हातात एक अशा दोन तलवारींचा उपयोग केला जातो तेव्हा त्या प्रकाराला दोअंग बाजी असे म्हणत. आजतागायत ह्या प्रकारच्या खेळांत मराठ्यांइतके वाकबगार दुसरे कोणी नाही. मराठा तरुण पंधरा वर्षांचा झाला आहे आणि तो तलवारबहाद्दर नाही अशी गोष्ट फारच क्वचित आढळून येईल.

( २२८ ) □ **पेशवा** म्हणजे परराष्ट्र खात्याचा मंत्री.

( २२९ ) □ सुलतानाच्या खाजगीकडील घोडदळाच्या प्रमुखाला **सरनोबत** असे म्हणत.

( २३० ) □ प्राच्य देशातील पंडिताला मुसलमान सुलतानाला राजाजू या नावाने संबोधल्याबद्दल प्रथम आश्चर्याचा धक्काच बसेल. परंतु त्याचा बाप एका ब्राह्मणाच्या वंशातला होता आणि या ब्राह्मणाने मुसलमानी धर्माचा स्वीकार केला होता ही गोष्ट वरील परिस्थितीवर सहज प्रकाश टाकते. या कुटुंबाने वऱ्हाडामधील पाथरी या खेड्याच्या कुलकर्णीपणाचे वतनावर वंशपरंपरेने आपला अधिकार सांगितला होता. परंतु त्यांनी मुसलमानी धर्माचा स्वीकार केल्यावर तो हक्क गमावला. अहमदनगरच्या सुलतानांनी मात्र या अधिकाराला आपण मुकलो आहोत अशी कधीही स्वतःची समजूत करून घेतली नाही. त्यासाठी त्यांची युद्ध करण्यापर्यंत देखील मजल गेली. आपला हा हक्क प्रस्थापित करण्याबाबत त्यांचा वऱ्हाडच्या सुलतानाबरोबर संघर्ष ओढवला आणि त्यामध्ये इमादशाही घराण्याला आपले राज्य गमवावे लागले.

( २३१ ) □ या ठिकाणी ही गोष्ट नमूद करणे जरूर आहे की परंडा आणि आजूबाजूचा मुलूख अहमदनगरच्या सार्वभौमत्वाखाली अजूनही ख्वाजाजहानच्या ताब्यात होता आणि त्याच्या या अधिकाराशी दुसऱ्या कोणाही सुलतानाचा संबंध नव्हता.

( २३२ ) □ कुलकर्णी म्हणजे खेडेगावचा पिढीजाद फडणवीस. हा अधिकार टिकविण्यासाठी या हिंदू कुटुंबाने जे प्रयत्न केले ते पाहिल्यानंतर असे दिसून येते की हिंदुस्थानातील लोक अशा तऱ्हेच्या अधिकारांना अतिशय महत्त्व देत. अशा तऱ्हेच्या अधिकारापासून मिळणाऱ्या प्राप्तीला जरी आंतरिक मूल्य कमी असले तरी त्याची ते पर्वा करीत नसत.

( २३३ ) □ या भेटीमध्ये शहाताहिरने आपल्या अंगातील मुत्सद्दीपणाचे जे कसब दाखविले आहे त्याचे लेखकाने अतिशय यथातथ्य वर्णन केले आहे.

( २३४ ) □ **चिटणीस** ही प्रथम पदवी होती आणि **चिटणीस** म्हणजे **सचिव** हे पद पुढे मराठ्यांनी आपल्या अधिकार नामावलीमध्ये अंतर्भूत केले.

(२३५) □ हे तीन खलीफ म्हणजे महमदानंतर लगोलग खलिफ पदावर आलेले अबू बक्र, उमर आणि उथमान हे होत.

(२३६) □ शहा जमालउद्दीन याचा फरिश्ता हा समकालीन होता. आपल्या काळात घडलेल्या गोष्टींची त्याने याप्रमाणे शहानिशा केली आहे.

(२३७) □ अहमदनगरविषयी १६ व्या शतकाच्या सुरुवातीस पोर्तुगीज प्रवासी बारबोसा हा पुढीलप्रमाणे लिहितो : गुजरातेतून दक्षिणेच्या बाजूने आणि हिंदुस्थानाच्या अंतर्भागाच्या दिशेने बाहेर पडल्यावर एका दक्षिणी सुलतानाचे राज्य आहे. हा सुलतान मूर (मुसलमान) असून त्याच्या राज्यातील बहुसंख्य लोक हे जेन्टाईल (हिंदू) आहेत. तो एक बडा सुलतान आहे आणि त्याची अफाट प्रजा आहे. त्याच्या ताब्यात फार मोठा प्रदेश असून तो अंतर्भागात दूरवर पसरलेला आहे. त्याच्या राज्यात मोठा व्यापार असलेली अनेक चांगली बंदरे असून त्यामधून त्याच्या राज्यात उपयोगात आणल्या जाणाऱ्या वस्तूंचा व्यापार होतो. त्यापैकी मुख्य बंदर म्हणजे मुंबईच्या दक्षिणेस १० मैलांवर असलेले चेऊल हे होय (Stanley's *Barbosa*, 66.)

(२३८) □ तत्कालिन पोर्तुगीज बखरकारांच्या मते बुरहाण निजामशहाच्या अंगी राष्ट्रीय वृत्ती बाणलेली असून त्याच्या जवळ राजकीय चातुर्य भरपूर होते. त्याकाळच्या हुशार आणि विद्वान मंडळींना त्याच्या दरबारात अगत्यपूर्वक आसरा दिला जाई. त्याच्या दरबारीमंडळींमध्ये सिमाव पेरिस नावाचा पोर्तुगीज होता. त्याने मुसलमान धर्म स्वीकारला होता. त्याला सुलतान इतका चाहत असे की त्याने त्याला आपला वजीर आणि सैन्याचा सेनापती नेमले. पेरिसने जरी आपला धर्म बदलला होता तरी तो आपल्या पोर्तुगीज धर्मबांधवांजवळ मैत्रीचे संबंध ठेवी. त्याचे स्वतःचे अनुकरण करून आपला धर्म सोडणाऱ्याबद्दल त्याच्या मनात यत्किंचितही आदर नसे. सुलतान मृत्युशय्येवर असताना त्याने आपल्या वारसाला पेरिससारख्या विश्वासू चाकराच्या सल्ल्याने राज्यकारभार चालविण्याची शिफारस केली. पेरिसने देखील त्याच्यावर सोपविलेल्या सर्व कामगिऱ्या अत्यंत प्रामाणिकपणाने पार पाडल्या. सुलतानाच्या मृत्यूनंतर लवकरच नव्याने गादीवर आलेल्या सुलतानाचा आदिलखानाबरोबर खटका उडाला आणि त्यात पेरिसने प्राण गमावले. निजामउल्मुल्क याला आता धीरगंभीर असा सल्ला देणारा कोणी उरला नव्हता आणि त्याच्या शहाण्या बापाचे उदाहरणही आता त्याच्यासमोर नव्हते. सारा राज्यकारभार आता त्याच्या लहरीपणावर चालू लागला. डिओगो–ड–कान्टो याच्या वृत्तांताप्रमाणे बुरहाण निजामशहाला महारोग (याला तो सेंट लाजारसचा रोग असेही म्हणतो) झाला होता. त्याला बरे करण्यासाठी केलेले सर्व वैद्यकीय उपाय अयशस्वी झाले. अखेरचा उपाय म्हणून त्याच्या एका दरबारी वैद्याने त्याला लहान मुलाच्या रक्ताने स्नान

करण्याची शिफारस केली. मोठमोठे हौद मुलांच्या रक्ताने भरण्यात आले. पण रक्तस्नानाचा हा उपाय देखील अयशस्वी ठरला. ( Da Cunha's *Chaul*, 44-45 ).

( २३९ ) □ चलबी रुमीखानाने अहमदनगर येथे (आता विजापूर येथे असलेली) एक सुप्रसिद्ध पितळेची तोफ ओतली. इंग्रज राजवटीत रुमीखानाच्या अहमदनगर येथील कबरीचे इंग्रज अधिकाऱ्यांच्या निवासस्थानात रूपांतर करण्यात आले. ज्या मुशीत ही तोफ ओतण्यात आली ती मूस बागेमध्ये दुर्लक्षिलेल्या अवस्थेत पडून आहे.

( २४० ) □ जेव्हा पान किंवा विडा हे हाताने दिले जाते त्यावेळी देणाऱ्याचे श्रेष्ठत्व त्यामध्ये अध्याहृत असते. ज्यावेळी ते चांदीची अथवा सोन्याची पेटी किंवा तबक यामधून दिले जाते त्यावेळी ही गोष्ट समानता दर्शवित. हे सूक्ष्म भेदाभेद अतिशय कसोशीने पाळले जातात. वागण्यासंबंधीचे हे जे काही नियम असतात त्याबाबत कोणीही अनास्था दाखविल्यास ती मनाला लावून घेतली जाते आणि कधीकधी त्याबाबत तीव्र नापसंतीही प्रकट केली जाते.

( २४१ ) □ असे म्हणतात की या प्रसंगी विजापूरमध्ये असलेली ४० टन वजनाची प्रचंड तोफ काबीज करण्यात आली. ही अतिशय उत्कृष्ट अशी तोफ बुरहाण निजामशहाच्या कारकिर्दीत ओतण्यात आली होती आणि साऱ्या जगात ओतीव पितळ्याची दुसरी एवढी मोठी तोफ नाही ही तोफ म्हणजे त्या काळच्या हिंदुस्थानात तोफा ओतण्याची कला किती प्रगत होती त्याचे निदर्शक आहे. अशी ही तोफ इंग्लंडमधील एखाद्या जाहीर ठिकाणी ठेवली जाणेच योग्य आहे. तेथे तिचे एक बघण्याजोगी वस्तू म्हणून प्रदर्शन तरी झाले असते आणि युरोपियन जगतात ती कौतुकाचा विषय बनली असती. त्याऐवजी विजापूरच्या मोडक्यातोडक्या किल्ल्यात उपेक्षिलेल्या अवस्थेत ती खितपत पडावी यासारखी दुसरी मनाला दुःख देणारी गोष्ट आहे असे वाटत नाही.

( २४२ ) □ तालीकोटच्या लढाईसंबंधी अधिक आणि जरा वेगळी अशी विस्तृत हकीकत *The Bijapur Statistical Account* मध्ये मिळते. परंतु ही लढाई जिंकण्याचा मान हुसेन निजाम आणि अहमदनगरची फौज याजकडे होता. याबाबत मात्र या वृत्तान्ताचे इतर हकीकतीशी एकमत आहे.

( २४३ ) □ मुर्तजा निजामशहाबद्दल सय्यद अलीने पुढील उद्‌गार काढलेले आहेत न्यायबुद्धी, शौर्य आणि औदार्य या तिन्ही गुणांनी मूर्तजा परिपूर्ण होता. त्याच्या न्यायप्रियतेमुळे राज्यातील चोर, डाकू, लुटारू इत्यादींच्या कृत्यांना आळा बसला. त्याने इतका दानधर्म केला की त्याचा खजिना रिकामा होऊन गेला. काही विद्वानांच्या मते मुर्तजा शहा हा वेडा होता. परंतु त्याची तीक्ष्ण बुद्धी आणि धर्मशास्त्रातील गती पाहता तो बुद्धिमान, समजुतदार आणि शहाणा होता असेच म्हणावे लागेल. ( अ. नि. पाने २५२–२५३ )

(२४४) ◻ अबुल फजल याच्या अकबरनाम्यात याबाबत पुढीलप्रमाणे हकीकत दिलेली आहे :

बुरहाण-उल्-मुल्क हा मुर्तजा निजाम-उल्-मुल्क याचा धाकटा भाऊ होता. जेव्हा हुसेन निजाम-उल्-मुल्क मरण पावला तेव्हा निजाम-उल्-मुल्की राज्य त्याच्या मोठया मुलाकडे आले. परंतु प्रत्यक्षात मात्र सुलतानाच्या आईच्या हातात राज्य-कारभाराची सूत्रे गेली. त्यानेही त्याच्या वडिलांप्रमाणेच आपल्या सर्व मित्रांपेक्षा बुरहाणलाच अधिक जवळचे मानले. कालांतराने मतलबी व्यक्तींनी त्याच्यामध्ये आणि त्याच्या नातेवाईकात कलह निर्माण केले. परिणामी त्याने आपली आई आणि भाऊ यांना कैद केले आणि एका किल्ल्यावर पाठवून दिले. त्याचा अज्ञानीपणा आणि त्याची खुनशी वृत्ती यामुळे निष्ठावंत आणि चांगल्या व्यक्तींपासून तो दुरावला. त्याला नीच माणसांची संगत लागली आणि त्यांच्या बदसल्ल्याने त्याची मनोवृत्ती फिरली. त्याने हुसेन नावाच्या एका हलक्या कुळात जन्मलेल्या माणसाबरोबर मैत्री केली. ह्या हुसेनचा कोंबड्यांची झुंज लावण्याचा व्यवसाय होता. मूर्तजा निजाम-उल्-मुल्काने त्याला असफखान ही पदवी दिली. ह्या हलक्या कुळात जन्मलेल्या माणसाने बिदरविरुद्ध युद्धाचा उठाव केला. कंधारमध्ये दोन्ही पक्षात तुंबळ युद्ध सुरू झाले. कोणत्याही कारणाशिवाय निर्माण झालेल्या या युद्धाची बातमी दूरवर पसरली. बुरहाणने किल्लेदाराच्या मदतीने कैदेतून आपली सुटका करून घेतली आणि त्याने बंडखोरी करण्यास सुरुवात केली. परंतु त्याचे मन द्विधा होते आणि त्याचे दैव झोपी गेले होते. त्याने दुसऱ्याच्या संपत्तीवर आपली दुष्ट नजर रोखली आणि त्यांच्यावर जबरदस्ती करण्यास प्रारंभ केला. जेव्हा ह्या बंडाची बातमी निजाम-उल्-मुल्कला समजली तेव्हा तो तावडतोब पाठीमागे फिरला आणि ठरलेल्या दिवशी अहमदनगर येथे पोहोचला. बुरहाणचे अनेक लोक त्याला सोडून गेले आणि लढल्याशिवाय त्याला पळून जाणे भाग पडले. त्यानंतर तो बीजनगर (येथे विजापूर पाहिजे) येथे आदिलखानाकडे गेला. परंतु तेथे कोणत्याही तऱ्हेचा कार्यभाग साध्य न झाल्यामुळे तो एका जोग्याच्या वेषात अहमदनगर येथे गेला. तेथे तो गुप्तपणे राहिला आणि आपल्या सभोवार नीच माणसे गोळा करण्याचा त्याने प्रयत्न केला. परंतु तो अहमदनगर येथे असल्याचे उघडकीस आले आणि म्हणून त्याने **बागलाणच्या** सुभेदाराकडे पलायन केले. परंतु तेथेही डाळ न शिजल्यामुळे तो कुतुबुद्दिनखान याच्याकडे बिदर येथे गेला. बिदरहून त्याने अकबर बादशहाच्या दरबाराकडे प्रयाण केले. दरबारात मोठ्या स्नेहाने त्याचे स्वागत करण्यात आले. ( **इलियट आणि डॉसन,** खंड ६ वा, पाने ७०–७१ ) या घटनेबाबत निजामउद्दीन अहमद याच्या '**तबकाते अकबरी**' या ग्रंथात पुढील हकीकत दिली आहे :

दक्षिणेचा सुलतान मुर्तजा निजाम-उल्-मुल्क याचा भाऊ बुरहाण-उल्-मुल्क हा

आपल्या भावाकडून कुतुबुद्दिनखानाकडे पळून गेला. तेथून बादशहाकडून हुकूम आल्यामुळे तो बादशहाला भेटण्यासाठी **रज्जब** महिन्यात येऊन दाखल झाला. या अगोदर स्वतःला बुरहाण-उल्-मुल्क म्हणवून घेणाऱ्या एका इसमाने बादशहाची भेट घेतली होती आणि त्याच्याकडून जहागिरी मिळविली होती. परंतु आता जेव्हा त्या नावाची खरी व्यक्ती येऊन दाखल झाली तेव्हा तोतयाचे सोंग उघडकीस आले. तोतया बुरहाण-उल्-मुल्क याने पळ काढला आणि तो लपून बसला. परंतु एका आठवड्यातच जोगी लोकांच्या मेळाव्यात तो सापडला आणि त्याची तुरुंगात रवानगी करण्यात आली. ( **इलियट आणि डॉसन**, खंड ५ वा, पान ४२९ ).

(२४५) ▫ १५६९–७० या दोन वर्षांत मुर्तजा निजामशहाचा पोर्तुगीजांबरोबर जो संघर्ष झाला त्याची हकीकत **फरिआ-इ-सोजा** याने पुढीलप्रमाणे दिली आहे :

१५६९ च्या डिसेंबरमध्ये मूर्तजा निजामशहाचा सेनापती फरहादखान याने ८ हजार घोडेस्वार आणि २० हजार पायदळ घेऊन चेऊलला वेढा दिला. अहमदनगरचे मुख्य सैन्य मुर्तजा निजामशहाच्या अधिपत्याखाली कोकणात उतरले. ( जानेवारी १५७० ). पोर्तुगीजांच्या अंदाजाप्रमाणे या सैन्यात ३४ हजार घोडेस्वार, १ लक्ष पायदळ, १६ हजार अधिकारी, ४ हजार गवंडी, लोहार आणि इतर कामकरी, तुर्कस्थान, इराण, खुरासान आणि इथिओपिया येथील रहिवासी आणि त्याशिवाय ३६० हत्ती, असंख्य मालवाहू जनावरे आणि मोठ्या आकाराच्या ४० तोफा एवढी सामग्री होती. शत्रूसैन्यातील ४ हजार घोडेस्वारांच्या एका तुकडीने कोकणच्या किनाऱ्याने उत्तरेकडे चाल करून वसई आणि पोर्तुगीजांच्या ताब्यातील इतर ठिकाणांहून त्यांना मिळणारी रसद कापण्याचा प्रयत्न केला. यानंतर मुर्तजा निजामशहाने चेऊलवर सर्व बाजूंनी एकदम हल्ला करण्याचा हुकूम दिला. परंतु प्रत्येक ठिकाणी त्याच्या सैनिकांनी केलेले हल्ले परतवून लावण्यात आले. किल्ल्यातून २०० पोर्तुगीज सैनिक किल्ला सोडून बाहेर पडले. किल्ल्याखालील मैदानावर दोन्ही फौजात लढाईला तोंड लागले. या लढाईत निजामशहाची तीन हजार माणसे कामी आली. सरतेशेवटी दोन्ही पक्षात तह झाला. ( ब्रिग्ज, **फरिश्ता**, खंड ३, पान ५२२ )

( २४६ ) ▫ हे अधिकारी कोणते यांची नावे मात्र फरिश्ता देत नाही.

( २४७ ) ▫ ही बाग आणि त्या बागेतील राजवाडा ही अजूनही अहमदनगर येथे दृष्टीस पडतात. ही बाग **बेहिश्ती** बाग म्हणून प्रसिद्ध आहे.

( २४८ ) ▫ बुरहाण-उल्-मुल्क हा मुर्तजा निजाम उल्-मुल्काचा धाकटा भाऊ. जेव्हा हुसेन निजाम-उल्-मुल्क मरण पावला तेव्हा अहमदनगरचे राज्य त्याच्या मोठ्या मुलाकडे आले. परंतु प्रत्यक्षात मात्र राज्यकारभाराची सर्व सूत्रे राजपुत्राच्या आईच्या हाती गेली. मुर्तजाने बापाप्रमाणेच आपल्या सर्व मित्रांना बाजूस सारून बुरहाणलाच जवळ केले. परंतु कालांतराने मतलबी व्यक्तींनी मुर्तजा आणि त्याचे नातेवाईक यांजमध्ये

बेबनाव घडवून आणला. परिणामी त्याने आपली आई आणि भाऊ यांना पकडून त्यांची एका किल्ल्यावर रवानगी केली. त्याचे अज्ञान आणि खुनशी वृत्ती यामुळे तो प्रामाणिक आणि सत्प्रवृत्तीच्या व्यक्तींच्या सहवासाला दुरावला. दुष्ट प्रवृत्तिच्या माणसाबरोबर त्याची जवळीक वाढली आणि त्यांनी दिलेल्या बदसल्यामुळे त्यांच्या मनःप्रवृत्तीत तिढेपणा आला. त्याने कोंबड्यांची झुंज लावणाऱ्या हुसेन नावाच्या एका हलक्या कुळातील माणसाला आपला सवंगडी केले आणि मूर्खपणाने त्याला असफखान ही पदवी दिली. या हलकट माणसाने बिदरविरुद्ध युद्ध घडवून आणले. आणि बिदरच्या उत्तरेस ६० मैलांवर कन्धार येथे दोन्ही फौजात घनघोर युद्ध झाले. या निरर्थक संघर्षाची हकीकत सर्वदूर पसरली. परिणामी बुरहाणने किल्लेदाराच्या मदतीने आपली सुटका करून घेतली आणि बंडाळी माजविण्यास सुरुवात केली. परंतु त्याची मनःस्थिती द्विधा झाली होती आणि दैव त्याच्यावर रुसले होते. त्याने आपली हावरी दृष्टी इतरांच्या संपत्तीकडे वळविली आणि त्यांच्यावर जुलूम जबरदस्ती करण्यास सुरुवात केली. जेव्हा मूर्तजाला या बंडाळाची बातमी देण्यात आली तेव्हा तो झपाट्याने मागे फिरला आणि इच्छिल्या दिवशी तो अहमदनगरला येऊन पोहोचला. बुरहाणची अनेक माणसे त्याला सोडून पळाली आणि न लढताच पळून जाणे त्याला भाग पडले. यानंतर तो विजापूरला आदिलखानाकडे गेला. तेथे कोणताच मतलब साध्य न झाल्यामुळे एका जोग्याच्या वेषात तो अहमदनगरास गेला. तेथे तो गुप्तपणे वास करून राहिला आणि हलकट प्रवृत्तीच्या लोकांचा एक पक्ष आपल्या बाजूने उभारण्याचे त्याने प्रयत्न चालू केले. परंतु त्याच्या भानगडी उघडकीस आल्याने तो नाशिक मधील बागलाणच्या सुभेदाराकडे गेला. पण तिथेही डाळ न शिजल्यामुळे तो बिदर येथे कुतुबुद्दीन खानाकडे गेला. तेथून तो बादशाही दरबाराकडे गेला. तेथे त्याचे भव्य स्वागत करण्यात आले.

(२४९) □ मिर्जा अजीज हा पश्चिमेच्या दिशेने गेला नाही तर तो ज्या मार्गाने आला त्याच मार्गाने तो हंडियाला परत गेला अथवा वऱ्हाडच्या डोंगराच्या दिशेने जाऊन शेंदुरजणा घाट उतरून गेला असे मानण्याला भरपूर जागा आहे.

( २४९ अ ) ★ सयद अलीने फते उल्ला-इमाद-उल्मुल्क याच्या मृत्यूची तारीख चुकीची दिली आहे. त्याचा मृत्यू १५०४ या वर्षी झाला. युसुफ आदिलशहाच्या मृत्यूच्या अनेक तारखा दिल्या जातात. **तबकाते अकबरी**मध्ये इ. स. १५०७ ही त्याच्या मृत्यूची तारीख दिली आहे. मिर्जा रफिउद्दिन सिराजी आणि मिर इब्राहीम असदखान इ. स. १५११ हे वर्ष देतात. सयद अली दोघांचा मृत्यू एकाच वर्षी झाला असे सांगतो पण तारीख देत नाही. यापूर्वी आलेला त्यांच्या बाबतचा अखेरच्या उल्लेखाचे वर्ष इ. स. १५०६ हे आहे. त्यानंतर काही काळाने दोन्ही सुलतान मरण पावले. इ. स. १५०५ मध्ये कासीम बरीद मरण पावला. त्याच्या जागी त्याचा मुलगा

अमिर बरीद गादीवर आला. कासीमने बहमनींच्या राजकारणाची नाडी ओळखली होती. त्याने असे ठरविले की आपली सत्ता जर दृढ करावयाची असेल तर बहमनी सुलतानावरील आपले वजन कमी होऊ देता कामा नये. परिणामी त्याच्या मृत्यूच्या वेळी बहमनी सुलतानांचे महत्त्व पूर्णपणे कमी झाले, आणि त्यांना कोणीही त्राता उरला नाही.

इ. स. १५०८ मध्ये अहमद निजाम उल्मुल्क, युसुफ आदिल आणि फत्ते उल्ला-इमाद-उल्मुल्क हे मरण पावले.

अहमद नंतर बुरहाण, युसुफ आदिलनंतर इस्माईल आणि इमाद-उल्मुल्क नंतर अल्लाउद्दीन दर्याखान हे राज्यपदावर आले. अमिर बरीद याने आपल्या मर्जीनुसार अधिकाराच्या जागांची विभागणी केली. इस्माईल आदिल याचे वर्चस्व सहन न झाल्यामुळे त्याने सुलतानाला त्याच्याविरुद्ध चालून जाण्यास चिथावून दिले. आलंदपूर येथे दोन्ही पक्षांची गाठ पडली. सुलतान आणि राजपुत्र यांना रणांगणावर सोडून अमिर बरीद हा पळून गेला. इस्माईल आदिल याने सुलतानाला इतमामाने विजापूर येथे नेले. सुलतानाने राजधानीला जाण्याची इच्छा प्रदर्शित केल्यावर इस्माईलने त्याच्याबरोबर ४।५ हजार मोगल शिपाई देऊन त्याची रवानगी बिदर येथे केली. याचवेळी इस्माईलने आपली बहीण बिबी सिती हिला राजपुत्र अहमदबरोबर रवाना केले. ( **बदायुनी** ३, १२९ ).

(२५०) ▫ व्हेनेशियन प्रवासी सिझारे फ्रेडेरिक हा इ. स. १५८६ मध्ये अहमदनगरबद्दल पुढीलप्रमाणे लिहितो : मूर सुलतान जामाल्लुको (म्हणजे निजाम-उल्-मुल्क) हा अतिशय बलवान असून त्याच्यापाशी २ लक्ष लढाऊ सैनिक आणि प्रचंड तोफखाना आहे. त्यातील काही तोफा मोडता-जोडता येण्याजोग्या आहेत. कारण त्या आकाराने मोठ्या असल्याने एकटाक-वाहून नेण्यास कठीण पडतात. जरी या तोफा मोडता-जोडता येत असत तरी त्यातून गोलंदाजी फारच आश्चर्यजनक रितीने करता येत असे. त्यातून उडवावयाचा गोळा दगडी असून असे काही तोफगोळे एका दुर्मिळ वस्तूचे नमुने म्हणून पोर्तुगालच्या राजाकडे पाठविण्यात आले होते. सुलतान जामाल्लुको जेथे रहात असे ते गाव म्हणजे अबुकीर (म्हणजे अहमदनगर) हे होय. चेऊल बंदरापासून ते अंतर्भागात सात आठ दिवसांच्या प्रवासमार्गावर होते. (Hakluyt's Voyages, II, 345.)

(२५१) ▫ या पंथाचे बरेचसे लोक दक्षिणेत आहेत. पण या पंथाचा प्रसार काही अफगाण जमातींपुरताच मर्यादित आहे. निजाम सरकारचे मांडलिक असणारे कुर्नुल, एलिचपूर, तुळजापूर आणि इतर ठिकाणचे नवाब हे याच पंथाचे होत.

( २५२ ) ▫ तळेगांव हे गाव पुण्याच्या वायव्येस आहे. याच ठिकाणी १२ जानेवारी १७७९ मध्ये मराठ्यांनी ब्रिटिश सैन्याचा पराभव केला.

( २५३ ) □ निजामशाही घराण्याची विलोभनीय राजधानी अहमदनगर येथील एक मनोहारी ठिकाण म्हणून सलाबतखानाच्या कबरीचा उल्लेख करावा लागेल.

( २५४ ) * बुरहाण निजामशाही–दुसरा याने आपला मुलगा इस्माईलखान याच्याकडून अहमदनगरचे राज्य बळकावून घेतल्याची हकीकत अबुल फजलच्या '**अकबरनाम्यात**' पुढीलप्रमाणे दिली आहे : जेव्हा बुरहाण-उल-मुल्क याने दक्षिणेतील राज्य जिंकून घेण्याचा पहिला प्रयत्न केला आणि त्यात तो अयशस्वी झाला तेव्हा तो आपल्या जहागिरीकडे निघून गेला. यावेळी खान-ए-आजम हा गुजराथेत गेला होता, आणि शाहबाजखान हा मरण पावला होता तेव्हा तो खान-देशचा सुलतान राजा अलिखान याच्याकडे येऊन दाखल झाला. अकबर बादशहाच्या हुकुमानुसार राजा अलिखान त्याला मदत करण्याबद्दल उत्सुक होता. त्याने विजापूरच्या आदिलखानाबरोबरही असा करार केला होता. की, ते दोघेजण अहमदनगरनजीक आल्यावर आदिलखानाने विजापूरहून त्यांच्या मदतीसाठी फौजेची रवानगी करावी. त्याप्रमाणे राजा अलिखानाच्या सैन्याचे आगमन होण्याची वाट बघत फौजेची एक तुकडी सरहद्दीवर रवाना करण्यात आली. अहमदनगरचा सुभेदार जमालखान याने या दोन फौजांचा मिलाफ होऊ नये यासाठी प्रतिकार करण्याचे ठरविले. बुरहाण-उल्-मुल्क हा नजीक येण्याचे अगोदर जमालखानाने त्याचा मुलगा इस्माईल याचा पराभव केला. नंतर त्याने विजापूरच्या फौजांवर हल्ला करण्यासाठी कूच केले आणि सहजगत्या त्यांचा पराभव केला. यानंतर जेव्हा बुरहाण-उल्-मुल्क वऱ्हाडात शिरला तेव्हा त्याला महमद-उल्-मुल्क आणि इतर अमीर येऊन मिळाले. पूर्वी मिळालेल्या विजयामुळे जमालखानाला गर्व चढला होता. त्याने अविचाराने बुरहाण-उल्-मुल्कला प्रतिकार करण्यासाठी कूच केले. राजा अलिखानाने वऱ्हाडच्या अमिरांवर प्रमुख म्हणून बुरहाण-उल्-मुल्क याची नियुक्ती केली आणि जमालखानाबरोबर युद्धाला सुरुवात केली. दोन्ही फौजांत तुंबळ युद्ध झाले. परंतु बंदुकीची गोळी लागून जमालखान ठार झाला आणि त्याच्या सैन्याची वाताहत झाली. बुरहाण-उल्-मुल्क याला याप्रमाणे मोठा विजय प्राप्त झाला. त्यानंतर लवकरच त्याचा मुलगा इस्माईलखान याला कैदी म्हणून आणण्यात आले आणि त्याची रवानगी तुरुंगात करण्यात आली. खानदेशचा सुलतान सैन्याची एक तुकडी घेऊन अहमदनगरवर चाल करून गेला आणि थोड्याच कालावधित त्याने सर्व प्रदेशावर आपली सत्ता प्रस्थापित केली.

जेव्हा बुरहाण-उल्-मुल्क याला अहमदनगरचा ताबा मिळाला तेव्हा त्याला आपली कृतज्ञता आणि राजनिष्ठा दाखवून इतर राज्यकर्त्यांना आपल्या वर्तनाचा कित्ता घालून देण्याची उत्कृष्ट संधी आली होती. परंतु मिळालेल्या विजयाच्या धुंदीने त्याच्यावर पगडा बसविला. त्याच्यावर बादशहाने अनेक प्रकाराने कृपा दाखविली

होती, आणि त्याला जे उपकृत करून ठेवले होते, ते तो विसरला. त्याने आपल्या अमलाखालील प्रजेची गांजणूक केली, आणि दुसऱ्याचे वाईट करून त्यामधून तो आपला स्वार्थ साधू लागला. बुरहाणला आता जे मानाचे स्थान प्राप्त झाले होते, ते मिळवून देण्याला राजा अलिखान कारणीभूत झाला होता. बादशहाने प्रथम त्याच्याकडे आपला वकील पाठविण्याचे ठरविले. त्याच्याबरोबर आणि त्या प्रदेशातील इतर राजांबरोबर बुरहाण-उल्-मुल्क याच्या प्रदेशावर स्वारी करण्याबाबत विचार विनिमय करण्याचा निर्णय बादशहाने घेतला. वरील योजनेला त्यानी संमती दिली तर वकिलाने परतावे असे ठरले. न दिल्यास बादशाही फौजा रवाना कराव्या असे ठरले.

कविजनांचा मुकुटमणी असा जो शेख अबुल फजल फैजी याला त्यानुसार राजा अलिखान आणि बुरहाण-उल्-मुल्क यांच्याकडे रवाना करण्यात आले. (**इलियट आणि डॉसन**, भाग ६, पाने ८७-८८).

( २५५ ) ⋆ इ. स. १५९२ मधिल पोर्तुगीज आणि बुरहाण निजामशहा यांच्या संघर्षाची हकीकत **फरिया-इ-सोजा** याने पुढीलप्रमाणे थोडक्यात दिली आहे. :

बुरहाण निजामशहाने एप्रिल १५९२ मध्ये चेऊल येथे पोर्तुगीजांवर हल्ला चढविला. चेऊलच्या संरक्षणाचे उत्कृष्ट काम किल्ल्यामध्ये असलेल्या १५०० युरोपियन आणि १५०० एतद्देशीय सैनिकांनी केले. किल्ल्यावरील शिबंदीने बुरहाण निजामशहाला वेढा उठविणे भाग पाडले. निजामशाही सैन्यातील ७५ तोफा आणि ५ हत्ती पोर्तुगीजांनी काबीज केले. अहमदनगरचा सेनापती फरहादखान याची बायको आणि कुटुंबातील इतर मंडळी यांना कैद करण्यात आले. फरहादखानाच्या बायकोची दंडादाखल रक्कम पावती झाल्यानंतर सुटका झाली. परंतु फरहादखान आणि त्याची मुलगी यांनी धर्मपरिवर्तन करून लिस्बनकडे प्रयाण केले. ( ब्रिग्ज **फरिश्ता**, खंड ३, पान ५२५ ).

( २५६ ) □ पोर्तुगीज इतिहासकारांच्या वृत्तान्ताप्रमाणे ३०० माणसे वसईहून आणि २०० माणसे साष्टीहून आली. ही माणसे आणि किल्ल्यावरील शिबंदी मिळून १५०० युरोपियन आणि तितकेच एतद्देशीय सैनिक एवढी संख्या झाली. या संख्येने त्यांनी मुसलमानांवर हल्ला केला आणि त्यांच्यापैकी १०,००० सैनिकांना ठार मारले. फरहादखान सुभेदार आणि त्याची कुटुंबीय मंडळी यांना कैद करण्यात आले. त्याने आणि त्याच्या मुलीने ख्रिस्ती धर्म स्वीकारला आणि ती दोघेजण पोर्तुगालला निघून गेली. या प्रसंगी पोर्तुगीजांनी ७५ तोफा जिंकून घेतल्या.

( **फरिया-इ-सोजा**, खंड ३, भाग १, प्रकरण ८ )

( २५७ ) ⋆ बुरहाण निजामशहा आणि पोर्तुगीज यांच्यामधील युद्धाची हकीकत सय्यद अलिने पुढीलप्रमाणे दिली आहे : निजामशहाच्या ताब्यात असलेले

'हुसेनो' नावाचे जहाज मक्केहून चेऊकडे येत असताना वसईजवळ बुडाले. त्यावरील सर्व मालमत्ता वसई येथील पोर्तुगीजानी आपल्या ताब्यात घेतली. बुरहाण निजामशहाने चेऊलचा सुभेदार फहिमखान याला ती संपत्ती ताब्यात घेण्याचा हुकूम केला. त्याने झालेली हकीकत निजामशहाला कळविली. निजामशहाने पोर्तुगीजांवर हल्ला करण्याचे ठरवून चेऊलजवळील कोल्र्याच्या टेकडीवर एक किल्ला बांधण्याचे ठरवून चेऊलकडील पोर्तुगीजांची वाट बंद करण्याचे ठरविले. या मोहिमेवर फरहादखान हवशी याची नेमणूक करण्यात आली. सैन्याचा **सरनौबत** म्हणून एतिमादखान याला नेमण्यात आले. सैन्यामध्ये शुजातखान, ताजखान, बजलाखान, बहादूरखान, नसिर उल्मुल्क, अण्णेराव, कामिलखान, शुष्तबाखान आणि शेख फरीद राजा वगैरे अधिकारी होते. तोफखान्याचा अधिकारी रुम्मीखान हा होता. **शाबान** महिन्याच्या दोन तारखेस ( २ मे १५९३ ) निजामशाही फौजांनी रेवदंड्याच्या दिशेने कूच केले. सय्यद अली, पोर्तुगीज आणि बुरहाण निजामशहा यांच्यामधील युद्धाची आणि या युद्धात बुरहाण निजामशहाचा जो पराभव झाला त्याची हकीकत देत नाही. याचे कारण उघड आहे—सय्यद अली हा बुरहाण निजामशहाचा आश्रित होता. साहजिकच बुरहाण निजामशहाच्या पराभवाची हकीकत देण्याचे त्याने टाळले आहे. ( **अ. नि.** पाने २७६--२७९ ).

( २५८ ) ★ याबाबत पोर्तुगीज इतिहासकार असे सांगतात की वसईहून ३०० माणसे आणि साष्टीहून २०० माणसे पोर्तुगीजांच्या मदतीसाठी आली. ही माणसे आणि शिबंदी मिळून एकंदर १५०० फिरंगी आणि जवळजवळ तितकेच एतद्देशीय शिपाई यांनी मुसलमानांवर हल्ला केला आणि १०,००० मुसलमानांना ठार मारले. किल्लेदार फरहादखान आणि त्याच्या कुटुंबातील माणसे कैद झाली. तो आणि त्याच्या मुली यांनी ख्रिश्चन धर्म स्वीकारला आणि पोर्तुगालकडे प्रयाण केले. याप्रसंगी अहमदनगरच्या ७५ तोफा काबीज करण्यात आल्या. (*Fari-e-Souza, III*, Part I) Chapter 8 in Brigg's *Ferishta*, III, 285 Foot-note)

( २५९ ) ▫ मौअलीद या शब्दाचा अर्थ हिंदुस्थानात जन्मलेला परदेशी मुसलमान. या जातीतील बहुतेकांच्या आया भारतीय होत्या.

(२६०) ( २६१ ) ★ दुसरा बुरहाण निजामशहा मरण पावल्यानंतर इब्राहीम निजामशहा आणि आदिलशहा यांच्यामध्ये झालेल्या युद्धाची थोडीशी हकीकत अबुल फजल याने आपल्या '**अकबर नामा**' या ग्रंथात दिली आहे ती अशी :

बादशहाने आपली कृपादृष्टी दक्षिण देशावरून काढून घेतली. त्या वेळेपासून त्या देशावर संकटाची परंपरा कोसळली आणि असंतोष धुमसू लागला. निजाम-उल्-मुल्क बुरहाण हा मरण पावला होता आणि त्याचा मुलगा इब्राहीम हा गादीवर

आला होता. त्याने कुमार्गाचा अवलंब केला. त्याच्या विरुद्ध विजापूरहून एका फौजेच्या तुकडीने कूच केले. १६ अमुरदाद या दिवशी अहमदनगरपासून ४० मैलांवर अहमदनगर आणि विजापूर यांच्या सैन्यात युद्ध झाले. या युद्धात बाण लागून इब्राहीम मरण पावला. विजयी झालेले विजापूरचे सैन्य परत फिरले आणि निजाम-उल्-मुल्की सैन्याची वाताहत होऊन ते इतस्ततः पांगले.

(२६२) * खानदेशचे राज्य खालसा केल्यानंतर खानखानानने दक्षिणेच्या मोहिमेवर निघण्यासाठी कूच केले. या मोहिमेची पहिली पायरी म्हणजे अहमदनगरला वेढा देण्याची होती. त्यावेळी त्या प्रांताची राज्यकर्ती चांदबिबी होती. तिने अकबराला वऱ्हाडचा प्रदेश तोडून देऊन तह केला. ( *Maasir-i-Rahimi* in Elliot and Dowson VI, 241 ) निजामउल्मुल्काची बहिण चांदबिबी हिने बराच काळपर्यंत किल्ल्याच्या संरक्षणार्थ लढा दिला. मोगलांनी किल्ल्याला जेव्हा वेढा दिला तेव्हा मोगल फौजेतील दुफळीमुळे किल्ल्याची शरणागती टळली. ( Faizi Sirhindi's *Akbarnama*, Elliot and Dowson, VI, 144 ).

( २६३ ) * मोगल आणि दक्षिणेतील सुलतान यांच्यामध्ये जो संघर्ष झाला त्याची हकीकत अबुल फजल याने आपल्या '**अकबर नामा**' या ग्रंथात दिली आहे. ती पुढीलप्रमाणे :

अहमदनगरचे प्रकरण आणि इतर काही दुर्दैवी घटना यामुळे दक्षिणेमधील सैन्याची अतिशय नामुष्की झाली होती. साहजिकच बादशाही फौजांचा प्रतिकार करून आपले अपयश धुवून काढावे अशी दक्षिणेतील सेनानींच्या मनात इच्छा उत्पन्न झाली. बादशाही सैन्याचे अधिपत्य शहा मुराद याच्याकडे होते. युद्ध करावे असे त्याचे मत होते. परंतु सैन्यातील अनुभवी अमिरांनी त्याला विरोध दर्शविला, आणि तो सतत चालू ठेवला. अखेर मिर्जा शाहरूख याची सेनापतीपदावर नेमणूक करण्यात आली आणि खानखानान व इतर प्रतिष्ठित उमराव यांना वेगवेगळ्या कामगिरीवर पाठविण्यात आले. युद्धसामुग्रीचे पेटारे, हत्ती आणि तोफखाना यांचा बंदोबस्त करण्यात आला आणि इतर सर्व गोष्टींचीही व्यवस्था लावण्यात आली. मिर्जा शाहरूख आणि खानखानान यांच्याकडे सेनेच्या मध्य विभागाचे अधिपत्य देण्यात आले, मोगल सैन्याने शहापूरमधून कूच केले आणि पाथरीपासून १२ कोसावर आपले मोर्चे दिले.

शत्रूने देखील युद्धाची तयारी केली. निजामउल्मुल्क याचे सैन्य मध्यभागी होते, आदिलशाही फौज सैन्याच्या उजव्या फळीवर आणि कुतुब-उल्-मुल्क याचे सैन्य डाव्या फळीवर होते. २८ **बहमन** या दिवशी दिवसाचा १ प्रहर उलटल्यावर गंगनदी ( गोदावरी ) पार करण्यात आली. शत्रूच्या उजव्या फळीवर हल्ला करण्यात आला आणि युद्धाला तोंड लागले. परंतु शत्रूने सक्त प्रतिकार करून पाय रोवून धरले

आणि मोगलांवर सतत तोफांचा भडिमार चालू ठेवला. दोन्ही बाजूच्या सैनिकांनी शौर्याची शर्थ केली. युद्ध बराच काळपर्यंत आणि अतिशय तुंबळ असे झाले. शत्रू संख्येने अधिक होता. त्याने केलेल्या तोफखान्याच्या जबरदस्त माऱ्यामुळे बादशाही फौजांना जरब बसली आणि त्यांचे मनोधैर्य डळमळू लागले. जगन्नाथ आणि इतर अनेक रजपूत यांनी परिस्थितीचो सूत्रे ताब्यात घेतली. ते रेसभरही सरले नाहीत. तिकडे आदिलखानी सेनेने खानदेशच्या राजा अलीखानावर हल्ला चढविला. त्याने मोठ्या निकराने प्रतिकार केला. शौर्याने लढता लढता त्याला मृत्यू आला. त्याच्या-बरोबर त्याचे ३५ नावाजलेले अधिकारी आणि ५०० एकनिष्ठ सैनिक हेही ठार झाले.

मिर्जा शाहरूख आणि खानखानान व त्याचप्रमाणे सय्यद कासीम आणि इतर अधिकारी हे आपापल्या युद्धकक्षेत विजयी झाले होते. शत्रूची अशी समजूत झाली होती की, खानदेशचा अधिपती हा मोगल सेनेच्या मध्यभागी आहे आणि त्याच्याबरोबर मिर्जा शाहरूख आणि खानखानान यांचाही पराभव झाला आहे. रात्रीच्या भयाण काळोखात आपल्या पक्षाला विजय मिळाला आहे अशा समजुतीने दोन्ही बाजूची सैन्ये युद्ध न करता समोरासमोर नुसती उभी राहिली होती. रात्रीच्या वेळी इतस्ततः विखुरली गेलेली सैन्याची पथके आपापल्या सेना विभागांना येऊन मिळाली. खानदेशचा राजा अलीखान शत्रूला जाऊन मिळाला आहे अशी मोगल सेनेची समजूत होऊन त्यांनी त्याचे सामानसुमान लुटले. आघाडीवर असलेला द्वारकादास आणि डाव्या फळीवरील सय्यद जलाल यांनी निलवीकडे माघार घेतली. रामचंद्र हा राजा अलीखानाच्या सैनिकांबरोबर शत्रूशी अतिशय शौर्याने लढला होता. त्याला वीस जखमा झाल्या होत्या. रात्रीच्या वेळी जखमी झालेल्या सैनिकांच्या मध्येच तो राहिला. काही दिवसांनी तो मरण पावला.

जेव्हा सकाळ झाली तेव्हा केवळ सात हजाराच्या संख्येने असलेल्या मोगल सेनेला आपल्यासमोर पंचवीस हजार शत्रू सैनिक खडे असल्याचे आढळून आले. रात्रभर तहानेने त्यांचे प्राण व्याकुळ झालेले होते. त्यांनी आता सुगाम नदीकडे मोर्चा वळविला. शत्रूची अवस्थाही संभ्रमित अशी होती. या लष्करी हालचालीमुळे शत्रू सैनिकांचा धीर सुटला आणि त्यांनी पलायन केले. त्यांनी फारच थोडा प्रतिकार केला. बऱ्याच काळ चाललेल्या संघर्षामुळे मोगल सैनिक मेटाकुटीला आलेले होते, आणि पाठलाग करणे त्यांच्या आवाक्याबाहेरचे होते. मोहिमेच्या सुरुवातीला बादशाही सैनिकांची संख्या फक्त पंधरा हजार होती तर शत्रूची संख्या साठ हजार एवढी होती. तरी देखील त्यानी मोठा विजय मिळविला आणि शत्रूचे चाळीस हत्ती आणि पुष्कळ तोफखाना काबीज केला. (**इलिएट आणि डॉसन**–खंड ६, पाने ९५–९६)

(२६४) ★ अकबर बादशहाच्या कारकीर्दीत मोगलांचा दक्षिणेतील शाह्यां-

बरोबर जो संघर्ष झाला, त्याची हकीकत अबुल फजल याच्या '**अकबर नामा**' या ग्रंथात पुढीलप्रमाणे आली आहे.

पूर्वी दिलेल्या हुकमानुसार राजपुत्र मुराद याने दक्षिणेवरील स्वारीची तयारी केली. परंतु खान खानान याची माणसे संथपणाने जमल्यामुळे त्याला मात्र उशीर झाला. तो राजपुत्र मुराद याला येऊन मिळण्याचे अगोदर त्या दोघांमध्ये थोड्याफार मतभेदाला सुरुवात झाली. राजपुत्राची अशी इच्छा होती की, सर्व सेनाप्रमुखानी त्याला येऊन मिळावे आणि नंतर गुजराथेतून दक्षिणेकडे कूच करावे. याउलट सेनाप्रमुख खान खानान याचे असे मत होते की, माळव्यातून दक्षिणेकडे चाल करून जावे. त्या दोघांच्या मतामध्ये अशा तऱ्हेने फरक पडल्यामुळे २० **आबान** या दिवशी राजपुत्राने अहमदाबादेहून कूच केले आणि आपल्याला आणखी सैनिक येऊन मिळतील या अपेक्षेने त्याने काही काळ भडोच येथे मुक्काम केला. २२ खुर्दाद या दिवशी त्याने भडोच सोडले. खान खानान सैन्य जमविण्यासाठी भिलसा या ठिकाणी काही काळ राहिला. भिलसा हे त्याच्या इक्तयामध्ये होते. ह्यामुळे राजपुत्राला अतिशय संताप आला आणि त्याने त्याला आपल्याला येऊन मिळण्यासंबंधीचा निरोप पाठविला. खानखानानने राजपुत्राला उत्तर दिले की, " खानदेशच्या अधिपतीने जी फौजेची तुकडी पाठविण्याचे मला वचन दिले आहे ती मला येऊन मिळाल्याबरोबर मी तुम्हाला येऊन मिळेन. दरम्यान तुम्ही गुजराथेमध्ये शिकारीच्या सुखाचा उपभोग घ्यावा. " या उत्तराने राजपुत्र भयंकर संतापला. त्याच्या खुशमस्कऱ्याने त्याच्या संतापात भर घातली. त्याने आपल्या सैन्यासहित अहमदनगरकडे कूच केले.

सैन्यातील प्रमुख अमीर आणि राजा अलीखान यांचे मत राजपुत्रासारखेच होते. त्याची जेव्हा खान खानान याला कल्पना आली तेव्हा त्याने आपली फौज, तोफखाना आणि हत्ती हे मिर्जा शाहरुख आणि इतर अमीर यांच्या ताब्यात दिले आणि तो स्वतः राजा अलीखानाला बरोबर घेऊन राजपुत्राला भेटण्यासाठी घाईघाईने निघाला. १९ **आजुर** या दिवशी अहमदनगरपासून तीस कोसावर असलेल्या चाँद या किल्ल्यापाशी तो राजपुत्राला भेटला. ही भेट तितक्याशा प्रसन्न वातावरणात झाली नाही. बराच काळ बोलणी झाल्यावर दरबार भरविण्यात आला. त्यानंतर जेव्हा सैन्याने कूच केले तेव्हा एकीचा संपूर्ण अभाव होता. खान खानानजवळ मोठे सैन्य होते. परंतु आपला अपमान झाला आहे अशी त्याची समजूत होती. त्यामुळे चाललेल्या एकंदर घडामोडींपासून तो अलिप्त राहिला. सादिक खानाने शहाबाजखानाबरोबर असलेले आपले एक जुने भांडण उकरून काढले आणि दरबारात तो क्वचितच हजेरी लावू लागला. ८ तारखेला शहरापासून अर्ध्या कोसावर सैन्याने छावणी केली आणि त्या दिवशी खान खानान आणि शहाबाजखान हे शहराकडे गेले. त्यांच्या निष्काळजीपणामुळे शत्रूने फौजेच्या सामानसुमानावर हल्ला चढविला. मोठ्या कष्टाने

तो हल्ला परतवून लावण्यात आला. मोगल सैन्यातील असलेले मतभेद जेव्हा उघड्यावर आले तेव्हा शहरातील लोकांना अधिकच उत्तेजन मिळाले. ८ तारखेला किल्ल्याला वेढा घालण्यात आला. बुरहाणची बहीण चांदबिबी हिने प्रतिकाराची तयारी केली. राजपुत्र अहमद याला त्यांनी अगोदरच पळवून नेल्यामुळे इखलासखान हा मोती नावाच्या एका मुलाला घेऊन अहमदनगर येथे आला. परंतु त्याचा पराभव होऊन तो पाटणकडे पळाला.

बादशहाचे सैन्य नजीक आल्यावर मुख्य वजीर मंजू हा खजिन्याचा थोडासा भाग आणि काही हत्ती बरोबर घेऊन अहमदसह विजापूरकडे निघून गेला. तो पकडला जाण्याच्या बेतात होता. योग्य तऱ्हेचा दारूगोळा उपलब्ध न झाल्यामुळे किल्ल्याचा वेढा लांबला. आपल्याला कैद केले जाईल याची चांदबिबीला भीती वाटत होती. परंतु तिला जेव्हा हल्लेखोरांच्या परिस्थितीबद्दल माहिती देण्यात आली तेव्हा शहराचे संरक्षण करण्यासाठी तिला स्फूर्ती आली. ९ तारखेला शहा अलि आणि अभंगखान यानी मोठे सैन्य घेऊन रात्रीच्या वेळी खान खानानच्या मोर्च्यांवर हल्ला चढविला. परंतु तेथील सैनिक मोठ्या शौर्याने लढले. हल्लेखोरांपैकी अनेकांना त्यांनी ठार मारले आणि हल्ला परतवून लावला. शत्रूच्या पराभवाचा फायदा घेऊन जर का मोर्चातील सैनिकांनी त्यांचा पाठलाग केला असता तर पळून जाणाऱ्या हल्लेखोरांबरोबर त्यांना कदाचित किल्ल्यात प्रवेश करता आला असता आणि किल्ल्याचा पाडाव झाला असता.

किल्ल्याची सक्त नाकेबंदी आणि रसदीचा तुटवडा याचे परिणाम किल्ल्यातील शिबंदीवर दिसून येत होते. १३ तारखेला शत्रूने छावणीवर अयशस्वी हल्ला केला. १६ तारखेला गुजराथेकडून एक तांडा नजीक आला, परंतु सादतखानाने तो तांडा लुटला. १९ तारखेला शेर ख्वाजा, शेख दौलत, कामरान बेग आणि दौलतखान यांना सैन्यासहित पाटणकडे पाठविण्यात आले. त्यांनी इखलासखानाचा पराभव केला आणि अधिक लूट मिळविण्याच्या आशेने त्यांनी पाटण येथील रहिवाशांना लुटले. मोगल सेनापतीकडून यापूर्वीच पाटण शहराला अभयदान मिळाले होते. इस्फंदरमज महिन्याच्या ११ तारखेला तटबंदीचा एक भाग मोडून काढण्यात आला. राजपुत्राच्या मोर्चापासून एक सुरुंग काढण्यात आला आणि तो किल्ल्याच्या तटबंदीखालून बाहेर नेण्यात आला. त्यात दारू भरण्यात आली होती. सुरुंगाचा स्फोट करण्यात आला. या स्फोटामुळे तटबंदीचा तीस गज लांब इतका भाग कोसळून पडला. हल्ला करण्यासाठी सैनिक तयार होते. परंतु शहाबाजखानाच्या मोर्चापासून तटबंदीपर्यंत नेण्यात आलेला एक सुरुंग किल्ल्यावरील शिबंदीने शोधून काढला आणि त्यातील दारू त्यांनी काढून घेतली. चिनोडला मोगल सैनिकांवर जे अरिष्ट कोसळले होते त्याचीच पुनरावृत्ती होईल अशी भिती वाटून हल्ला करण्यासाठी निघालेले लोक तेथेच थांबले.

त्यामध्ये बराच विलंब झाला. दिवसाच्या छाया जाऊन अंधार पडला. रात्रीच्या वेळी किल्ल्यावरील शिबंदीने तटाला पडलेले भगदाड बुजवून टाकले. परंतु वेढा घालून बसलेल्या सैनिकांच्या हालचालीमुळे किल्ल्यावरील शिबंदी नाउमेद झालेली होती. त्यांनी तहाची बोलणी सुरू केली. बुरहाण उल्-मुल्कच्या मुलाचा मुलगा बहादूर याला निजाम उल्-मुल्क ही पदवी देऊन सिंहासनावर बसविण्याचे आणि मोगल सम्राटांचे मांडलिकत्व स्वीकारण्याचे त्यांनी कबूल केले. अहमदनगरच्या प्रदेशाचे राज्य त्याला देण्यात यावे आणि वऱ्हाडचा प्रांत बादशहाला तोडून देण्यात यावा ह्या अटीला त्यांनी कबुली दिली. हिरे, उत्तमोत्तम हत्ती आणि इतर वस्तू खंडणी म्हणून बादशहाकडे पाठविण्यात याव्या असे ठरले. अहमदनगर येथील परिस्थिती अतिशय नाजूक झाली होती. अन्नसामुग्रीचा अतिशय तुटवडा पडला होता. ही परिस्थिती ध्यानात घेतल्यानंतर देखील वरील अटींना मान्यता देण्यात आली आणि १७ **इस्फंदर मज** या दिवशी तहावर सह्या करण्यात आल्या. ( **इलिएट आणि डॉसन**-खंड ६, पाने ९२–९४ )

( २६५ ) ◻ खान खानानच्या छावणीचे नष्ट झालेले अवशेष अजूनही जालना शहराच्या दक्षिणेकडे असलेल्या सरोवरापाशी सापडू शकतात.

( २६६ ) ◻ अबुल फजल हा **अकबर नामा, ऐन-इ-अकबरी** आणि त्याने लिहिलेली पत्रे यासाठी प्रसिद्ध आहे. ही पत्रे म्हणजे हिंदुस्थानात सर्वमान्य पत्रव्यवहाराचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून गणली जातात.

( २६७ ) ◻ अकबर बादशहाने अबुल फजल याला दक्षिणेत पाठविले. त्याबद्दलची हकीकत अबुल फजल स्वतः देतो ती पुढीलप्रमाणे आहे :

बादशहा पंजाबमधून परतल्यानंतर त्याने राजधानीला भेट न देता दक्षिणेत तसेच कूच करून जाण्याचा बेत केला. परंतु राजपुत्राचे आगमन न झाल्यामुळे त्याचे मन चिंताग्रस्त झाले होते आणि त्यातच राजपुत्रासंबंधी अनेक वदंता त्याच्या कानावर घालण्यात आल्या होत्या. तेव्हा त्याने मुत्सद्दीपणाचा एक डाव म्हणून मुक्काम करण्याचे ठरविले आणि पुन्हा एकदा राजपुत्रांना आपल्या समक्ष बोलावू पाठविले. त्या महिन्याच्या २५ तारखेला मला ( अबुल फजल ) दक्षिणेत जाण्याचा आणि बरोबर राजपुत्र सुलतान मुराद याला घेऊन येण्याचा हुकूम मिळाला. जर का दक्षिणेतील अमिरांची तेथील राज्यकारभार बघण्याची तयारी असली तर त्याप्रमाणे त्यांच्याकडे व्यवस्था सोपवून राजपुत्रासह मी निघून यावे असे मला सांगण्यात आले. परंतु अमिरांची तशी तयारी नसल्यास मी राजपुत्राला दरबारात पाठवावे आणि दक्षिणेत राहून तेथील अधिकाऱ्यांच्या सहकार्याने मिर्जा शाहरूख याला पाठिंबा द्यावा अशी मला आज्ञा देण्यात आली. मिर्जाला सैन्यभरती करून ते सुसज्ज करणे सोपे जावे म्हणून माळव्याचा प्रांत त्याला तोडून देण्यात आला एक

ध्वज आणि नौबत त्याला बहाल करण्यात आली. त्याचप्रमाणे जेव्हा जरूर पडेल तेव्हा त्याने दक्षिणेत परतावे अशी आज्ञा त्याला देण्यात आली. ( **इलिएट आणि डॉसन**, खंड ६, पाने ९६–९७ )

(२६८) ▫ दक्षिणेच्या इतिहासाची नायिका आणि दंतकथांचा कथाविषय म्हणून चांदबिबीचा उल्लेख करावा लागेल. खाफीखान सुद्धा असे सांगतो की तिने मोगल छावणीवर रुप्यांच्या गोळ्यांचा भडिमार केला. अहमदनगरमध्ये प्रचलित असलेली रूढ आख्यायिका अशी की जेव्हा चांदबिबीजवळचा दारूगोळा संपला तेव्हा तिने आपल्या तोफेत तांबे, रूपे आणि सोने यांची नाणी भरली आणि जेव्हा तिच्यावर स्वतःजवळील हिरे तोफेत घालून उडविण्याची पाळी आली तेव्हाच ती तहाच्या वाटाघाटींना तयार झाली. ( Elphinstone's *History*, 456 ). कर्नल मेडोज टेलरच्या मते अहमदनगर आणि विजापूर येथे चांदबिबीइतके दक्षिणेतल्या इतर कोणत्याही मुसलमान राजकन्येचे चारित्र्य आणि वीरकृत्ये ही आपल्या तेजाने तळपली नाहीत. लोकांमध्ये ज्या अनेक गोष्टी प्रचलित आहे त्यापैकी अहमदनगर शहराचे चांदराणीने जे मोठ्या धाडसाने रक्षण केले त्याबाबतच्या कथेइतकी दुसरी कोणतीच गोष्ट लोकांना प्रिय नाही. हिंदुस्थानच्या इतिहासात अत्यंत आणीबाणीचे प्रसंगी उच्च पदस्थ स्त्रीने आपल्या अंगचे राजकीय चातुर्य, असामान्य मनोधैर्य आणि असीम स्वावलंबन दाखविल्याची जी उदाहरणे आहेत त्यापैकी एक असा चांदबिबीचा उल्लेख करावा लागेल. बहुधा एका पारशी चित्रकाराने रंगविलेले तिचे चित्र विजापूर येथे आहे. उत्कृष्ट कलेचा नमुना आणि चांदबिबीची खरीखुरी प्रतिकृती म्हणून या चित्राचा उल्लेख करावा लागेल. त्या चित्राच्या एका बाजूवरून ती उजळरंगाची, निळे अथवा करडे डोळे असलेली, धारधार नासिकाग्र आणि बांधेसुद अवयव असलेली, स्त्रीत्वाच्या कोमलपणाबरोबर निग्रही स्वभाव असलेली आणि उमदा आणि रेखीव आकृतीची तरुणी असावी असे दिसते. ( *Architecture of Bijapur* 36 ).

( २६९ ) ▫ अहमदनगरचा पाडाव झाल्यानंतर अहमदनगरमध्ये झालेल्या घडामोडींची अबुल फजलने दिलेली हकीकत पुढीलप्रमाणे आहे :

जरी बादशाही फौजांपुढे अहमदनगरचा पाडाव झाला होता तरी धान्याचा तुटवडा पडल्यामुळे मोगल सत्ता थोड्याच काळात दुर्बळ झाली. राज्यातील विघ्न-संतोषी लोक एकत्र जमा झाले आणि त्यांनी बंडाचे निशाण उभारले. त्यांनी शहा अलीचा मुलगा आणि मुर्तजा निजाम-उल्-मुल्क याचा चुलता अली याला आपला पुढारी म्हणून नियुक्त केले. अहमदनगरचा सेनापती या पदावर खानखानान याची नेमणूक करण्यात आली आणि मला नाशिक येथे जाण्याचा हुकूम देण्यात आला. परंतु नाशिक येथे जाणे मला शक्य झाले नाही. कारण शहा अलीच्या मुलाविरुद्ध माझी रवानगी करण्यात आली. या गोष्टीला साहजिकच अधिक महत्त्व होते. मागील

वर्षाच्या **इस्फन्दर मज** महिन्यात मी वरणगांव नजीक खान खानानला येऊन मिळालो होतो. परंतु दरम्यान बातमी आली की आदिलखान विजापुरीचा एक प्रतिष्ठित मांडलिक पाच हजार घोडेस्वार आणि बारा हजार पायदळ एवढे सैन्य घेऊन अहमदनगरवर चाल करून येत आहे. त्याच्या हालचालीवर नजर ठेवणे खानानला आवश्यक वाटल्यामुळे त्याने जालनापूरकडे कूच केले आणि शहा अलीच्या मुलाविरुद्ध चालून जाण्यासाठी मला मागे ठेवले. २७ तारखेला मी गंगानदीच्या (गोदावरी) किनाऱ्यावर पोचलो. २९ तारखेला अहमदनगर राज्यातील कालना (गाळणा) या प्रमुख किल्ल्याचा मी ताबा घेतला. याचवेळी बादशाही फौजांचा सेनापती अली मर्दानखान याचा तेलंगणात पराभव होऊन त्याला कैद करण्यात आले. यानंतर या बंडाचा बिमोड करण्याकडेच माझ्या सर्व हालचालींचा रोख होता. मी माझ्या मुलाला १२०० घोडेस्वार देऊन शत्रूवर रवाना केले. **खुर्दाद** महिन्याच्या ६ तारखेला त्याने शत्रूचा पराभव केला. शत्रूच्या चारशे सैनिकांना त्याने ठार केले आणि अनेकांना जखमी केले. (**इलिएट ॲण्ड डॉसन**, खंड ६, पाने १०१–१०२)

(२७०) ◻ दुसऱ्या बुरहाण निजामशहाच्या मृत्यूनंतर अहमदनगरमध्ये झालेल्या घडामोडी आणि मोगलांची दक्षिणेवरील स्वारी याची फरिश्त्याने अकबर बादशहाच्या इतिहासात जी हकिकत दिली आहे तिचा पुढे थोडक्यात अनुवाद दिला आहे :

दुसऱ्या बुरहाण निजामशहाचा मुलगा इब्राहीम निजामशहा हा आदिलशहा-बरोबर झालेल्या लढाईत मारला गेला. अहमदनगरचा वजीर मियाँ मंजू याने अहमद नावाच्या एका मुलाला सिंहासनावर बसविले. ही गोष्ट अहमदनगरच्या अमिरांना पसंत न पडल्याने त्यांनी बंड केले आणि मियाँ मंजू याला अहमदनगर येथे कोंडले. या परिस्थितीला तोंड देणे अशक्य झाल्याने मियाँ मंजूने आपली माणसे अहमदाबाद येथे राजपुत्र सुलतान मुराद याजकडे पाठवून त्याच्या मदतीची याचना केली आणि त्याला अहमदनगरचा किल्ला देण्याचे कबूल केले. मुरादने ही विनंती आनंदाने मान्य केली आणि झपाट्याने दक्षिणेकडे कूच केले. दरम्यान मोगल सेनापती मिर्जाखान याला ही बातमी कळली तेव्हा त्याने माळव्याचा सुभेदार शहारूख, शहाबाजखान कंबु, राजा जगन्नाथ, राजा दुर्गादास, राजा रामचंद्र आणि इतर सरदार यांच्याबरोबर दक्षिणेकडे कूच केले. त्याने खानदेशचा सुलतान राजा अलीखान याचे मन ६००० घोडेस्वार घेऊन मोगलांना येऊन मिळण्याबद्दल वळविले. सर्व मोगल फौजा गाळणा येथे एकत्रित झाल्या आणि त्यांनी मजल दरमजल करीत अहमदनगरकडे कूच केले.

दरम्यान मियाँ मंजूने अहमदनगर येथील बंडाचा मोड केला होता. त्याला मोगलांना बोलाविल्याबद्दल आता पश्चात्ताप झाला होता. त्याने अहमदनगरच्या रक्षणाची तयारी केली. रक्षणाचे काम त्याने चांदबिबीवर सोपविली, आणि स्वतः

उरलेली फौज घेऊन विजापूरच्या सरहद्दीच्या दिशेने कूच केले. मुराद आणि मिर्जाखान हे आता मित्र म्हणून येत नसून शत्रू म्हणून अहमदनगरला वेढा देण्यासाठी येत होते. **हिजरी** १००४ या वर्षीच्या **रबी उस्सानी** (नोव्हेंबर १५९५) महिन्यात मोगलानी अहमदनगरला वेढा दिला आणि किल्ल्यासभोवार आपले मोर्चे उभारले. चांदबिबी मोठ्या शर्थीने मोगलांना प्रतिकार करीत होती. तिने इब्राहीम आदिलशहा आणि कुतुबशहा यांच्याकडे मदतीची याचना केली. वेढा तीन महिने चालल्यानंतर मोगलांनी किल्ल्याच्या तटापर्यंत पाच सुरुंग नेले. त्यातील दोन किल्ल्यातील शिबंदीने निकामी केले. राजपुत्र मिर्जा आणि सादिक महमदखान यांचे मिर्जाखानाबरोबर वैमनस्य होते. **रज्जब** महिन्याच्या १ ल्या तारखेला (१७ फेब्रुवारी) त्याने मिर्जाखानाला न कळविता मोर्चांवर चाल केली आणि सुरुंगाना बत्ती दिली व किल्ल्याची पन्नास गज तटबंदी उद्ध्वस्त झाली. किल्ल्यातील शिबंदीने दोन सुरुंग निकामी केलेले आहेत हे माहीत नसल्याने त्यांचा स्फोट होईल याची वाट बघत मोगल सैनिक बसले असता दरम्यानच्या काळात किल्ल्यातील शिबंदीने तटाला पडलेल्या खिंडारांचा शर्थीने बचाव केला. चांदबिबी बुरखा घेऊन त्याठिकाणी हजर झाली. शत्रूवर तोफांचा भडिमार करण्याची तिने आज्ञा दिली. अनेकवार शत्रूनी केलेले हल्ले परतवून लावण्यात किल्ल्यावरील शिबंदीला यश आले. रात्रीच्या वेळी तिने आपल्या समक्ष तटाची दुरुस्ती करून नऊ फुटाएवढे भगदाड भरून काढले. दरम्यान अशी बातमी आली की आदिलशाही सरदार सुहेलखान कुतुबशाही फौजेसहित मोगलांचा वेढा उठविण्यासाठी सत्तर हजार फौज घेऊन येत आहे. त्याचवेळी मोगल सैन्यात अन्नधान्याचा तुटवडा पडला. तेव्हा राजपुत्र मुराद आणि मिर्जाखान यांनी तहाच्या वाटाघाटी करणे उचित आहे असा विचार केला. दोन्ही पक्षात असे ठरले की, वऱ्हाडचा ताबा मोगलांकडे जावा आणि उरलेल्या प्रदेशावरील बहादूरशहाचे (दुसऱ्या बुरहाण निजामशहाचा नातू) स्वामित्व मोगलांनी मान्य करावे. तहाच्या मसुद्यावर सह्या झाल्यावर राजपुत्र मुराद आणि मिर्जाखान यांनी वऱ्हाडाकडे कूच केले. तेथे बाळापूर नजीक त्यानी शहापूर या गावाची बांधणी केली आणि तेथे आपली लष्करी छावणी केली.

मोगल फौजा निघून गेल्यावर चांदबिबीने राज्याची सूत्रे बहादूर निजामशहाच्या स्वाधीन केली. त्याने राज्याचे सर्व अधिकार नेहंगखान आणि इतर उमराव यांच्याकडे सोपविले. त्यानी चांदबिबीच्या सल्ल्याविरुद्ध आणि नुकत्याच झालेल्या कराराचा भंग करून मोगलाना वऱ्हाडामधून हुसकावून लावण्यासाठी पन्नास हजार घोडेस्वार घेऊन उत्तरेकडे चाल केली. इकडे खानखानान याने राजपुत्र मुराद आणि सादिक महमद यांना शहापूर येथे ठेवले, आणि वीस हजार घोडेस्वार बरोबर घेऊन राजा अलीखान फारुकीसह वरील फौजेला गोदावरी नदीच्या तीरावर तोंड देण्यासाठी त्याने कूच केले.

सुपा या खेड्याजवळ पोहोचल्यानंतर एकंदर परिस्थितीची जाणीव करून घेण्यासाठी आणि शत्रूची ताकद अजमाविण्यासाठी खानखानानने तेथे काही दिवस मुकाम केला. नंतर त्याने नदी पार करून दक्षिण तीरावर आपले सैन्य खडे केले. हिजरी १००५ या वर्षी जमादिल आवाल या महिन्याच्या १७ तारखेला इब्राहीम आदिलशहाचा अधिकारी सुहेलखान याने दक्षिणी फौजांचे अधिपत्य आपल्याकडे घेतले व मोगल फौजांसमोर तो युद्धासाठी सज्ज झाला. सैन्याच्या मध्यभागी आदिलशाही स्वार होते, उजव्या बाजूला निजामशाही स्वार आणि डाव्या बाजूला कुतुबशाही स्वार होते.

मोगल सैन्याच्या मध्यभागी खानखानानने आपली जागा मुक्रर केली. खानदेशचा राजा अलीखान आणि राजा रामचंद्र यांनी दक्षिणी फौजांवर चढाई केली. मोगलांचा पहिला मारा इतका जबरदस्त होता की त्यांनी दक्षिणी फौजांची आघाडी मोडून काढली आणि ते सुहेलखानावर तुटून पडले. परंतु या ठिकाणी त्यांच्यावर तोफखाना, बंदुका आणि हातगोळे यांचा जबरदस्त भडिमार झाला. मोगल सैन्यात भयंकर कत्तल होऊन राजा अलीखान, राजा रामचंद्र आणि त्यांचे तीन हजारांवर सैनिक ठार झाले. मोगलांच्या सैन्याचा मध्मभाग आणि डावी फळी ही त्याचवेळी विस्कळीत झाली आणि रणांगणाच्या त्या भागात सुहेलखानाला संपूर्ण जय मिळाला. इकडे खानखानानने उजव्या फळीवर दक्षिणी सैन्याचा पराभव केला होता आणि इतर ठिकाणी काय झाले आहे याची जाणीव नसल्याने त्याने त्यांचा पाठलाग सुरू केला होता. थोड्याच वेळात काळोख पडला होता. प्रत्येक पक्षाला आपला जय झाला आहे असे वाटले. सुहेलखानाने पराजित सैन्याचा पाठलाग केला नाही, परंतु त्या चे निम्मे सैन्य मात्र रात्रीच्या वेळी मिळालेली लूट घेऊन पळून गेले.

पाठलागावरून परत आल्यावर खानखानान अचानक दक्षिणी तोफखान्या-समोर येऊन थडकला. शत्रूचा पराभव झाला आहे अशा समजुतीत तो होता. साहजिकच या गोष्टीचे त्याला आश्चर्य वाटले. त्याला आता खबर मिळाली की, बहुतेक मोगल सैन्याचा पराभव झाला असून ते वऱ्हाडात पळून गेले आहे. सुहेलखानाच्या सैनिकांनी रात्रीच्या वेळी आगट्या पेटविल्या होत्या, त्यामुळे त्यांच्या छावणीची जागा हुडकून काढून त्यांच्यावर काही तोफगोळे टाकणे खानखानानला शक्य झाले. सुहेलखानाच्या सैन्यात तात्पुरता गोंधळ उडाला. त्याने ताबडतोब आपल्या छावणीची जागा बदलली आणि संभाव्य धोका टाळला. जितकी माणसे जमविता येतील तितकी जमविण्याचा त्याने प्रयत्न केला. खानखानाननेही तुताऱ्या वाजवून आपली माणसे जमविली. मोगल सैनिक आणि दक्षिणी सैनिक यांच्यात चकमकी उडाल्या. प्रत्येकाचे डोळे दिवस उजाडण्याकडे लागले. दिवसा उजेडी सुहेलखानाने बारा हजार सैनिक घेऊन मोगलावर चाल केली. खानखानानजवळ जेमतेम ३-४ हजार सैन्य होते. तरी त्याने लढण्याचा निश्चय केला. घनघोर युद्ध

झाले. सुहेलखान जखमी होऊन घोड्यावरून पडला. त्याच्या आश्रिताने त्याला रणा-बाहेर नेले. त्याच्या पाठोपाठ दक्षिणी सैन्यानेही पळ काढला. त्यांचा पाठलाग न करता खानखानान शहापूरला परतला. याच वेळी मुराद आणि खानखानान यांच्यातील द्वेषभाव विकोपाला गेला. या भांडणाचे विपरीत परिणाम होऊ नयेत म्हणून अकबर बादशहाने युसूफखान मशदी आणि शेख अबुल फजल यांना **हिजरी** १००६ (इ. स. १५९७) या वर्षी राजपुत्राजवळ राहण्यासाठी रवाना केले. खानखानान याला बादशहाने परत बोलाविले. काही काळ तरी बादशहाची खानखानानवर अवकृपा झाली. थोड्याच काळात वऱ्हाडातील नरनळा, गावील गड, खेडला आणि इतर किल्ले मोगलांनी जिंकून घेतले. **हिजरी** १००७ या वर्षाच्या **शव्वाल** महिन्यात (मे १५९९) राजपुत्र मुराद मरण पावला. दरम्यानच्या काळात निजामशाही फौजांनी मोगल सरदार शेर ख्वाजा याचा पराभव केला. युसुफखान आणि अबुल फजल यांना या परिस्थितीत दक्षिणी फौजांवर हल्ला करण्याचे धाडस झाले नाही. या सुमारास बादशहाची खानखानानवर पुन्हा मर्जी बसली आणि त्याने त्याला सुसज्ज असे सैन्य देऊन राजपुत्र दानियल मिर्जा याच्यासह दक्षिणेत रवाना केले. निजामशाही प्रदेश ताब्यात घेण्याचा त्याने त्याला हुकूम दिला. खुद्द अकबर बादशहाने **हिजरी** १००८ (इ. स. १५९९) या वर्षी दक्षिणेकडे कूच केले. दरम्यान दानियल मिर्जा आणि खानखानान यांनी दक्षिणेत चाल केली. खानदेशाचा सुलतान मिरान बहादुरखान याने त्यांना सहकार्य न दिल्यामुळे मोगलांनी गोदावरीच्या तीरावर मुक्काम केला. परंतु अकबराने स्वतः असीरच्या किल्ल्याला वेढा देण्याचे ठरविले आणि राजपुत्र दानियल आणि खानखानान यांना अहमदनगरवर चाल करून जाण्याचा हुकूम दिला. त्यांनी ३० हजार घोडेस्वारानिशी अहमदनगरवर चाल केली. त्यांच्यासमोर नेहंगखान हबशी आणि इतर दक्षिणी सरदार यांनी पळ काढला. इकडे अकबराने बुरहाणपूरकडे चाल केली आणि आपल्या अधिकाऱ्यांना असीरच्या किल्ल्याला वेढा देण्यासाठी पाठविले. किल्ल्यावर युद्धसामग्री आणि धान्यपुरवठा भरपूर होता, परंतु किल्ल्यामध्ये रोगराई फैलावली. साहजिकच किल्ला लढविण्याबद्दल मिरान बहादुर निराश झाला. याचवेळी अहमदनगरचाही पाडाव झाला. **हिजरी** १००९ (इ. स. १६००) यावर्षी मिरान बहादुरखानाने असीरचा किल्ला अकबराच्या स्वाधीन केला. अकबराशी समझोता करण्यासाठी इब्राहीम आदिलशहाने आपला वकील अकबराकडे रवाना केला. अशा तऱ्हेने असीर, बुरहाणपूर, अहमदनगर आणि वऱ्हाड यांचा मोगल राज्यात समावेश करण्यात आला.

(फरिश्ता, भाग २, पाने २७०–२८०)

(२७१) ◻ अहमदनगरच्या पाडावाचे मोगल इतिहासकारांनी दिलेले वृत्तान्त पुढीलप्रमाणे आहेत : दुसऱ्या वेळी जेव्हा खानखानान याने अहमदनगरवर हल्ला केला

तेव्हा सेनापती म्हणून आदिलशहाने सुहेलखान हबशाची नेमणूक केली आणि त्याच्या हाताखाली निजामउलमुल्क, आदिलशहा, कुतुबउलमुल्क यांची सैन्ये व बरीदशाहीचा प्रमुख यांना दिले. मोगलांबरोबर मुकाबला करण्यासाठी मोठी फौज घेऊन आत्मविश्वासाने तो बाहेर पडला. खानखानानच्या हाताखालील थोड्याशा फौजेने सुहेलखानावर संपूर्ण विजय मिळविला. तेथून खानखानानने अहमदनगरला वेढा देण्यासाठी कूच केले. अहमदनगरचा त्याने पाडाव केला आणि दक्षिणेचा सर्व प्रांत त्याने दिल्लीपतीच्या अमलाखाली आणला ( *Masiri Rahimi* in Illiot and Dowson, VI. 241·2 )

अहमदनगरचा वेढा बराच काळपर्यंत चालला आणि बादशाही फौजेला रसद मिळण्यात अनेक अडचणी निर्माण झाल्या. हलकट प्रवृत्तीच्या माणसांनी सर्व बाजूंनी उठाव करण्यास सुरुवात केली. तेव्हा मिर्जा रुस्तुम याला राजपुत्र दानियलकडे १ लक्ष मोहरा देऊन पाठविण्यात आले. याचसुमारास नाशिक मोगल अधिकाऱ्यांच्या हाती पडले. पावसाळा संपल्यावर अकबराने आपले लक्ष अहमदनगरच्या पाडावावर केंद्रीभूत केले. त्याने प्रयत्नांची पराकाष्ठा करण्याबद्दल आदेश दिले आणि तो स्वतः बुरहाणपूरकडे निघाला. ह्या ग्रंथाचा कर्ता अबुलफजल याजबरोबर केलेल्या तहाचे पालन करावे असे चांदबिबीचे मत होते. परंतु अभंग ऊर्फ नेहंगखान, हा हबशी आणि दक्षिणी लोकांची मोठी फौज हाताशी घेऊन तिच्याविरुद्ध लढत होता. २६ **फरवर्दीनला** बादशाही सैन्य आले आणि दक्षिणी फौजांच्या मनात संशयाचे जाळे विणले गेले. प्रत्येकजण दुसऱ्याच्या कानाशी लागून म्हणाला की आपल्या पुढाऱ्यांनी बादशाही फौजांबरोबर समझोता केलेला दिसतो. याचा परिणाम असा झाला की अभंगच्या या सेनाविभागाने धीर सोडला आणि कोणताही प्रतिकार न करता त्यांनी माघार घेतली. २ **उर्दीबिहीश्तला** निरनिराळे मोर्चे वेगवेगळ्या अमिरांच्या हाताखाली नेमून देण्यात आले. चांदबिबीचा कल तहाप्रमाणे वागण्याचा होता. किल्ल्यावरील अनेक प्रमुख व्यक्तींनी अशा परिस्थितीत लढाईची सूत्रे आपल्या हाती घेतली आणि मोगल सैन्यावर अनेक अयशस्वी हल्ले चढविले. राजपुत्राच्या मार्गदर्शनाखाली ३० ते ४० गज रुंद आणि ७ गज खोल असलेला खंदक बुजविण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली गेली. किल्ल्याची भिंत निळ्या रंगाच्या दगडांची होती आणि तिची उंची २७ गज होती. राजपुत्र आणि मिर्जा युसुफखान यांच्या खंदकापासून सुरुंग तयार करण्यात आले. परंतु किल्ल्यातील शिबंदीने तेथपर्यंत घुसून सुरुंग बुजवून टाकले. इतकेच काय परंतु त्यांनी किल्ल्याच्या आतील बाजूने उलट सुरुंग भरला आणि त्याला बत्ती दिली. परंतु त्यामुळे फारसे नुकसान झाले नाही. सुरुंगामुळे किल्ल्याच्या बुरुजाला मात्र तडा गेला. ही गोष्ट जेव्हा उघडकीस आली तेव्हा हे भगदाड साफ करण्यासाठी प्रयत्न केले गेले आणि त्याप्रमाणे भगदाड साफ केल्यावर त्यामध्ये १८० मण बंदुकीची दारू भरण्यात आली. ६ **शारियरला** सुरुंगाला बत्ती देण्यात

आली. तो बुरूज आणि ३० गज भिंत स्फोटामुळे आकाशात उडाली. उडून पडणाऱ्या दगडामुळे शिबंदीचे नुकसान झाले परंतु वेढा देऊन बसलेल्या सैन्यावर एक कणही उडाला नाही. हल्लेखोर ह्या भगदाडातून आत घुसले आणि मिर्जा युसुफखानाच्या मोर्चामधून दुसऱ्या एक तुकडीने आत प्रवेश मिळविला. शिबंदीपैकी १५०० जणांना कंठस्नान घालण्यात आले. उरलेल्यांचा जीव त्यांच्या मित्रमंडळींनी केलेल्या कळकळीच्या विनंतीने वाचला. इब्राहीमचा मुलगा आणि बुरहाणचा नातू म्हणजे ज्याला निजामउल्मुल्क म्हणून गादीवर बसविण्यात आले होते त्याला कैद करण्यात आले. अतिशय मौल्यवान हिरे, उठावकाम केलेली शस्त्रे, उत्कृष्ट ग्रंथालय, भरजरी रेशीम आणि २५ हत्ती एवढी लूट मोगलांच्या हाती पडली. तोफा आणि दारूगोळा ह्या गणतीच्या पलीकडे होता. पावसाळ्यात वेढा चालू ठेवण्यात आला. विजय मिळाल्यानंतर एका दिवसात मुसळधार पावसाला सुरुवात झाली. वेढा चार महिने आणि चार दिवस चालला होता. ( Abul Fazal, *Akbarnama* in *Elliot and Dowson*, VI. 99-101 ).

या वेढ्याचे आणखी एक वर्णन पुढीलप्रमाणे आहे :

राजपुत्र दानियल याने फौजेतील काही उच्चपदस्थ अमिरांच्या मदतीने अहमदनगरचा किल्ला हल्ला करून काबीज केला. वेढा जवळ जवळ सहा महिने चालू होता आणि सातत्याने किल्यावर तोफांचा भडिमार चालला होता. पण त्याचा काहीच परिणाम झाला नाही. शेवटी खानखानानने विचार केला की सुरुंग पेरणे हा एकच मार्ग उरला आहे. इतर उमराव त्याच्याबरोबर सहमत झाल्यामुळे सुरुंग भरण्यात आला. त्यात १८० मण बंदुकीची दारू ठासण्यात आली. तो सुरुंग अकबर बादशहाच्या कारकिर्दीच्या ४५ व्या वर्षी २० **शारियरला** उडविण्यात आला. किल्ल्याचा एक बुरूज ७० ते ८० गज भिंतीसकट हवेत उडाला. खानखानान, राजा जगन्नाथ आणि इतर अमिरांनी सैनिकांना चेतावणी देण्यासाठी जारीने प्रयत्न केले आणि असे हुकूम सोडले की फौजेने स्फोट झाल्यानंतर भगदाडातून आत घुसावे आणि उरलेल्या कामगिरीची पूर्तता करावी. ह्या हुकूमाची अंमलबजावणी करण्यात आली. दुसऱ्या एका जागी मातीच्या ढिगाऱ्यावरून अथवा खाकरेज बनवून त्यावरून युसुफखानाच्या हाताखालील एक तुकडी किल्ल्याच्या भिंतीवरून चढून गेली. हल्लेखोरांनी शिबंदीला चेपित नेले. लढाईची एकच धुमश्चक्री उडाली. वेढा घातलेल्या मोगलांचे १००० सैनिक रणात पडले आणि अखेर किल्ला काबीज झाला. निजामउल्मुल्काच्या नातवाला कैद करण्यात आले आणि बादशहाकडे त्याची रवानगी करण्यात आली. ( Faizi Sirhindi's Akbarnama in Elliot and Dowson VI. 144-5 )

( २७२ ) ▫ मराठ्यांच्या इतिहासाच्या एका लेखकाने मिया राजू दक्नी हा हिंदू असून मुसलमान नव्हता असे प्रतिपादन केले आहे. असे प्रतिपादन करण्यास कोणता पुरावा उपलब्ध झाला आहे हे मात्र त्याने दिले नाही.

( २७३ ) ◻ मलिक अंबरच्या शासनातील न्यायीपणा आणि चातुर्य ही दक्षिण देशात सर्वतोमुखी झाली आहेत. हिंदुस्थानच्या इतिहासात अतिशय प्रगत अशा अर्थतज्ञामध्ये मलिक अंबरचा अंतर्भाव आपल्याला करावा लागेल. औरंगजेबाने ज्या शहराला पुढे औरंगाबाद असे नाव दिले त्या शहराचा तो संस्थापक होता.

( २७४ ) ◻ अहमदनगरचे निजामशाही घराणे कलाकुसरीच्या कामाच्या बांधणीबाबत अतिशय प्रसिद्ध होते. त्यांनी स्वतः विविध प्रकारच्या आणि सुंदर इमारती बांधल्या. एवढेच नव्हे तर आपल्या दरबारी मंडळींनाही अशा कामाची बांधणी करण्याबाबत उत्तेजन दिले. निजामशाही घराण्याच्या कालखंडात बांधलेल्या काही उत्कृष्ट कलाकृती आज शेकडो वर्षानंतरही टिकून आहेत. या कलाकृती ज्यांनी बांधल्या त्यांच्या अभिरुचीचे उत्कृष्ट प्रतिक म्हणून आजही त्यांची गणना करता येईल त्यापैकी काहींचे वर्णन पुढे दिले आहे.

अहमदनगरचा किल्ला : शहरापासून पूर्वेला अर्ध्या मैलाच्या अंतरावर बाभळीच्या आणि वडाच्या झाडांच्या दाट गर्दीत सपाटीवर हा किल्ला बांधण्यात आलेला आहे. किल्ल्याचा परीघ १ मैल आणि ८० यार्ड एवढा आहे. किल्ल्याभोवती वृक्षाच्छादीत बांध आहे. हा बांध किल्ल्याचे तटदेखील दृष्टीपासून लपवून ठेवतो. या बांधाच्या आतल्या बाजूला ८५ ते १८० फूट रुंद आणि १४ ते २० फूट खोल असा खंदक आहे. किल्ल्याच्या तटाच्या भिंतीसाठी वापरण्यात आलेला दगड या खंदकातीलच आहे. तटाच्या भिंती ५ फूट रुंद आहेत. तटाला दोन दरवाजे असून एक दरवाजा पश्चिम दिशेला आहे या दरवाजातून तोफांचे गाडे नेण्यासाठी वाट आहे. दुसरा दरवाजा हा प्रामुख्याने माणसांच्या वाहतुकीसाठी असून यावर काढता घालता येण्याजोगा पूल बसविलेला आहे. किल्ल्याच्या भिंतीची उंची खंदकाच्या तळापासून ३० फूट इतकी आहे. भिंतीला ठिकठिकाणी बुरूज बांधलेले आहेत. किल्ल्याच्या तटबंदीवर एकाच वेळी १०२ तोफा चढविण्याची सोय आहे. आज जुन्या काळी बांधलेल्या थोड्याफार इमारती शिल्लक आहेत. किल्ल्यामध्ये दारूगोळा साठविण्यासाठी प्रचंड कोठार आहे. किल्ल्याच्या परिसरात चार विहिरी असून त्यामधून १२ महिने पिण्याच्या पाण्याचा उत्तम पुरवठा होतो.

रुमीखानाचा दर्गा–या दर्ग्याला मक्का मशीद असेही म्हणतात. हा दर्गा बुरहाण निजामशहाच्या कारकिर्दीत रुमीखान दक्कनी याने बांधला. दर्ग्याची बांधणी चुना आणि काळ्या दगडाची आहे. दक्षिणोत्तर दर्ग्याची लांबी ४० फूट असून पूर्वपश्चिम दर्गा ३० फूट रुंद आहे. दर्ग्याला दोन मजले असून पहिला मजला हा विश्रांति-गृह म्हणून आणि दुसरा मजला प्रार्थनेची जागा म्हणून बांधलेला आहे. दर्ग्याचे छप्पर सपाट असून ते ४ खांबांवर आधारलेले आहे. प्रत्येक खांबाची गोलाई २ फूट असून उंची ८ फूट आहे. हे खांब मक्केहून आणले असे म्हणतात आणि

म्हणूनच या दर्ग्याला मक्का मशीद असे नाव दिले आहे. दर्ग्याच्या छप्पराचा पश्चिमेकडील भाग कोसळलेला आहे.

कासीमखानाचा राजवाडा–हा राजवाडा अहमदनगरचा पहिला सुलतान मलिक अहमद याच्या कारकिर्दीत बांधण्यात आला. राजवाड्याच्या मध्यभागी एक भव्य दिवाणखाना असून, या दिवाणखान्याचे छत उंच अशा अखंड काळ्या फत्तराच्या खांबावर आधारलेले आहे. दिवाणखान्याच्या बाजूला खोल्या असून, प्रत्येक खोलीवर घुमट आहे. प्रत्येक घुमटावर अतिशय शोभिवंत असे कोरीव काम आहे.

चेंगीजखानाचा राजवाडा–हा राजवाडा अहमदनगरचा सुप्रसिद्ध आणि दुर्दैवी सरदार चेंगीजखान याने हुसेन निजामशहाच्या कारकिर्दीत बांधला. राजवाड्याची इमारत अतिशय भव्य अशी असून तिला अनेक मजले आहेत. राजवाड्याच्या चौथऱ्यावर एक अक्षरे कोरलेला दगड बसविलेला आहे.

( २७५ ) □ पायरार्ड ह्या फ्रेंच प्रवाशाने १६०१ आणि १६०८ या कालावधित हिन्दुस्तानला भेट दिली. चेउलचे वर्णन करताना तो म्हणतो–– चेउलच्या राजपुत्राचे नाव मलिक असे आहे आणि तो मोगल बादशहाचा मांडलिक आहे. त्याच्याजवळ अनेक हत्ती आहेत. तो जेव्हा भोजन करतो तेव्हा अनेक सुंदर स्त्रिया नाच आणि गायन करतात. जेवण झाल्यानंतर आपल्या वैभवाचा आणि मानवी जीवनाच्या अशाश्वततेचा विचार करीत सुलतान आपल्या राजवाड्यात निद्राधीन होतो.

( २७६ ) □ न्यामतखानाचा राजवाडा आणि दर्गा या इमारतीचा नकाशा सरदार फरहबक्ष याने तयार केला आणि इमारतीचे बांधकाम पहिल्या मुर्तजा निजामशहाच्या कारकिर्दीत न्यामतखान दक्कनी याने पुरे केले. या इमारतीत एक अतिशय मोठे असे स्नानगृह होते. या इमारतीला पाण्याचा पुरवठा नेपती नावाच्या कालव्यापासून होत असे. न्यामतखानाचा दर्गा ४ फूट उंचीच्या पायावर बांधण्यात आलेला असून बांधकाम कोरीव दगड आणि चुन्यात केलेले आहे. दर्ग्याचे छप्पर सपाट असून आधारासाठी त्याला ८ खांब आहेत. प्रत्येक खांब ५ फूट उंच असून चौकोनी आहे. दर्ग्याच्या दक्षिण दिशेला प्रत्येकी ३ कमानींच्या दोन रांगा आहेत. उजव्या बाजूला न्यामतखान आणि त्याची बायको यांच्या कबरी आहेत. राजवाडा आणि स्नानगृहे यांनी जवळ जवळ ५०० चौ. वार एवढी जागा व्यापलेली आहे. दरवाजावर हिन्दी आणि अरबी भाषेतील मजकूर कोरलेला आहे. त्यावरून दर्गा बांधल्याची तारीख म्हणजे इ. स. १५७९ ही कळून येते.

( २७७ ) □ अहमहनगरकालीन राज्यव्यवस्थेचे थोडक्यात वर्णन पुढे दिले आहे. अहमदनगरच्या राज्यात पुढील प्रदेशाचा समावेश होता. वऱ्हाडचा बव्हंशी भाग, पुढील काळात औरंगाबाद सुभा या नावाने ज्याचा उल्लेख करतात, तो संपूर्ण

सुभा, गाळणा आणि नाशिक आणि खानदेश यामधील इतर जिल्हे आणि कोकण-मधील कल्याण जिल्हा व चेउलचे बंदर. बहमनींप्रमाणे अहमदनगरचा सुलतान हा राज्यप्रमुख होता. सुलतान, राज्याचे इतर अधिकारी, वजीर आणि अमिर मिळून मध्यवर्ती सरकार होत असे. या मध्यवर्ती सरकारला **राखतखाना** अथवा मध्यवर्ती कारभार मंडळ असे म्हणत. राज्यकारभाराबाबतचे सर्व हुकूम या मंडळाकडून निघत असत. राज्यकारभाराच्या कामात सुलतानाला त्याने निवडलेल्या अधिकाऱ्यांची मदत होई. हे अधिकारी सुलतानाला जबाबदार असत. राज्यकारभारात तीन प्रमुख अधिकाराच्या जागा असत ( १ ) **वकील** अथवा **पेशवा** ( २ ) **वजीर** आणि ( ३ ) **अमीर जुमला**. वजीराकडे महसूलाबाबतचे अधिकार असत तर **अमीर जुमला** याच्याकडे अर्थखात्याची व्यवस्था असे. राज्यातील **परगणे** राखतखान्या-तील अधिकारीवर्गाकडे कारभारासाठी सोपविलेले असत. वरील अधिकाऱ्यांशिवाय राज्यातील इतर अधिकारी पुढीलप्रमाणे असत : **सराशिलेदार, सरनोबत, अमीरउल्उमरा,** मुख्य **नाईकवाडी**, आणि **चिटणीस**. राज्याची विभागणी जिल्ह्यामध्ये करीत. हे जिल्हे **परगणा, कर्यात, संमत**, **महाल** आणि **तालुका** या नावाखाली विभागले जात. राज्याचा पश्चिम भाग हा डोंगराळ असून त्याची व्यवस्था हिन्दू अधिकाऱ्यांकडे सोपविलेली असे. महसूल गोळा करणाऱ्या अधिकाऱ्याला **अमिल** असे म्हणत. त्याच्याकडे राज्यातील पोलिस आणि मुल्की कज्जे यांची व्यवस्था असे. जमिनीबाबतचे मुल्की कज्जे पंचायतीकडे दाखल केले जात. अहमदनगर राज्यात हिन्दूंची दुय्यम अधिकारांचे जागांवर नेमणूक केली जात असे. काही मोठ्या अधिकारावर असलेल्या हिन्दूंचीही नावे मिळतात. उदा. नर्सी, अण्णेराव, भोपालराय, सावाजी अनंत, समत्या आणि ताव्या. किल्ल्यांचे किल्लेदार म्हणून बव्हंशी मुसलमानांची नेमणूक करीत. क्वचित हिन्दूची पण नेमणूक होई. शिबंदीमध्ये मराठे, कोळी आणि धनगर यांचा भरणा असे. मुल्की कारभारासाठी मराठे आणि ब्राम्हण यांच्या नेमणुका झाल्याची अनेक उदाहरणे सापडतात. या अधिकाऱ्यांना जिल्ह्यावर नेमून देशमुख या नावाने संबोधिले जाई. मुसलमानांप्रमाणेच हिन्दूना जहागिरी दिली जाई. असे हिन्दू आणि मुसलमान जहागीरदार मिळून राज्यातील सरदार वर्ग बने. बहमनींप्रमाणेच अहमदनगर सरकारनेही लष्करी मनसबदारी देण्याची प्रथा चालू ठेवली. अशा मनसब-दारांना देण्यात येणारी जहागिरी ही ते बाळगत असलेल्या लष्कराच्या प्रमाणात दिली जाई. राज्यासाठी उत्तम कामगिरी बजावलेल्या हिन्दू अधिकाऱ्यांना **राजा; नाईक** आणि **राव** अशा पदव्या दिल्या जात.

( २७८ ) □ १५ व्या आणि १६ व्या शतकांत अनेक परदेशी प्रवाशांनी हिंदु-स्थानला भेटी दिल्या. त्यामध्ये बारबोसा नावाचा एक प्रवासी होता. त्याने अहमदनगर राज्याचे पुढीलप्रमाणे वर्णन दिलेले आहे. ते असे :—अहमदनगरचा सुलतान हा मुसलमान

असून त्याचे बहुसंख्य प्रजाजन हिन्दू आहेत. त्याच्या ताब्यात मोठा प्रदेश असून तो खूप दूरवर पसरलेला आहे. राज्याच्या किनारपट्टीला अनेक व्यापारी बंदरे असून त्यातील प्रमुख बंदर चेउल आहे. चेउलचे वर्णन देताना तो म्हणतो चेउल गाव हे लहानसे असून त्यामधील घरे सुरेख आणि शाकारलेली अशी आहेत. चेउल व्यापाराचे मोठे ठिकाण असून डिसेंबर ते मार्च या महिन्यात मलबार आणि इतर भागांतून मालाने भरलेली अनेक गलबते येथे येतात. बरोबर आणलेला नारळसुपाऱ्या, मसाल्याचे पदार्थ, औषधे हा माल चेउल बंदरात उतरून परतीच्या प्रवासासाठी येथील गहू, भाजीपाला, तांदूळ, तीळ, तिळाचे तेल, बाजरी वगैरे माल ते जहाजात भरतात. चेउलमधे तांब्याची मोठ्या प्रमाणावर विक्री होते. याचे कारण राज्यातील नाणी ही तांब्यापासून बनवितात आणि अन्न शिजविण्याकरिता तांब्याच्या भांड्यांचा उपयोग करतात. वर्षाचे हे ३–४ महिने सोडून दिले तर चेउल बंदरात इतर वेळी फारच थोडी वस्ती असते. चेउल बंदराचा सुभेदार हा मुसलमान असून तो दक्षिणच्या सुलतानाचा मांडलीक आहे. तो महसूल गोळा करून सुलतानाकडे जमा करतो.

सीझारे फ्रेड्रीक ह्या व्हेनेशियन प्रवाशाने १५८६ मध्ये अहमदनगरला भेट दिली. त्याने अहमदनगरच्या मूरसुलतानाचे नाव जमालिको (निजाम उल्मुल्क) असे दिले आहे. हा सुलतान अतिशय सामर्थ्यवान असून त्याच्याजवळ दोन लक्ष खडे सैन्य आणि प्रचंड तोफखाना होता असे तो म्हणतो. त्यातील काही तोफा इतक्या प्रचंड होत्या की, त्यांचे वेगवेगळे भाग करून त्या वाहून न्याव्या लागत. तोफेतील गोळा हा दगडाचा असून त्यातील काही गोळे पोर्तुगालच्या राजाकडे सर्वोत्कृष्टपणाचा नमुना म्हणून पाठविण्यात आले होते. सुलतानाचे निवासस्थान अबुकर (अहमदनगर) हे असून ते चेउलपासून ७–८ दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर होते.

## विजापूरची आदिलशाही : तळटीपा

(२७९) ☐ गजनफर बेग हा युसुफ आदिलखानाबरोबर हिंदुस्थानात आला. विजापूर येथे आदिलखानाला सुलतानपद प्राप्त झाल्यावर गजनफर बेगची त्याचा एक अतिशय नावाजलेला सेनापती म्हणून प्रसिद्धी झाली. पुढे विजापुरात बंड झाले आणि या बंडात इस्माईल आदिलशहावर प्राण गमाविण्याची जवळ जवळ पाळी आली होती. त्या बंडात गजनफर बेगची बहीण दिलशद आगा हिला फार प्रसिद्धी मिळाली.

(२८०) ☐ बिबी मुसती म्हणजे युसुफ आदिलशहाची मुलगी.

(२८१) ☐ पोर्तुगीज इतिहासकार वैकल्याने त्याला सावायो आणि हिदलचान या नावाने संबोधतात.

(२८२) ☐ हा काल्पनिक पक्षी ज्याच्या मस्तकावर फेर धरेल त्या व्यक्तीला राज्यपद मिळण्याचे ते सूचक आहे अशी सर्वसाधारणपणे समजूत आहे.

( २८३ ) ▫ हिरवी म्हणजे खुरासाणातील हिरातचा रहिवासी.

( २८४ ) ▫ कुराणामधील नैमित्तिक स्तवन म्हटले जाण्याअगोदरची प्रास्ताविक प्रार्थना असते तिला खुत्बा असे म्हणतात.

( २८५ ) ▫ अलीला वगळून टाकण्यासाठी ज्या तीन खलीफांचा उपयोग केला गेला त्यांना साहिबा या नावाने संबोधले जाते. ते तिघेजण म्हणजे अबूबक्र, उथमान आणि उमर. त्यांचा शियापंथियांना भयंकर तिरस्कार वाटतो.

( २८६ ) ▫ **फरिया-इ-सौजा** ( खंड १, प्रकरण ५ ) या ग्रंथातील वृत्तान्तानुसार अल्बुकर्क याने गोव्यावर हल्ला केला. गोव्याच्या संरक्षणाचे काम याकूत नावाच्या जॉर्जियन माणसाकडे होते. [ २० फेब्रुवारी १५१० ] या वर्षी मीर अलीने अखेर गोव्याची शरणागती दिली. पोर्तुगीजांना तेथे दारूगोळयाचा भरपूर साठा आढळला.

( २८७ ) ▫ याबाबत पोर्तुगीज वृत्तान्तात असे आढळते की मे महिन्यात ईस्माइल आदिलशहाचा सेनापती कमालखान याने २० दिवसांच्या वेढ्यानंतर गोवा परत जिंकून घेतले. या वृत्तान्तात दिलेली हकीकत बहुधा खरी असावी.

( २८८ ) ▫ **फरिया-इ-सौजा** या ग्रंथात पोर्तुगीज आणि विजापूर यांच्यामध्ये गोव्याबाबत झालेल्या संघर्षाची हकिकत पुढीलप्रमाणे दिली आहे :

फेब्रुवारी २०, १५१० : युसुफ आदिलशहा सवाई याच्या ताब्यातून अल्बुकर्क याने गोवा घेण्याचे ठरविले. कॅनराच्या ( विजनगरच्या ) तिमोजाने ( तिमराज ) त्याला मदत केली. २० फेब्रुवारीला गोव्याचा पाडाव करण्यात आला. दारूगोळा आणि लष्करी सामग्री यांचा प्रचंड साठा पोर्तुगीजांच्या हाती पडला. आदिलशहाने मे महिन्यात २० दिवसांच्या वेढ्यानंतर गोवा पोर्तुगीजांपासून परत घेतले. अल्बुकर्क याला मदतीसाठी म्हणून [ २२ नोव्हेंबर १५१० ] युरोपातून १३ जहाजे येऊन दाखल झाली. तेव्हा त्याने २३ गलबते आणि १५०० शिपाई घेऊन गोव्यावर हल्ला करण्यासाठी कूच केले. तिमोजाचा दर्यासारंग माधोराव हा त्याच्या मदतीला होता. पोर्तुगीजांनी गोवा जिंकून परत घेतले. गोव्याचा मुलकी कारभार अल्बुकर्क याने तिमोजा आणि मल्हिराव यांजकडे सोपवून मलबारकडे प्रयाण केले. यानंतर इ. स. १५१५ मध्ये पोर्तुगीज आणि विजापूरचा सुलतान यांचे गोव्यावरून युद्ध झाले. विजापूरचा सरदार अंकुसखान हा मोठ्या सैन्यानिशी कोकणात उतरला. पोतुगीजांनी त्याच्यावर फोंडा येथे हल्ला चढविला. विजापूरच्या एका सरदाराला त्याने आपल्याकडे वळवून घेतले. त्यानंतर विजापूरचे सैन्य परतले. ( ब्रिग्ज **फरिश्ता** खंड ३, पाने ५०८–५०९, ५११ )

( २८९ ) ▫ **घोडा राऊत** म्हणजे मराठा घोडेस्वार. यांना वार्षिक तनखा दिला जात असे, आणि ज्याज्या वेळी हुकूम दिला जाई त्यावेळी कामगिरीसाठी

संपूर्ण तयारीनिशी हजर राहण्याचे त्यांच्यावर बंधन असे. ते आपल्याबरोबर स्वतःचा घोडा, सरंजाम आणि पोषाख व शस्त्रास्त्रे आणीत आणि स्वतःच्या पोटापाण्याची सोय बघत.

(२९०) ◻ ज्याप्रमाणे युरोपात निरोप देताना हाताचे चुंबन घेण्याची पद्धत असे त्याप्रमाणे हिंदुस्थानात राजाकडून निरोप देताना सुगंधी विड्याचे पान दिले जाई.

(२९१) ◻ ११ जिल्हे, परंडा आणि सोलापूर एवढा मुलुख फक्रउलमुल्क याच्या जहागिरीत पहिल्याप्रथम होता. त्याच्या मृत्यूनंतर त्याचे दोन मुलगे ख्वाजा जहान आणि जैनखान यांनी या जहागिरीची वाटणी केली. जैनखानाने ही जहागिरी विजापूरचा राज प्रतिनिधी कमालखान याच्या हवाली केली.

(२९२) ◻ अंबारी म्हणजे सुलतानाला हत्तीवर बसणे सोईचे जावे म्हणून तयार करण्यात आलेले सिंहासन. या सिंहासनावर छत असून टोकांवर असलेल्या खांबांचा त्या छताला आधार दिला जाई. अंबारीला जसे छत असे तसे हौद्याला नसे.

(२९३) ◻ दिलशद आगा ही त्याच्या दुधभावाची आत्या आणि त्याच्या दाईची बहीण होती.

(२९४) ◻ इ. स. १५४३ मध्ये पोर्तुगीजांनी विजापूरचा राजपुत्र मल्लूखान याला आश्रय दिला. त्याबाबत **फरिया इ-सौजा** या ग्रंथात पुढीलप्रमाणे हकीकत आहे. 'पोर्तुगीज गव्हर्नर जनरल डॉन गॉर्शिया याने विजापूरचा राजपुत्र मल्लूखान याला आपल्या स्वाधीन करावे म्हणून बेळगावच्या असदखानाने त्याच्याकडे नजराणा पाठविला. विजापूरचा सुलतान पहिला इब्राहीम आदिलशहा यानेही त्या संबंधातच पोर्तुगीजांशी वाटाघाटी सुरू केल्या. आपला हेतू सिद्धीस जावा म्हणून असदखानाने दहा लाख पौंड इतका वसूल असलेला कोकणप्रांत पोर्तुगीजांच्या हवाली करण्याचे वचन दिले. पोर्तुगीज गव्हर्नर जनरलने मल्लूखानाचा पाठपुरावा करण्याचे ठरविले. दरम्यान बेळगावच्या असदखानाचा मृत्यू झाला. आपल्याला असदखानाची सर्व संपत्ती दिली गेल्यास राजपुत्र मल्लूखान याला तुमच्या स्वाधीन करू असे पोर्तुगीजांनी इब्राहीम आदिलशहाला कळविले. त्यानुसार वरील संपत्ती ख्वाजा शमसुद्दीन याच्या हाताखाली गोव्याला पाठविण्यात आली. आपल्याला एकंदर संपत्तीचा फक्त दहावा हिस्सा मिळाला असा पोर्तुगीजांनी दावा मांडला. ही संपत्ती १०० लाख डुकाट एवढी भरली. पोर्तुगीजांनी राजपुत्र मल्लूखान याला इब्राहीम आदिलशहाकडे पाठविण्यास विलंब लावला. पुढे इब्राहीम आदिलशहाने सालशेट्टी आणि बारदेस ही ठिकाणे राजपुत्र मल्लूखान याला आपल्याकडे पाठविल्यास पोर्तुगीजांना देण्याचे कबूल केले. पोर्तुगीजानी बारदेसचा ताबा घेतला. परंतु मल्लूखानाला विजापूरच्या स्वाधीन करण्याचे मात्र नाकारले. यावर विजापूरच्या सुलतानाने बारदेस घेण्यासाठी सैन्य रवाना केले. या सैन्याने केलेला हल्ला पोर्तुगीजांनी परतवून लावला विजापूरच्या सैन्याने

फोंडा घाटाच्या पायथ्याशी माघार घेतली. विजापूरचा सेनापती सलाबतखान या लढाईत ठार मारला गेला. श्रीवर्धन आणि गोवा यामधील प्रत्येक बंदरावर पोर्तुगीजांनी हल्ला करून ती उद्ध्वस्त केली. इ. स. १५४९ मध्ये पोर्तुगीज गव्हर्नर कॅस्ट्रो याचा मृत्यू झाला. गार्शिया-द-सा हा गव्हर्नर जनरल होतो. पोर्तुगीज आणि विजापूर यांच्यातनंतर तह घडून आला.

इ. स. १५५४ मध्ये मल्लू आदिलखान याने स्वतःला विजापूरचा सुलतान म्हणून जाहीर करून फोंड्याचा किल्ला काबीज केला. सर्व कोकणप्रांत याने पोर्तुगीजांना तोडून दिला. यानंतर तो विजापूरवर चाल करून गेला परंतु त्याचा पराभव होऊन त्याला कैद केले गेले. इब्राहीम आदिलशहाने नंतर मल्लूखानाला ठार मारले. (ब्रिग्ज **फरिश्ता** खंड ३, पाने ५१६–५१८).

(२९५) ▫ फरिया-इ-सौजा या ग्रंथात ही हकीकत अतिशयोक्तीपूर्णपणे रंगविण्यात आलेली आहे. त्यात असेही सांगण्यात आले की गोवळकोंड्याच्या वेढ्याच्या वेळी सुलतान कुलीच्या चाकरीत १२ पोर्तुगीज होते.

(२९६) ▫ मुसलमानी इतिहासकारांनी दिलेल्या या बाबतच्या हकीकतींचे महत्त्व आणि खरेपणा जो वाचक पोर्तुगीज वृत्तान्तात दिलेली अस्ताव्यस्त हकीकत पडताळून बघण्याचे श्रम घेईल त्यालाच पूर्णत्वाने प्रत्ययास येईल.

(२९७) ▫ पोर्तुगीज वृत्तान्ताप्रमाणे इ. स. १५८४ मध्ये राजपुत्र मल्लूखानाचा मुलगा गफूरखान (**फरिया-इ-सौजा** यामध्ये त्याचा उल्लेख उपोकान असा केलेला आहे) याने विजापूरचे राज्यावर येण्याची महत्त्वाकांक्षा धरली. परंतु विजापूरच्या सुलतानाच्या चाकरीत असलेल्या जेम्स लोपेज नावाच्या एका पोर्तुगीजाने गोव्याला येऊन राजपुत्राला कैद केले आणि विजापूर येथे सुलतानाबरोबर झालेल्या करारानुसार त्याचे डोळे काढले. (ब्रिग्ज **फरिश्ता** खंड ३, पान ५२४).

(२९८) ▫ शेवटचा बहमनी सुलतान कलीम उल्ला हा इ. स. १५३८ च्या सुमारास अहमदनगर येथे मृत्यू पावला. त्याला विषप्रयोग झाला असावा असे म्हटले जाते. त्याच्या नांवाची नाणी १५३६, १५३७ या वर्षापर्यंतची मिळतात. (Speight, 275, 386) इ. स. १५३० मध्ये आदिलशहाने मुद्‌गल जिंकले. विजापूर शहराभोवती असलेल्या तटावर त्याने या घटनेची निशाणी कोरली. त्यामध्ये त्याने स्वतःचा उल्लेख मजलीस इ-रफी आदिलखान असा केला आहे. (Sewell, 160) त्याचप्रमाणे इ. स. १५३७ मधल्या ख्वाजा संबूल याच्या मशिदीजवळ मिळालेल्या शिलालेखातही विजापूरच्या ४ थ्या सुलतानाचा उल्लेख वरीलप्रमाणेच असे. वलीउल्लाच्या नांवाचे शेवटचे नाणे हे १५३७ मधील आहे विजापूरच्या सुलतानांचा १५३७ पर्यंतचा उल्लेख वरीलप्रमाणे येतो, त्यावरून वलीउल्लाचा मृत्यू १५३८ च्या

सुमारास झाला असावा. ( *Memorial Archaeological Survey of India* No. 49, p. 26, Inscription No 3251 ) यानंतर इ. स. १५३९ च्या शिलालेखांत विजापुरच्या सुलतानाचा उल्लेख इब्राहीम आदिलशहा असा येतो. हा शिलालेख विजापूर येथील इदग्यावर कोरलेला आहे. ( *Ibid* p. 26, Inscription No. 410 ) असेही मानण्यास जागा आहे की अहमदनगरचे वातावरण सुरक्षित न वाटल्याने कलीम उल्ला विजापूरला गेला असावा. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा इल्हा मुल्ला हा वेषांतर करून मक्केला गेला. तेथेच त्याचा अंत झाला. ( **बदायुनी** ३, १३९ )

( २९९ ) ▫ हिंदुस्थानातील राज्यांची घटना कशा प्रकारची होती त्याबाबत काही विश्लेषण या ठिकाणी करणे जरूर आहे. अगदी सुरुवातीला प्रत्येक हिंदू राज्याचा प्रदेश हा राज्यातील मोठमोठ्या लष्करी अधिकाऱ्यांमधे विभागला जात असावा असे दिसते. सर्वसाधारणपणे ठरविल्या गेलेल्या काही तत्त्वांनुसार त्यांना राज्यकारभाराचे नियमन केले जाई परंतु राज्यप्रमुखाच्या प्रत्यक्ष हुकमतीखाली त्यांच्या कारभाराची अंगोपांगे येत नसत. मुसलमानांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर अगदी सुरुवातीलाच त्यांनी या प्रथेचा स्वीकार केला. प्रत्येक प्रांतिक सुभेदार हा एकाच वेळी प्रांताचा लष्करी प्रमुख आणि मुलकी अधिकारी असे. अंदाजे येणाऱ्या उत्पन्नाचा एक हिस्सा मुलकी खर्चासाठी बाजूला काढून ठेवला जाई, दुसरा हिस्सा सुभेदाराच्या आस्थापनखर्चासाठी आणि उरलेली शिल्लक रकम ही फौजफाट्याच्या वर्धापनासाठी राखून ठेवली जाई. ह्या फौजेची भरती पूर्णपणे सुभेदाराच्या अखत्यारात होत असे आणि या फौजेत मुख्यतः घोडदळाचा भरणा असे. या घोडदळात **शिलेदार** म्हणजे कवचधारी आणि **बारगीर** असत. युरोपमधील सरंजामशाहीच्या काळातील हुजरे आणि वर उल्लेखिलेले **बारगीर** यांच्यात पुष्कळसे साम्य होते आणि हे **बारगीर** मोठमोठ्या सरदार मंडळींच्या पदरी राहात. **बारगीर** या शब्दाचा अर्थ सामानसुमान ज्याच्या ताब्यामध्ये आहे तो असा होतो. या शब्दाचा पुढे अपभ्रंश होऊन त्याचे **बारगीर** म्हणजे अग्निबाण वाहक असे रूप बनले. कारण या नंतरच्या काळात ते आपल्या घोड्यावर अग्निबाण वाहून नेत आणि शत्रूला सतावण्यासाठी रात्रीचे हल्ले करण्याकरता त्यांची नियुक्ती केली जाई. शिलेदारांचे स्वतःच्या मालकीचे घोडे असत आणि आपल्या पदरी असलेल्या बारगीरांना ते घोडे पुरवीत.

( ३०० ) ▫ प्रांतिक सुभेदार हे राजनिष्ठ राहावेत याबद्दल जातमुचलका म्हणून प्रत्येक प्रांतिक सुभेदाराला आपला मोठा मुलगा अगर जवळचा नातेवाईक याच्या हुकमतीखाली दरबारात आपल्या अनुयायांपैकी काहींना ठेवण्याचे बंधन असे. स्वतः सुलतान आपली प्रतिष्ठा आणि सामर्थ्य आपल्या खाजगीकडे मोठे सैन्य बाळगून त्यांच्या मदतीने टिकवीत असे. हे सैनिक बव्हंशी परदेशी मुसलमानांपैकी असत आणि ते पूर्णतया बादशहावरच अवलंबून राहात.

( ३०१ ) □ अंदाजे २१ मैल.

( ३०२ ) □ अंदाजे १८ मैल.

( ३०३ ) □ अल्लाउद्दीन इमादशहाचा युसूफ आदिलशहाच्या मुलीबरोबर विवाह झाला आणि त्यामुळे त्याचे या लग्नसंबंधामुळे इब्राहीम आदिलशहाबरोबर चुलत्याचे नाते होते.

( ३०४ ) □ रुबिया सुलताना ही राजकन्या इब्राहीम आदिलशहाची आत्या खुदिजा सुलताना हिची मुलगी होती.

( ३०५ ) □ **फरिया-इ-सौजा** हा पोर्तुगीज इतिहासकार अबदुल्लाखानाचा उल्लेख करीत नाही. तो असे सांगतो की गोव्यानजिकचा विजापूरचा काही प्रदेश ताब्यात घेण्याचा आसदखानाने पोर्तुगीजांना सल्ला दिला. त्यानंतर पोर्तुगीजांवर विजापूरचे जे सैन्य चाल करून त्याचे अधिपत्य असदखानाकडे होते. पोर्तुगीज वृत्तान्त गोंधळ निर्माण करणारा, असमाधानकारक आणि संपूर्णपणे असंभवनीय आहे. त्यावेळी **फरिया-इ-सौजा** हा स्वतः हिंदुस्थानात होता तरी देशातल्या अंतर्गत परिस्थितीबद्दल तो पूर्णपणे अज्ञानी असावा असे दिसते, आणि त्याचा वृत्तान्त तर असंबद्ध अतिशयोक्तीने भरलेला आहे.

( ३०६ ) □ या घटनेनंतर जेमतेम ५० वर्षांनीच फरिश्त्याने त्याबाबतची हकीकत विजापूर येथे लिहिली तेव्हा त्याला चुकीची माहिती मिळाली असावी हे संभवत नाही. तरीसुद्धा पोर्तुगीज वृत्तान्तात असे ठासून सांगितले आहे की अबदुल्लाच्या बाजूने जो बंडाचा उठाव झाला त्याचा प्रमुख सूत्रधार असदखान हा होता. अबदुल्लाला ते मल्लूखान असेच चुकीने समजून त्याचा उल्लेख ते मिली असा करतात.

( ३०७ ) □ **रमजान** हा मुसलमानांचा उपवासाचा महिना असून त्या महिन्यात त्यांना फक्त सूर्यास्त आणि सूर्योदय याच्या दरम्यानच्या काळातच भोजन करण्याची परवानगी असते.

( ३०८ ) □ ख्वाजाजहाज दक्नी याचा उल्लेख वारंवार परण्ड्याचा पिढीजाद अधिपती असा केलेला आढळतो.

( ३०९ ) □ ज्या प्रदेशातून माण नदी वाहते त्या प्रदेशाला माणदेश असे नाव आहे.

( ३१० ) □ विजयनगरच्या राजाचे नाव रामराजा असे आहे. परंतु फरिश्त्याने त्याचा उल्लेख रामराज असा केल्यामुळे आपणही इंग्रजी भाषांतरात रामराज हेच नाव कायम ठेवले आहे असा ब्रिग्जने तळटीपेत खुलासा केला आहे.

( ३११ ) □ पूर्वेकडे आणि विशेषतः हिंदुस्थानात अशा तऱ्हेच्या व्यवहाराच्या

वारीकसारीक बाबीकडे दुर्लक्ष केल्यास त्याला किती महत्त्व दिले जाते हे अतिशय उल्लेखनीय आहे. आपल्याकडे आलेल्या पाहुण्याला थोड्या वाटेवर पोहोचवून येण्याची पद्धत जितकी मुसलमान सुलतानात होती तितकी हिंदुराजांमध्ये नव्हती. फिरोजशहा बहमनी इ. स. १४०६ मध्ये देवरायाच्या दरबारातून भेटीनंतर बाहेर पडला तेव्हा देवरायाने या प्रचलित प्रथेप्रमाणे वागण्याकडे दुर्लक्ष केले. फिरोजशहाचा अपमान करण्याचा देवरायाचा यत्किंचितही उद्देश नसताना त्याच्यावर सूड घेण्याची फिरोजशहाने प्रतिज्ञा केली. वरील घटनेत अली आदिलशहा आणि रामराजा यांच्या भेटीत जाणूनबुजून कोणाचाही अपमान व्हावा असा उद्देश नव्हता. इतिहासामध्ये दिसून येणाऱ्या अनेक उदाहरणांपैकी वरील उदाहरण एक आहे असे म्हणावे लागेल. ज्या लोकांमध्ये आम्ही राहात आहोत आणि ज्यांच्या मनात आमच्याबद्दल सदिच्छा उत्पन्न व्हावी अशी आमची इच्छा आहे त्यांच्या चालिरीतींचे सूक्ष्म निरीक्षण करण्याच्या जरुरीतून वरील गोष्ट नैमितिक अनुभवाने आम्हाला शिकविली आहे.

( ३१२ ) □ या ठिकाणी फरिश्त्याने अतिशयोक्ती अलंकाराचा उपयोग केलेला दिसतो. कारण हिंदुस्थानच्या दोन्ही किनाऱ्यावरील बंदराची संख्या देखील एवढी भरणार नाही. त्याशिवाय पोर्तुगीज वृत्तान्तावरून देखील असे कळते की पश्चिम किनाऱ्याच्या बऱ्याच मोठ्या भागावर रामराजाची अधिसत्ता नव्हती.

( ३१३ ) □ मुसलमान या लढाईला तालिकोटची लढाई असे नाव देतात कारण या लढाईत भाग घेणाऱ्या अनेक सुलतानांच्या प्रमुख छावणीचे ठिकाण तालिकोट या खेड्याजवळ होते. तालिकोटची लढाई कृष्णा नदीच्या दक्षिण किनाऱ्याकडे जवळजवळ २० मैल अंतरावर झाली.

( ३१४ ) □ युरोपियन युद्धशास्त्रात नुकतेच प्रवेश झालेले हे शास्त्र हिंदूंना ३०० वर्षे आणि कदाचित त्याच्या अगोदरच्या काळातही परिचित असावे असे मानण्याला जागा आहे.

( ३१५ ) □ विजापूरच्या किल्ल्याच्या एका गटाराच्या झाकणावर आज रामराजाच्या मस्तकाचे कोरलेले चित्र बघितल्यावर मुसलमानांच्या मनात राजराजा-बद्दल वसत असलेल्या प्रखर द्वेषाच्या भावनेचे आणि त्या काळी हिनावस्थेला पोहोचलेल्या अभिरुचीचे एक जळजळीत उदाहरण आपल्या दृष्टीप्रतीस येते. हिही गोष्ट आम्हाला माहीत आहे की रामराजाचे प्रत्यक्ष मस्तक हे त्याचा खून करणाऱ्या वंशजाच्या ताब्यात आजतागायत असून त्याच्यावर तेल आणि शेंदूर यांचा घट्ट थर आहे. तालिकोटच्या लढाईचा स्मृतिदिन म्हणून दरवर्षी वरील मंडळी त्या मस्तकाचे दर्शन गेली २५० वर्षे अहमदनगरमधील धार्मिक मुसलमानांना घडवीत असतात.

( ३१६ ) □ रामराजाच्या सैन्यातील दोन मुसलमान अधिकाऱ्यांच्या विश्वासघातकी वर्तनामुळे हिंदु लढाई हरले असे सिझारे फ्रेडरिक हा सांगतो. ही घटना सांगण्याचे फरिश्त्याने टाळले आहे. पोर्तुगीजांच्या सत्तेने उत्कर्षाचा परमोच्च बिंदू गाठल्याच्या कालखंडांत झालेली अतिशय महत्त्वाची राजकीय घटना असा या लढाईचा उल्लेख करावा लागेल. परंतु पोर्तुगीज इतिहासकार या लढाईची बिलकूल दखल घेत नाहीत.

( ३१७ ) □ विजयनगरजवळचे एक ठिकाण.

( ३१८ ) □ तारखेच्या बाबतीत विश्वसनीय असलेल्या पोर्तुगीज इतिहासकारानी

या घटनेची तारीख १५६९ साल सरता आणि १५७० साल उजाडता अशी दिली आहे. त्यांनी मुसलमानी फौजेच्या लष्करी हालचालींची अगदी संपूर्ण आणि विस्तारपूर्वक अशी हकीकत दिली आहे. ( पाहा **फरिया-इ-सौजा** खंड २, भाग ३, प्रकरण ७ )

( ३१९ ) * इ. स. १५७० मध्ये अहमदनगर आणि विजापूरचे सुलतान व कालिकतचा राजा यांनी पोर्तुगीजांवर एका वेळी हल्ला करण्याचा निश्चय केला. अली आदिलशहाने १ लाख पायदळ, ३५ हजार घोडेस्वार, २१४० हत्ती आणि ३५० तोफा घेऊन फोंडा घाटातून कोकणवर स्वारी केली. कोणताही प्रतिकार न होता त्याने गोव्यापर्यंत मजल मारली आणि गोव्याला तिन्ही बाजूंनी वेढा दिला. गोव्याचे संरक्षण करण्यासाठी फक्त १६०० सैनिक आणि ३० तोफा पोर्तुगीजांजवळ होत्या. त्यांनी शत्रूच्या मोर्चांवर अनेकवेळा यशस्वी हल्ले केले. दरम्यान आदिलशाही सरदार सुलेमान आगा याने पाच हजार सैनिक घेऊन गोवा बेटावर प्रवेश केला परंतु पोर्तुगीजांनी त्याच्यावर हल्ला केला आणि त्याच्या सैन्याला उधळून लावले. झालेल्या लढाईत सुलेमान आगा ठार झाला. गोव्याचा व्हॉइसराय लुई याने विजापूरचा सेनापती नूरखान याला सांगून पाठविले की, " तुम्ही अली आदिलशहाचा खून केल्यास पोर्तुगीज तुम्हाला विजापूरच्या गादीवर येण्यास मदत करतील. " हा कट उघडकीस येऊन त्याला वेळीच प्रतिबंध झाला. ऑगस्ट १५७१ मध्ये जवळजवळ १० महिन्यांच्या वेढ्यानंतर अली आदिलशहाने गोव्याचा वेढा उठविला. पोर्तुगीजांबरोबरील संघर्षात त्याची १२ हजार माणसे, ३०० हत्ती, ४ हजार घोडे आणि ६००० मालवाहू जनावरे कामी आली. ( **फरिया-इ-सौजा**, ब्रिग्ज **फरिश्ता** खंड ३, पाने ५२०–५२१ )

( ३२० ) □ जेहं या ठिकाणाचा पत्ता लागत नाही.

( ३२१ ) □ हैदर किंवा हैदर अली याच्या चितळदुर्गच्या वेढ्याचे विल्क्सने दिलेले वर्णन याबाबत पाहा.

( ३२२ ) □ मलबार आणि कॅनरा येथे राणीवशातील स्त्रियांच्या सरकाराचे

अस्तित्व या ठिकाणी सूचित करण्यात आलेले आहे. त्या काळी असलेल्या पद्धतीमध्ये आजतागायत काहीही फरक पडलेला नाही.

( ३२३ ) □ या घटनेबाबतची अधिक संपूर्ण हकीकत फरिश्त्याने आपल्या बिदरच्या सुलतानांच्या इतिहासात दिलेली आहे. फरिश्ता हा अली आदिलशहाचा पुतण्या दुसरा इब्राहीम आदिलशहा याच्या आश्रयाखाली होता. त्याचा अधिक्षेप होऊ नये म्हणून या ठिकाणी त्या विषयावर लिहिण्याचे त्याने टाळले आहे. सुलतानाला ज्या कारणपरत्वे मृत्यू आला ते अतिशय घृणास्पद आणि विवेकबुद्धीला चीड आणणारे असे आहे फरिश्त्याने जेव्हा त्या कारणाचा उल्लेख केला तेव्हा त्याबाबत वाटणाऱ्या घृणेची तीव्रता कमी व्हावी असा कोणताही प्रयत्न फरिश्त्याने केला नाही. विजापूरच्या इतिहासाच्या एका आधुनिक लेखकाने अली आदिलशहाच्या वर्तनाचे समर्थन करणारी कारणमीमांसा दाखल केली आहे. फरिश्त्याने अली आदिलशहाच्या स्मृतीला काळे फासण्याचा प्रयत्न केला आहे असे सांगण्याचा या इतिहासकाराने आटापिटा केला आहे

( ३२४ ) □ या सर्व कलाकृती आजही अस्तित्वात आहेत आणि अली आदिलशहाच्या कारकिर्दीचे उत्कृष्ट प्रतीक म्हणून त्यांचा उल्लेख करावा लागेल.

( ३२५ ) □ बंकापूरचा सुभेदार मुस्तफाखान आर्दिस्तानी हा मोठ्या घराण्यातल्या सय्यदांपैकी होता.

( ३२६ ) □ प्रधानमंत्र्याला **पेशवा** ह्या पदवीने उल्लेखिण्याची प्रथा चांदबिबीने अहमदनगरच्या निजामशाही दरबारातून याप्रसंगी सुरू केली.

( ३२७ ) □ गोवळकोंड्याच्या कुतुबशाही दरबारात वित्त मंत्र्याला **अमीर जुम्ला** ही पदवी होती. गोवळकोंड्याचा शेवटचा अमीर जुम्ला याच नावाने औरंगजेबाला मिळाल्यानंतर मोगल दरबारात प्रसिद्धीस आला.

( ३२८ ) □ दुसरा इब्राहीम आदिलशहा याचा फरिश्ता हा आश्रित होता. त्याच्याच कारकिर्दीत त्याने या इतिहास ग्रंथाचे संकलन करण्याचे काम हाती घेतले होते. असे असताना देखील या सबंध घडामोडींचे सविस्तर कथन करण्याचे धाडस फरिश्ताने दाखविले आहे याबद्दल कौतुक केल्यावाचून राहवत नाही. विजापूर सोडण्यापूर्वी आपल्या सुलतानाबरोबर विश्वासघाताचे वर्तन दिलावरखानाने केलेले होते. त्याचप्रमाणे अहमदनगरच्या सुलतानाला विजापूरावर हल्ला करण्यास उद्युक्त करून आपला सुलतान आणि आपला देश यांचा विश्वासघात केल्याच्या दुहेरी अपराधाचा तो धनी झाला होता आणि मृत्यूची त्याला झालेली शिक्षा ही योग्यच होती. तरी देखील आपल्या शत्रूला आपल्या कचाट्यात आणण्यासाठी इब्राहीम आदिलशहाने ज्या क्लृप्तीचा अवलंब केला तिचा कोणत्याही परिस्थितीत पाठपुरावा करता येणे

अशक्य आहे. त्याचप्रमाणे त्याच्या कारकिर्दीच्या इतिहासकाराचे मत देखील आपल्या सुलतानाच्या वर्तनाची चाहा करण्यास धजत नाही. कोणत्याही तऱ्हेचा अधिक उणा शब्द न देता तो या प्रसंगी जे घडले ते सही सही सत्य कथन करतो.

( ३२९ ) □ वा वास्तू अजून देखील एका छोटयाशा चांदीच्या पेटीत विजापूरच्या राजवाडयांत ठेवल्या आहेत. त्या **असर शरीफ** म्हणजे पवित्र अवशेष या नावाने ओळखल्या जातात. या घटनेनंतर जवळजवळ १०० वर्षांनी औरंगजेबाने विजापूर जिंकून घेतले तेव्हा पैगंबराच्या दाढीचा केस जतन करून ठेवलेले एक पवित्र स्थान त्याने उध्वस्त केले व दुसरे तसेच सोडले. इटली जिंकल्यानंतरच्या अलिकडील एका विजेत्याने तेथील शहरांची जी दशा केली त्याबरोबर तुलना करता औरंगजेबाने विजापूर शहराबाबत मनाचे मोठेच औदार्य दाखविले असे म्हणावे लागेल.

( ३३० ) □ या कालावधीनंतर जवळ जवळ १६ वर्षे म्हणजे इ. स. १६१२ पर्यंत फरिश्त्याने आपले इतिहास लिखाणाचे काम चालू ठेवले होते. विजापूरचा इतिहास अगदी शेवटी लिहिण्याचा त्याचा उद्देश असावा हे ह्या ठिकाणी त्याने आपला मजकूर एकाएकी अर्धवट सोडून दिला आहे त्यावरून वाटते. त्याच्या कार्याशी निगडीत असलेली प्रत्येक गोष्ट त्याचा मृत्यू त्याच्या ऐन तारुण्यात झाला असावा ह्याच मताची सांगता करताना दिसते. त्याला अचानक मृत्यू आला असावा हेच यातून संभवते.

( ३३० ) अ ★ इ स. १६३९ मध्ये फ्रेंच प्रवासी मॅन्डेस्लो याने विजापूरला भेट दिली. त्याने विजापूरचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. तो म्हणतो विजापूरचा राजा हा जरी मोगल बादशहाचा मांडलिक असला तरी तो दोन लाखांचे सैन्य उभारू शकत असे. त्याचा तोफखाना सुप्रसिद्ध असून हिन्दुस्तानामधील कोणत्याही राजापेक्षा त्याच्याकडे अधिक तोफा होत्या. त्याच्याकडे असलेली एक पितळ्याची तोफ एका इटालियन कारागीराने तयार केलेली असून त्या तोफेच्या गोळ्याचे वजन आठ हंड्रेडवेट एवढे होते. या राज्यातून सुरत, इराण आणि युरोप येथे मिरी रवाना होत असत. हिन्दुस्तानातील इतर प्रांतात रेशमी कापडाच्या बदल्यात कॅलिकोचे कापड रवाना होई. धान्याचा व्यापार वंजारी जमातीच्या लोकांच्या हाती होता. हे लोक एका वेळी एक हजार जनावरे घेऊन धान्याची ने-आण करीत. तेथे प्रचारात असलेले नाणे **लारी** या नावाने ओळखले जाई. येथील बहुसंख्य प्रजा हिन्दू होती.

इ. स. १६४८ मध्ये टॅव्हरनियर या प्रवाशाने विजापूरला भेट दिली. तो म्हणतो की विजापूरच्या सुलतानाचे मोगलांबरोबर नेहमी युद्ध चालू असे. परंतु गोवळकोंडा आणि आजूबाजूच्या छोट्या राजेरजवाड्यांकडून त्याला मदत मिळत असल्याने मोगलांचे त्याच्याविरुद्ध काही चालत नसे. त्याचप्रमाणे विजापूरच्या राज्यात पाणी आणि धान्य यांचा तुटवडा असल्याने सैन्याच्या हालचालींना तो प्रदेश कठीण होता. विजापूरच्या

राज्यात दोन मोठ्या व्यापारी पेठा होत्या. एक बेळगावच्या हद्दीतील रायबाग ही मिर्‍यांकरिता प्रसिद्ध होती आणि दुसरी रत्नागिरीच्या हद्दीतील वेंगुर्ला ही वेलचीच्या व्यापारासाठी प्रसिद्ध होती.

( ३३१ ) ★ विजापूरचा पाडाव होण्याचे काही काळ अगोदर इंग्लिश भूगोल तज्ज्ञ ऑगिल्बी याने १६८० मध्ये विजापूरचा वृत्तान्त दिला आहे. तो म्हणतो विजापूरात अनेक जवाहिरे असून ते भारी किंमतीच्या रत्नांचा आणि मोत्यांचा व्यापार करीत. विजापूर राज्यातील सैनिक रुंद तलवारी, भाले, धनुष्यबाण आणि बरची ही हत्यारे वापरीत असत. कूच करून जाताना मुक्कामासाठी ते कॅलिकोच्या कापडाचे तंबू नेत. आपले सामानसुमान नेण्यासाठी ते बैलांचा उपयोग करीत. विजापूरच्या सुलतानापाशी अनेक हत्ती होते. तो अतिशय सामर्थ्यवान असून लढाईच्या वेळी दोन लाखांपर्यंत सैन्य तो रणांगणात आणू शकत असे. त्याच्या सैन्यात दोनशे मोठ्या तोफा होत्या. सुलतानाचे नाव आदिलशहा असे होते. राजधानीच्या शहरी दिवाणी खटले कोतवाल चालवीत असे आणि फौजदारी खटले सुलतान चालवीत असे. आरोपींना सुलतानाच्या समक्ष अतिशय क्रूरपणे शिक्षा देण्यात येई. अनेकदा गुन्हेगारांना हत्तीच्या पायाखाली देत, क्रूर जनावरांचे भक्ष्य बनवीत आणि त्यांच्या शरीराचे अवयव छाटून टाकीत. ऋणकोने कर्जफेड न केल्यास त्याला फटक्यांची शिक्षा देत आणि त्यांच्या बायकामुलांना गुलाम म्हणून धनकोला विकत असत.

( ३३२ ) ★ विजापूर राज्यातील राज्यव्यवस्था : तत्कालीन परिस्थिती आणि सामाजिक स्थिती ही अहमदनगर राज्याहून फारशी भिन्न नव्हती. आदिलशाही घराण्याचा संस्थापक युसूफ आदिलशहा याने इ. स. १४७८ मध्ये महमूद गावानने महसुलाबाबतच्या केलेल्या सुधारणा आपल्या राज्याला लागू केल्या. इतकेच नव्हे तर ज्या सुधारणांमुळे इ. स. १४९० मध्ये बहमनींच्या राज्यात क्रांती होऊन महमूद गावानचा खून झाला, त्याही सुधारणा त्याने स्वीकारल्या. बहमनींप्रमाणेच राज्य-कारभाराचा मुख्य हा सुलतान असून त्याला पुढील अधिकाऱ्यांची मदत होत असे : **वकील** आणि **पेशवा**, **वजीर**, **अमीर जुमला**, **सर शिलेदार**, **सरनोबत**, **अमीर-उल्-उमरा**, **मुख्य नाईकवाडी** आणि **चिटणीस** वगैरे. या सर्वांमिळून मध्यवर्ती कार्यालय बनत असे. या कार्यालयाची विभागणी निरनिराळ्या विभागांत झालेली असे. या विभागांना **दिवाण** असे म्हणत. राज्याचे **परगणे** वरील अधि-काऱ्यांकडे **मोकासा** किंवा **जहागीर** म्हणून सोपविले जात. साहजिकच मध्यवर्ती सरकारचे प्रतिनिधी आणि परगण्याचे प्रमुख हे दोन अधिकार एकाचवेळी त्यांच्याकडे असत. आदिलशाहीच्या पूर्वार्धात वकिलाच्या पदाला फार मोठा मान असे. आदिल-शाहीच्या उत्तरार्धात **वजीर** आणि **पेशवा** ही पदे एकाच पातळीत आणण्यात

आली. अनेक वेळा **अमीर जुमला** आणि **वकील** हे अधिकार एकाच व्यक्तीकडे सोपविले जात. अहमदनगरप्रमाणेच देशाची विभागणी जिल्ह्यांमध्ये झालेली होती. जिल्ह्याची विभागणी तालुके, प्रांत अथवा देश यामध्ये होई. जमिनीच्या वसुलाचे काम खंडून दिले जाई. महसूल गोळा करणाऱ्या अधिकाऱ्याला **अमील** असे म्हणत. **अमील** या अधिकाऱ्याच्या वरचा अधिकारी **मोकासादार** असे. पुष्कळदा मोकासादारीवर तहहयात नेमणुका होत. कधी कधी मोकासादाराच्या मुलाची नेमणूक त्या जागेवर होई. मोकासादाराच्या वरचा अधिकारी प्रांतिक सुभेदार असे त्याला **सुभा** असे म्हणत. प्रत्यक्षात **सुभा** हा जिल्ह्याचे ठिकाणी कधीच राहात नसे किंवा जिल्ह्याच्या महसूल कारभारात भाग घेत नसे. त्यांचे काम त्यांनी नेमलेले दुय्यम अधिकारी करीत. विजापूर सरकारांत अहमदनगरपेक्षा हिन्दू अधिकाऱ्यांची संख्या अधिक होती. त्यांच्यापैकी अनेकजण **जहागीरदार** होते तर अनेकजण मुलकी आणि लष्करी अधिकारावर होते, त्यापैकी काहींची नावे पुढीलप्रमाणे होती. जावळीचे चंद्रराव मोरे, फलटणचे नाईक निंबाळकर, मालवडीचे झुंजारराव घाटगे, जतचे डफळे, म्हसवडचे माने आणि कापशीचे घोरपडे.

( ३३३ ) * विजापूरची न्यायपद्धती पुढीलप्रमाणे होती : न्यायाबाबतचे सर्व अधिकार सुलतानाकडे होते. पुष्कळदा समाजातील प्रमुख व्यक्तींचा न्यायदानाच्या बाबतीत सल्ला घेतला जाई. सुलतानाच्या नंतरचा अधिकारी म्हणजे मुख्य न्यायाधीश. त्याला **काजी** असे म्हणत. त्याची नेमणूक सुलतानाकडून केली जाई आणि तो सुलतानाला जबाबदार असे. त्याखेरीज **वजीर** आणि **अमीर** यांना त्यांच्या ताब्यातील प्रदेशाबाबत न्यायदानाचे अधिकार असत. बहुधा हे अधिकारी आपल्या दुय्यमांकडे आपल्या जबाबदाऱ्या सोपवीत परंतु ते जेव्हा स्वतः न्यायदान करीत तेव्हा ते मजलीसचा सल्ला घेत. मजलीसप्रमाणेच **गोत सभा** ही देखील न्यायसंस्थेचे एक प्रमुख अंग होती.

परगण्यातील सर्व सरकारी अधिकारी मिळून **दिवाण** बनत असे. यामध्ये प्रमुख अधिकारी म्हणजे **काजी, मोकाशी** आणि **सभासद** हे असत. त्याखेरीज दिवाणमध्ये **देशमुख, देशपांडे, वतनदार** आणि **मिरासदार** हेही असत. प्रत्येक परगण्याला अशी **मजलीस** अथवा **दिवाण** असे. कधीकधी परगण्यामध्ये असलेल्या किल्ल्यात **मजलीस** अगर **दिवाण** यांची बैठक कज्जांचे निकाल देण्यासाठी बोलावीत असत.

(३३४) * विजापूर राज्य आणि तेथील लोक यांचे अतिशय उत्कृष्ट वर्णन त्याकाळी हिन्दुस्तानात आलेल्या परदेशी प्रवाशांनी दिले आहे. त्यापैकी काहींनी दिलेल्या वर्णनाचा सारांश पुढे दिला आहे :

वार्थेमा हा इटालियन प्रवासी १५०२ मध्ये हिन्दुस्थानात आला. विजापूरचा

सुलतान हा अतिशय सामर्थ्यवान, श्रीमान, उदार आणि मोठ्या वैभवात आणि भपक्यात राहणारा होता असे वर्णन त्याने केले आहे. त्याच्या चाकरांपैकी अनेकजण आपल्या पायातील पादत्राणांत रत्ने, हिरे आणि इतर माणके बसवून घेत. बऱ्हंशी तेथील लोक रंगाने पिंगट होते. त्यांचा पोशाख हा उत्तम रेशमी कापडापासून बनविलेला असून त्यांच्या पोशाखाची तऱ्हा खलाशाप्रमाणे असे. तेथील स्त्रिया बाहेर जाताना बुरखा घेत असत. विजापूरच्या सैन्यात २५ हजार पायदळ आणि घोडेस्वार असून त्यापैकी बहुतेक परदेशी होते. सुलतानाच्या ताब्यात अनेक जहाजे होती. तो फिरंग्यांचा अतिशय द्वेष करी. सुलतान जेव्हा आपल्या सैन्यात सैनिकांची भरती करी तेव्हा त्यांच्यावर मुष्टीप्रहार करून तो त्यांची ताकद अजमावीत असे.

(३३५) ★ इ. स. १६६० मध्ये बाल-दे-ऑस या डच प्रवाशाने विजापूर राज्याला भेट दिली. तो म्हणतो–विजापूरचे राज्य ७५० मैल लांब आणि ४५० मैल रुंद एवढे होते. विजापूरचा सुलतान हा नाममात्र स्वतंत्र असून प्रत्यक्षात मात्र तो मोगलांचा मांडलीक होता. त्याच्या फौजेत १ लक्ष ५० हजार घोडेस्वार असून असंख्यात पायदळ होते. विजापूर राज्यात मीठ तयार करण्याचे अनेक कारखाने होते.

## खानदेशचे फारुकी घराणे : तळटीपा

( ३३६·१ ) □ सिपाह सालार म्हणजे मुख्य सेनाधिकारी.

( ३३६·२ ) □ विशिष्ट शिल्पामध्ये बांधलेल्या पहिल्या फारुकी सुलतानांच्या अनेक कबरी अजून बऱ्या स्थितीत थाळनेर येथे आहेत. परंतु त्यापैकी कोणत्याही कबरीवर वाचता येण्याजोगे शिलालेख असे नाहीत.

( ३३६·३ ) □ शहा या शब्दाचा मूळ अन्वयार्थ साधू असा आहे. या शब्दाचा पहिल्या प्रथम उपयोग पर्शियाच्या सूफी सुलतानांनी सिंहासनावर आल्यानंतर करण्यास सुरुवात केली. या शब्दापाठीमागे जी पावित्र्य निदर्शक भावना होती ती विचारात न घेता हिंदुस्थानातील सुलतानांनी त्याच पदवीने आपल्याला संबोधून घेण्यास सुरुवात केली.

( ३३६·४ ) □ अहीर या शब्दाचा अर्थ मेंढपाळ. हिंदुस्थानामधील जुन्यात जुने असे जे किल्ले आहेत त्या किल्ल्यांच्या किल्लेदारांचे जीवन मेंढपाळांच्या जीवनाशी निगडीत असल्याचे आपल्याला आढळून येते. ज्या वेळी भारतवासीयांना एकादी जुनी कलाकृती अथवा शिल्प याची निश्चित तारीख देता येत नाही तेव्हा ते तिचा संबंध गवळी राजांच्या कालमानाबरोबर जोडतात. माझ्यासमोर अशा डोंगरी किल्ल्यांची जी काही ठळक उदाहरणे आहेत, त्यामध्ये असीर, गावीलगड, गोवळकोंडा, वेणकोंडा आणि ग्वालियर या किल्ल्यांचा मी प्रामुख्याने समावेश करतो. माझ्या मते ग्वालियर ह्या किल्ल्याच्या नावामध्ये वरील अर्थच अभिप्रेत असावा.

( ३३६·५ ) □ या पूर्वी अनेक शतके होऊन गेलेल्या अश्वत्थाम्याचे निवासस्थान म्हणून असीरच्या देवळाचा उल्लेख करतात. हिंदूंच्या अमलाखाली या किल्ल्याची स्थिती कशीही असो परंतु तेथे आता दिसणारा दर्गा आणि तोफांना तोंड देऊ शकेल अशी तटबंदी व इतर सुधारणा पाहिल्यावर त्याचे श्रेय मुसलमानी राजवटीला द्यावे लागेल यात काहीच शंका नाही.

( ३३६·६ ) □ मुसलमानांनी दक्षिण जिंकण्याचे अगोदर असा हा बहुधा देवगिरीच्या यादवांच्या प्रांतिक सुभेदार असावा. देवगिरीच्या राजघराण्याचा नाश झाल्यावर हे प्रांतिक सुभेदार आपापल्या निष्ठेतून मुक्त झाले आणि त्यांनी शक्य झाले तोपर्यंत आक्रमकांना तोंड देण्याची पराकाष्ठा केली. या परिस्थितीत अनेक प्रांतिक सुभेदार स्वतंत्र होणे साहजिकच होते. परंतु दक्षिणेमधील सुभेदारांचे काय झाले याबद्दल आपल्याला निश्चित माहिती नाही. म्हणून याबाबत अनुमानावरच आपल्याला अधिक भर द्यावा लागेल.

( ३३६·७ ) □ स्त्रिया आणि आजारी माणसे वाहून नेण्यासाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या पालख्या अथवा आच्छादलेले मेणे.

( ३३६·८ ) □ नसीरखान आणि त्याचे वंशज याबद्दल फरिश्त्याला वाटणाऱ्या रागात फरिश्त्याचा मुसलमानीपणा गोठून गेला आहे. असाच्या संपत्तीसंबंधी फरिश्त्याने येथे जे उद्गार काढले आहेत त्याचा अर्थ असा की नियतीने असाच्या संपत्तीचा नसीरखानाच्या वंशजांना उपयोग घेऊ दिला नाही.

( ३३६·९ ) □ दौलताबादजवळ असलेल्या रोजा या गावी या दोन अवलियांचे दफन केलेले आहे. दक्षिणेमध्ये या दोन अवलियांच्या नावांना लोक अजून मानतात.

( ३३६·१० ) □ ही लढाई माणिकपुंज घाटाच्या वर असलेल्या सपाटीवर झाली. हिचा उल्लेख दक्षिण देशचे इतिहासकार करीत नाहीत.

( ३३६·११ ) □ या शद्बातून खून असा अर्थ निघतो.

( ३३६·१२ ) □ बुरहाणपूरच्या उत्तरेला एक मैलावर असलेल्या सपाटीच्या मैदानाला दौलतमैदान असे म्हणतात. राजवाड्यासभोवार असलेली मोकळी जागा अनेक एकरांवर पसरलेली असून तिच्यापैकी काही जागेचा उपयोग बादशहाच्या घोडेस्वारांना तालीम देण्यासाठी आणि शिकविण्यासाठी केला जाई. अजूनही या जागेला पूर्वीचेच नाव आहे. १८२१ मध्ये मी जेव्हा बुरहाणपूरला भेट दिली तेव्हा एकेकाळी तऱ्हतऱ्हेच्या फळझाडांनी गजबजलेल्या पण आता ओसाड असलेल्या या बागेत सुलतानाची कबर शोधून काढावयास मला फार कष्ट पडले. ही कबर आणि तिच्यासारख्याच अनेक वास्तू असलेले हे मैदान आता झाडाझुडपांनी गच्च भरलेले असून विषारी सर्प आणि रानटी प्राणी यांचे आश्रयस्थान झालेले आहे.

( ३३६·१३ ) □ मलिक राजाच्या कारकिर्दीच्या इतिहासाची सांगता करताना फरिश्ता असे म्हणतो की इ. स. १६०४ मध्ये मी जेव्हा बुरहाणपूरला भेट दिली तेव्हा खानदेशच्या फारुकी सुलतानांचा इतिहास मिळविण्यात मला अपयश आले; म्हणून मी मिर्जाअली ( इस्फहानचा ) याजकडे असलेल्या फारुकींच्या वंशवृक्षाची नकल करून घेतली. यामध्ये ७३० वर्षांवर पसरलेल्या १६ पिढ्यांची नावे मिळतात. म्हणजे प्रत्येक पिढीला ४५ वर्षे, ७ महिने आणि १५ दिवस एवढा कालावधी मिळतो. हा कालखंड सर आयझॅक न्यूटन आणि इतर कालक्रमगणना तज्ज्ञांनुसार अधिक बाजूचा असा आहे.

फरिश्त्याने भेट दिल्यानंतर दोनशे वर्षांपेक्षा अधिक कालावधीनंतर ब्रिग्जने बुरहाणपूरला भेट दिली. वर उल्लेखिलेल्या वंशवृक्षाव्यतिरिक्त इतर कसलेही ऐतिहासिक साहित्य त्याला मिळाले नाही. वरील वंशवृक्ष शहा शम्सउद्दीन या प्रतिष्ठित घराण्यातील एका व्यक्तीकडे त्याला मिळाला. आपण पहिल्या आदिलखानाचा मुलगा अजीजखान याचे वंशज असल्याचा त्याचा दावा होता. अजीजखानाचा हक्क त्याचा चुलता दाउद याने बळकाविला असे त्याचे म्हणणे होते. फरिश्ता हा अजीजखानाचा उल्लेख करीत नाही. साहजिकच शम्सउद्दीन याच्या कुलवृत्ताताचे खरेखोटेपण तूर्त तरी त्याच्याच शब्दावर ठरवावे लागेल. त्याच्या घराण्याचे आडनाव फारुकी आहे हे निःसंशय. त्याचप्रमाणे बुरहाणपूर येथे त्याचा जो वडिलोपार्जित जमीनजुमला आहे त्याचा कालखंड हा बुरहाणपूरमध्ये सध्या अस्तित्वात असलेल्या दप्तरातील तारखांपेक्षा अधिक जुना आहे.

फरिश्त्याने दिलेल्या वंशवृक्षापेक्षा शहा शम्सउद्दीन याने दिलेला वंशवृक्ष अधिक परिपूर्ण आहे. त्यात ३७ पिढ्या दाखविल्या असून त्यांचा कालखंड ८१९ वर्षे एवढा आहे. म्हणजे प्रत्येक पिढीपाठीमागे २२ वर्षे, १ महिना आणि अंदाजे १९ दिवस एवढा कालावधी मिळतो. हा वंशवृक्ष पुढे दिल्याप्रमाणे आहे. :

| | |
|---|---|
| खलिफ उमर फरुक | खान जेहान |
| अबदुल्ला | खानदेशचा पहिला सुलतान मलिकराजा |
| ओबेदउल्ला | नसीरखान |
| नासिर | मिरान आदिलखान |
| महमद अहमद | मिरान मुबारकखान |
| आजीम | पहिला आदिलखान |
| महमद | अजीजखान |
| महमूद | कैसरखान |
| अहमद | राजा फिरोजखान |
| आदम | राजा कासिमखान |

| | |
|---|---|
| इब्राहीम | मिरान मुबारक शहा |
| आर्मिअन | साहिबखान |
| जुलकुफूल | मोहबतखान |
| आशिआ | महमद हुसेनखान |
| दानियल | महाबत खान ऊर्फ बाबासाहिब |
| ख्वाजा तिह्ला | शहा शम्सउद्दिन-जमिनजुम |
| सिकंदर | त्याचा मालक आणि कुटुंब प्रमुख |
| शहीब | हल्ली वास्तव्य बुरहाणपूर |
| सिमेआन | |
| उथमान | |
| अली | |

( ३३६·१४ ) □ आलमखान हा कोणाचा मुलगा होता अथवा सिंहासनावर त्याचा अधिकार कसा पोहोचत होता याचे स्पष्टीकरण कुठेच केलेले नाही.

( ३३६·१५ ) □ या नात्याचा या ठिकाणी उल्लेख करण्यात आला आहे याचे कारण गुजराथच्या मुजफ्फरशहाला अनेक बायकांपासून मुले झाली. परंतु खानदेशच्या सुलतानाची बायको आणि गुजराथचा बहादूरशहा ही दोघे एकाच आईची मुले होती. म्हणूनच गुजराथच्या बहादूरशहाच्या मृत्यूनंतर तिचा ( खानदेशच्या राणीचा ) मुलगा मिरान महमदशहा याला गुजराथच्या सिंहासनावर बसविण्यात आले.

( ३३६·१६ ) □ त्याने जरी स्वतला शहा अथवा सुलतान ही पदवी घेतली तरी या सन्मान्य उपाधिवर त्याचा काहीही अधिकार नव्हता. कारण कोणत्याही राज्याचे राजेपण त्याच्याकडे आलेले नव्हते. याबाबत घोटाळा होऊ नये म्हणून मी त्याचा उल्लेख खान असा केलेला आहे.

( ३३६·१७ ) □ बहादूरशहाचा भाऊ लतीफखान याने गुजराथचे सिंहासन मिळविण्यासाठी केलेले प्रयत्न यापूर्वीच कथन करण्यात आलेले आहेत. खानदेशचा सुलतान आणि गुजराथचे सिंहासन यामध्ये अडथळा फक्त महमूद याचाच होता आणि त्याचा सोयिस्करपणे निकाल लावणे हे एक खानदेशच्या सुलतानालाच शक्य होते. तत्कालीन परिस्थिती विचारात घेता मिरान महमदशहापेक्षा महमूद याला अधिक आयुष्य लाभले ही गोष्ट मिरान महमदच्या निश्चितच जमेच्या बाजूला आहे.

( ३३६·१८ ) □ अहमदनगर आणि गुजराथ यांच्या वजिरांची नावे एकाच वेळी चेंगीजखान अशी असावीत हा मोठा योगायोगच समजला पाहिजे. परंतु दोन राज्यांमधील वैशिष्ट्य ध्यानात घेतल्यास वाचक निश्चितच दोघांमध्ये गोंधळ करणार नाहीत हे सांगणे नको.

( ३३६·१९ ) □ या विधानानुसार एक मुजफ्फरी म्हणजे अर्धा रुपाया किंवा १५ इंग्लिश पेन्स. मुजफ्फरी हे नाणे हिणकस रुप्याचे असून ते गुजराथच्या तिसऱ्या मुजफ्फरशहाच्या कारकिर्दीत पाडण्यात आलेले होते. त्याच सुमारास ते खानदेशमध्ये प्रचलित झाले परंतु आता ते चलनामधून पूर्णपणे नामशेष झाले आहे.

( ३३६·२० ) □ त्यांनी सुलतानपूर आणि नंदुरबार मार्गे वऱ्हाडमधून माघार घेतली हे मोगल इतिहासकारांचे विधान माझ्या मते चुकीचे असले पाहिजे. ज्या मार्गाने त्यांनी वऱ्हाडात प्रवेश केला त्याच मार्गावर असलेल्या डोंगराळ भागातून बहुधा ते परतले असावे असे मानण्यास जागा आहे.

( ३३७ ) * **इस्फन्दरमज** महिन्याच्या २२ तारखेला खाने आजम, असफखान, शेख फरीद आणि मी ( अबुल फजल ) अशा चौघांना असीरच्या किल्ल्याला वेढा घालण्याचा आणि सभोवार मोर्चे उभारण्याचा हुकूम देण्यात आला. परंतु या कामगिरीसाठी शेख फरीदच्या हाताखाली जी फौजेची तुकडी देण्यात आली होती त्या तुकडीत शत्रू सैनिकांबरोबर तुलना करता सैनिकांची संख्या अतिशय कमी होती. साहजिकच किल्ल्यापासून तीन कोस अंतरावर मुक्काम करणे शहाणपणाचे ठरेल असा निर्णय घेण्यात आला. काही अननुभवी आणि टवाळ व्यक्तींनी वरील गोष्टीबाबत बादशहाचे मन भडकविण्याचा प्रयत्न केला. परंतु मी स्वतः त्याच्या भेटीला गेलो आणि खऱ्या परिस्थितीची त्याला जाणीव करून दिली. साहजिकच त्याचा राग निवळला. त्याच दिवशी खानदेशच्या प्रांताचा ताबा घेण्याच्या कामावर माझी नेमणूक करण्यात आली. त्या प्रांतामध्ये मी ३२ ठाण्यांची स्थापना केली आणि प्रत्येक ठाण्यावर एका जबाबदार अधिकाऱ्याची नेमणूक केली. एका ठाण्यावर मी आपला भाऊ शेख अबुल बरकत याची नेमणूक केली, आणि त्याच्या दिमतीला काही अनुभवी दुय्यम अधिकारी दिले. दुसऱ्या एका ठाण्यावर मी माझा मुलगा शेख अब्दुर रहमान याला नेमले. थोड्याच काळात खानदेशातील बंडखोरांना वठणीवर आणण्यात आले आणि अनेकांनी आनंदाने बादशहाची चाकरी पत्करली. खानदेशांतील सैनिक शांततेने शरण आले आणि शेतकऱ्यांनी शेतीच्या कामासाठी आपल्याला वाहून घेतले. ( **इलिएट ॲण्ड डॉसन**, खंड ६, पाने ९७–९८ )

( ३३८ ) * फैजी सिरहिन्दी याने अकबराच्या दक्षिणेतील मोहिमेसंबंधी दिलेली हकिकत संक्षिप्त स्वरूपात त्याच्या **अकबरनामा** या ग्रंथातून पुढे दिली आहे. ती अशी :—

दक्षिणेत तीन राज्ये आहेत.

(१) निजाम-उल्-मुल्कीया (२) आदिलखानीया (३) आणि कुतुबुल्मुल्किया. परकीयांचे आक्रमण झाल्यास ते आपापसातील भांडण विसरून त्यांच्याबरोबर लढत.

मोगल सैन्याने जेव्हा दक्षिणेवर स्वारी केली तेव्हा त्यांनी एकत्र येऊन मोगलांबरोबर युद्ध केले. त्यांची हजार माणसे कामी आली. मोगलांकडील राजा अलीखान ठार झाला. रामचंद्रकचवाहा हा जखमी झाला. त्यानंतर शत्रूचे सैन्य छावणीकडे परतले. संध्याकाळी खानखानानने शत्रूवर परत चाल केली. शत्रूही युद्धासाठी सज्ज झाला. परंतु झालेल्या लढाईत शत्रूची भयंकर कत्तल होऊन मोगलांना संपूर्ण विजय मिळाला. दक्षिण देश आपल्या अमलाखाली आणण्याचे मोगलांचे काम अशा तऱ्हेने चालू होते. दरम्यान शहा मुराद याचा मृत्यू झाला. त्याच्या जागी राजपुत्र दानियल याला तिकडे पाठविण्यात आले. दक्षिणेतील परिस्थितीविषयी बादशहाचे मन साशंक झाल्यामुळे बादशहाने स्वतः दक्षिणेकडे जाण्याचे ठरविले. मजल दरमजल करीत बादशहाने कालियाद आणि उज्जैन यांच्या दरम्यान मुक्काम केला. या ठिकाणी खानदेशचा राजा अलीखानाचा मुलगा बहाद्दूरखान आपल्याला येऊन मिळेल असे त्याला वाटले. बहाद्दूरखानाच्या मनात काही संशय असल्यास तो दूर करावा या हेतूने त्याने आपला वकील मिरान सद्रईजहान याला खानदेशकडे पाठविले. तेथे गेल्यावर त्याला असे कळले की, गादीवर येण्याचे अगोदर जवळजवळ तीस वर्षे बहाद्दूरखान हा बंदिवासात होता. राजनीती आणि राज्यकारभार याची त्याला यत्किंचितही माहिती नव्हती. साहजिकच राजा अलीखानाच्या मृत्यूनंतर त्याला राज्यपद मिळाले तेव्हा तो व्यसनात गुरफटला. राजा अलीखानाची मुत्सद्देगिरी आणि कुवत यांचा लवलेशही त्याच्या अंगी नव्हता. त्याच्या मनात बादशहाजवळ आपली कृतज्ञता व्यक्त करून खंडणी आदा करण्याचे नव्हते किंवा त्याच्या मनात आपल्या बापाचा सूड घेण्याचाही विचार आला नाही. बहाद्दूर खान हा मिरानला सामोरा गेला. मिरानने त्याला बादशहाबरोबर निष्ठा बाळगणे किती अगत्याचे आहे हे त्याच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला परंतु दैवच त्याच्यावर उलटले होते. मिरानने दिलेल्या सल्ल्याचा त्याच्यावर काहीही परिणाम झाला नाही. कधी तो आपण बादशहाच्या भेटीला जाणार असे म्हणे तर कधी लोकांच्या बोलण्याने संशय निर्माण होऊन तो भेटीला जाण्याचे टाळी. परंतु त्याने मिरानला असे वचन दिले की, " माझ्या मुलाला मी बादशहाकडे पाठवीन इतकेच नव्हे तर माझ्या मनावरचे दडपण नाहीसे झाल्यावर मी स्वतःच बादशहांच्या भेटीला जाईन. " त्याचा हा नकार त्याच्या चंचल मनःस्थितीचे द्योतक तरी असावा किंवा त्याच्या मनातील विश्वासघाताचे निदर्शक तरी असावा. आपल्या सल्ल्याचा काहीही परिणाम होत नाही असे जेव्हा मिरानला कळले तेव्हा त्याने त्याप्रमाणे बादशहाला कळविले. या गोष्टीचा बादशहाला राग आला आणि त्याने शेख फरीद बोखारी याला खानदेशकडे रवाना केले. बहाद्दूरखानाची समजूत घालून त्याला बादशहाकडे घेऊन येण्याचा आणि त्याने न ऐकल्यास असीरच्या किल्ल्याला वेढा देऊन तो ताब्यात घ्यावा असे शेख फरीद याला सांगण्यात आले होते. शेख फरीद याने नर्मदा नदी ओलांडली. तेथे त्याला

असे कळले की, बहाद्दूरखानाचे सैन्य राजा अलीखानाचा जावई सादत खान याच्या हाताखाली आहे आणि बादशाही फौजांचे लक्ष द्विधा करावे म्हणून त्याला नंदूरबार आणि सुलतानपूरकडे पाठविण्यात आले आहे. त्याच्यावर लक्ष ठेवण्यासाठी एका तुकडीची रवानगी करण्यात आली आणि बाकीचे सैन्य खानदेशात कूच करून गेले. धरखोल येथे आल्यावर शेख फरीद याला बहाद्दूरखानाकडून एक खलिता आला. त्यात त्याने आपल्याला पश्चात्ताप झाल्याचे आणि आपल्या मुलाला नजराणा देऊन बादशहाकडे पाठविण्याची आपली तयारी असल्याचे कळविले होते. आपल्यावतीने रदबदली करण्याची विनंती त्याने शेख फरीद याला केली होती. हे पत्र शेख फरीद याने बादशहाकडे पाठविले. यावर बादशहाने उत्तरादाखल साजेलसे पत्र लिहून बहाद्दूरखानाला क्षमा केल्याचे आणि आपल्याला तावडतोब येऊन भेटण्याबद्दल कळविले होते.

मोगलांची खानदेशात आगेकूच चालूच होती. मिरानने प्रथम असा सल्ला दिला होता की, मोगल सैन्याने असीरकडे न जाता बुरहाणपूरकडे जावे. असीरकडे गेल्यास बहाद्दूरखानाची निराशा होईल. परंतु बादशहाला हे मत मान्य न झाल्यामुळे त्याने मोगल सैन्याला असीरकडे कूच करून असीरला वेढा देण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणे मोगल सैन्य असीरहून दोन-तीन कोसांवर येऊन ठेपले. मिरानप्रमाणेच बादशहाने आपला दुसरा एक अधिकारी पेशरावखान यालाही बहाद्दूरखानाकडे पाठविले होते. या दोघांच्याही सांगण्याचा बहाद्दूरखानावर परिणाम झाला नाही. ते दोघेही असीरहून बुरहाणपूरकडे परतले होते. त्यांनी तेथून आपल्याला अपयश आल्याचे बादशहाला कळविले. पुढे जेव्हा शेख फरीद असीरजवळ आला तेव्हा बहाद्दूरखानाने त्यालाही वरीलप्रमाणेच पत्र पाठविले. त्याला उत्तर म्हणून असे कळविण्यात आले की, "दक्षिणेमधील सुलतानांनी बादशहाविरुद्ध युद्ध पुकारले. बादशहाच्या बाजूने लढताना राजा अलीखान मरण पावला. बादशहाचा उद्देश आता राजा अलीखानाच्या मृत्यूचा सूड घेण्याचा आहे. याकरिता तुम्ही विलंब न लावता आपल्या सैन्यासहित बादशहापाशी येऊन दाखल व्हा आणि तुमच्या बापाच्या मरणाचा सूड घ्या." परंतु दैवाने फारुकी घराण्याकडे पाठ फिरविली होती आणि बहाद्दूरखान हा बरेवाईट ऐकण्याच्या परिस्थितीत राहिला नव्हता. (या ठिकाणी फैजी सिरहिंदी याने फारुकी घराण्याची कुळकथा दिलेली आहे ती फरिश्त्याने दिलेल्या हकिकतीशी बरीचशी जुळती असल्याने या ठिकाणी दिलेली नाही.) यानंतर शेख फरीद याने असीरच्या किल्ल्याला वेढा दिला. खुद्द बादशहा वेढ्याच्या कामावर देखरेख करण्यासाठी नर्मदा पार करून आला.

दरम्यान अबुल फजल हा दक्षिणेतून बुरहाणपूर येथे येऊन दाखल झाला. त्याला शेख फरीदला जाऊन मिळण्याचा हुकूम देण्यात आला. त्याच्या छावणीची

जागा मुकर करण्यासाठी बाज बहाद्दूर उजबेक आणि करावेग यांना रवाना करण्यात आले. त्यांनी खबर दिली ती अशी : " असीरसारखा किल्ला आम्ही कोणत्याही देशात पाहिला नाही. कितीही काळ सैन्य वेढा देऊन बसले तरी बादशहाचे नशीब जोरावर असल्यासच किल्ला हाती येऊ शकेल. " ( या ठिकाणी फैजी सिरहिंदी याने किल्याचे सविस्तर वर्णन दिले आहे. किल्याचा आजुबाजूचा प्रदेश, त्यावर असलेली सामुग्री याबद्दल त्याने बरीच माहिती दिलेली आहे. वेढ्याचे वर्णन देण्याअगोदर तो किल्या-वरील युद्धसामुग्रीची माहिती देतो. ही सामुग्री किल्याचा पाडाव झाल्यानंतर मोगलांच्या हाती पडली असे तो म्हणतो. या माहितीप्रमाणे किल्यावर लहानमोठ्या १३०० तोफा होत्या. त्यातून उडविण्यासाठी असलेले तोफगोळे दोन मणापासून एक शेर वजनापर्यंत होते. त्याचप्रमाणे अनेक **हुकदान** ( उखळी तोफा ) आणि **मंजनीक** नावाची हत्यारे होती. त्यामधून एक ते दोन हजार मणी दगडांचा मारा करता येत असे. बंदुकांची तर गणतीच करता आली नाही. हजारो मण दारूगोळा इतक्या दिवसाच्या सतत चाललेल्या माऱ्यानंतरही किल्यावर होता. किल्यावर प्रचंड तलाव होते. )

शेख फरीद याने किल्याबद्दलची सर्व माहिती गोळा करून ती बादशहाकडे पाठविली. बादशहाने स्वतः येऊन प्रत्यक्ष परिस्थिती बघण्याचे ठरविले. या सुमारास अबुल फजलही बुरहाणपूरहून असीर येथे दाखल झाला. त्याला भेटण्यासाठी शेख फरीद निघाला असताना दुसऱ्या दिवशी बहाद्दूरखान भेटीला येणार असल्याचे त्याला आठवले. दुसऱ्या दिवशी बहाद्दूरखान शेख फरीदच्या भेटीला आला. दोघांची बोलणी झाली. परंतु त्यातून काहीच निष्पन्न झाले नाही. बदाद्दूरखान किल्यावर परतला. दुसऱ्या दिवशी शेख फरीदने अबुल फजलची भेट घेतली. त्यानंतर वेढ्याचे काम कसे पार पाडावयाचे याबद्दलच्या योजनेची आखणी करण्यात आली. बुरहाणपुर आणि असीर या दरम्यान १००० घोडेस्वारांची तुकडी ठेवण्यात आली. या तुकडीने किल्याकडचे सर्व मार्ग रोखून धरले. बुरहाणपूर शहर अगोदरच बादशाही सैन्याच्या ताब्यात आले होते. यानंतर शेख फरीद याने किल्याच्या अवतीभवती मोर्चे खणले आणि किल्याकडे जाणारे सर्व रस्ते रोखून धरले. एक दिवस शेख फरीद हा किल्याची पाहणी करीत असता त्याच्यावर किल्यावरून एक तोफ डागण्यात आली. परंतु तोफ ठेवलेला बुरूज आणि तोफ ही कोसळून खाली पडली. मोगल सैन्याने हा एक शुभ शकुन मानला. बादशहाचा मुक्काम या वेळी असीरपासून ७-८ कोसांवर असलेल्या बुरगाव या ठिकाणी होता. तेथे शेख फरीदने बादशहाची भेट घेतली. बुरगावहून बादशहाने आपला मुक्काम हलविला आणि २५ **रमजान** या दिवशी तो बुरहाणपूर येथे पोहोचला. ३ **शव्वाल** या दिवशी बादशहा किल्यानजीक येऊन दाखल झाला. वेढ्याचे कामावर वेगवेगळ्या ठिकाणी खान-इ-आजम, आसफखान, मिर्जा जानी बेग वगैरेंची नियुक्ती करण्यात आली. किल्याच्या तटापर्यंत सुरुंग नेणे शक्य नसल्याने

मोर्चे किल्ल्याच्या अगदी नजीक नेण्याचे प्रयत्न मोगल फौजांनी केले. किल्ल्यावरून रात्रंदिवस तोफांचा अविरत भडिमार होत असल्याची आणि मोगल सैन्य दमदारपणे तो सहन करीत असल्याची बातमी आजमखान आणि आसफखान यांनी बादशहाकडे दिली.

**जिलकाद** महिन्याच्या सुरुवातीला बहाद्दूरखानाने आपली आई व मुलगा यांना ६४ हत्ती बरोबर देऊन बादशहाकडे पाठविले आणि आपल्या अपराधाबद्दल क्षमा करण्याविषयी विनविले. बादशहाने "तू स्वतः येऊन शरणागती दे" असा निरोप त्याला पाठविला. **जिल्हिज्जा** महिन्याच्या १६ तारखेला शिबंदीने मोगलावर हल्ला चढविला. हल्ला परतवून लावण्यात आला. मोगलांच्या हाती किल्ल्यावर मारा करता येईल अशी कोरिया नावाची छोटी टेकडी पडली. तेथून जवळच असलेल्या आणखी एका टेकडीचा ताबा शर्थीने लढून मोगल सैन्याने घेतला.

यानंतर काही दिवसांनी बहाद्दूरखानाने आपले दोन प्रमुख अधिकारी सादतखान आणि पीर महमद हुसेन याना बादशहाकडे क्षमा याचनेची विनंती करण्यासाठी रवाना केले. दोन दिवसानी पीर महमद याला परत पाठविण्यात आले. त्याच्याबरोबर आलेल्या माणसांना परत जाण्यास सांगण्यात आले. परंतु त्यांनी किल्ल्यात जाण्याची आपली इच्छा नाही असे कळविले. त्यांच्याजवळ जामीन मागण्यात आला. ज्यांनी तो दिला त्यांना छावणीत ठेवण्यात आले, बाकीचे किल्ल्यात परत गेले. किल्ल्याचा पाडाव होण्याच्या कारणांपैकी एक कारण म्हणजे किल्ल्यावरील दूषित हवा आणि त्यामुळे निर्माण झालेले दोन भयंकर रोग. त्यापैकी एका रोगामुळे कमरेखालचा भाग लुळा पडत असे तर दुसऱ्यामुळे दृष्टी मंद होत असे. परिणामी किल्ल्यावरील शिबंदी गलितगात्र आणि नाउमेद झाली आणि त्यांनी बहाद्दूरखानाला शरणागती देण्यास सांगितले. त्यांच्या सांगण्यावरून बहाद्दूरखानाने बादशहाकडे आपली शरणागती कळविली. अशा तऱ्हेने किल्ल्याचा वेढा संपला. बहाद्दूरखान किल्ल्यातून बाहेर आला तेव्हा अकबर बादशहाने मोठा दरबार भरविला. १७ **सफर** रोजी बादशाही फौजांनी किल्ल्यात प्रवेश केला. बादशहाने स्वतः किल्ल्याची पाहणी केली बादशहा त्या ठिकाणी तीन दिवस राहिला आणि तेथून त्याने बुरहाणपूरकडे प्रयाण केले. (**इलिएट ॲन्ड डॉसन**, खंड ६, पाने १३१-१४७).

## वऱ्हाडची इमादशाही : तळटीपा

(३३९) □ खुदावन्दखान हबशी याच्याकडे रामगीर, माहूर आणि वऱ्हाड-प्रांताचा दक्षिण भाग हा प्रदेश कारभारासाठी सुपूर्द करण्यात आला होता. याच वेळी एलिचपूर, गावील आणि वऱ्हाड प्रांताचा उत्तर भाग हा प्रदेश फत्तेउल्लाइमादउल्मुल्क याच्या ताब्यात देण्यात आला होता.

(३३९ अ) * वऱ्हाडच्या फत्तेउल्लाइमादउल्मुल्क याने विजापूरचा युसुफ आदिलखान आणि अहमदनगरचा निजाम-उल्-मुल्क यांच्याबरोबर इ. स. १४९० मध्ये स्वातंत्र्य पुकारले. त्याच्या नावावरून त्या राज्याला इमादशाही घराणे असे नाव पडले. महमूद गावानने जेव्हा राज्याची आठ भागांमध्ये विभागणी केली तेव्हा इमाद-उल्-मुल्क याच्याकडे गावीलची सुभेदारी आली. महमूद गावानचा खून झाल्यानंतर त्याने महमद शहाबरोबर फटकून वागण्यास सुरुवात केली. पुढे सुलतानाने जेव्हा बेळगावकडे कूच केले तेव्हा फत्तेउल्ला सुलतानाच्या आज्ञेप्रमाणे येऊन दाखल झाला परंतु सुलतानाबरोबर कूच करून जाण्याचे अथवा त्याची भेट घेण्याचेही त्याने नाकारले. नंतर सुलतानाची भेट न घेता तो वऱ्हाडात निघून गेला. महमदशहाचा मृत्यू झाल्यानंतर त्याचा मुलगा महमूद हा गादीवर आला. फत्तेउल्ला याने आपले पूर्वीचे धोरण पुढे चालविले. त्यावेळी दक्षिणी आणि परदेशी मुसलमान यांच्यामधील वैमनस्य विकोपाला गेले होते. त्यावेळी फत्तेउल्ला याने मलिक नायब याच्याबरोबर राज्यकारभारात वजीरपद स्वीकारले. परंतु बिदरमधील कटकटीला कंटाळून तो वऱ्हाडकडे चालता झाला, १४९० मध्ये आपले स्वातंत्र्य जाहीर करीपर्यंत त्याने बिदरकडील भानगडीकडे लक्ष दिले नाही.

(३४०) * वऱ्हाडच्या तुफालखानासंबंधी सय्यद अलीच्या **बुरहाणे मासीर** या ग्रंथात पुढीलप्रमाणे हकीकत दिलेली आहे : तुफालखानाने वऱ्हाडच्या इमादशहाचा विश्वास संपादन करून मुख्य वजिराचे पद आपल्याकडे घेतले. पुढे त्याची महत्त्वाकांक्षा इतकी वाढली की, त्याने दर्या इमादशहाला पदच्युत करण्याचे ठरविले. इमादशहाने हुसेन निजामशहाची मदत मागितली. हुसेन निजामशहाने आपली फौज वऱ्हाडकडे पाठविली तेव्हा तुफालखानाने वऱ्हाड सोडून बुरहाणपूरचा आश्रय घेतला. पुढे तालीकोटच्या लढाईनंतर मुर्तजा निजामशहा आणि अली आदिलशहा यांनी वऱ्हाडवर स्वारी करण्याचे ठरविले. अहमदनगरतर्फे फरहादखान आणि विजापूरतर्फे दिलावरखान हे वऱ्हाडवर रवाना झाले. तुफालखानाने गावील गडाचा आश्रय घेतला. अहमदनगरच्या सैन्याने किल्ल्याला वेढा दिला. दरम्यान तुफालखानाने आदिलशहाला लाच देऊन किल्ल्याचा वेढा उठविण्यासंबंधी त्याचे मन वळविले. त्याप्रमाणे अहमदनगर आणि विजापूर यांची सैन्ये वेढा उठवून आपापल्या राज्याकडे परत फिरली. इ. स. १५७२ मध्ये पोर्तुगीजांकडून अहमदनगरचा पराभव झाल्याचा फायदा घेऊन अली आदिलशहा आणि तुफालखान यांनी एकजूट केली. प्रथम निजामशहाने विजापूरचा समाचार घ्यावा असे ठरविले. परंतु विजापूरच्या सहकार्याखेरीज तुफालखानाचा नाश करता येणार नाही म्हणून त्याने विजापूरशी समझोता केला. तेव्हा असे ठरले की, आदिलशहाने तेलंगणावर चाल करावी आणि निजामशहाने वऱ्हाडवर. निजामशहाचे सैन्य त्याप्रमाणे वऱ्हाडात घुसले. मुर्तजा निजामशहा पाथरी येथे थांबला. तो प्रांत त्याने आपल्या अधिकाऱ्यांमध्ये वाटून दिला. दरम्यान त्याला असे कळले की,

तुफालखानाने कंधार प्रांतावर चाल केली आहे. तेव्हा निजामशाही सैन्यही कंधारकडे चालून गेले. हे ऐकून तुफालखानाने बिदरच्या दिशेने चाल केली. निजामशहाचे सैन्यदेखील त्या दिशेने गेले. दोन्ही सैन्याची गाठ बिदरजवळ शिकारीच्या मैदानातच पडली. दोन्ही फौजांत त्या दिवशी भयानक युद्ध झाले. परंतु रातोरात तुफालखान माहूरच्या दिशेने निघून गेला. त्याच्या मागावर निजामशाही सैन्य गेले. मेतापूर येथे उभय सैन्याची गाठ पडली. दोन प्रहर रात्रीपर्यंत युद्ध चालले होते. मागीलप्रमाणेच तुफालखान परत पळून गेला. त्याच्या मागावर खुदावन्दखान आणि रुस्तुमखान हे होते. त्यांनी तुफालखानाच्या हालचालीकडे दुर्लक्ष केले आणि ते ऐषारामात राहिले. त्याचा फायदा घेऊन तुफालखानाचा मुलगा समशेर-उल्-मुल्क याने अचानक हल्ला करून निजामशाही सैन्याचा पराभव केला. रुस्तुमखान या युद्धात मरण पावला. मुर्तजा निजामशहाने आपल्या सैन्याच्या मदतीसाठी ताबडतोब कूच केले. तुफालखान आता बुरहाणपूरच्या सरहद्दीवर पोहोचला होता. त्याला आश्रय देऊ नये असे मुर्तजा निजामशहाने खानदेशचा सुलतान मिरानमहमदशहा याला कळविले. तेव्हा महमदशहाने तुफालखानाला हाकलून दिले. तुफालखानाने नरनाळ्याच्या किल्ल्याचा आणि समशेर-उल्-मुल्कने गावीलगड किल्ल्याचा आश्रय घेतला. या दोन्ही किल्ल्यांना निजामशाही सैन्याने वेढा दिला. जवळ जवळ एक वर्षभर किल्ल्यांचा वेढा चालला होता. सरतेशेवटी नरनाळ्याचा पाडाव झाला. तुफालखान किल्ल्यामधून निसटला परंतु त्याला जवळच्याच एका खेड्यात पकडण्यात आले. नरनाळा पडल्याची बातमी समशेर-उल्-मुल्क याला कळताच त्यानेही गावीलगडचा किल्ला निजामशाही सैन्याच्या ताब्यात दिला. तुफालखान, त्याची इतर मुले, समशेर-उल्-मुल्क आणि इमादशाही घराण्यातील इतर मंडळी यांना लोहगड येथे बंदिवासात ठेवण्यात आले. अशा तऱ्हेने वऱ्हाड प्रांत हा निजामशाही राज्यात सामील झाला. मुर्तजा निजामशहाने वऱ्हाडचा **सर लष्कर** म्हणून खत्ताखान काशी याची नेमणूक केली. बहरामखान गिलानी याची गावीलगडचा किल्लेदार आणि सय्यद अली जहिर याची नरनाळ्याचा किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

( ३४१ ) * वऱ्हाड प्रांत निजामशाहीत सामील झाल्यावर तेथे झालेल्या काही बंडांची हकीकत सय्यद अलीने आपल्या **बुरहाणे मासीर** या ग्रंथात दिली आहे. ती अशी :

वऱ्हाडात मिर्जा कुलीखान हा निजामशाही सरदार होता. त्याचे आणि **सर लष्कर** खत्ताखान याचे भांडण होऊन मिर्जा कुलीने खत्ताखानाला ठार मारले. त्याचे बंड मोडण्याकरिता निजामशहाने खुर्शिदखानाला **सर लष्कर** म्हणून वऱ्हाडात पाठविले. याच वेळी खानदेशच्या मिरान महमदशहाला वऱ्हाड जिंकून घ्यावा अशी हाव सुटून त्याने आपला सेनापती सय्यद जैनाल याला वीस हजार सैन्य देऊन वऱ्हाडवर पाठविले. या सैन्यासमोर आपला निभाव लागणार नाही असे वाटून

खुर्शिदखानाने गावीलगडचा आश्रय घेतला. नरनाळा किल्ल्यालाही खानदेशच्या सैन्याने वेढा दिला. निजामशाही सैन्य आणि खानदेशचे सैन्य यांच्यात युद्ध होऊन पूर्णा नदीच्या काठावर निजामशाही सैन्याचा पराभव झाला. ही हकीकत कळल्यावर मुर्तजा निजामशहाने सय्यद मुर्तजा याला वऱ्हाडात पाठविले. आता वऱ्हाडात रहाण्यात काही अर्थ नाही असे वाटून खानदेशचा सेनापती सय्यद जैनाल याने खानदेशच्या दिशेने माघार घेतली.

यानंतर काही काळाने फिरोजशहा नावाच्या एका इसमाने आपण इमादशहाच्या मुलांपैकी एक आहोत असे सांगून बंड केले. त्याने वऱ्हाडचा सुभेदार खानजमान याचा पराभव केला. यावर मुर्तजा निजामशहाने सय्यद मुर्तजा याला वऱ्हाडचा अमीर-उल्-उमराव म्हणजे **सर सुभेदार** म्हणून नेमले. बंडखोरांनी ह्या वेळेपर्यंत एलिचपूरचा ताबा घेतला होता. सय्यद मुर्तजाने एलिचपूर गाठले. तेव्हा फिरोजशहाने आमनेर चर्वी या किल्ल्याचा आश्रय घेतला. निजामशाही सैन्याबरोबर झालेल्या लढाईत फिरोजशहा मारला गेला. याचवेळी वऱ्हाडातील गोंड आणि इतर जमातींनी उठाव केला आणि ठिकठिकाणी लूटमार करण्यास सुरुवात केली. त्यांचाही निजामशाही सैन्याने बीमोड केला. सय्यद मुर्तजा हा त्यानंतर एलिचपूर येथे राहू लागला. यानंतर वऱ्हाडात झालेले बंड म्हणजे अकबर बादशहाचा लांबचा चुलतभाऊ मुजफ्फर हुसेन मिर्जा याचे होय. या सुमारास अकबर बादशहा हा माळव्याच्या स्वारीवर आला होता. त्याचे आक्रमण होईल या भीतीने मुर्तजा निजामशहाने प्रतिकाराची तयारी केली. मुजफ्फर हुसेन मिर्जा हा दर्यापूर येथे होता. त्याने सैन्य जमवून वऱ्हाडकडे कूच केले. सय्यद मुर्तजाने वरवर त्याच्याबरोबर पत्रव्यवहार चालू ठेवला. परंतु प्रत्यक्षात मात्र लढाईची तयारी चालू ठेवली. दोन्ही फौजांची गाठ अंजनगाव येथे पडली. मिर्जाच्या सैन्यात सय्यद मुर्तजाने फूट पाडली होती. युद्ध सुरू झाल्याबरोबर मिर्जाचे सरदार निजामशाही सैन्याला येऊन मिळू लागले. तेव्हा मिर्जाने युद्धातून पळ काढला आणि तो बुऱ्हाणपूरच्या दिशेने पळून गेला.

## बिदरची बरीदशाही : तळटीपा

( ३४२ ) □ बरीदशाही घराण्याचा इतिहास देताना फरिश्त्याने अशी इच्छा प्रकट केली की, " ज्याला कोणाला कुतुबशाही, इमादशाही आणि बरीदशाही घराण्याचा साद्यन्त इतिहास मिळेल त्याने तो माझ्या या ग्रंथात अंतर्भूत करावा. " ब्रिग्ज बरीदशाही घराण्याच्या इतिहासाचा फरिश्त्याने दिलेली हकीकत अनुवादीत करताना असे सांगतो की, " फरिश्त्याने प्रकट केलेल्या इच्छेनुसारच मी गोवळकोंड्याच्या सुलतानांच्या इतिहासाबद्दल पुरवणी जोडलेली आहे. " ही पुरवणी आपण " **महमद कुली कुतुबशहाचा इतिहास** " या ग्रंथातून दिली असल्याचे ब्रिग्जने सांगितले आहे. या ग्रंथाच्या लेखकाने आपले नाव दिलेले नाही तरी तो फरिश्त्याचा

समकालीन असावा. ब्रिग्ज पुढे असे सांगतो की, " इमादशाही आणि बरीदशाही घराण्यातील सुलतानांचा इतिहास वृत्तान्त मिळावा म्हणून मी पुष्कळ वेळा त्या राज्यांच्या राजधान्यांना भेटी दिल्या. परंतु त्या घराण्याबद्दलची माहिती मिळविण्याचे माझे सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. "

( ३४३ ) * महमूद गावानच्या खुनानंतर बहमनींची सत्ता जवळजवळ विलयाला गेली. बिदर येथे कासीम बरीद याने बहमनी सुलतान महमूद शहा याला आपल्या हातातील बाहुले बनविले. सय्यद अलीच्या **बुरहाणे मासीर** या ग्रंथात त्याच्यासंबंधी आलेल्या हकीकतीचा थोडक्यात सारांश पुढे दिलेला आहे :-- कासीम बरीदचे नाव कासीम तुर्क ऊर्फ खवासखान असे होते. त्याच्याकडे कंधार आणि आजूबाजूचा प्रदेश हा जहागिरीदाखल होता. त्याने राज्यामध्ये झालेल्या गोंधळाचा फायदा घेऊन बंड केले. सुलतानाने त्याच्यावर चाल करून जाण्यासाठी दिलावरखान हबशी याची नेमणूक केली. युद्धामध्ये कासीम बरीदचा टिकाव न लागल्याने त्याने माघार घेतली, आणि कंधारहून बालकोंड्याकडे कूच केले. दिलावरखानाने त्याच्या पाठलागाला सुरुवात केली. दुर्दैवाने त्याच्या सैन्यातील एक हत्ती पिसाळला आणि त्याने दिलावरखानाला पायाखाली तुडवून ठार मारले. ताबडतोब कासीम बरीद हा पाठीमागे फिरला. तेथून तो बिदरला आला. त्याने राज्याचा सर्व कारभार आपल्या हाती घेतला. सुलतानाला त्याने नाममात्र बादशहा म्हणून ठेवले. कासीम बरीदला आता अशी महत्त्वाकांक्षा निर्माण झाली की, राज्याच्या सर्व अमिरांनी आपल्या आज्ञा मान्य कराव्यात. राज्याच्या अमिरांना हे न पटल्याने त्यांनी एकत्र येऊन सैन्य जमविले, आणि बिदरवर चाल केली. त्यांना तोंड देण्यासाठी कासीम बरीद सुलतानाला घेऊन राजधानीबाहेर पडला. दोन्ही फौजांत तुमुल युद्ध झाले, आणि प्रत्यक्ष सुलतान हा जखमी होऊन युद्धभूमीवर पडला. कासीम बरीद हा पळून गेला. राज्याच्या अमिरांनी सुलतानाला राजधानीकडे परत पाठविले, आणि ते आपापल्या देशांकडे निघून गेले. त्यानंतर कासीम बरीद पुन्हा राजधानीला परत आला आणि राज्याची सर्व सूत्रे त्याने आपल्या ताब्यात घेतली. या सुमारास हबशी खोजा मलिक दिनार दस्तुर-इ-ममालिक आणि मलिक खुषकदम तुर्क अजीज-उल्-मुल्क यांनी बंड केले. त्यांचा मोड करण्यासाठी कासीम बरीद याने सुलतानाला घेऊन कूच केले. वाटेत त्यांना आदिलखान आणि फक्र-उल्-मुल्क हे येऊन मिळाले. सैन्याच्या डाव्या फळीवर कासीम बरीद हा होता. झालेल्या लढाईत शत्रूचा पूर्ण पराभव झाला. या लढाईत सुलतान कुली खवासखान हमदानी याने मोठे शौर्य गाजविले. हाच पुढे कुतुब-उल्-मुल्क म्हणून प्रसिद्धीस आला. यानंतर सुलतानाने आपल्या सर्व अमिरांसहित कूच करून बहादूर गिलानी या कोकणपट्टीवरील सुभेदाराचा पराभव केला. दरम्यानच्या काळात जरी राज्यातले अमीर लढाईच्या प्रसंगी सुलतानाला येऊन मिळत तरी प्रत्येकाने आपापल्या जहागिरीत

स्वातंत्र्य पुकारले होते. कासीम बरीद याच्याकडे औसा आणि कंधार हे परगणे होते. त्याचे आणि राज्यातील अमिरांचे पटत नसे. कासीम बरीदचा मुक्काम औसाच्या किल्ल्यात होता. राज्यातील काही अमिरांनी सुलतानाला विनंती केली की, "कासीम बरीद हा राजघराण्याशी विरोध करीत आला आहे. तो बंड पुकारण्याचे अगोदर त्याचा नाश करण्यात यावा." त्याप्रमाणे हिजरी ९०६ या वर्षी सुलतान राजधानीबाहेर पडला आणि त्याने औसाच्या किल्ल्याला वेढा दिला. त्याच्याबरोबर असलेल्या काही अमिरांचे कासीमबरोबर संगनमत होते. लढाईला तोंड लागताच ते कासीम बरीदला जाऊन मिळाले. हे बघितल्यावर आदिलखान आणि कुतुब-उल्-मुल्क हे दोघेजण आपापल्या प्रांतांकडे निघून गेले. त्यावर कासीम बरीद सुलतानाला येऊन भेटला आणि त्याच्याबरोबर बिदरला जाऊन राज्याचे सर्व अधिकार त्याने आपल्याकडे घेतले. कासीम बरीदच्या राज्यकारभाराचा दरबारातील अमिरांना तिटकारा आला. त्यांनी पुन्हा एकदा कासीम बरीदचा नाश करण्याचे ठरविले. हे सुलतानाला समजताच त्याने बिदरवर चालून येणाऱ्या अमिरांकडे आपल्यातर्फे विद्वान मंडळी पाठविली. अखेर असे ठरले की, कासीम बरीदसह सर्वांनी आपापल्या प्रांतांकडे निघून जावे. परंतु वर्षातून एकदा सर्व अमिरांनी बिदर येथे एकत्र जमावे. यानंतर काही काळाने सुलतानाने विजयनगरवर स्वारी केली. स्वारीवरून परत आल्यानंतर सुलतानाच्या फौजेचा कासीम बरीदने मोड केला आणि बिदरचा फौजदार खानजहान याला ठार केले आणि पुन्हा एकदा राज्याचा कारभार आपल्या हाती घेतला. कासीम बरीदचे वर्चस्व इतर अमिरांना सहन होणे शक्य नव्हते. त्यांनी पुन्हा एकदा कासीम बरीदवर हिजरी ९०९ मध्ये चाल केली. दोन्ही फौजांचे तुंबळ युद्ध झाले त्यात कासीम बरीदचा पराभव होऊन त्याने रणांगणातून पळ काढला. हिजरी ९१० यावर्षी कासीम बरीद मरण पावला.

( ३४४ ) * कासीम बरीद हा जातीने तुर्क होता. महमदशहा बहमनीचा मृत्यू झाल्यानंतर बहमनींच्या दरबारात जे दोन पक्ष झाले त्यापैकी मलिकनायब निजाम-उल्मुल्क याच्या पक्षाला तो मिळाला. नंतरच्या काळात बिदर येथे परदेशी मुसलमानांची जी कत्तल झाली त्यात कासीम बरीद याने भाग घेतला. मलिक नायब याच्याकडे राज्याची सूत्रे आल्यावर त्याने कासीम बरीद याच्याकडे शहराच्या कोतवालीचे अधिकार दिले. काही काळाने मलिक नायब याचा खून झाला. त्याच्याविरुद्ध सुलतानाकडे तक्रार करण्यात कासीम बरीदचाही हात होता. १४९० मध्ये अहमदनगर, विजापूर आणि वऱ्हाड येथे स्वतंत्र शाह्यांची स्थापना झाल्यावर कासीम बरीद याच्याकडे शेष बहमनी राज्याचे अधिकार आले. तो स्वतः जरी तुर्क होता तरी तो सुन्नी पंथी होता. एकेकाळी त्याची मलिक नायब याच्याबरोबर मैत्री होती. साहजिकच राज्यातील दक्षिणी पक्षाला तो चालण्यासारखा होता परंतु परदेशी

मुसलमानांचे आणि त्याचे वावडे होते. त्याने सुलतानाला सक्त दडपणाखाली ठेवले. सुलतानाच्या मताचीही त्याला पर्वा राहिली नाही. त्याने सुरुवातीला राजधानी भोवतालच्या प्रदेशाचा ताबा घेण्यासाठी उपाय योजले आणि राज्यातील किल्लेदारां-विरुद्ध आपल्या फौजा रवाना केल्या. परंतु त्यांनी किल्ले स्वाधीन करण्यास नकार दिला आणि सुलतानाच्या फौजांवर अनेक विजय मिळविले. दरम्यान दिलावरखान हबशी हा खानदेशमधून सुलतानाला मदत करण्यासाठी परतला. त्याने कासीम बरीदचा पराभव केला. परंतु त्याचा पाठलाग करीत असताना अचानकपणे दिलावर-खान हा मारला गेला. यावर कासीम बरीद हा बिदरला परतला. त्याने सुलतानाची अतिशय केविलवाणी परिस्थिती करून सोडली. काही इतिहासकार असे म्हणतात की, बरीदशाही घराण्याची स्थापना या घटनेपासूनच झाली.

यानंतर कासीम बरीदने प्रान्तिक सुभेदारांचा बिमोड करण्याचे ठरविले. त्याने प्रथम युसुफ आदिलशहावर चाल केली. त्याने आपल्याबरोबर अहमद निजामशहा आणि ख्वाजा जहान यांना येण्यासाठी पाचारण केले. परंतु ऐनवेळी अहमदशहाने लढाईत भाग न घेतल्याने कासीम आणि ख्वाजा जहान यांचा पराभव झाला. इ. स. १४९३ या वर्षी कासीम बरीदने सुलतानाला घेऊन बहादूर गिलानी याच्यावर चाल केली. बहादूर गिलानी याचा युसुफ आदिलशहाविरुद्ध उपयोग होईल असा विचार करून कासीम बरीद याने बहादूर गिलानी याला अतिशय सौम्य अशा तहाच्या अटी देण्याचा प्रयत्न केला. बहादूर गिलानीचा पुढे ख्वाजा जहान याने वध केला. गिलानीची जहागिरी ऐन उल्मुल्क याला देण्यात आली. यानंतर काही काळाने सुलतान आणि कासीम बरीद यांनी दाभोळ बंदराला भेट दिली. इ. स. १४९५ मध्ये दस्तूर दिनार या बंडखोराचा मोड करण्यासाठी युसुफ आदिलशहाची मदत घेणे भाग पडले. इ. स. १४९७ मध्ये दक्षिणी मुसलमानांनी परदेशी मुसलमानांविरुद्ध कट रचला. परंतु तो उघडकीस आला आणि कासीम बरीदने मुख्य कटवाल्यांना ठार मारले. इ. स. १४९८ मध्ये सुलतानाचा मुलगा अहमद याचे युसुफ आदिलशहाची मुलगी बिबिसिती हिच्याशी लग्न ठरले. याप्रसंगी दस्तूर दिनार आणि युसुफ आदिल यांच्यामध्ये भांडण उद्भवले. कासीम बरीदने दस्तूर दिनारचा पक्ष उचलून धरला. परंतु कासीम बरीद आणि दस्तूर दिनार यांचा टिकाव न लागून त्यांना पळ काढावा लागला. युसुफ आदिलने सुलतानाकडून आपल्या मनाप्रमाणे शर्ती मान्य करून घेतल्या आणि बिदरहून कूच केले. कासीम बरीद हा परत बिदर येथे दाखल झाला आणि आपले पूर्वीचे अधिकार त्याने सुलतानाकडून बळकाविले. काही काळाने युसुफ आदिलने पुन्हा दस्तूर दिनारवर चाल केली. परंतु त्याने कासीम बरीद आणि अहमद निजामशहा यांच्या मदतीने आपला बचाव केला. कासीम बरीद याचा मृत्यू इ. स. १५०४ मध्ये झाला.

( ३४५ ) * विजयनगरबरोबर संघर्ष चाललेला असताना बिदरमध्ये अंतस्थ भानगडींना उत आला. त्यात कासीम बरीद हा बडतर्फ झाला आणि त्याच्या जागी खान-ई-जहान यांस नेमण्यास आले. विजयनगरची मोहीम संपल्यावर बरीदने खान-ई-जहानचा खून करविला, आणि त्याचे जागी आपली नेमणूक करण्यास त्याने सुलतानाला भाग पाडले. या घटनेमुळे युसुफ आदिल, कुतुब उल्मुल्क आणि दस्तुर-ई ममालीक हे बरीदवर चाल करून आले. झालेल्या युद्धात बरीदचा पराभव होऊन तो पळून गेला. यानंतर वरील सरदार आपआपल्या जहागिरीच्या मुलखाकडे निघून गेले. इ. स. १५०४ मध्ये बरीद तेदूर मुक्कामी सुलतानास भेटण्यासाठी आला. त्याने युसुफ आदिल याच्याबरोबर भांडण उकरून काढले. या भांडणात युसुफच्या पक्षाच्या ऐन-उल्मुल्क याला बरीदच्या माणसांनी ठार मारले. नंतर कासीम बरीद बिदरकडे निघून गेला. सुलतान परतल्यावर बरीद त्याला जाऊन भेटला. सुलतानाने त्याची नेमणूक **नायब बारबेक** या पदावर केली, आणि त्याला बिदर शहराच्या कोतवालीच्या अधिकारावर नेमले. ( **बदायुनी** ३, १२९ )

( ३४६ ) * सयद अली ( बुरहाणचा कर्ता ) कासीम बरीदच्या मृत्यूचा आणि त्याच्यानंतर अमीर बरीद गादीवर आल्याच्या घटनेचा उल्लेख करीत नाही.

( ३४७ ) * ७ डिसेंबर १५१८ रोजी अमीर बरीद याने महमूदशहाचा मुलगा अहमद याला गादीवर बसविले. अमीर बरीद याला यावेळी गादी बळकाविता आली असती परंतु तसे केल्यास विजापूर, अहमदनगर यांना तोंड देणे आपल्याला शक्य होणार नाही म्हणून त्याने ती गोष्ट टाळली. अर्थात त्याने अहमदशहावर इतकी पकड ठेवली की, त्याला राजवाड्याबाहेर जाणेही त्याने मुश्कील करून टाकले. त्याचे जीवन त्याने दारू, नाचगाणी आदी व्यसनात गुंतवून बरबाद केले. महमूदशहाच्या हयातीपर्यंत कुतुब उल्मुल्क हा सुलतानाकडे नजराणा पाठवीत असे. तो आता त्याने बंद केला. तेव्हा अहमदशहाने बहमनी घराण्याचा जुना मुकूट मोडून त्याचे हिरे विकण्यास सुरुवात केली. हे अमीर बरीद याला कळताच त्याला अतिशय संताप आला आणि त्याने ज्यांनी हे हिरे विकण्यास मदत केली त्यांना ठार केले. ह्या दुर्दैवी सुलतानाचा मृत्यू १५ डिसेंबर १५२० रोजी झाला.

( ३४८ ) * वलीउल्ला याला विष देऊन ठार मारल्यानंतर बरीदने कलीमउल्ला याला गादीवर बसविले. हा अहमदशहाचा मुलगा असे बदायुनी म्हणतो ( ३, १३७) परंतु त्याच्या नाण्यांवरून तो शहाबुद्दीन महमूदशहा याचा मुलगा होता असे सिद्ध होते. ( Speight, plate XIX opposite p. 305 ).

( ३५० ) * अमीर बरीद याने अल्लाउद्दीन शहानंतर वलीउल्ला याला मार्च १५२३ मध्ये गादीवर बसविले. हा अल्लाउद्दीनचा भाऊ असा उल्लेख फरिश्ता आणि बदायुनी करतात तो चूक आहे. वलीउल्ला हा सुलतान महमूद याचा मुलगा.

( ३५१ ) * बदायुनीने आपल्या ग्रंथात असे सांगितले आहे की, अहमदशहाचा मृत्यू झाल्यानंतर अमीर बरीदच्या मित्रांनी त्याला गादीवर बसण्याबद्दल आग्रह केला. ( भाग ३ रा, पान १३२ ) परंतु अमीर बरीदला इतके धारिष्ट्य झाले नाही आणि त्याने अहमदशहाचा मुलगा अल्लाउद्दीन याला २८ डिसेंबर १५२० रोजी गादीवर बसविले. अल्लाउद्दीन हा वृत्तीने अतिशय वेगळा होता. त्याने अमीर बरीद याला बोलावून सांगितले की, " माझ्या वडिलांनी विषयोपभोगात दंग होऊन राज्य-कारभाराकडे दुर्लक्ष केले. माझी इच्छा राज्यकारभारात भाग घेण्याची आहे. तरी तुम्ही मला माझ्या बंधनातून मोकळे तरी करा किंवा मक्केला जाऊन तेथे आत्मसमर्पण करण्याची परवानगी तरी द्या. " यावर अमीर बरीदने त्याच्यावरची काही बंधने सैल केली. या गोष्टीचा फायदा अल्लाउद्दीनला घेता आला नाही. त्याने अमीर बरीद याच्या विरुद्धच नव्हे तर साऱ्या बरीदी जमातीविरुद्ध शस्त्र उचलण्याचा कट केला. परंतु हा कट उघडकीस आला आणि सुलतानाच्या सर्व पाठीराख्यांना आपल्या प्राणांना मुकावे लागले. अमीर बरीद याने सुलतानाला ५ मार्च १५२३ रोजी पदच्युत केले.

( ३५२ ) * इ. स. १५१८ मध्ये महमूदशहा मरण पावला. त्याचा मुलगा अहमद याला अमीर अली बरीदने गादीवर बसविले. तो इ. स. १५२१ मध्ये मरण पावला. अमीर अली बरीदने त्याचा भाऊ अल्लाउद्दीन याला आता गादीवर बसविले. अल्लाउद्दीन शहाने अमीर अली बरीदविरुद्ध कारस्थान केले. पण त्यात त्याला अपयश आले. अमीर अली बरीदने त्याला कैदेत टाकले आणि काही काळाने त्याचा वध केला.

अमीर अली बरीदला अजून गादीवर बसण्याचे धाडस होत नव्हते. त्याने अल्लाउद्दीनचा भाऊ वलीउल्ला याला गादीवर बसविले परंतु त्यानेही अमीर अली बरीद-विरुद्ध कट केल्याने ३ वर्षांच्या आतच अमीर अलीने त्याला पदच्युत केले आणि त्याचा वध केला. मृत सुलतानाच्या राणीशी त्याने विवाह केला आणि सुलतानाचा भाऊ कलीमउल्ला याला गादीवर बसविले. या सुलतानाने मोगल बादशहा बाबर याच्याशी संधान बांधले. परंतु अमीर अली बरीद याला याचा सुगावा लागला असावा याचा संशय येऊन त्याने बिदरहून पळ काढला. अमीर अली बरीदच्या स्वातंत्र्य मिळविण्याच्या आकांक्षेला आता कोणताच अडथळा उरला नाही.

दरम्यानच्या काळात काही विशेष घटना घडल्या त्या नमूद करणे अवश्य आहे. विजयनगरच्या कृष्णरायाने अमीर अली बरीदच्या चिथावणीवरून विजापूरचा रायचूर दोआब जिंकून घेतला होता. इ. स. १५२१ मध्ये हा प्रांत जिंकून घेण्याचे इस्माईल आदिलशहाचे प्रयत्न फसले. इ. स. १५२४ मध्ये विजापूर आणि अहमदनगर यांच्यामध्ये अमीर अली बरीद विरुद्ध झालेला तह सोलापूरच्या प्रश्नावरून फिसकटला.

तेव्हा बुरहाण निजामशहा, अलाउद्दीन इमादशहा आणि अमीर अली बरीद यांनी इ. स. १५२५ मध्ये विजापूरवर चाल केली. परंतु त्यात या युतीचा पराभव झाला. इ. स. १५२७ मध्ये बुरहाण निजामशहाने अमीर अली बरीदच्या मदतीने माहूरचा किल्ला जिंकून घेतला आणि वऱ्हाडात लुटालूट केली. यावर इमादशहा आणि त्याचा दोस्त खानदेशचा सुलतान महमद यांनी गुजराथच्या बहादूरशहाची मदत मागितली, त्यामुळे बुरहाण, अमीर अली बरीद आणि इस्माईल यांची तात्पुरती एकी झाली. अमीर अली आणि बुरहाण परंड्याकडे निघून गेले. अखेर बुरहाण निजामशहाने बहादूरशहाच्या नावे खुत्बा वाचण्याचे कबूल केल्यावर बहादूरशहा गुजराथकडे निघून गेला.

विजापूरच्या फौजा यावेळी बुरहाण निजामशहाच्या मदतीकरता आल्या होत्या. त्यांना फितूर करण्याचे अमीर अली बरीदने प्रयत्न केले. अमीर अली बरीदला शिक्षा करण्यासाठी इस्माईलने बिदरवर चाल केली. अमीर अली आता वृद्ध झाला होता. त्याने कुतुबशहाकडे मदतीची याचना केली आणि बिदरचे रक्षण करण्याचे काम आपल्या मुलांवर सोपविले. तो स्वतः उद्गिरकडे गेला. त्याच्या विनंतीवरून अल्लाउद्दीन इमादशहाने बिदरकडे इस्माईल आदिलजवळ रदबदली करण्यासाठी कूच केले. बिदर आपल्या ताब्यात दिल्याखेरीज आपण वाटाघाटीला तयार होणार नाही असे इस्माईल आदिलने कळविले. निराश होऊन अमीर अली बरीद नशेत दंग झाला त्याला आसदखानाने पकडून इस्माईलच्या समोर नेले. आदिलशहाने त्याला उन्हात दोन तास तिष्ठत ठेवले आणि बिदरचा किल्ला स्वाधीन न झाल्यास त्याला ठार मारण्याची धमकी दिली. अखेर बरीदच्या मुलांनी बिदर स्वाधीन केल्यावर अमीर अलीची सुटका करण्यात आली. आदिलशहाने बिदरमध्ये प्रवेश करून अमीर अली बरीदला आपल्या सरदारांत दाखल करून घेतले. काही काळानंतर आदिलशहाने रायचूर दोआब जिंकून घेतला. त्याप्रीत्यर्थ त्याने मेजवानी दिली. अमीर अली बरीदला त्यावेळी अत्यंत अपमानास्पद रीतीने वागविण्यात आले. त्याचा उल्लेख कुत्रा असा करून आदिलशहाने त्याची हेटाळणी केली. झालेल्या अपमानाने अलीच्या डोळ्यात अश्रू आले. याप्रसंगी इस्माईल आदिलशहाने कल्याणी आणि कंधार हे देण्याच्या अटीवर अमीर अलीकडे बिदर सुपूर्त केले. पुढे अमीर अलीने कल्याणी आणि कंधार देण्याचे नाकारल्यावर संघर्षाचा प्रसंग उद्भवला. अमीर अलीने बुरहाणची मदत घेतली आणि विजापूरवर चाल केली. परंतु असदखानाने दोघांचाही पराभव केला. इ. स. १५३४ मध्ये अमीर अलीला बरोबर घेऊन इस्माईलने नलगोंड्यावर चाल केली. या स्वारीत इस्माईल आजारी पडून मरण पावला. इ. स. १५४० मध्ये बुरहाण निजामशहाने अमीर अली बरीद याला बरोबर घेऊन परंड्यावर चाल केली, आणि त्याने सोलापूर घेतले. इब्राहीम आदिलशहा गुलबर्ग्याकडे निघून गेला. बुरहाण आणि अमीर अली यांनी विजापूर शहराची लुटालूट केली आणि गुलबर्ग्याकडे मोर्चा वळविला. परंतु इब्राहीम आदिलशहा, दर्या इमादशहा आणि असदखान यांनी बुरहाण आणि अमीर

अली बरीद यांचा पराभव करून त्यांना बीडकडे माघार घ्यावयास लावली. तेथून ते दौलताबादकडे निघून गेले. इ. स. १५४२ साली अमीर अली बरीद मरण पावला.

( ३५३ ) * कासीम बरीदनंतर अमीर बरीद याच्याकडे राज्याचा कारभार आला. हिजरी ९०९ या वर्षी आदिलखानाने राजघराण्याशी संबंध जोडला. अमीर बरीद आणि आदिलखान यांना परस्परांविषयी द्वेष वाटे. या विवाहाच्या निमित्ताने आदिलखान हा बिदरला आला असताना अमीर बरीदने आदिलखानाच्या सैन्यावर हल्ला केला. दोन-तीन महिने हे युद्ध चालले होते. आदिलखानाच्या पक्षातील मलिक ऐन–उल्-मुल्क हा या युद्धात ठार झाला आणि हे युद्ध तात्पुरते थांबले. सुलतानाने ऐन–उल्-मुल्क याचा प्रदेश ताब्यात घेतला. त्यानंतर तो बिदरला परतला. त्याने राजधानीचा कारभार अमीर बरीद याजकडे सोपविला. हिजरी ९२० या वर्षी सुलतानाने आदिलखानाच्या सल्ल्यावरून गुलबर्गा शहरावर चाल केली आणि ते शहर धुळीला मिळविले. तेथील सुभेदार दस्तुर–इ–ममालिक याने अमीर बरीदचा आश्रय घेतला, हिजरी ९२१ या वर्षी अमीर बरीद याने कुतुब–उल्-मुल्क याच्याबरोबर संगनमत करून दस्तुर–इ–ममालिक याला बरोबर घेतले आणि राजधानीवर चाल केली आणि बिदरला वेढा दिला. आदिलखानाच्या वतीने अजमत–उल्-मुल्क याने सामोपचाराने वरील कलह मिटविला. याच वर्षी अमीर बरीद आणि दस्तूर–इ-ममालिख यांच्यामध्ये कलह निर्माण झाला. या वेळी राज्याचा एक अमीर खुदावन्दखान याने बंड केले. त्याचा पाडाव करण्यासाठी सुलतानाने अमीर बरीदची मदत मागितली, सुलतानाने खुदावन्दखानावर चाल केली. तेव्हा त्याने इमाद–उल्-मुल्क याच्याकडे मदतीची याचना केली. त्याच्याकडून मदत आल्यावर सुलतानाबरोबर त्याच्या फौजेची लढाई झाली. त्यात त्याचा पराभव झाला आणि तो कैद झाला. त्याला फाशी देण्यात आले. यानंतर राजधानीमध्ये असलेल्या अनेक अमीरांपैकी शुजातखानाने अमीर बरीदच्या सत्तेविरुद्ध बंड पुकारून राजधानीतून पळ काढला. त्याच्या पाठलागावर सुलतानाने अमीर बरीद याची नियुक्ती केली. त्याने शुजातखानाचा पाठलाग करून त्याला ठार मारले. त्यानंतर तो राजधानीला परत फिरला, अमीर बरीदची सत्ता दिवसेंदिवस वाढतच गेली. हिजरी ९२४ या वर्षी सुलतान महमूद हा मरण पावला. सय्यद अली असे सांगतो की, बराच काळपर्यंत सुलतान महमूद हा अमीर बरीद याच्या कैदेत होता. त्यातच त्याचा मृत्यू झाला. ( येथे एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. ती ही की, सय्यद अली कासीम बरीदच्या मृत्यूचा आणि त्याच्यानंतर अमीर बरीद गादीवर आल्याच्या घटनेचा उल्लेख करीत नाही. )

( ३५४ ) * अमीर बरीद याने आता महमूदशहाचा एक मुलगा वलीउल्ला याला गादीवर बसविले. ( फरिश्ता याचा उल्लेख अल्लाउद्दीनचा भाऊ असा करतो तर बदायुनी तो अल्लाउद्दीनचा चुलत भाऊ असे सांगतो. दोघांची माहिती चुकीची आहे.)

( अधिक माहितीसाठी स्पेट ' Coins of the Bahamani King '; इस्लामिक कल्चर, हैद्राबाद १९३५, पान २९० ) वलीउल्लाने देखील बंधनातून मोकळे होण्याचा प्रयत्न केला परंतु अमीर बरीद याने त्याला जनानखान्यातच कैद करून ठेवले. राजघराण्याशी संबंध जोडण्याकरिता म्हणून त्याने मरहूम अहमदशहाची विधवा स्त्री बिबी सिती हिच्याबरोबर विवाह केला. अमीर बरीद याला आता जनानखान्यात राजरोस प्रवेश करता येत असे. त्याचे लक्ष आता सुलतानाच्या पत्नीकडे गेले. या गोष्टीला तिने हरकत घेतल्याने १५२६ च्या सुरुवातीला अमीर बरीद याने सुलतानावर विषप्रयोग केला. याबाबत बदायुनी असे सांगतो की, अमीर बरीदने सुलतानाच्या पत्नीबरोबर लग्न केले, आणि नंतर सुलतानाला ठार केले हे संभवत नाही. कारण अमीर बरीदबरोबर लग्न करण्याचे अगोदर तिला वलीउल्लापासून घटस्फोट घ्यावा लागला असता. निजामउद्दीन अहमद सांगतो त्याप्रमाणे सुलतान मरण पावल्यावर त्याने त्याच्या पत्नीबरोबर लग्न केले असावे हे अधिक संभवते. वलीउल्लाच्या मृत्यूनंतरही अमीर बरीद याने गादी बळकाविण्याचा प्रयत्न केला नाही. त्याने त्याचा भाऊ कलीमउल्ला याला गादीवर बसविले. बदायुनीच्या हकिकतीप्रमाणे हा अहमद शहाचा मुलगा होता. परंतु त्याच्या नावाची जी नाणी उपलब्ध आहेत त्यावरून तो शहाबुद्दीन महमूदचा मुलगा होता असे सिद्ध होते. ( स्पेट, पान ३०५ ) कलीम उल्लाने अमीर बरीदच्या कचाट्यातून मुक्त होण्यासाठी बाबरला पत्र लिहून त्याची मदत मागितली. त्याला त्याने वऱ्हाड आणि दौलताबाद हे दोन प्रांत देऊ केले. ही बातमी बाहेर फुटल्याने कलीमउल्ला जीवाच्या भीतीने बिदर सोडून पळून गेला. याप्रमाणे कलीमउल्लाच्या पलायनाबरोबर बहमनी घराणे संपुष्टात आले आणि बिदरच्या बरीदशाही घराण्याचा अंमल खऱ्याखुऱ्या अर्थाने सुरू झाला.

( ३५९ ) * कासीम बरीदनंतर बिदरमधील सर्वाधिकार त्याचा मुलगा अमीर अली बरीद याजकडे आले. या सुमारास युसूफ आदिलशहा याने शिया पंथाचा स्वीकार केला त्याच्याविरुद्धच्या लढ्यात अमीर अली बरीद, अहमद निजामशहा आणि कुतुबशहा यांनी युती केली. अमीर अली बरीदच्या बिदरमधील प्रभुत्वाबद्दल वैषम्य वाटल्याने अल्लाउद्दीन इमादशहा मात्र या युतीला मिळाला नाही. या युतीविरुद्ध आपला टिकाव लागणार नाही हे जाणून युसूफने खानदेशकडे पळ काढला. तेथून त्याने अहमदशहा आणि कुतुब-उल्-मुल्क यांना अमीर अली बरीदविरुद्ध फितवले. त्यानंतर त्याने महमूदशहाला पत्र लिहून क्षमेची याचना केली. त्यावर अमीर अली बरीदने युसूफ आदिलशहाला अपमानास्पद उत्तर पाठविले. युसूफ आदिल हा खानदेशातून परतला, आणि इमादशहाची मदत घेऊन त्याने सुलतान आणि अमीर बरीद यांजवर कळम येथे हल्ला चढविला. या लढाईत युसूफ आदिलचा विजय झाला.

इ. १५१४ मध्ये अमीर अली बरीदने जहांगीरखानाला दस्तूर उल्-ममालिक

ही पदवी दिली; आणि त्याला गुलबर्गा प्रांताचा सुभेदार म्हणून नेमले. नंतर त्याने बादशहाला घेऊन विजापूरवर स्वारी केली. परंतु इस्माईल आदिलशहाने त्याचा पराभव केला. बादशहाला घेऊन इस्माईल आदिलशहा गुलबर्ग्याकडे गेला. तेव्हा अमीर अली बरीद औसाकडे पळून गेला. परंतु त्याने बुरहाण निजामशहाची मदत घेतली आणि बिदर येथील विजापूरच्या फौजेला हाकलून लावले. याप्रमाणे त्याने पुन्हा एकदा राज्याची सूत्रे हाती घेतली. अमीर अली बरीदच्या जाचाला कंटाळून महमूदशहाने वऱ्हाडकडे पळ काढला. अल्लाउद्दीन इमादशहाने त्याला मदत देऊ केली. अमीर अली बरीदने बुरहाण निजामशहाची मदत घेतली. लढाईच्या ऐनवेळी महमूदशहा हा अमीर अली बरीदकडे आला. इमादशहाने माघार घेतली. परिणामी अमीर अली बरीदने सुलतानाला कामठाणा येथे बंदिवासात ठेवले. इ. स. १५१७ मध्ये अमीर अली बरीदने सुलतानाला घेऊन माहूरवर चाल केली. कारण खुदावंदखानाचा मुलगा शारजाखान याने कंधार आणि उद्गीर यांची लुटालूट केली होती. झालेल्या लढाईत शारजाखान मारला गेला. परंतु इमादशहाने अमीर अली बरीदवर चाल करून त्याला माघार घेणे भाग पाडले.

( ३५६ ) * अमीर अली बरीदच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा अली बरीदशहा हा गादीवर आला. इ. स. १५४३ मध्ये विजापूरविरुद्ध विजयनगर, गोवळकोंडा आणि अहमदनगर यांनी केलेल्या युतीत अली बरीदशहा हा सामील झाला. त्याने आणि बुरहाण निजामशहाने सोलापूरला वेढा घातला. परंतु इब्राहीम आदिलशहाने विजयनगरला फोडल्यामुळे अखेर विजापूरचा विजय झाला. विजापूरविरुद्ध इ. स. १५४४ मध्ये पुन्हा एकदा उठाव झाला. अली बरीदशहाने या उठावात सामील होण्याचे नाकारल्याने बुरहाण निजामशहाने बिदरच्या राज्यावर हल्ला करून औसा, उद्गीर आणि कंधार हे किल्ले घेतले.

इ. स. १५४७ मध्ये बुरहाण निजामशहाने विजापूरविरुद्ध युद्ध पुकारून सोलापूरला वेढा दिला. परंतु प्रथम त्याने अली बरीदशहा याचा समाचार घेण्याचे ठरविले आणि सोलापूरचा वेढा उठवून कल्याणीला वेढा दिला आणि कल्याणी जिंकून घेतले. यानंतर काही वर्षेपर्यंत अली बरीदशहा याचा विजापूर, अहमदनगर आणि गोवळकोंडा यांच्यामधील संघर्षात संबंध आलेला दिसत नाही. १५६२ मध्ये आदिलशहा, सदाशिवराय, वऱ्हाड आणि बिदर यांची अहमदनगर आणि गोवळकोंडा यांच्या विरुद्ध एकी झाली. या संघर्षात मुसलमान सुलतानांना विजयनगरचा अतिशय कटू अनुभव आल्याने दक्षिणेतील मुसलमानी सुलतानांनी विजयनगरविरुद्ध एकी केली. अली बरीदशहा या युतीत सामील झाला. प्रत्यक्ष लढाईत अली बरीदशहा हा डाव्या फळीवर होता. त्याच्या जोडीला इब्राहीम कुतुबशहा होता विजयनगरच्या फौजांनी केलेल्या माऱ्यामुळे मुसलमानांची डावी फळी कोसळून पडत होती परंतु

हुसेन निजामशहाच्या फौजांनी बाजू सावरून धरली. विजयनगरचा या लढाईत पूर्ण पराभव झाला. मुसलमानांच्या फौजांनी विजयनगरचा विध्वंस केला. यामध्ये अली बरीदनेही भाग घेतला होता.

इ. स. १५७२ मध्ये मूर्तजा निजामशहाने वऱ्हाड जिंकून घेण्याचे ठरविले. वऱ्हाडमध्ये बुरहाण इमादशहा याला पदच्यूत करून त्याचा वजीर तुफालखान याने राज्यकारभार आपल्या हाती घेतला होता. तुफालखानाने अली बरीदशहाकडे मदत मागितली परंतु त्याने ती नाकारली. मूर्तजा निजामशहाची वऱ्हाडवरील स्वारी यशस्वी झाली आणि वऱ्हाड अहमदनगरच्या राज्यात सामील झाले. आता मूर्तजा निजामशहा बिदर काबीज करील अशी भीती कुतुबशहा आणि खानदेशचा सुलतान महमद दुसरा यांना वाटली. असे झाल्यास अहमदनगरच्या शक्तीत वाढ होईल असा विचार त्याने केला. दरम्यान अली आदिलशहाने दक्षिणेकडून मुलख जिंकल्याने त्याचा धोका आपल्याला अधिक आहे असे कुतुबशहा याला वाटले. तेव्हा इब्राहिम कुतुबशहाने अहमदनगरशी समझोता केला. यानंतर मूर्तजा निजामशहाने त्याच्या मर्जीतल्या साहिबखान या हलकट इसमाला " बिदर तुझ्या स्वाधीन करतो " असे वचन दिले. या कामी त्याने इब्राहीम कुतुबशहाची मदत मिळविली. या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी अली बरीदशहाने अली आदिलशहाकडून अतिशय अपमानास्पद अटीवर मदत मिळविली. परिणामी मूर्तजा निजामशहाला बिदरचा वेढा उठवून परत जावे लागले. इ. स. १५७९ मध्ये अली बरीदशहा याचा मृत्यू झाला.

( ३५७ ) * अली बरीदशहा याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा इब्राहीम बरीदशहा हा गादीवर आला. यानंतरच्या २० वर्षांच्या काळात मोगलांचा दक्षिणेच्या राजकारणात प्रवेश झाला. दक्षिणेमधील राजकारणात इब्राहीम बरीदशहाने भाग घेतल्याचे फारसे उल्लेख नाहीत. १५९९ मध्ये मोगलांनी अहमदनगरला वेढा दिल्यानंतर बरीदशाही घराण्यातील सुलतानांनी त्याबाबत कोणता दृष्टिकोन स्वीकारला हेही समजण्यास जागा नाही. इ. स. १६०० मध्ये अकबर बादशहाने खानदेश जिंकून घेतल्यानंतर विजापूर, गोवळकोंडा आणि बिदर जिंकून घेण्याचे ठरविले होते. परंतु दरम्यान सलीमच्या बंडामुळे त्याला दक्षिणेतून परत फिरावे लागले. अकबराच्या मृत्यूचे वेळी अहमदनगरचे छोटेसे राज्य दुसऱ्या मूर्तजा निजामशहाकडे नामधारीरित्या होते. विजापूर आणि गोवळकोंडा ही मोठी राज्ये आणि बिदरचे छोटेसे राज्य यांचे स्वतंत्र अस्तित्व होते. इ. स. १६१९ मध्ये विजापूरच्या आदिलशहाने बिदरचे राज्य खालसा केले. अशारीतीने जवळ जवळ १०० वर्षे अस्तित्वात असलेल्या बिदरच्या बरीदशाही घराण्याचा अस्त झाला.

( ३५८ ) * फारश्त्याच्या ग्रंथातील कुतुबशाही घराण्यांचा वृत्तांताच्या पूर्ण अनुवाद ब्रिग्ज याने दिलेला आहे. त्याचा मराठी अनुवाद वरील प्रकरणात आलेला

आहे. कुतुबशाही घराण्याचा अधिक समग्र इतिहास देणारे फरिश्त्याच्या समकालीन लेखकाने लिहिलेले एक पुस्तक ब्रिग्ज याला मिळाले. या लेखकाने आपले नाव दिलेले नाही. त्याचेही भाषांतर ब्रिग्ज याने केले आणि फरिश्त्याच्या भाषांतराच्या शेवटी ते दिले. त्यातील महत्त्वाचा भाग सारांशरूपाने पुढे दिला आहे. अनुवादाची इंग्रजी पानांची संख्या १४६ ( फरिश्ता भाग ३, पाने ३३९ ते ४८४ ) एवढी भरते. पुस्तकाचा परिचय अपूर्ण राहू नये म्हणून प्रकरणांचा सारांशही या ठिकाणी दिला आहे.

## प्रकरण पहिले

## सुलतान कुली कुतुबशहा

लेखकाने प्रथम कुली कुतुबशहाचा कुलवृत्तांत दिला आहे. तो इराणातून हिंदुस्थानात आला आणि बिदर येथे गेला. तेथे महमूदशहा बहमनी राज्य करीत होता. एकदा महमूदशहा बहमनींवर काही हबशी आणि दक्षिणी लोकांनी हल्ला केला. त्यातून सुलतान कुली याने मोठी मर्दुमकी दाखवून सुलतानाची सुटका केली. यानंतर अनेक प्रसंगी सुलतान कुली याने सुलतानाची चाकरी बजावली. याबद्दल बक्षीस म्हणून सुलतानाने त्याला अमीर-उल्-उमरा ही पदवी दिली आणि त्याला तेलंगणाचा सुभेदार नेमले. यानंतर सुलतान कुली हा महमूदशहा बहमनीने बहादूर गिलानीवर केलेल्या स्वारीत हजर होता. काही काळाने मलिक कासीम बरीद याने बिदर येथे सर्व सत्ता बळकाविली. त्याचा पाडाव करण्यासाठी युसुफ आदिलखान, कुतुब-उल्-मुल्क, वगैरे बिदरवर चाल करून गेले. त्याजबरोबर कासीम बरीदने तात्पुरता समझोता केला. हिजरी ९०८ ( इ. स. १५०२ ) या वर्षी सुलतान महमूदशहा बहमनी याने विजयनगरवर स्वारी केली. या स्वारीत सुलतान कुली हा महमूदशहाला ३ हजार घोडेस्वार आणि दहा हजार पायदळ घेऊन उटगी या गावी येऊन मिळाला. या स्वारीत रायचूर आणि मुद्गल हे किल्ले पाडाव करण्यात आले. महमूदशहा बहमनी हा बिदरला परत फिरला. हिजरी ९०९ ( इ. स. १५०४ ) मध्ये कासीम बरीद याने पुन्हा बिदर ताब्यात घेऊन सुलतानाला बंदिस्त केले. पुन्हा एकदा प्रांतिक सुभेदारांना कासीम बरीदवर चाल केली. सुलतान कुलीच्या शौर्यामुळे प्रांतिक सुभेदारांना यश मिळाले आणि बरीदने औसाकडे पळ काढला. याच वर्षी महमूदशहा बहमनीने कुली कुतुब-उल्-मुल्क याला घेऊन युसुफ आदिलखानावर काही कारणामुळे स्वारी केली पण दोघांचा समेट झाला.

हिजरी ९११ ( इ. स. १५०६ ) या वर्षी महमूदशहा बहमनीने पुन्हा एकदा प्रांतिक सुभेदारांना घेऊन विजयनगरवर चाल केली. कुतुब-उल्-मुल्क याने विजय-नगराबरोबर झालेल्या लढाईत पराक्रम गाजवला पण बहमनी सैन्याला माघार घ्यावी

लागली. यानंतर पुन्हा एकदा महमूदशहा बहमनी हा कासीम बरीदच्या कच्छपी लागला. **हिजरी ९१२** ( इ. स. १५०७ ) या वर्षी महमूदशहा बहमनी मरण पावला. त्याच्या मृत्यूबरोबर प्रांतिक सुभेदारांनी आपला राजनिष्ठेचा बुरखा फेकून देऊन स्वातंत्र्य पुकारले. यामध्ये सुलतान कुली कुतुब-उल्-मुल्क हाही होता. त्याने गोवळकोंडा ऊर्फ महमदनगर हे आपले राजधानीचे ठिकाण केले. आपल्या कारकिर्दीची पहिली काही वर्षे कुतुबशहाने आजूबाजूच्या हिंदू राजेरजवाड्यांचा मोड करण्यात घालविली, त्याने ६० ते ७० किल्ले जिंकून घेतले. यामध्ये प्रमुख किल्ले राजकोंडा, कोविळकोंडा, देवरकोंडा, पानगळ, गुणपुरा, जिरकोंडा, येलगंडल, मुलुनगुर, एटगीर, मेडक, भोवंगीर, वेलमकोंडा, वरंगळ, कूमामटे, इंद्रकोंडा, रामगीर, कोंडापल्ली, एलोर आणि चिटकोळ हे होते. ती हकीकत अशी—प्रथम सुलतानाने राजकोंडा आणि देवकोंडा हे किल्ले काबीज केले. ही बातमी विजयनगरचा राजा कृष्णराय याला समजली तेव्हा त्याने ३५०००० फौज घेऊन गोवळकोंड्यावर स्वारी केली. त्यांना प्रतिकार करण्यासाठी कुतुबशहाने कूच केले. दोन्ही फौजांची गाठ पानगळ येथे पडली. मोठे घनघोर युद्ध झाले. हिंदूंचा पराजय होऊन त्यांनी रणातून पळ काढला. त्यानंतर सुलतानाने पानगळला वेढा दिला. दोन महिन्यांच्या वेढ्यानंतर पानगळचा पाडाव झाला. पानगळहून सुलतानाने गुणपुऱ्यावर चाल केली आणि किल्ल्याला वेढा दिला. किल्ल्यातील शिबंदीने वारंवार हल्ले करून मुसलमानांचे पुष्कळ नुकसान केले. अखेर किल्ला मुसलमानांच्या स्वाधीन झाला. गुनपुऱ्याहून सुलतानाने कोविलकोंड्यावर चाल केली. येथेही अनेक चकमकी झाल्या. दोन्ही पक्षांचे खूप नुकसान झाले. सरते शेवटी किल्ला मुसलमानांच्या स्वाधीन झाला.

सुलतान या स्वारीवर असताना किवाम-उल् मुल्क तुर्क नावाच्या बहमनींच्या अधिकाऱ्याने गोवळकोंड्याच्या उत्तरेकडील प्रदेशावर हल्ला केला होता. वरील मोहिमेवरून परतल्यावर कुली कुतुबशहाने किवाम-उल्-मुल्कवर चाल केली. दोन्ही फौजांची गाठ एलगंडलपासून १ दिवसाच्या मजले इतक्या अंतरावर पडली. त्यात किवाम-उल्-मुल्काचा पराभव होऊन तो वऱ्हाडात अल्लाउद्दीन इमादशहाच्या आश्रयाला गेला. कुतुबशहाने इमादशहाला किवाम-उल् मुल्क याला आश्रय न देण्याबद्दल कळविले. ही विनंती इमादशहाने फेटाळली. तेव्हा कुतुबशहाने इमादशहावर स्वारी केली. इमादशहाही प्रतिकारार्थ निघाला. दोन्ही फौजांची गाठ रामगीरच्या किल्ल्याजवळ पडून त्यात इमादशहाचा पूर्ण पराजय होऊन तो वऱ्हाडात पळून गेला. सुलतान कुली कुतुबशहा हा त्यानंतर गोवळकोंड्याला परतला.

या सुमारास कुमामेटच्या राजाने ( सितापती ) गोवळकोंड्याच्या प्रदेशावर आक्रमण केल्याची बातमी आली. या राजाच्या ताब्यात कुमामेट, बेलमकोंडा, वरंगळ आणि इतर किल्ले होते. सुलतानाने प्रथम बेलमकोंड्यावर चाल केली आणि मोठ्या शर्तीने तो किल्ला जिंकून घेतला. यावर सितापतीने सुलतानावर चाल केली.

दोन्ही फौजांत घनघोर युध्द झाले. मुसलमानांचे अनेक अधिकारी ठार झाले परंतु अखेर राजा सितापती याला माघार घ्यावी लागून रणांगणातून पळ काढावा लागला. पराभूत झालेल्या सितापतीने कोंडापल्ली, इंद्रकोंडा, वादपल्ली आणि एटगीर येथील राजांची मदत मागितली. हे सर्व राजे कुमामेट येथे एकत्रित झाले. कुतुबशहाला हे कळताच त्याने त्यांच्यावर चाल केली. कुमामेटपासून जवळच दोन्ही फौजांत युद्ध झाले. युद्धात मुसलमानांचा विजय झाला. सितापतीने रामचंद्रदेवाकडे आश्रय घेतला. यावर कुतुबशहाने कुमामेटवर चाल केली. वेढा बराच काळपर्यंत चालला. मुसलमानांची असंख्यात माणसे ठार झाली. अखेर कुतुबशहाने निकराचा हल्ला करून किल्ला जिंकून घेतला. किल्ल्यावरील सर्वांची कत्तल करण्यात आली. वर सांगितल्याप्रमाणे सितापतीने कोंडापल्लीचा राजा गजपति याचा मुलगा रामचंद्रदेव याच्याकडे आश्रय घेतला होता. गजपतीच्या ताब्यात तेलंगण आणि ओरसाचा बंगालपर्यंतचा मुलख होता. रामचंद्रदेवाने सितापतीला मदत देण्याचे ठरविले. त्याने ३,००,००० घोडेस्वार एवढे सैन्य जमवून कुतुबशहावर चाल केली. कुतुबशहाने देखील शत्रूशी मुकाबला करण्यासाठी तयारी केली. दोन्ही फौजांची गाठ पलूनाचिभूर नदीजवळ पडली. या लढाईत कुतुबशहाचा विजय झाला आणि समुद्रकिनारपट्टीजवळचा सर्व प्रदेश त्याच्या ताब्यात आला. यानंतर कुतुबशहाने कोंडापल्ली, एलोर आणि राजमहेन्द्रीचा पाडाव केला. रामचंद्रदेवाच्या पराभवाची बातमी वैजनाथदेव ऊर्फ गजपति याला कळताच त्याने वकील पाठवून कुतुबशहाबरोबर तह केला. गोदावरी ही दोन्ही राज्यांमधील सरहद्द मानण्यात यावी असे या तहान्वये ठरले.

या मोहिमेवरून गोवळकोंड्याला परतल्यावर विजयनगरच्या कृष्णरायाने गोवळकोंड्याच्या सरहद्दीनजिकच्या मुलुखावर आक्रमण केल्याची बातमी आली. कुतुबशहाने सैन्य जमवून कोंडवीरच्या किल्ल्याला वेढा दिला. परंतु शत्रूने बेलमकोंडा आणि इनकोंडा या जवळील किल्ल्यावर गनिमीकाव्याच्या लढाईचा अवलंब करून सुलतानाच्या फौजेला इतके सतावले की सुलतानाने कोंडवीर सोडून बेलमकोंडा या किल्ल्यावर चाल केली. किल्ला लवकर हाती येण्याची चिन्हे दिसेनात. फौजेचे भारी नुकसान होऊ लागले. अखेर सुलतानाने सर्व फौजेनिशी किल्ल्यावर हल्ला चढवून किल्ला हस्तगत केला. तेथून सुलतानाने कोंडापल्लीकडे कूच केले. या सुमारास कोंडवीर येथील राजपुत्र हैदरखान याच्या हाताखालील हिंदू अधिकाऱ्यांनी बंड केले तेव्हा सुलतानाने राजपुत्राच्या मदतीसाठी कूच केले. सुलतानाने बेलमकोंडा येथे सुहेलखानाला ठेवले होते. सुलतान परत गेला असे पाहून कृष्णरायाने आपल्या पुतण्याला त्याच्यावर हल्ला करण्यास पाठविले. सुहेलखानाला त्याचा प्रतिकार करणे शक्य नसल्याने त्याने किल्ला ताब्यात देण्याची तयारी दाखविली. पण त्याचवेळी ही हकीकत त्याने सुलतानाला कळविली. ताबडतोब कुतुबशहाने परत फिरून वेढा देऊन बसलेल्या शत्रूचा पराभव केला. काही काळाने

त्याने कोंडवीरचा किल्लाही जिंकून घेतला. ही बातमी कृष्णरायाला समजली तेव्हा त्याने आपला जावई शिवराय याची मुसलमानी सैन्यावर हल्ला करण्यासाठी रवानगी केली. कुतुबशहाने कोंडवीरहून माघार घेऊन कृष्णा नदीच्या तीरावर आपली छावणी दिली. कुतुबशहाच्या छावणीपासून विजयनगरचे सैन्य काही मैल अंतरावर आल्यानंतर त्याने शत्रूवर अचानक हल्ला चढविला. दुपारपर्यंत लढाई चालल्यावर विजयनगरच्या सैन्याने कोंडवीरचा आश्रय घेतला. सुलतानाने किल्ल्याला पुन्हा वेढा घातला. किल्ला लढविणे अशक्य आहे असे दिसून आल्यावर शिवरायाने खंडणी देण्याचे आणि कुतुबशहाचे मांडलिकत्व पत्करण्याचे कबूल केले.

या मोहिमेनंतर सुलतानाने राजधानीकडे कूच केले. वाटेत त्याला कळले की विजयनगरच्या राजाच्या चिथावणीवरून विजापूरच्या इस्माईल आदिलशहाने कोविलकोंड्याच्या किल्ल्याला वेढा दिला आहे. किल्ला त्यावेळी जफरबेगच्या ताब्यात होता. त्याने सुलतानाला कळविले की वेळेवर मदत न आल्यास किल्ला शत्रूच्या हाती पडेल. कुतुबशहा सैन्य घेऊन निघाला आणि गुणपुरा येथे आल्यावर त्याने काफरांच्या चिथावणीवरून हल्ला केल्याबद्दल आदिलशहाची निर्भर्त्सना केली. इस्माईल आदिलशहाने बरेचसे सैन्य वेढ्यावर ठेवले आणि स्वतः कुतुबशहावर चाल केली. दोन्ही फौजांची गाठ पडली. तीन दिवस दोन्ही फौजांत युद्ध झाले परंतु कोणत्याही पक्षाची सरशी झाली नाही. तेव्हा इस्माईल आदिलशहाने गोवळकोंडा लुटण्यासाठी एका तुकडीची रवानगी केली. कुतुबशहाला हे समजताच त्याने या तुकडीवर हल्ला करण्यासाठी चाल केली. त्यातील एकूणएक माणूस त्याने कापून काढला. ही बातमी समजताच इस्माईल आदिलशहाने कोविलकोंड्याकडे माघार घेऊन वेढा चालू ठेवला. दोन्ही पक्षांत चकमकी झडतच राहिल्या. एका चकमकीत कुतुबशहाला तलवारीची जखम होऊन त्याचा गाल आणि नाक कापले गेले. जवळ जवळ ११ महिने अशी परिस्थिती राहिली. अखेर इस्माईल आदिलशहा अतिशय आजारी पडला आणि **सफर** महिन्याच्या १६ तारखेला **हिजरी ९४१** या वर्षी ( २७ ऑगस्ट १५३४ ) तो मरण पावला. त्याच्या पाठीमागे त्याचा मोठा मुलगा मल्लू आदिलशहा गादीवर आला. त्याने कुतुबशहाबरोबर तह करून युद्धाची समाप्ती केली.

शव्वाल महिन्यात **हिजरी ९३६** या वर्षी ( जून १५३० ) सुलतानाला मुलगा झाला. त्याचे नाव इब्राहीम कुली असे ठेवण्यात आले. विजापूर आणि गोवळकोंडा यांचे युद्ध चालू असताना बिदरच्या कासीम बरीदशहाने तेलंगणाचा काही प्रदेश लुटला. त्याचा सूड घेण्यासाठी कुतुबशहाने बिदरवर चाल करून बरीदशाही सैन्याचा मोड करून त्यांना पळवून लावले. नंतर त्याने कोहिरच्या किल्ल्यावर चाल केली. त्याला प्रतिकार करण्यासाठी बरीदशहा चालून गेला. तीन महिनेपर्यंत दोन्ही फौजांत चकमकी चालू होत्या. अखेर दोन्ही पक्षांत तह होऊन असे ठरले की बरीदशहाने

कोहीरचा किल्ला कुतुबशहाला द्यावा आणि कुतुबशहाने आपल्या राजाकडे निघून जावे.

यानंतर काही काळाने कुतुबशहाने नलगोंडयाच्या किल्ल्यावर चाल केली. किल्ला काही केल्या हाती येईना. अखेर कुतुबशहाने किल्लेदार राजा हरीचंदर याला कळविले की "तुम्ही मांडलिक म्हणून राहण्यास कबूल असाल तर मी आपल्या देशाला परत जाईन." हरीचंदर याने ही गोष्ट कबूल केली. तेव्हा कुतुबशहाने आपल्याला किल्ला बघावयाचा आहे अशी इच्छा प्रकट केली. राजा हरीचंदर याने हे मान्य केले. परंतु दोघांनी परस्परांचा विश्वासघाताने काटा काढावयाचा निश्चय केला. किल्ल्यावर चढल्यावर दरवाजावरील रक्षकांचा सुलतानाने आणि त्याच्याबरोबर आलेल्या चार शस्त्रधारी सैनिकांनी वध केला. तोपर्यंत सुलतानाचे सर्व सैन्य तेथे येऊन पोहोचले. राजास कैद करण्यात येऊन काही काळाने ठार मारण्यात आले. त्यानंतर सुलतानाने कोंडवीरच्या किल्ल्यावर चाल करून जाऊन तो किल्ला घेतला.

इकडे विजापूर येथे वजीर आसदखानाच्या मदतीने मरहूम इस्माईल आदिलशहा याचा धाकटा मुलगा इब्राहीम आदिल याने मल्लूखानला पदच्युत करून गादी बळकाविली होती. कोहिरच्या वेढ्यात सुलतान गुंतला असताना इब्राहीम आदिलशहाने कासीम बरीदबरोबर संगनमत करून गोवळकोंड्याच्या मुलुखात लुटालूट केली. तेव्हा कुतुबशहाने एटगीर किल्ल्यावर आणि पूर्वी इस्माईल आदिलशहाने बळकाविलेल्या काकनी, गुरोली आणि नरगी या जिल्ह्यांवर फौजेची रवानगी केली. या फौजांनी वरील जिल्हे काबीज केले. सुलतानाने स्वतः एटगीरवर चाल केली आणि बरीदशहाकडे मेडक आणि कौलासची मागणी केली. बरीदशहाने बुरहाण निजामशहाकडे मदत मागितली. बुरहाण निजामशहा इब्राहीम आदिलशहाबरोबर सोलापूरच्या प्रश्नावरून युद्धात गुंतला होता. त्याने कुतुबशहाबरोबर बोलणी करण्यास ही वेळ योग्य आहे असे समजून आपला वकील शहाताहिर याला त्याजकडे रवाना केले. शेवटी असे ठरले की बरीदशहाने मेडकचा किल्ला कुतुबशहाच्या स्वाधीन करावा आणि निजामशहाला मदत करण्यासाठी ५००० घोडेस्वार रवाना करावे.

यावेळी कुतुबशहा ९० च्या घरात पोहोचला होता. त्याचे शरीर जरी कमजोर झाले होते तरी मन कणखर होते. त्याने आता आपल्या राजधानीला मशिदी आणि इमारती बांधून आणि बागा उठवून सुशोभित करण्याचे ठरविले. **जमादिल-अव्वाल** महिन्यात **हिजरी ९५०** यावर्षी ( ऑगस्ट १५४३ ) तो गोवळकोंड्याच्या मुख्य मशिदीच्या दुरुस्तीचे चाललेले काम पाहण्यास गेला. काही कारणामुळे दुरुस्तीचे काम त्याने दुसऱ्या म्हणजे **२ जमादि उससानी हिजरी ९५०** ( ४ सप्टेंबर १५४३ ) या दिवसावर ढकलले. त्या दिवशी तो तेथे गेला असताना राजपुत्र जमशीद याच्या चिथावणीवरून गोवळकोंड्याचा सुभेदार मीर महमद हमदानी याने त्याला ठार मारले.

## जमशीद कुतुबशहा

( ३५९ ) * फरिश्त्याचे भाषांतर करताना ब्रिग्जला कुतुबशाही घराण्याची माहिती देणारा एक ग्रंथ मिळाला. त्याचा संपूर्ण अनुवाद ब्रिग्जने आपल्या फरिश्त्याच्या भाषांतराचे अखेर दिला. त्यातील जमशीद कुतुबशहाबद्दलची माहिती पुढे दिली आहे.

सुलतान कुली कुतुबशहाला हैदरखान, कुतुबुद्दीन, यार कुली जमशीदखान, अबदुल करीम, दौलतखान आणि इब्राहीम असे सहा मुलगे होते. कुली कुतुबशहाच्या मृत्यूनंतर जमशीदखान हा गादीवर आला. मृत सुलतानाने कुतुबुद्दीन यास आपला वारस नेमले होते. त्याला जमशीद कुतुबशहाने आंधळा केले. राजपुत्र इब्राहीम हा त्यावेळी देवरकोंडा येथे होता. तो कासीम बरीदशहाकडे गेला आणि त्याला घेऊन त्याने गोवळकोंड्यावर चाल केली. या आक्रमणाच्या बातमीमुळे बुरहाण निजामशहाच्या मनात बरीदशहाच्या हेतूविषयी शंका निर्माण होऊन त्याने कुतुबशहाच्या मदतीसाठी कूच केले. या सैन्याशी मुकाबला करणे अशक्य झाल्यामुळे त्याने विजापूरच्या दिशेने माघार घेण्यास सुरुवात केली. वाटेत इब्राहीमचे सामानसुमान लुटण्याचा त्याने प्रयत्न केल्यामुळे इब्राहीम त्याला सोडून विजयनगरच्या रामराजाच्या आश्रयाला गेला रामराजा हा पूर्वी कुली कुतुबशहाच्या चाकरीत होता. तो विजयनगरच्या कृष्णरायाच्या पदरी गेला. त्याच्या अंगचे गुण पाहून कृष्णरायाने आपली मुलगी त्याला दिली. पुढे कृष्णराया मेल्यानंतर त्याचा वारस लहान असल्याने रामराजाने सिंहासन बळकाविले. रामराजाने इब्राहीमचे सन्मानाने स्वागत केले. इकडे बुरहाण निजामशहा, जमशीद कुतुबशहा आणि अल्लाउद्दीन इमादशहा यांनी विजापूरविरुद्ध युती करून सोलापूरच्या किल्ल्याचा पाडाव करण्यासाठी चाल केली. या युतीला तोंड देणे शक्य नाही असे वाटल्यामुळे इब्राहीम आदिलशहाने कासीम बदीरशहाला बरोबर घेऊन परंड्यावर चाल केली. त्याबरोबर वरील त्रयीने परंड्याकडे मोर्चा वळविला. त्यांच्यावर इब्राहीम आदिलशहाने खासपूरजवळ हल्ला चढविला पण त्यात त्याचाच पराभव झाला. या लढाईत जमशीद कुतुबशहाने शौर्य गाजविले. कासीम बरीदचाही त्याने बिदरपर्यंत पाठलाग केला. नंतर तो गोवळकोंड्याला परतला.

जमशीद कुतुबशहा एकटाच गोवळकोंड्याला परतला हे जेव्हा कासीम बरीदला कळले तेव्हा तो ८००० घोडेस्वार घेऊन त्याच्यावर हल्ला करण्यासाठी निघाला तो गोवळकोंड्यापासून ४ कोस अंतरावर चिळकूर येथे येऊन पोहोचला. त्याबरोबर घाबरून जाऊन त्याने गोवळकोंडा सोडले आणि आपल्या सरदार मंडळींना जहागिरीवरून ताबडतोब निघून येण्यासाठी कळविले. तो स्वतः बिदरवर चाल करून गेला आणि कामठाण्याच्या आसपासचा मुलूख त्याने लुटला. ही बातमी कळल्यावर कासीम बरीदने

गोवळकोंड्याचा वेढा उठविला आणि तो परत फिरला. वाटेत दोन्ही सुलतानांची गाठ पडली. दोघांनी आपापल्या प्रदेशांकडे परत फिरण्याचे कबूल केले. काही काळाने पुन्हा फौज जमवून जमशीद कुतुबशहाने बिदरवर स्वारी केली. कौलास येथे आल्यावर त्याने तेथे एक किल्ला बांधण्याचे ठरविले आणि तो तेथून बरीदशहाबरोबर लढण्यासाठी निघाला. नारायणखेडा येथे दोन्ही फौजांत लढाई झाली. पण निर्णय लागला नाही. दरम्यान कौलासचा किल्ला पूर्ण झाला. जमशीद कुतुबशहा एक तुकडी घेऊन तिकडे गेला तेव्हा बरीदशहाने त्याच्या छावणीवर हल्ला करून ती लुटली. पण नंतर तो बिदरकडे निघून गेला. इकडे कुतुबशहाने कौलास, नारायणखेडा आणि अहसनाबाद हे जिल्हे ताब्यात घेऊन त्यावर जगदेवरावाची नेमणूक केली.

कौलासचा किल्ला पूर्ण झाल्यावर कुतुबशहाची छावणी जेव्हा बरीदशहाने लुटली तेव्हा कुतुबशहाने आपल्याला येऊन मिळण्याविषयी बुरहाण निजामशहाला लिहिले. बुरहाण निजामशहाने त्याप्रमाणे कूच करून औसाच्या किल्ल्याला वेढा दिला. तेथे कुतुबशहा त्याला येऊन मिळाला. औसाचा वेढा चालू ठेवून जमशीद कुतुबशहाने मेडककडे चाल केली आणि किल्ला जिंकून घेतला. इकडे निजामशहा आणि कुतुब-शहाच्या संयुक्त फौजांनी औसा आणि उद्‌गिर हे किल्ले जिंकून घेतले तेव्हा कासीम बरीदने आदिलशहाकडे मदतीची याचना केली. इब्राहीम आदिलशहाने ५००० घोडेस्वार त्याच्या मदतीला इखलासखानाच्या हाताखाली रवाना केले. या फौजेसह बरीदशहा कौलासकडे निघाला. नारायणखेडा येथे त्याला कुतुबशहाने गाठले. दोन्ही फौजांत युद्ध होऊन कासीम बरीदचा पराभव झाला. जमशीद कुतुबशहा हा त्यानंतर गोवळकोंड्याला परतला.

या घटनेनंतर कुतुबशहाने बुरहाण निजामशहाला कळविले की बरीदशहा हा आपल्या शेजारच्या देशाच्या मुलखात नेहमीच लुटालूट करतो. त्याचा कायमचा काटा काढून टाकावा आणि त्यासाठी इब्राहीम आदिलशहाबरोबर बोलणी सुरू करावी. निजामशहाने त्याप्रमाणे आदिलशहाला लिहिले. आदिलशहा या गोष्टीला कबूल झाला. असे ठरले की निजामशहाने बिदरवर हल्ला करावा आणि आदिलशहाने विजयनगरवर. आदिलशहाच्या विजयनगरवरील हल्ल्यात निजामशहाने त्याला कोणताही उपसर्ग देऊ नये असाही प्रस्ताव संमत झाला. या करारानुसार बुरहाण निजामशहाने कंधारवर हल्ला करून ते जिंकले. बरीदशहाला वरील कराराची काहीच माहिती नसल्याने तो विजापूरकडे पळून गेला. तेथे त्याला इब्राहीम आदिलशहाने कैदेत टाकले. विजयनगरचा बराचसा मुलुख नंतर आदिलशहाने आपल्या राज्याला जोडला.

विजापूरच्या राज्याच्या वाढीमुळे आपल्याला कदाचित धोका पोहोचेल अशी निजामशहाला भीती वाटली आणि त्याने अचानक सोलापूरच्या किल्ल्यावर हल्ला

केला. त्याचा प्रतिकार करण्यासाठी आदिलशहाने कूच केले. निजामशहाने आणि आदिलशहाने कुतुबशहाकडे मैत्रीचा हात पुढे केला. दोहोंपैकी कोणत्यातरी एका पक्षाला मिळणे फायद्याचे ठरेल असे वाटून कुतुबशहाने गोवळकोंड्याहून कूच केले आणि सोलापूरच्या मैदानावर दोन्ही युद्धखोर फौजांच्यामध्ये त्याने तळ दिला. त्याचवेळी त्याला कासीमबरीदकडून निरोप आला की तुम्ही माझ्या सुटकेचा प्रयत्न केल्यास मी तुम्हास माझ्या राज्याचा पाहिजे तो मुलुख तोडून देईन. कुतुबशहाने आदिलशहाच्या वकिलास बोलावून सांगितले की कासीम बरीद याची मुक्तता केल्याखेरीज मी तुमच्या सुलतानाजवळ बोलणी करण्यास तयार नाही. त्याप्रमाणे आदिलशहाने कासीम बरीदची सुटका केली. यानंतर जमशीद कुतुबशहाने आपल्या सल्लागार मंडळाची बैठक बोलावून सद्यः परिस्थितीत कोणत्याच पक्षाला मिळणे श्रेयस्कर होणार नाही असे निवेदन केले. त्याने आपली छावणी उठविली आणि कासीम बरीदशहाची बिदरच्या गादीवर पुन्हा स्थापना केली. यानंतर तो गोवळकोंड्याला परतला. तेथे काही काळाने त्याला एका कठीण रोगाने पछाडले आणि **हिजरी ९५७** (इ. स. १५५०) या वर्षी त्यातच त्याला मृत्यू आला. त्याची कारकीर्द सात वर्षांची झाली.

## सुभान कुली कुतुबशहा

(३६०) ★ फरिश्त्याच्या अनुवादाच्या शेवटी ब्रिग्जने त्याला मिळालेल्या कुतुबशाही घराण्याच्या एका इतिहास ग्रंथाचा अनुवाद दिलेला आहे. त्यात सुभान कुली कुतुबशहाची हकीकत पुढीलप्रमाणे दिली आहे. फरिश्ता याच्या कारकिर्दीचा उल्लेख करीत नाही.

जमशीद कुतुबशहाच्या मृत्यूनंतर दरबारातील अमिरांनी त्याचा ७ वर्षांचा मुलगा सुभान कुली याला गादीवर बसविण्याचे ठरविले. राजमातेने अमिरांच्या सल्ल्याने अहमदनगर येथे निघून गेलेल्या सैफखान ऐन-उल्-मुल्क याला परत बोलविण्याचे ठरविले. राज्यात जगदेवराव हा श्रेष्ठ अमीर होता. त्याने सुभान कुलीचा धाकटा भाऊ दौलतखान याला गादीवर बसविण्याचे ठरविले. परंतु त्याच्या बेताशी बहिरीखान आणि जगतराव हे दोघे सरदार सहमत झाले नाहीत आणि त्यांनी जगदेवरावाला बंडखोर ठरविले. जगदेवरावाने भोवनगीर येथून दौलतखानाची सुटका केली आणि आजूबाजूच्या जिल्ह्यांत त्याची सत्ता स्थापन केली.

दरम्यान सैफखान हा अहमदनगरहून आला. त्याने जगदेवरावावर चाल केली. जगदेवरावाने वऱ्हाडच्या तुफालखानाची मदत मागितली. तुफालखानाने ती देऊ केली. दोन्ही पक्षांत सिंगाम येथे घनघोर लढाई झाली आणि सैफखानाचा जय झाला. दौलतखानाला पुन्हा भोवनगीर येथे ठेवण्यात आले. सैफखानाच्या हाती आता पूर्ण सत्ता आली. त्याने राज्यातील अधिकारी आणि अमीर यांना वाईट रीतीने वागविण्यास सुरुवात केली. तेव्हा अमिरांनी एकमताने मरहूम जमशीद कुतुबशहाचा

धाकटा भाऊ राजपुत्र इब्राहीम यास गोवळकोंड्यास येऊन राज्याधिकार ग्रहण करण्यासाठी बोलविण्याचे ठरविले. इब्राहीम पूर्वी सांगितल्याप्रमाणे विजयनगर येथे होता. अमिरांनी ठरल्याप्रमाणे गुप्तपणे त्याला लिहिले तेव्हा इब्राहीम त्याप्रमाणे विजयनगर सोडून पानगळ येथे येऊन पोहोचला. रामराजा त्याला देऊ करीत असलेली फौजेची मदत त्याने आपले सल्लागार सय्यद हाय आणि हमीदखान यांच्या सांगण्यावरून नाकारली. पानगळ येथे त्याच्यापाशी ८००० फौज जमा झाली. कोविलकोंडा किल्ल्याच्या नाईकवाडींनीही त्याला निष्ठेचे आश्वासन दिले. दररोज इब्राहीमकडे अधिकारी आणि सैनिक यांची रीघ लागली. इब्राहीमचा प्रतिकार करण्यासाठी सैफखान हा चाल करून गेला. तो गुणपुरा येथे पोहोचला. इकडे इब्राहीमने गोवळकोंड्याला कोविलकोंड्याचे नाईकवाडी पाठवून तेथील नाईकवाडी शिबंदी आपलीशी करून घेतली. त्यांनी जगदेवरावाला मुक्त केले आणि जगतरावाला गोवळकोंड्याच्या किल्ल्यात बंदिस्त केले. सुभानकुलीच्या पक्षातील प्रमुख अमिरांना त्यांनी ठार मारले आणि सुभानकुलीला कैद केले. ही हकीकत सैफखानाला कळताच त्याने इब्राहीमला क्षमायाचनेचे पत्र लिहिले पण "सिंहासनावर बसेतोपर्यंत आपण कोणतेच वचन देऊ शकत नाही" असे त्याने सैफखानाला कळविले. त्यावर सैफखान हाती असलेला खजिना आणि ५००० घोडेस्वार घेऊन सरहद्दीकडे निघून गेला. इब्राहीमने गोवळकोंड्याकडे कूच केले. १२ **रज्जब हिजरी ९५७** जुलै (२७ जुलै इ. स. १५५०) या वर्षी त्याला गोवळकोंडा येथे राज्याभिषेक करण्यात आला.

(३६१) * इब्राहीम कुतुबशहाबद्दल सय्यदअलीने आपल्या '**बुरहाणे मासिर**' या ग्रंथात पुढीलप्रमाणे माहिती दिलेली आहे.

"इब्राहीम कुतुबशहा हा न्यायनिष्ठूर होता. राज्यातील चोरांना आणि इतर गुन्हेगारांना त्याने कडक शासन देऊन दाबात ठेवले. चोरी, लुटमार आणि दरोड्याचे सर्व प्रकार इब्राहीम कुतुबशहाने नाहीसे केले." (**अ. नि.** पान २१९)

(३६२) * फरिश्त्याचा अनुवाद दिल्यानंतर ब्रिग्जने त्याला मिळालेल्या एका कुतुबशाही घराण्याचा इतिहास देणाऱ्या ग्रंथाचा अनुवाद दिलेला आहे. त्यामध्ये इब्राहीम कुतुबशहाबद्दल पुढीलप्रमाणे हकीकत दिली आहे.

## इब्राहीम कुतुबशहा

राज्याधिकार ग्रहण केल्यानंतर कुतुबशहाने राज्यकारभाराच्या बाबींकडे लक्ष देण्यास आणि त्या अनुषंगाने कायदेकानू करण्यास सुरुवात केली. दक्षिणेतील सुलतानांनी त्याचे अभिनंदन करणारी पत्रे त्याला लिहिली. हुसेन निजामशहाने आपल्यातर्फे कासिमबेग शिराजी याला वकील म्हणून गोवळकोंड्याला पाठविले तर इब्राहीम कुतुबशहाने मुस्तफाखानाची वकील म्हणून अहमदनगरला रवानगी केली.

दोघा सुलतानांनी बिदर आणि कुलबर्गा या दोन किल्ल्यांचा पाडाव करावा असे ठरले. त्याप्रमाणे आपापल्या फौजा घेऊन दोघेजण कुलबर्ग्याला पोहोचले आणि त्यांनी कुलबर्ग्याला वेढा घातला. किल्ल्याचा बंदोबस्त मजबूत होता त्यामुळे वेढ्याचा काहीच परिणाम झाला नाही. कुलबर्गा आदिलशहाच्या ताब्यात होते. त्याने विजयनगरच्या रामराजाची मदत मागितली. रामराजा स्वतः सैन्य घेऊन आदिलशहाच्या मदतीला आला. त्याने कुतुबशहाला निजामशहाशी संगनमत न करण्याचे आणि विजापूरविरुद्ध आक्रमण न करण्यासंबंधी लिहिले. अशाच तऱ्हेचे पत्र इब्राहीम आदिलशहाने देखील त्याला लिहिले. कुतुबशहाने रामराजाची भेट घेण्याचे आणि विजापूर आणि अहमदनगर यामध्ये मैत्री घडवून आणण्यास आपण तयार आहोत असे कळविले. चारही राजांची भेट भीमा आणि कृष्णा या नद्यांच्या संगमावर झाली. तहाची बोलणी होऊन परस्परांना समाधानकारक असा तह झाला. दरम्यान रामराजाच्या गैरहजेरीत त्याच्या भावांनी बंडे केली. रामराजाने कुतुबशहाची मदत मागितली, त्याप्रमाणे कुतुबशहाने काबूलखानाची रवानगी केली. रामराजाने आपल्या भावांचे बंड मोडले आणि काबूलखानाची सन्मानाने पाठवणी केली.

इब्राहीम कुतुबशहाला गादीवर बसविण्यात जयदेवरावाची मोठी मदत झाली होती. कुतुबशहाने त्याला आपला मुख्य वजीर केले. त्याने दौलतखानाला पुन्हा गादीवर बसविण्याचा कट केला. त्याचा दुय्यम रायराव याने मुसलमान अधिकाऱ्यांशी उद्धटपणे वागण्यास सुरुवात केली. त्यांनी सुलतानाकडे तक्रार केली. सुलतानाने प्रथम तिकडे दुर्लक्ष केले परंतु नंतर त्याने रायरावाला पकडून ठार मारले. हे कळल्यानंतर जगदेवराव दोनतीन हजार फौज घेऊन वऱ्हाडाकडे वाटेतला मुलख उद्ध्वस्त करीत पळून गेला. त्याला बुरहाण इमादशहाने आपल्या चाकरीत घेतले. वऱ्हाडचे त्यावेळी खानदेशच्या मिरान महमद खानाबरोबरोबर युद्ध चालले होते. इमादशहाने जगदेवरावाला सेनापती नेमून त्याची रवानगी महमदखानावर केली. जगदेवरावाने खानदेशच्या फौजांचा पराभव केला. वऱ्हाडमधील लहानसहान राजेराजवाड्यांनाही त्याने वठणीवर आणले. त्यानंतर तो वऱ्हाड आणि खानदेशच्या सुलतानांनाही जुमानीनासा झाला. बुरहाण इमादशहाने याबद्दल त्याला जाब विचारला तेव्हा त्याने वऱ्हाडातून काढता पाय घेतला. तो येलगंडेल येथे येऊन पोहोचला आणि तेथून त्याने विजयनगरकडे जाण्याचे ठरविले.

वरील बातमी समजताच कुतुबशहाने त्याचा प्रतिकार करण्यासाठी मुस्तफाखानाची रवानगी केली. मुस्तफाखानाने प्रथम जगदेवरावाशी सामोपचाराने घेण्याचा प्रयत्न केला पण त्याने युद्धाची तयारी केली. झालेल्या युद्धात जगदेवरावाचा पराभव झाला आणि तो विजयनगरकडे पळून गेला.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे रामराजा, इब्राहीम आदिलशहा आणि इब्राहीम

कुतुबशहा यांची भेट झाल्यावर काही काळाने आदिलशहा मरण पावला. त्याचा तरुण मुलगा अली आदिलशहा हा गादीवर आला. या परिस्थितीचा फायदा घेऊन हुसेन निजामशहाने विजापूरवर स्वारी केली. तेव्हा आदिलशहाने रामराजाची मदत मागितली. तो सैन्य घेऊन आदिलशहाच्या मदतीला आला. आदिलशहा आणि रामराजा यांनी कुतुबशहाला आपल्याला येऊन मिळण्याविषयी कळविले त्याप्रमाणे तो कुलबर्गा येथे त्यांना जाऊन मिळाला. दोस्तांनी अहमदनगरला वेढा दिला. निजामशहाने राजधानी सोडून दौलताबादकडे माघार घेतली. दरम्यान कुतुबशहाने निजामशहा आणि अहमदनगरचा किल्लेदार यांच्याशी पत्रव्यवहार चालू ठेवला. त्याने विजयनगरच्या सैन्यातील काही अधिकाऱ्यांना फितविले आणि "पावसाळा आता सुरू होईल तेव्हा तुमचे अतिशय हाल होतील" असे सांगून वेढा उठविण्याविषयी त्यांचे मन वळविले. रामराजा आपल्या अधिकाऱ्यांच्या सांगण्यावरून वेढा उठविण्यास प्रवृत्त झाला पण अली आदिलशहाने वेढा चालू ठेवण्याविषयी त्याचे मन वळविले. कुतुबशहाने मात्र अहमदनगरच्या किल्ल्यात रसद पाठविण्याची व्यवस्था केली आणि मुस्तफाखानास रामराजाचे मन वळविण्यासाठी पाठविले. किल्ला पाडाव होण्याच्या बेतात होता आणि किल्ल्याचा पाडाव होऊ नये असे कुतुबशहास वाटत होते. मुस्तफाखानाने छावणीत पडलेली रसदीची टंचाई, पावसाळ्याचे आगमन आणि निजामशहाच्या मदतीसाठी गुजराथ आणि खानदेश यांच्या येणाऱ्या फौजा वगैरेंच्या योगे रामराजाचे मन वेढा उठविण्याबद्दल वळविण्याचा प्रयत्न केला. वेढा उठविल्यास कोंडापल्ली रामराजास देण्याचे कुतुबशहातर्फे आश्वासन दिले. याचा उपयोग होऊन रामराजाने वेढा उठविण्याचे कबूल केले. त्याप्रमाणे वेढा उठवून रामराजा, आदिलशहा आणि कुतुबशहा हे आपापल्या राज्यांकडे निघून गेले.

अहमदनगरचा वेढा चालू असताना बातमी आली की वऱ्हाडच्या तुफालखानाने तेलंगणात घुसून लुटालूट केली आहे. तेव्हा रामराजाने कुतुबशहाला सांगितले की "तुफालखानाचा पराभव करण्यासाठी मदत पाहिजे असल्यास ती मी देतो." त्याचा राग येऊन कुतुबशहाने रामराजाच्या समक्ष आपला अधिकारी दस्तूरखान याला फक्त १०० सैनिक घेऊन तुफालखानावर चालून जाण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणे दस्तूरखानाने भीमकुल येथे तुफालखानाला गाठून त्याचा पराभव केला.

इब्राहीम कुतुबशहाने अहमदनगरच्या वेढ्यात केलेल्या मदतीबद्दल आभार मानण्यासाठी हुसेन निजामशहाने आपला अधिकारी मौलाना-इनायत-उल्ला याची गोवळकोंड्याला रवानगी केली. दोघा सुलतानांनी कल्याणीच्या किल्ल्यानजिक भेटावे आणि भेटीनतर कल्याणीचा किल्ला जिंकून घ्यावा असे ठरले. त्याप्रमाणे पुढील वर्षी दोन्ही सुलतान कल्याणी येथे भेटले. निजामशहाने आपली मुलगी कुतुबशहाला विवाहादाखल दिली. त्यानंतर दोघांनी कल्याणीला वेढा दिला. ही बातमी आदिलशहाला समजताच त्याने रामराजाजवळ मदतीची याचना केली. रामराजा

सैन्यासह आदिलशहाच्या मदतीला या विनंतीप्रमाणे निघाला. अली बरीदशहा हा पण अली आदिलशहाच्या मदतीला आला. रामराजाने गोवळकोंड्याच्या दक्षिणेकडील जिल्ह्यावर आपला भाऊ वेंकटाद्री याची २५००० फौज देऊन रवानगी केली. ही बातमी कळताच निजामशहा आणि कुतुबशहा यांनी वेढा उठवून आपापल्या देशांकडे जाण्याचे ठरविले. कुतुबशहा हा गोवळकोंड्याकडे जात असताना आदिलशाही फौजांनी त्याचा पाठलाग केला. मोठ्या मुष्किलीने कुतुबशहा गोवळकोंड्याला पोहोचला.

यानंतर काही काळाने विजापूर, विजयनगर आणि बिदर यांच्या फौजांनी गोवळकोंड्यावर स्वारी केली. पानगळ, कोविलकोंडा आणि गुणपुरा हे किल्ले रामराजाच्या हाती पडले. या मोहिमेत जगदेवरावाने विशेष कामगिरी बजाविली. अखेर अली बरीदशहा आणि अली आदिलशहा यांच्या मध्यस्थीने तह होऊन रामराजाने "गुणपुरा आणि पानगळ हे किल्ले आपल्याला दिल्यास आपण विजयनगरला परतु" असे सांगून तहाला मान्यता दिली. यानुसार दोस्तांच्या फौजा गोवळकोंड्यांच्या राज्यातून निघून आपापल्या देशाकडे परत गेल्या. याचवेळी कुतुबशहाने गोवळकोंड्याचा किल्ला, दगड आणि चुना यांचे बांधकाम करून नव्याने बांधून काढला. काही काळाने इंद्रकोंड्याचा किल्ला घेण्यासाठी कुतुबशहाने मुस्तफाखानाची रवानगी केली. मागील युद्धात किल्ल्याच्या नाईकवाडीचा प्रमुख काशीराव याने किल्ल्याचा किल्लेदार महमद मोमीन याला बंदिस्त करून किल्ला ताब्यात घेतला होता. मुस्तफाखानाने किल्ला सर करून काशीरावाला ठार मारले. नंतर तो राजधानीला परतला. तेथे त्याला सुलतानाने पेशवेपद दिले. त्याचवेळी सुलतानाने नाईकवाडीची सत्ता मोडण्याचे ठरविले. हे कळल्यावर गोवळकोंड्याच्या नाईकवाडीचा प्रमुख सूर्यराव याने सुलतान जेव्हा शिकारीला जाईल तेव्हा राज्यातील किल्ले व खजिना ताब्यात घेण्याचा आणि सर्व मुसलमानांना ठार मारण्याचा कट केला ह्या कटाची बातमी त्याने रामराजाला दिली. यानंतर सुलतान सैन्यासहित शिकारीनिमित्त राजधानीबाहेर पडल्यावर नाईकवाडीनी किल्ल्याचे दरवाजे लावून घेतले आणि मुसलमानांवर हल्ला चढविला. ही बातमी दोघा पळून गेलेल्या मुसलमानांनी सुलतानाकडे पोहोचविली तेव्हा सुलतानाने सर्व सैन्यासहित किल्ल्याला वेढा दिला. हे पाहून सर्व नाईकवाडी तटावर जमा झाले आणि मुस्तफाखानाला ताब्यात दिल्यास आपण आपल्या कामावर पुन्हा परत जाऊ असा निरोप त्यांनी सुलतानाकडे दिला. सुलतानाने या गोष्टीला नकार दिला. काही दिवसांनी सर्व नाईकवाडी शरण आले. त्या सर्वांना सूर्यरावासहित ठार करण्यात आले.

दरम्यान एलोरे किल्ल्याचा किल्लेदार दिलावरखान याने राजमहेंद्रीवर आपण हल्ला करावा अशी सूचना सुलतानाला केली. त्याप्रमाणे सुलतानाने रुफतखान लोदी ऊर्फ मलिक नायब याची १०००० घोडेस्वार देऊन तिकडे रवानगी केली.

ही हकीकत विद्याद्री आणि सितापती यांना कळताच त्यांनी आजूबाजूच्या राजे-रजवाड्यांना मदतीसाठी बोलाविले आणि प्रचंड सैन्य जमवून मुसलमानांवर चाल केली. त्यात हिंदूंचा पराभव झाला आणि विद्याद्री व सितापती राजमहेन्द्रीकडे पळून गेले. मुसलमानानी घोलेश्वरपर्यंत त्यांचा पाठलाग करून तो किल्ला घेतला. नंतर त्यांनी तटपाकवर चाल करून तोही किल्ला काही कालावधित जिंकून घेतला.

यानंतर इब्राहीम कुतुबशहाने असा विचार केला की रामराजाकडून आपल्या राज्याला जो वारंवार उपसर्ग होतो त्याचा प्रतिकार करणे जरूर आहे आणि यासाठी दक्षिणेतल्या इतर सुलतानांबरोबर संगनमत होणे अवश्य आहे. हा उद्देश सिद्धीस जावा म्हणून त्याने आपला वजीर मुस्तफाखान याला प्रथम अहमदनगर आणि तेथून पुढे विजापूर येथे पाठविले. मुस्तफाखान आपल्या कामगिरीत यशस्वी झाला. तिघा सुलतानांनी सोलापूर येथे एकत्र जमावे आणि तेथून रामराजावर चाल करून जावे असे ठरले. त्याप्रमाणे **हिजरी ९७२** या वर्षी **जमादिल अव्वाल** महिन्याच्या २० तारखेला ( २६ डिसेंबर १५६४ ) मुसलमानांच्या फौजांनी कूच केले. रामराजानेही प्रचंड फौज जमविली, **हिजरी ९७२** या वर्षी **जमादिउससानी** महिन्याच्या २० तारखेला शुक्रवारी ( २५ जानेवारी १५६५ ) तालिकोट येथे दोन्ही फौजांत लढाई होऊन हिंदूंचा पराजय झाला. तालिकोटहून कूच करून मुसलमानी फौजांनी मुद्गल आणि रायचूरचा पाडाव केला. हे दोन्ही किल्ले मुस्तफाखानाने विजापूरच्या किश्वरखानाच्या स्वाधीन केले. त्यावर हुसेन निजामशहाने मुस्तफाखानाविरुद्ध कुतुबशहाकडे लिहिल्यामुळे मुस्तफाखानावर कुतुबशहाची नाराजी होऊन त्याने त्याची राज्यातून हकालपट्टी केली. मुस्तफाखान अली आदिलशहाच्या दरबारात गेला. तेथे अली आदिलशहाने त्याला आपला वजीर केले. अली आदिलशहाच्या मृत्यूनंतर **हिजरी ९८८** मध्ये ( इ. स. १५८० ) त्याचा खून झाला.

**हिजरी ९७३** यावर्षी **रमजान** महिन्याच्या १४ तारखेला ( ८ एप्रिल १५६५ ) सुलतानाला मुलगा झाला. त्याचे नाव महमद कुली असे ठेवण्यात आले.

विजयनगरवरील मोहिमेवरून परतल्यावर हुसेन निजामशहा हा अतिशय आजारी पडला. **हिजरी ९७२** या वर्षी **जिल्काद** महिन्याच्या ७ तारखेला शुक्रवारी ( ७ जून १५६५ ) तो मरण पावला. त्याचा मुलगा मुर्तजा निजामशहा हा गादीवर आला. त्याची आई खूनजा हुमायूँन हिने सत्ता आपल्या हाती घेतली. तेव्हा मुख्य वजीर किश्वरखान याने अली आदिलशहा याला अहमदनगरवर चाल करून येण्यास कळविले. ही गोष्ट मुर्तजा निजामशहाला कळताच त्याने कुतुबशहाकडे मदत मागितली पण ती येण्याचे आतच आदिलशहा हा सरहद्दीवर येऊन ठेपल्याने मुर्तजा निजामशहाला अहमदनगर सोडून जाणे भाग पडले. तो वऱ्हाडात गेला. तेथे त्याने तुफालखानाची मदत घेऊन कौलास गाठले. दरम्यान

कुतुबशहाच्या फौजाही त्यांना येऊन मिळाल्या. तेव्हा असे ठरले की अहमदनगर, वऱ्हाड आणि गोवळकोंडा यांच्या संयुक्त फौजांनी विजापूरवर चाल करावी. या फौजांनी विजापूरला वेढा घालण्याचे अगोदर आदिलशहा राजधानी सोडून कोकणात गेला. आदिलशहाला आपला मुल्ख मुर्तजा निजामशहाला तोडून देणे भाग पडू नये म्हणून कुतुबशहाने आपल्या दोस्तांची मने विजापूरचा वेढा उठविण्याबाबत वळविली आणि त्यानुसार दोस्तांच्या फौजा आपापल्या राज्यांकडे निघून गेल्या.

या घटनेनंतर आदिलशहाने निजामशहाशी बोलणी सुरू केली. दोघांची भेट औसा येथे होऊन असे ठरले की निजामशहाने वऱ्हाड जिंकून घ्यावे आणि आदिलशहाने बिदर आणि तेलंगणाचा पाडाव करावा. परंतु हा तह अमलात येण्याचे अगोदर दोघांच्या फौजांनी तुफालखानावर चाल केली. तुफालखान पळून गाविलगडच्या किल्ल्यात गेला. निजामशहा व आदिलशहा यांच्या फौजांनी गाविलगडला वेढा दिला परंतु तुफालखानाने आदिलशहाला २००००० होन आणि ५० हत्ती देऊन आपल्या बाजूला वळवून घेतले आणि त्याच्यातर्फे निजामशहाला वेढा उठविण्यास प्रवृत्त केले. निजामशहा दक्षिणेच्या बाजूने निघून गेला. दोघांच्या फौजांनी मात्र कौलास घेण्यासाठी कूच केले पण वाटेत विजापूरच्या मराठा घोडदळाने निजामशाही सैन्याच्या पिछाडीवर हल्ला करून लुटालूट केली. त्यात निजामशाही सरदार मन्सूरखान हा ठार झाला. साहजिकच वरील तहाला मूठमाती मिळून दोन्ही सुलतानांच्या फौजा आपापल्या राज्याकडे परतल्या.

मुर्तजा निजामशहा हा अहमदनगर येथे परतल्यावर अली आदिलशहाचा सूड घेण्याच्या हेतूने त्याने कुतुबशहाशी मैत्री करण्याकरता आपल्यातर्फे वकील गोवळकोंड्याला रवाना केला. त्यानुसार दोघा सुलतानांनी आपापल्या सैन्यासह कृष्णा नदीपावेतो कूच केले आणि तेथून त्यांनी येल्तम राजाला आपल्याला येऊन मिळण्याविषयी लिहिले. परंतु अशी एक घटना घडली की आदिलशहाविरुद्ध झालेली वरील एकीही दुभंगली.

मूर्तजा निजामशहा गादीवर आला तेव्हा तो जेमतेम बारा वर्षाचा होता. त्याची आई खुनजा हुमायूँ हिने राज्यकारभार आपल्या हाती घेतला. तिने येल्तम राजाकडे दोन लाख होनांची मागणी केली. त्याने ही गोष्ट कुतुबशहाला कळविली. कुतुबशहाने खुनजा हुमायूँ हिचा या गोष्टीबद्दल निषेध केला. परंतु तिने हा निषेध फेटाळून लावला आणि पुन्हा पैशाची मागणी केली. येल्तम राजाने ही मागणी फेटाळली. अखेर येल्तम राजा आणि कुतुबशहा यांनी आपापल्या देशांकडे परत फिरण्याचे ठरविले. आपण आदिलशाही सैन्याच्या तावडीत सापडलो आहोत असे पाहून मूर्तजा निजामशहाने तेलंगणाचा मार्ग गाठून आपल्या राज्याकडे माघार घेण्यास सुरुवात केली. निजामशाही सैन्याने तेलंगणात लुटालूट करण्यास सुरुवात

केल्यामुळे कुतुबशाही सैन्याने त्यांच्यावर वारंवार हल्ले करून त्यांना संत्रस्त केले. अखेर कुतुबशाही सरदार सलाबतखान याने निजामशाही सैन्याचा पराभव केला. दुसऱ्या एका लढाईत निजामशाही सैन्याचा, त्याचप्रमाणे कुतुबशाही सैन्याचा एक सेनापती असे दोघेजण ठार मारले गेले. रात्र पडल्यामुळे युद्ध संपले तेव्हा निजामशाही सन्याने युद्धातून माघार घेतली. बिदरचा प्रदेश येईतोपर्यंत त्यांनी मुक्काम केला नाही.

तालीकोटच्या लढाईपूर्वी रुफतखानाला राजमहेंद्रीवरती पाठविण्यात आले होते. या सुमारास पुन्हा त्याची राजमहेंद्रीचा पाडाव करण्यासाठी रवानगी करण्यात आली. राजमहेंद्रीकडे सितापती हा पेत्तापूर आणि राजबुंदी या ठिकाणाहून मदत पाठवीत असे. त्याने या दोन ठिकाणांचा प्रथम पाडाव करण्याचे ठरविले. ही दोनही ठिकाणे रुफतखानाने काबीज केली. सितापती हा राजमहेंद्रीकडे पळून गेला आणि विद्याद्रीला जाऊन मिळाला. रुफतखानाने त्यानंतर राजमहेंद्रीवर चाल केली. राजमहेंद्रीचा वेढा बराच काळ चालला. अखेर सितापती आणि विद्याद्री यांनी राजमहेंद्री किल्ला रुफतखानाच्या स्वाधीन केला. ही घटना **हिजरी ९७९** ( इ. स. १५६७ ) या वर्षी घडली

राजमहेंद्रीचा पाडाव झाल्यानंतर सुलतानाने कॉसीमकोट्टाकडच्या पुढे चालून जाण्याविषयी रुफतखानाला आज्ञा दिली. त्याप्रमाणे रुफतखानाने ओरिसाकडे चाल केली वाटेत वेंकटराजाने त्याचा प्रतिकार केला. त्याचा पराभव करून रुफतखानाने गोपाळपिल्ली आणि वीरगोटम हे किल्ले घेतले. तेथून तो पुढे निघाला. दरम्यान ओरिसातील दोन प्रमुख राजे सर्वराज आणि भाय बलंदर यांनी आपले वकील तहासाठी म्हणून रुफतखानाकडे पाठविले. भाय बलंदरने गोवळकोंड्याचा माडलिक म्हणून राज्य करावे या अटीवर तह झाला. तेथून रुफतखानाने गोपाळ ओरिअर याच्या राज्यावर चाल केली. तो पळून बंगालमध्ये गेला होता. त्याचा प्रदेश रुफतखानाने घेतला त्यानंतर रुफतखानाने विद्याद्रीच्या प्रदेशावर चाल केली. विद्याद्रीच्या राज्यातील देवपुराल या किल्ल्याला त्याने वेढा दिला. बऱ्याच काळानंतर किल्ल्याचा सुभेदार वेळुपराज याने शरणागती दिली तेथून त्याने चंद दरबार या ठिकाणावर चाल केली. तेथील अधिपती नरसिंग आणि शूरसिंग हे दोघे भाऊ होते. त्यांचा पराभव करून रुफतखानाने त्यांना कैद केले.

यानंतर रुफतखानाने ओरिसातील बलाढ्य राजा वैजनाथ देव याच्यावर चाल केली प्रथम त्याने पोटनूरचा किल्ला काबीज केला आणि तेथून कोंडदेवपल्लीवर चाल केली. ह्या किल्ल्याचा देखील पाडाव झाला. वैजनाथदेव पंचावन्न हजार फौज व पाचशे हत्ती घेऊन रुफतखानावर चालून आला. झालेल्या लढाईत मुसलमानांचा जय झाला. वैजनाथदेवाने तीन हजार होन खंडणीदाखल आणि चाळीस हत्ती भेट म्हणून देण्याचे कबूल करून तहाला मान्यता दिली. ही मोहीम जवळ जवळ दोन वर्षांपेक्षा जास्त चालली होती

दरम्यान अहमदनगर येथे मूर्तजा निजामशहाने आपल्या आईच्या जाचाला कंटाळून तिला दौलताबादच्या किल्ल्यात कैद करून ठेवले. अहमदनगर राज्याची परिस्थिती अतिशय गोंधळाची होती. त्याचा फायदा घेऊन अली आदिलशहाने आपला सेनापती किश्वरखान लारी याला अहमदनगर राज्यावर पाठविले. त्याने प्रथम कोंडाणा किल्ला घेतला, आणि नंतर धारूरवर चाल केली. तोही किल्ला त्याने जिंकून घेतला. मूर्तजा निजामशहाने आपला सेनापती ख्वाजामिरक डबीर इस्पहानी ऊर्फ चेंगीजखान याला किश्वरखानावर पाठविले. त्याने धारूरला वेढा दिला. झालेल्या लढाईत किश्वरखान ठार झाला. त्यावर आदिलशहाने नूरखान, ऐन-उल्-मुल्क आणि जरीफ–उल्–मुल्क यांची रवानगी निजामशाही राज्यावर केली आणि तो स्वतः पन्नास हजार फौज घेऊन अहमदनगर जिंकून घेण्याच्या हेतूने निघाला. मूर्तजा निजामशहाने इब्राहीम कुतुबशहाची मदत मागितली कुतुबशहाने अली बरीदशहाला बरोबर घेऊन निजामशहाच्या मदतीसाठी प्रयाण केले आणि त्याची वाघदरी येथे भेट घेतली. तिघांनी विजापूरवर चाल करून जाण्याचे ठरविले. अहमदनगरच्या शहा ताहिरचा मुलगा शहा अबुल हसन हा आदिलशहाचा वजीर होता. त्याचा या कारस्थानात हात असावा असे वाटून अली आदिलशहाने त्याला कैद केले. अहमदनगरचा एक सरदार सय्यद मूर्तजा हा आदिलशहाकडे पळून आलेला होता. त्याने विजापूर आणि अहमदनगर यांच्यात तह घडवून आणण्यासाठी अहमदनगरच्या छावणीकडे कूच केले. यात त्याचा उद्देश अबुल हसन याची सुटका घडवून आणण्याचा होता. मूर्तजा निजामशहाने अबुल हसनची सुटका केल्यास आपण तहाच्या वाटाघाटी करावयास तयार आहोत असे आदिलशहाला कळविले. त्याप्रमाणे आदिलशहाने अबुल हसनची सुटका करून त्याला वाटाघाटीसाठी निजामशहाकडे रवाना केले. त्याने बिदर आणि गोवळकोंड्याच्या सैन्यांवर हल्ला करण्याचा सल्ला दिला. या सल्ल्यानुसार निजामशहाने त्यांच्यावर हल्ला केला. बरीदशहा आणि कुतुबशहा यांनी बिदरकडे माघार घेतली. तेथून कुतुबशहा गोवळकोंड्याकडे गेला.

वरील घटनेमुळे निजामशहाचा सूड घेण्याचे कुतुबशहाने ठरविले. त्याकरिता त्याने वऱ्हाडच्या तुफालखानाबरोबर मैत्रीचा तह केला. अली बरीदशहालाही त्याने मदतीसाठी बोलाविले. अली आदिलशहाकडे देखील वकील रवाना करण्यात आले. दरम्यान मूर्तजा निजामशहाने चेंगीजखानाला पाठवून अली आदिलशहाचे मन आपल्या बाजूला वळविले. हे पाहिल्यानंतर कुतुबशहाने वऱ्हाड आणि बिदर यांच्या फौजांची त्यांच्या देशाकडे रवानगी केली आणि तो स्वतः गोवळकोंड्याला आला. इकडे निजामशहा आणि आदिलशहा यानी तेलंगण आणि बिदर यांचा पाडाव करण्याचे ठरविले. आदिलशाही फौजांनी कामठाण्याजवळ मुक्काम केला आणि निजामशाही फौजांनी बिदरला वेढा दिला. कुतुबशहाने सलाबतखानाची चौदा हजार फौज देऊन बिदरच्या मदतीसाठी रवानगी केली. त्यांनी अहमदनगरच्या फौजेवर

हल्ला करून तिला संत्रस्त केले. वेढा उठविणे भाग आहे याची जाणीव दोस्तांना झाली. परंतु तसे केल्यास आपली फारकत झाली असे कुतुबशहाला वाटेल आणि तो आपल्यावर हल्ला करील अशी आदिलशहा आणि निजामशहा यांना भीती वाटली म्हणून त्यांनी वेढा उठविला. कुतुबशहाने हल्ला करू नये म्हणून आदिलशहाने कामिलखान याची आणि निजामशहाने मिर्जा यादगार याची प्रत्येकी पंधरा हजार फौज देऊन कौलासच्या बाजूला रवानगी केली. यानंतर मूर्तजा निजामशहाने वऱ्हाडकडे कूच केले आणि अली आदिलशहाने बंकापूर आणि विजयनगरच्या मांडलिक राजांवर स्वारी केली. कौलास येथे ठेवण्यात आलेल्या फौजेने तेलंगणाच्या सरहद्दीवरील मुलखात लुटालूट करून तो उद्ध्वस्त केला. या फौजेवर कुतुबशहाने मीरशहा महमद अंजू याची आठ हजार घोडेस्वार देऊन रवानगी केली. या फौजेवर देगलूरचा सुभेदार शहा हैदर याने वाटेत हल्ला केला. त्याचा पराभव झाला. देगलूरचा किल्ला कुतुबशाही फौजांनी जिंकून घेतला आणि त्यांनी पुढे कूच केले. देगलूर आणि कंधारच्या मध्ये आदिलशाही आणि निजामशाही फौजांच्या छावण्या पडल्या होत्या. त्यांच्या आघाडीवर असलेल्या बसवंतराव, विश्वासराव आणि कोळीराव यांनी कुतुबशाही फौजेवर हल्ला केला. त्यांचा हल्ला परतवून लावण्यात आला. दुसऱ्या दिवशी दोन्ही फौजांत मोठी धुमश्चक्री झाली. युद्धाचा काहीच निकाल लागला नाही. शत्रूने रात्री छावणी सोडून दिली होती. त्यांचा पाठलाग कुतुबशाही फौजांनी केला आणि त्यांना गाठून पुन्हा एकदा त्यांचा पराजय केला. त्यानंतर दोन्ही फौजांत बारीकसारीक चकमकी होतच राहिल्या. त्यानंतर एक महिन्याने पुन्हा दोन्ही फौजांत मोठी लढाई होऊन कुतुबशाही फौजांचा विजय झाला. शत्रूचे सर्व सामानसुमान लूट म्हणून घेऊन कुतुबशाही फौजा गोवळकोंड्याला परतल्या.

यापूर्वी सांगण्यात आलेलेच आहे की, आदिलशहाने बिदरचा वेढा उठविल्यानंतर विजयनगरवर चाल केली. तेथील राजा श्रीरंगराय याला विजापूरचा प्रतिकार करता न आल्याने त्याने इब्राहीम कुतुबशहाची मदत मागितली. कुतुबशहाने त्याप्रमाणे आपला सेनापती शहा महमद अंजू याला विजापूरच्या सरहद्दीवर लुटालूट करण्यास पाठविले आणि तो स्वतः श्रीरंगरायाला मदत करण्यासाठी निघाला. परिणामी दोघांचे सैन्य एकत्र आले. आदिलशहाला विजयनगरचा वेढा उठवून विजापूरला परतणे भाग पडले. कुतुबशहा वारंवार युद्धात गुंतल्यामुळे वेंकटाद्री कस्तुरी किमराज आणि नरसिंगराय यानी कोटबीर येथे ठरलेली खंडणी न देता कृष्णा ओलांडून कोंडपल्लीच्या किल्ल्यावर हल्ला केला. कुतुबशहाने आपल्या सैनिकांना काही काळ विश्रांती दिली आणि नंतर आपला सेनापती हैदर-उल्-मुल्क याला वरील राजांच्या पाडावासाठी रवाना केले. हैदर-उल्-मुल्कने प्रथम इनकोंड्याचा किल्ला घेतला. नंतर काचेरल कौटा हा किल्ला घेतला, आणि वाटेत कुमुमचा किल्ला घेऊन कोंडबीरवर चाल केली. दरम्यान त्याला असे कळले की, कोंडी तिमन्ना, मुदना चिनिया आणि कस्तुरी रंगय्या यांनी

त्याच्यावर हल्ला करण्याची तयारी केली आहे. त्यांच्यावर हैदर-उल्-मुल्क चाल करून गेला. दोन्ही फौजांत लढाई होऊन हिंदूंचा पराभव झाला. यानंतर त्याने कोंडवीरच्या किल्ल्यावर चाल केली. वेढा बराच काळ चालला. तेव्हा हैदर-उल्-मुल्कने कुतुबशहाकडे अधिक मदत मागितली कुतुबशहाने शहा मीर याची फौज देऊन रवानगी केली. त्याने जारीने वेढा चालविला. मुसलमानांचे खूप नुकसान झाले. अखेर किल्ला **हिजरी ९८७** या वर्षाच्या **सफर** महिन्यात ( एप्रिल १५७९ ) मुसलमानांच्या हाती आला. रामराजाचा जावई कपूरी तिमराज हा कैद झाला. त्याला बरोबर घेऊन शहा मीर गोवळकोंड्याला परतला.

या सुमारास मूर्तजा निजामशहाने बिदर जिंकून घेण्याचे ठरविले. या कामी कुतुबशहाची संमती असणे आवश्यक आहे असे वाटून त्याने मीर अबुल कासीम याला कुतुबशहाकडे पाठविले. कुतुबशहाने दहा हजार घोडेस्वार देऊन शहा मीरची अहमदनगरच्या मदतीसाठी रवानगी केली. इकडे अली बरीदने आदिलशहाची मदत मागितली. मदतीदाखल एका सुंदर तरुण खोजाची मागणी आदिलशहाने केली. मोठ्या नाखुषीने बरीदशहाने त्या खोजाला आदिलशहाकडे रवाना केले. दोघांच्या पहिल्याच भेटीत आदिलशहाच्या वागणुकीचा संताप येऊन त्या खोजाने त्याला खंजिराचा वार करून ठार केले. ( **सफर** २३, **हिजरी** ९८७ –एप्रिल २०, इ. स. १५७९ ) अली आदिलशहाला मुलगा नसल्यामुळे त्याचा पुतण्या इब्राहीम हा गादीवर आला. विजापुरात झालेल्या गडबडीचा फायदा घेऊन निजामशहाने विजापूरवर हल्ला करण्यासाठी बेहजाद-उल्-मुल्क तुर्क याची रवानगी केली. त्याचा विजापुरी फौजांनी धाराशीव येथे पराभव केला. ते माघार घेत असताना त्यांना वऱ्हाडातून सय्यद मूर्तजा हा येऊन मिळाला. निजामशहाने सय्यद मूर्तजा याला सेनापती नेमले. कुतुबशाही सैन्य शहामीरच्या हाताखाली सय्यद मूर्तजाला येऊन मिळाले आणि त्यांनी नळदुर्गकडे चाल केली. त्यांचा विजापुरी फौजांशी मुकाबला झाला. विजापुरी फौजांनी नळदुर्गचा आश्रय घेतला. नळदुर्गला वेढा देऊन दोस्तांच्या फौजा विजापूरकडे वळल्या. दरम्यान किल्ल्यातील फौजेने बाहेर पडून दोस्तांच्या अगोदर विजापूर गाठले. विजापूरच्या वेशीपाशी दोन्ही फौजांत युद्ध होऊन आयत्या वेळी गोवळकोंड्याच्या घोडेस्वारांनी केलेल्या हल्ल्यामुळे विजापुरी सैन्याचा पराभव झाला. दरम्यान बातमी आली की, कुतुबशाही सैन्याची आणखी एक तुकडी अमीर जैन याच्या हाताखाली विजापूरवर चालून येत आहे. या तुकडीला अडविण्यासाठी म्हणून आदिलशहाने नुरुद्दीन निशापुरी याची रवानगी केली. अमीर जैन याने या अगोदर कुतुबशहाच्या आज्ञेवरून काकनी नकवी आणि कुतुल यांचा पाडाव केला होता. ही ठिकाणे अली आदिलशहाने सुभान कुलीच्या कारकिर्दीत जिंकून घेतली होती. विजापूरकडे येण्याच्या अगोदर अमीर जैन याने मादरगी आणि एटगिर यांचा पाडाव करून गोवळकोंड्याचा विजापूरने जिंकलेला मुलूख ताब्यात घेतला होता. दोन वेळा

त्याला अडविण्याचे विजापुरी फौजांनी केलेले प्रयत्न निष्फळ झाले होते. आता निशापुरीची रवानगी झाली आहे असे कळल्यावर दोस्तांनी त्याच्या ( निशापुरीच्या ) पाठलागावर फौज रवाना केली. त्या फौजेने निशापुरीचा पराभव केला आणि अमीर जैन हा दोस्तांच्या फौजेला येऊन मिळाला. याचवेळी विजापूर शहरात यादवी युद्धाला जोर येऊन विजापूरचे दोन सरदार किश्वरखान व ऐन उल्-मुल्क हे हबशी लोकांच्या क्रोधाला आपला बळी पडू नये म्हणून दोस्तांच्या छावणीत येऊन दाखल झाले.

दुसऱ्या दिवशी हबशी अमिरांनी सय्यद मूर्तजाकडे वकील पाठवून " आपण शहा अबुल हसन याला वजीर म्हणून नेमू, तुम्ही कुतुबशाही सेनापती शहा मीर याच्यावर हल्ला करावा " असे कळविले. ही बातमी शहा मीरच्या कानावर गेली. हे सय्यद मूर्तजाला कळल्यावर तो शहा मीरकडे गेला आणि त्याने त्याला वरील गोष्ट सांगितली. दोघा सेनापतींनी परस्परांना मदत करण्याचे वचन दिले. यावर हबशी सरदारांनी वेढा उठविण्यासाठी दुसऱ्या मार्गाचा अवलंब केला. त्यांनी दहा हजार मराठा घोडेस्वारांची, दोस्तांची रसद तोडण्यासाठी रवानगी केली. हे मराठे स्वार इतके यशस्वी झाले की, दोस्तांनी आपला वेढा उठविला, आणि त्यांनी मिरज, रायबाग, पन्हाळा, सातारा आणि हुकेरी या जिल्ह्यांत लुटालूट करीत कुलबर्ग्याकडे प्रयाण केले. दरम्यान बातमी आली की, इब्राहीम कुतुबशहाचा मृत्यू झाला असून त्याचा मुलगा महमद कुली कुतुबशहा हा गादीवर आला आहे. सुलतानाचा मृत्यू हिजरी ९८८ या वर्षी रबीउस्सानी महिन्याच्या २१ तारखेला म्हणजे २ जून इ. स. १५८० यावर्षी झाला. त्याचे वय ५१ वर्षाचे असून त्याची कारकीर्द ३१ वर्षे झाली. इब्राहीम कुतुबशहाला तीस मुले झाली आणि त्यातील सहा मुलगे आणि तेरा मुली त्याच्या मृत्यूच्या वेळी हयात होती.

( ३६३ ) * फरिश्त्याने दिलेल्या कुतुबशाही घराण्याच्या इतिहासाचा अनुवाद केल्यानंतर ब्रिग्ज याने त्याला मिळालेल्या गोवळकोंड्याच्या कुतुबशाही घराण्याचा इतिहास देणाऱ्या दुसऱ्या एका ग्रंथाचा अनुवाद दिला. या ग्रंथामध्ये महमद कुली कुतुबशहा याच्या संबंधी दिलेली माहिती थोडक्यात अनुवादित केलेली आहे.

इब्राहीमनंतर त्याचा तिसरा मुलगा महमद कुली हा गादीवर आला. कुतुबशाही सैन्य त्यावेळी नळदुर्गच्या वेढ्यात गुंतले होते. महमद कुतुबशहा आपल्या सैन्याला जाऊन मिळाला. दरम्यान इब्राहीम आदिलशहाने तहाच्या वाटाघाटीस आपण कबूल आहोत असे कळविले. यावर कुतुबशहाने वेढा उठविला आणि तो राजधानीला परतला. इब्राहीम कुतुबशहाच्या कारकीर्दीत अलिखान नूर नावाचा हलक्या कुळातील एक मनुष्य अमीर पदावर चढला होता. त्याला कोंडवीरच्या भागात असलेल्या सैन्याचा सेनापती नेमण्यात आलेले होते. त्या प्रांताचा सुभेदार

रायराव याच्याबरोबर त्याचा तंटा झाला आणि तो विजयनगरच्या राजाचा जावई मिकर तिमा याच्याकडे मदतीसाठी गेला. त्याच्या मदतीने त्याने कोंडबीरवर चाल केली. परंतु त्याचा रायरावाने पराभव केला. अलिखानाने आता सैन्य जमवून मुलखात लुटालूट करण्यास सुरुवात केली. कुतुबशहाने त्याच्या पाठलागावर सैन्य पाठविले. प्रथम अलिखानाने अरदिंगा या किल्ल्याचा आश्रय घेतला. तेथून तो निजामपट्टम या बंदराकडे गेला. अखेर कुतुबशाही सेनापती रहिमदाद याच्याबरोबर झालेल्या लढाईत तो ठार मारला गेला. या लढाईनंतर विजापूरचा वजीर दिलावरखान याने कुतुबशहाकडे वकील पाठवून इब्राहीम आदिलशहाकरिता कुतुबशहाच्या बहिणीला मागणी घातली. दोन्ही सुलतानांची गाठ नळदुर्ग येथे पडली आणि दोन्ही राज्यांत मैत्रीचा तह झाला.

**हिजरी ९९८.** (इ. स. १५८९) या वर्षी कुतुबशहाने आपली राजधानी मोसी नदीच्या काठावर हलविण्याचे ठरविले. तेथे नवीन शहराची उभारणी करण्यात आली. या शहराला त्याने आपल्या प्रेयसीच्या नावावरून भागानगर असे नाव दिले. तिच्या मृत्यूनंतर हे नाव बदलून हैद्राबाद असे ठेवण्यात आले. शहरात मोठमोठ्या इमारती बांधण्यात आल्या. काही वर्षे याप्रमाणे शांततेत गेली. सुलतानाने आता दक्षिणेच्या दिशेने आपल्या राज्याची वाढ करण्याचे ठरविले. त्याने सैन्य जमवून मुसलमोरूच्या किल्ल्यावर हल्ला केला. तो किल्ला जिंकून त्याने नंदियाल आणि कुलगुर या किल्ल्यांवर चाल केली. हे किल्ले बसवंतराय याच्या ताब्यात होते. त्याने कुतुबशहाचा मांडलिक होण्याचे कबूल केले. त्यानंतर त्याने आपला वजीर अमीर–उल्–मुल्क याला गुंडिकोटा या किल्ल्यावर हल्ला करण्यास पाठविले. वेढा काही काळ चालल्यावर किल्ल्याचा सुभेदार नरसिंगराज याने सुलतानाचे मांडलिकत्व स्वीकारले.

यावेळी वेंकटपती हा विजयनगरचा राजा होता. त्याने आपली राजधानी पेणकोंडा येथे नेली होती आणि गोवळकोंड्याच्या प्रदेशावर आक्रमण केले होते. कुतुबशहाने पेणकोंड्यावर चाल केली आणि किल्ल्याला वेढा दिला. दरम्यान पावसाळा सुरू झाल्यामुळे सुलतानाने वेढा उठविला आणि ठिकठिकाणी आपले सैन्य ठेवून तो राजधानीला परतला. यावेळी कोंडबीर येथे फारसे सैन्य नव्हते. त्याचा फायदा घेऊन वेंकटपतीने उद्‌गिरीदुर्गच्या राजाला चिथावणी देऊन कोंडबीरवर हल्ला करण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्याने कोंडबीरच्या जिल्ह्यात लुटालूट केली. कोंडबीरचा सुभेदार अफजलखान याच्याशी राजाच्या सैन्याची गाठ पडून अफजलखानाचा विजय झाला. पावसाळ्याचा फायदा घेऊन वेंकटपतीने सैन्य जमविले आणि गुंडिकोटावर हल्ला चढवून किल्ल्याला वेढा दिला. तेव्हा कुतुबशाही सेनापती मूर्तजाखान याने कुरपा या शहरापर्यंत मजल मारली आणि त्याच्यावर वेंकटपतीने पाठविलेल्या सैन्याचा पराभव केला. ही बातमी कळल्यावर कुतुबशहाने रुस्तुमखानाला मूर्तजाखानाच्या मदतीसाठी पाठविले. उघड उघड हिंदूंशी लढाई देणे अशक्य आहे हे जाणून

मूर्तजाखानाने रुस्तुमखानाला असे सुचविले की, "मी अर्धे सैन्य घेऊन विजयनगरकडे चाल करून जातो आणि तुम्ही शत्रूबरोबर गनिमीकाव्याच्या युद्धाने लढा." त्याचा सल्ला न ऐकता रुस्तुमखानाने छावणीसमोरील नदी ओलांडून एकट्यानेच कूच करण्यास सुरुवात केली. अधिक संख्येने असलेल्या हिंदूंनी त्यांना घेरले. ऐनवेळी मूर्तजाखान मदतीस गेल्यामुळे मुसलमानांचे बरेचसे सैन्य कत्तलीतून वाचले. यानंतर सुलतानाने कोंडबीरचा हवालदार एतिबारखान येजदी याला सैन्य जमवून विजयनगरवर चाल करून जाण्याचा हुकूम केला. मुसलमान चाल करून येत आहेत असे पाहून हिंदूंनी जंगलाचा आश्रय घेतला. याप्रसंगी अनंतगीरचा राजा नरसानंदराज याने मुसलमान छावणीवर हल्ला करण्याचे ठरविले. झालेल्या युद्धात हिंदूंचा पराभव झाला. त्यानंतर एतिबारखानाने कालिसत्री या शहराकडे चाल केली. तेथील सर्व देवळे त्याने उद्ध्वस्त केली. या सुमारास आलमखान, साबाजी मराठा आणि बालाराव वगैरे ठिकठिकाणच्या जहागीरदारानी वार्षिक खंडणी देण्याचे नाकारून बंड केले. कुतुबशहाने त्यांच्यावर मीर जुमला अमीन-उल्-मुल्क याला पाठविले. त्याने प्रथम कोंडबीरचा सुभेदार कौलानंद हाच बंडखोरांना पाठिंबा देतो अशा समजुतीने त्याला ठार केले. तेव्हा बंडखोरांनी विजयनगरच्या राजाकडे पलायन केले. त्यांचा प्रदेश अमीन-उल्-मुल्क याने उद्ध्वस्त केला आणि तो कोंडबीरला परतला. तेथून तो हैद्राबादला गेला.

या सुमारास सुलतानाचा मृत थोरला भाऊ अबुल कादर याचा एक तोतया निर्माण झाला आणि त्याने आपल्याभोवती सैन्य जमवून कृष्णेच्या काठी तळ दिला. येथून त्याने गोवळकोंड्याच्या उमरावांना आपल्याला येऊन मिळण्यास सांगितले. या तोतयावर सुलतानाने एतिबारखान यास चालून जाण्यास सांगितले. एतिबारखानाने तोतयावर हल्ला करून त्याचा पराभव केला. तोतया विजापूरकडे पळून गेला.

या सुमारास कॉसीमकोटा या जिल्ह्याचा राजा भायबलंदर हा मरण पावला. त्याचा मुलगा मुकुंदराज हा गादीवर आला. त्याला सुलतानाने राजधानीला बोलाविले, आणि मानाचा पोषाख दिला. तेथून परतल्यावर मुकुंदराजाने गोवळकोंड्याचा त्या देशाचा सुभेदार बिरलासखान याला कैद करण्याचा प्रयत्न केला. त्याने आपली वार्षिक खंडणीही पाठविली नाही. सुलतानाने आपला रुसुमदार मीर जैन-उल्-आबीदिन याला मुकुंदराजावर पाठविले. त्याच्या मदतीला अमीर जुमला अमिन-उल्-मुल्क याची सुलतानाने रवानगी केली. यामुळे मुकुंदराज घाबरला आणि त्याने आजूबाजूचे राजे आणि विजयनगरचा राजा वेंकटपती यांना आपल्या मदतीला बोलाविले. त्या अगोदर मुकुंदराज आणि मुसलमानी फौजा यात घनघोर युद्ध झाले. मुसलमानांचा पराजय होण्याच्या बेतात होता परंतु अमीन-उल्-मुल्क याने आपल्या तुकडीला घेऊन मुकुंदराजावर अचानक हल्ला केला. मुकुंदराजाचा पराभव झाला आणि तो कॉसीमकोट्याकडे पळून गेला. अमीन-उल्-मुल्कने त्याचा पाठलाग केला. तेव्हा

मुकुंदराजाने पेत्तापूरच्या दिशेने माघार घेतली. अखेर त्याने रामचंद्रराज या तेथील एका बलाढ्य राजाचा आश्रय घेतला. रामचंद्रराजाचे मुसलमानांपुढे काही चालले नाही. त्याने गोवळकोंड्याचे मांडलिकत्व स्वीकारले. मुकुंदराज बंगालमध्ये पळून गेला. दरम्यान वेंकटपतीने कोंडबीरवर चाल केली. सुलतानाने त्याच्यावर आदिलखान बंगी (बंगश) याला पाठविले. तेव्हा वेंकटपतीने आपले वकील गोवळकोंड्याकडे पाठवून आपला स्वारी करण्याचा उद्देश नसल्याचे सांगितले. तेव्हा सुलतानाने आदिलखान बंगी याला विजयनगरवर चाल न करून जाण्याची आज्ञा दिली. सुलतानाच्या फौजा कॉसीमकोट्याच्या लढाईत गुंतल्या असताना राजमहेंद्री आणि एलोर येथील रेड्डीबार लोकांनी बंड केले. त्यांच्यावर सुलतानाने आदिलखानाला पाठविले. रेड्डीबारांनी गनिमीकाव्याच्या युद्धनीतीचा अवलंब केला. परंतु अखेर रेड्डीबारांचा पराभव होऊन त्यांनी जंगलाचा आश्रय घेतला. सरतेशेवटी त्यांनी सुलतानाकडे वकील पाठवून आपण शरण आल्याचे कळविले. याचवेळी रावतराय नावाच्या एका राजाने अमीन–उल्–मुल्क याने केलेली आज्ञा न आवडल्याने सुलतानाची छावणी सोडली. त्याने भायबलंदरचा भाऊ हरिचंद्र यालाही आपल्या-बरोबर घेतले आणि त्याला कॉसीमकोटा ताब्यात घेण्याबद्दल चिथविले. त्याने सुलतानाच्या फौजेवर उघडउघड हल्ला केला. पण त्यात त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. हरिचंद्र मात्र पळून गेला. त्याने वैजनाथ देव आणि मुकुंदराज यांना आपल्या बाजूला वळविले. त्यानी जुरजुरा या किल्ल्यावर हल्ला केला. परंतु त्यांचा पराभव होऊन त्यांना वेढा उठवावा लागला. वैजनाथ देव आणि मुकुंदराज यांच्या बंडाचा सुलतानाच्या फौजांनी बीमोड केला. वैजनाथ देवाने गोवळकोंड्याला वकील पाठवून दरसाल खंडणी देण्याचे कबूल केले. कॉसीमकोट्याचा सर्व प्रांत मुसलमानांच्या ताब्यात आला. दरम्यान रावतरावाचा मुलगा कृष्णराज याने मुकुंदराजाला पुन्हा आपला प्रदेश मिळविण्यासाठी बंड करण्याबद्दल चिथावले. परंतु बराच काळपर्यंत युद्ध चालल्यानंतर मुकुंदराजाचा पराभव होऊन तो पुन्हा बंगालमध्ये पळून गेला.. या सुमारास सुलतानाने सय्यद मीर महमद अमीन याला मीरजुमला म्हणून नेमले. या जागेचा मेहनताना दोन लक्ष होन एवढा होता.

हिजरी १०१२ } **हिजरी १०१२** या वर्षी पर्शिया या देशाचा सुलतान शहा
इ. स. १६०३ } अब्बास याने महमद कुली कुतुबशहाकडे आपला वकील पाठविला. त्याच्या स्वागतासाठी सुलतानाने अमीर जैन उद्दीन निशापुरी याची रवानगी केली. सुलतानाने पर्शियाचा वकील उगझल सुलतान याची गोवळकोंडा शहरात काळा चवुतरा येथे भेट घेतली. वकिलाने पर्शियाहून आणलेल्या अनेक भेटी सुलतानाला नजर केल्या. यावेळी मोगलांचे दक्षिणेत आक्रमण सुरू झालेले होते. त्यामुळे हा वकील सहा वर्षे हैद्राबाद येथे राहिला. मोगलांच्या दक्षिणेवरील स्वारीमुळे हैद्राबादमध्ये अनेक मोगल जमा झाले होते. या सुमारास त्यांच्यापैकी काहींनी नोबत घाटाचा राजवाडा

आणि बाग येथे दंगल केली. तेव्हा सुलतानाने ' सर्व मोगलांनी राज्याबाहेर जावे ' असा हुकूम काढला. त्यामुळे झालेल्या गोंधळाचा फायदा घेऊन दक्षिणी लोकांनी लुटालूट आणि दंगली करण्यास सुरुवात केली. ही हकीकत मीर जुमला महमद अमीन याने सुलतानाच्या कानावर घातली. तेव्हा सुलतानाने आपला हुकूम मागे घेतला. हिजरी १०१८ (इ. स. १६०९) या वर्षी सुलतानाचा धाकटा भाऊ मिर्झा महमद खुदा बंदा याने बंड केले. परंतु सुलतानाला ही हकीकत वेळीच कळल्यामुळे त्याने बंडाचा बीमोड केला. खुदा बंदा याला गोवळकोंडा येथे कैदेत ठेवण्यात आले. ह्या कालापर्यंत कासीम कोट्याच्या प्रांतात शांतता नांदत होती. या सुमारास दिल्लीच्या जहांगीर बादशहाने आपला मुलगा राजपुत्र परवीज याला दक्षिण जिंकून घेण्यासाठी पाठविले. या परिस्थितीचा फायदा घेऊन वैजनाथ देवाने कॉसीम कोट्यावर हल्ला केला. वैजनाथ देवाचा बीमोड करण्यासाठी चेंगीजखान आणि धर्मराव यांना त्याच्यावर रवाना करण्यात आले. वैजनाथ देवाचा पुतण्या कृष्णराज हा मुसलमानांना येऊन मिळाला. दरम्यान वैजनाथ देवाचा मृत्यू झाला. अखेर कृष्णराज आणि कुतुबशाही अधिकारी यांच्यात तह होऊन कृष्णराजाने खंडणी देण्याचे कबूल केले. परंतु कृष्णराजाने संपूर्ण खंडणी न भरल्यामुळे कुतुबशहाने चेंगीजखानाला त्याच्यावर चालून जाण्याचा हुकूम दिला. परिणामी कृष्णराजाला उरलेली खंडणी देणे भाग पडले.

हिजरी १०१९, इ. स. १६१० — **हिजरी १०१९** या वर्षी अशी बातमी आली की, परतबसा या बस्तरच्या राजाने कुतुबशाही सरहद्दीवरील मुलखात लुटालूट केली आहे. त्याच्यावर सुलतानाने असीराव नावाच्या अधिकाऱ्याला पाठविले. असीरावाने परतबसाचा पराभव करून बस्तरला वेढा दिला. वेढ्यात यश न आल्याचे असीरावाने सुलतानाकडे कळविले. सुलतानाने आपला वजीर मीर महमद अमीन याला असीरावाच्या मदतीसाठी पाठविले. परतबसाने आजूबाजूच्या राजांना मदतीला बोलावून मुसलमानांचा प्रतिकार करण्याची तयारी केली परंतु एकाएकी पाऊस कोसळल्यामुळे मुसलमानांचा उद्देश सिद्धीस गेला नाही. मीर महमद अमीन याने माघार घेतली. त्याच्या मदतीला सुलतानाने मलिक बिर्लास याला रवाना केले.

हिजरी १०२०, जिलकाद १७, इ. स. १६११, डिसेंबर १७ — यानंतर लवकरच **जिलकाद** महिन्याच्या १७ तारखेला शनिवारी **हिजरी १०२०** या वर्षी महमद कुली कुतूबशहा हा एकाएकी आजारी पडला आणि दोन दिवसांनंतर तो मरण पावला. त्यावेळी त्याचे वय ४९ वर्षांचे होते आणि त्याची कारकीर्द ३४ वर्षे झाली होती.

---

# सूची*

पृष्ठे

'अ'



---

* श्री. श्याम कृ. खिलारे, दर्शनिका कार्यालय, मुंबई, यांनी ही सूची तयार केली.

पृष्ठे

पृष्ठे

पृष्ठे

'ख'

'फ'

पृष्ठे

पृष्ठे

पृष्ठे

पृष्ठे


प्र/१४०
2
ग्रंथालय